श्रीमत्सद्गुरुहंसराजस्वामिविरचित

# आगमसार



हंसमंडळ, परंडा

श्रीमत्सद्गुरुहंसराजस्वामिविरचित

# आगमसार

श्रीमत्सद्गुरु "हंसराज" इति ये ख्याता महाराष्ट्रिकाः
अद्वैतप्रतिपादने निपुणता येषां च मान्या बुधैः ।
येषां पादरजोभिरावृततया धन्या "परांडा" पुरी
तेषां "आगमसार" सत्कृतिमिमां गृह्णन्तु विद्वज्जनाः ।।

संपादन आणि गद्यानुवाद
**कल्याण काळे**

**हंसमंडळ, परंडा**

## पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

प्राकृत लघुवाक्यवृत्तीचे कर्ते प्रसिद्ध श्रीमत् हंसराज स्वामी यांनी लिहिलेला 'आगमसार' हा आजवर अप्रकाशित ग्रंथ आहे. परांडा येथील हंसमंडळानें स्वामींचे अप्रकाशित ग्रंथ प्रकाशन करण्याचे ठरविले व त्या दिशेने होणाऱ्या प्रयत्नांचे हे पहिले फळ आहे. महाराष्ट्रीय वेदान्तप्रेमी जनांनी या मंडळाच्या सुकृतीबद्दल त्यांचे आभार मानणे अवश्य आहे.

श्रीहंसराज स्वामी हे इतके प्रसिद्ध वेदांती आहेत व त्यांचा या मार्गातील अधिकारही इतका सर्वमान्य आहे की मजसारख्याने त्यांच्या ग्रंथावर अभिप्रायवजा प्रस्तावना लिहून त्यांना विद्वज्जनांसमोर मांडण्याचे कारण नाही. श्री हंसराजस्वामी हे पंढरपुरात बरीच वर्षे वास्तव्य करून होते. यामुळे त्यांच्या प्रतिपादनात संस्कृतग्रंथांप्रमाणेच ज्ञानेश्वरी आदी प्राकृत ग्रंथांतील आध्यात्मिक विचार पहावयास मिळतात. जुने संप्रदायी ज्याप्रमाणे अनुबंधचतुष्टय ग्रंथारंभी देतात तशाचसारखे खालील चार शब्द लिहीत आहे.

आगमसार या ग्रंथाचा विषय औपनिषदीय जीवब्रह्मैक्य असा आहे व तो निरनिराळ्या युक्त्यांनी तीव्रमंदादी अधिकाऱ्यांकरिता स्वामींनी फारच सुंदर रीतीने मांडून ठेवला आहे.

ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग केले आहेत व प्रत्येकातील लहान विभागास पंचिका असे नाव दिले आहे. प्रत्येक पंचिकेत अनेक समास आहेत. एक एक समास अद्वैत वेदांताच्या वेगवेगळ्या विषयाच्या चर्चेस वाहिला आहे. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे वेदान्ताच्या अभ्यासूंस सर्वसाधारण येणाऱ्या शंका मांडून त्यांची उत्तरे पटतील अशीच दिलेली आहेत. प्रश्नोत्तराच्या रूपाने चर्चा केलेली असल्याने जिज्ञासूंस विषय समजण्याची उत्तम सोय झाली आहे.

साधकाच्या दृष्टीने तर या पुस्तकातील काही भाग फारच महत्त्वाचा आहे. यात वेगवेगळ्या प्रकारचे अभ्यास साधकांकरता सांगितले आहेत. तात्पर्य, नुसती तत्त्वचर्चा शुद्ध व पटेल अशा रीतीने केली असती तरीसुद्धा ग्रंथ वाचनीय झाला असता; पण शुद्ध वेदान्त चर्चेशिवाय यात साधकाकरिता साधनेही सांगितली असल्याने ग्रंथास विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे.

लघुवाक्यवृत्तीपेक्षा या ग्रंथात मोकळेपणा आहे. कारण हा ग्रंथ लघुवाक्यवृत्तीवरील टीकेसारखा टीकाग्रंथ नाही. श्रीहंसराजस्वामींनी उपनिषदाचे सार सांगताना आपणास योग्य वाटेल अशी विषयास अनुसरून मांडणी केली आहे.

साधकाने ग्रंथ वाचून त्यातील उपदेश आचरणात आणावा असा हा ग्रंथ आहे. परंडा येथील श्री. हंसमंडळाने हा ग्रंथ छापून जसा महाराष्ट्रीय अध्यात्मप्रेमी वर्गावर उपकार केला तसाच इतर अप्रकाशित ग्रंथ छापून करावा व ज्यांना द्रव्यरूपाने साहाय्य करणे शक्य असेल त्यांनी या मंडळाला अवश्य साहाय्य करावे. कार्य साहाय्य करण्यालायक आहे.

चैत्र वद्य १३ शके १८६२ — **शंकर वामन दांडेकर**

पुण्यपत्तन

## प्रकाशकांचे चार शब्द

प.प. हंसराजस्वामिकृत आगमसाराची ही दुसरी आवृत्ती वाचकांची हाती देताना आम्हांला अतिशय आनंद होतो आहे. त्याची पहिली आवृत्ती इ. स. १९४० मध्ये हंसमंडळानेच प्रसिद्ध केली होती. त्यावेळी फक्त तीनशेच प्रती काढल्या होत्या. त्यामुळे त्या लवकरच संपून गेल्या. त्यामुळे बऱ्याच वर्षांपासून आगमसार हा ग्रंथ दुर्मीळ होता. त्यामुळे अभ्यासकांनाही त्याची माहिती नाही अशी परिस्थिती निर्माण झाली होती. ही दुसरी आवृत्ती काढावी अशी मनात खूप इच्छा होती, पण तो योग येत नव्हता.

सुदैवाने तो योग जुळून आला. विदर्भातील एक थोर सत्पुरुष आणि हंसराजस्वामींचे भक्त असलेल्या कै. हरिभाऊ धनकर यांच्या जन्मशताब्दीच्या वर्षाच्या निमित्ताने धनकर परिवारातील सन्मित्रांनी हा ग्रंथ प्रकाशित करण्याची इच्छा प्रकट केली. दोन वर्षांपूर्वी हंसराजस्वामींच्या 'कथाकल्पलता' या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशनासाठी याच मंडळींनी सिंहाचा वाटा उचलला होता. आगमसाराच्या या प्रकाशनाच्या वेळीही हीच मंडळी तत्परतेने पुढे आली. यातून त्यांचा हंसराजस्वामींविषयीचा आपुलकीचा भाव स्पष्ट दिसून येतो. हंसमंडळाला त्यांच्याबद्दल मनापासून कृतार्थता वाटते. या आवृत्तीच्या प्रकाशनासाठी आवश्यक ती आर्थिक सेवा उपलब्ध करून दिल्याबद्दल हंसमंडळ धनकर परिवारातील प्राचार्य मदनराव हरिभाऊ धनकर, श्री. वा. शं. राजयोगी, चंद्रपूर; श्री. रमेश संत, यवतमाळ; श्री. अशोक व सौ. अरुणा यावलकर, मुंबई; श्री. सुमित व सौ. माधवी यावलकर (अमेरिका); श्री. गंगाधरराव हरिभाऊ धनकर या सर्व सद्‌गृहस्थांचे ऋणी आहे.

कै. श्री. हरिभाऊ धनकर हे चंद्रपूर येथे शिक्षक होते. ते अतिशय सात्त्विक प्रवृत्तीचे असून परमार्थातून मिळवलेले श्रेष्ठ समाधान हे त्यांचे ऐश्वर्य होते. ते समर्थ रामदासस्वामी, प.प. हंसराजस्वामी, प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज या थोर संतांचे निस्सीम भक्त होते. स्वतःची नोकरी सांभाळून ते वरील सत्पुरुषांच्या वैचारिक धनाचा आयुष्यभर प्रसार करत राहिले. हंसराजस्वामींचे वेदेश्वरी, वाक्यवृत्ती, आगमसार हे ग्रंथ त्यांच्या अत्यंत आवडीचे होते. त्यांची हंसराजस्वामींवर अतिशय निष्ठा असल्यामुळे त्यांच्या साक्षात्काराचेही भाग्य त्यांना लाभले होते. ते वरील तीन सत्पुरुषांच्या ग्रंथांवर केवळ प्रवचनेच करत नसत तर प्रत्यक्ष जीवनातही त्यांचे तत्त्वज्ञान जगत होते. प. प. हंसराजस्वामींच्या या आगमसार ग्रंथाच्या प्रकाशनासाठी त्यांच्या जन्मशताब्दीच्या वर्षाचा योग यावा आणि त्यांच्याच परिवारातील वरील व्यक्ती त्या प्रकाशनासाठी आर्थिक सेवा करण्यास उत्साहाने पुढे याव्यात हा एक दुग्धशर्करायोगच मानावा लागेल.

या आवृत्तीत आम्ही आगमसाराचा गद्य अनुवाद समाविष्ट केला आहे. आगमसार हा ग्रंथ तसा

छोटेखानी ग्रंथ असून त्याची ओवीसंख्या ३५२६ इतकीच आहे. पण ग्रंथ आकाराने लहान झाला म्हणून काय झाले? स्वामींनी त्यात सर्व प्रमुख उपनिषदांचे सार सिद्धान्तरूपाने मांडले आहे. हे करताना त्यांनी त्याला सुगमता आणण्याचा खूप प्रयत्न केला आहे. उपनिषदांचे सार सांगताना त्यांनी वक्ता आणि श्रोता अशा पात्रांची कल्पना करून त्यांच्या संवादातून ते सांगितले आहे. जागोजागी स्वमतपुष्ट्यर्थ दृष्टान्तांचा वापर केला आहे. अनेक लोकोक्तींचा आधार घेतला आहे. प्रसंगी काही कथाही सांगितल्या आहेत. त्यांच्या ओवीची रचना प्रवाही असून भाषा प्रासादिक आहे. पण त्यांचा विषयच मुळात जटिल आणि परिभाषाप्रचुर असल्याने तो अनेक ठिकाणी दुर्बोध वाटतो. एका वाचनात तर ही स्थळे स्पष्ट होतच नाहीत. तेव्हा वाचकांची ही गैरसोय दूर करण्यासाठी त्यांना थोडी मदत व्हावी या हेतूने त्या ओव्यांचा आजच्या गद्य भाषेत अनुवाद द्यावा अशी कल्पना मनात आली. हा अर्थानुवाद देताना अनेक ठिकाणी स्पष्टीकरणात्मक मजकुराची जोड त्याला द्यावी लागली. कठीण शब्दांचे अर्थ शक्यतो स्वतंत्र न देता मूळ अनुवादाच्या मजकुरातच सामावून घेतले आहेत. तरीसुद्धा तळटिपा, संदर्भ आणि शब्दार्थ यांच्या विभागात अनेक शब्दांचे अर्थ स्वतंत्रपणेही दिले आहेत. हा अनुवादार्थ सुबोध होण्यासाठी शक्य तेवढे प्रयत्न केले आहेत. तरीसुद्धा विषयाच्या स्वरूपामुळेच तो दुर्बोध राहिला असण्याची शक्यता नाकारता येत नाही. हंसराजस्वामींचे इतर ग्रंथ ज्यांनी अभ्यासले असतील, त्यांच्या सिद्धान्तांशी ज्यांचा अगोदरच परिचय झालेला आहे, अशांना या ग्रंथातील विषय अनोळखी वाटणार नाहीत. ग्रंथ एकदा वाचून कठीण वाटला तरी दुसऱ्या वाचनाच्या वेळी तो सुबोध वाटायला लागतो असा अनुभव आहे. वाचकांच्या सोयीसाठी ग्रंथातील मजकुराला अनुसरून काही तालिका तयार केल्या आहेत. त्या शेवटी परिशिष्टात दिल्या आहेत. पहिल्या आवृत्तीच्या संपादकांनी पुष्कळ मेहनत घेऊन ती आवृत्ती सजवली होती. निर्दोष मुद्रण हा एक तिचा विशेष होता. प्रत्येक पृष्ठाखाली दिलेल्या तळटिपाही उपयुक्त होत्या. त्याशिवाय आगमसारातील सर्व विषयांची बयाजवार सूचीही त्यांनी दिली होती. ही सारी वैशिष्ट्ये या आवृत्तीतही आणण्याचा यथाशक्ती प्रयत्न केला आहे. पहिल्या आवृत्तीला वै. ह.भ.प. मामासाहेब दांडेकरांनी प्रस्तावना दिली होती. तीही या आवृत्तीत समाविष्ट केली आहे. या प्रस्तुतच्या आवृत्तीचा विशेष म्हणजे तळटिपांच्या विभागात हंसराजस्वामींच्या विवेचनात उपनिषदे, पंचदशी, भगवद्गीता, दासबोध, विवेकसिंधू या ग्रंथातील मजकुराचे अनुसरण करणाऱ्या ओव्या आल्या आहेत. तेव्हा थोडा प्रयत्न करून त्या ओव्यांमागील मूळ ग्रंथातील आधार त्यांच्या अर्थासहित देण्याचा प्रयत्न केला आहे. ग्रंथविस्तार होऊ नये म्हणून पूर्वसूरींच्या मराठी ग्रंथांचे सगळे आधार मात्र देता आले नाहीत.

या ग्रंथाच्या सिद्धतेसाठी अनेक जणांचे हात लागले आहेत. आमचे मित्र डॉ. द. दि. पुंडे, श्री. रा. शं. नगरकर हे या ग्रंथाच्या निर्मितीमध्ये आरंभापासून लक्ष घालत आहेत. त्यांच्या ग्रंथनिर्मितीच्या क्षेत्रातील पूर्वानुभवाचा आम्हांला खूपच लाभ झाला. त्यांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक आभार मानतो. धनकर परिवारातील मान्यवरांच्या सहकार्याबद्दल वर निर्देश झालाच आहे. त्या सर्व सन्मित्रांचे आभार मानणे हे आमचे कर्तव्यच आहे. मित्रवर्य श्री. गंगाधरराव धनकर यांनी कै. हरिभाऊ धनकर आणि प.पू.सागडे

महाराज यांची छायाचित्रे, कै. हरिभाऊ धनकरांच्या संदर्भातील पद्यरचना इत्यादी साहित्य धावपळ करून उपलब्ध करून दिले याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत. या ग्रंथाचे डी.टी.पी. मुद्रण करण्याची जबाबदारी गुरुकुल टाइपसेटर्सच्या डॉ. अंजली जोशी यांनी स्वीकारली. त्यांनी ती मोठ्या आत्मीयतेने पार पाडली. त्यांचेही आम्ही आभार मानतो. या ग्रंथाचे मुद्रण स्मिता प्रिंटर्स, सदाशिव पेठ, पुणे या छापखान्यात झाले. या छापखान्याचे संचालक श्री. हेमंत जोशी यांनी केवळ मुद्रणच नव्हे तर मुखपृष्ठ, ग्रंथछपाई व त्याची बांधणी या सर्व कामांची जबाबदारी घेऊन आमचा भार कमी केला. हे सर्व काम त्यांनी आत्मीयतेने आणि तत्परतेने करवून घेतले. ग्रंथाच्या नीटस आणि सौंदर्यपूर्ण निर्मितीचे सर्व श्रेय त्यांचे आहे. त्याबद्दल ते व त्यांचे कार्यालयीन सर्व सहकारी यांचे आम्ही मनापासून आभार मानतो. हंसराजस्वामींचा बरीच वर्षे दुर्मिळ असलेला हा ग्रंथ वाचकांना समाधान देईल अशी आम्ही आशा बाळगतो.

१२ डिसेंबर २००८ **हंसमंडळ, परंडा**

दत्तजयंती

## तीर्थरूप श्री. हरिभाऊ धनकर ऊर्फ अण्णासाहेब धनकर

बाळपणापासूनी जडला, वेदान्ताचा छंद
प्रभुचरणांच्या भक्तीवाचुन, नसेचि दुसरा नाद
निर्व्यसनी शीलवान सात्त्विक, असे आपुली काया
रोमी रोमी रामप्रभुंनि तिस, वसती केलि रहाया॥१॥

प्रपंच साधुनि परमार्थसहि, करिता शुद्धमती
तुकारामची दुसरे, अथवा एकनाथ गमती
रामभक्तियुत देह साजिरा, दिसति रामदास
एक्या देही त्रिविध भासती, दत्तात्रय खास ॥२॥

रूप आपुले सतेज सुंदर, हर्ष देतसे मना
सद्‌गुणसुगंध वितरुनि भवती, पावन केले जनां
ज्ञान विरक्ती भक्तिनीतिची, मूर्तिच ही गोजिरी
रामभक्तिची ध्वजा रोविली, भाविक मनमंदिरी ॥३॥

श्रीकृष्णाची मुरली ऐकिलि, अपुल्या वाणीमध्ये
श्रीरामांचे धनुष्य प्रकटे, अपुल्या बाहूंमध्ये
वचनी करणीं चिंतनि अपुल्या, सदा प्रकटला राम
चारी मुक्ती साऱ्या शक्ती, यांचे आपण धाम ॥४॥

धन्य धन्य ते मानव ज्यांनी, ऐकिलि अपुली वाणी
दासबोध ज्ञानेश्वरि प्रवचनि, पडली ज्यांच्या कानी
ज्ञानेश्वर, एकनाथ आणी समर्थ, बाबाजींनी
वरदहस्त आपुल्या ठेविला,मस्तकि प्रसाद म्हणुनी॥५॥

मोहिनिराज बाबाजी हे, सद्‌गुरु जीवनि आले
महत्त्व त्यांचे गावयास हे, शब्दचि अपुरे पडले
दिव्य तयांच्या उपदेशांनी, जीवन उजळुनि गेले
राममंत्र नित हृदयी जपता, जीवन सोने झाले॥६॥

सागरलाटा ओसरल्यावर, पुलिनी ओल रहाते
तसेच आपण सोडुन गेला,परि मन स्मृतीत रमते
आपण दिधल्या ज्ञानाच्या या, पुंजीवरती जगतो
कसले स्थावर जंगमादि?
हे धनचि खरे त्या पुजतो ॥७॥

**–गंगाधर हरिभाऊ धनकर**

## गुरुवर्य श्री. हरिभाऊ धनकर

हरि हरि म्हणता,
सदाचार स्मरे ।
हरि-सत्संगी रमता,
चित्त नामीं जडे ॥१॥
हरि स्पर्शिता वंदिता,
पापक्षय तो घडे ।
हरिते आलिंगता,
ज्ञानवृत्ति ती नुरे ॥२॥
हरिशी संभाषणे,
संतकथा ये श्रवणीं ।
प्रपंच परमार्थांचे,
समतोलन आकळे ॥३॥
हरि ग्रामस्थ होउनी,
मोहिनिराजतेजे उजळुनी
श्रीरामप्रभुचरणाते पुजुनी ,
नामयोगी जाहले ॥४॥
हरि आत्मारामी पावुनी,
स्वजनां सन्मार्ग दावुनी ।
'सिताराम सुतास' सत्पथ,
सांगुनी ब्रह्मलीन जाहले ॥५॥

**–वासुदेवानंद शंकरानंद**
१०/१/२००७



# श्री. हरिभाऊ धनकर, चंद्रपूर

## –संक्षिप्त परिचय–

श्री. हरिभाऊ गणपतराव धनकर हे दासबोध जगणारे एक समर्थभक्त. चंद्रपूर येथे शिक्षक, वैद्य व प्रवचनकार असं त्यांचं तीन क्षेत्रांतील कार्य ५० वर्षे लोकांनी पाहिलं अन् अनुभवलं. त्यांना आपल्या आयुष्यात अनेक थोर सत्पुरुषांचा सहवास व अनुग्रह लाभला. त्यामुळे त्यांनी आपले सर्व जीवन या संत सज्जनांच्या कृपाछायेत संतांच्या साहित्याचे वाचन, मनन, चिंतन करण्यात आणि कीर्तन, प्रवचन या माध्यमांतून लोकांमध्ये त्यांचा प्रसार करण्यात घालविले. आपल्या वैयक्तिक जीवनात ते अत्यंत सात्त्विक पुण्यशील सत्पुरुष म्हणूनच सर्वज्ञात होते. त्यांचा जन्म विदर्भातील वणी जि. यवतमाळ येथे त्यांच्या मातामहांच्या घरी दि. ३ जुलै १९०७ रोजी झाला. वयाच्या तिसऱ्याच वर्षी त्यांचे पितृछत्र हरवले. त्यामुळे त्यांचे बालपण आजोळातच गेले. आरंभीचे शिक्षणही तेथेच झाले. शालांत परीक्षा नागपूरच्या पटवर्धन हायस्कूलमधून त्यांनी दिली. त्यांचा विवाह १९३२ साली झाला. परमार्थाच्या पायावरच त्यांचा प्रपंच उभा राहिला. त्यांचे मातामह वणी, जि. यवतमाळ, येथील भागवतोत्तम श्री. श्रीनिवास नीळकंठ ऊर्फ आप्पाजी महाराज ढुमे ह्यांच्या सहवासात त्यांचं बालपण गेलं. लहानपणापासून असणाऱ्या रामभक्तीला आणि रामनामप्रेमाला आप्पाजी महाराजांकडून खतपाणी, मागदर्शन मिळालं. परमहंस परिव्राजकार्य श्री. वासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामी महाराज ह्यांचे अधिकारी शिष्य श्री. बाबाजी महाराज ग्रामस्थ, लोधीखेडा जि. छिंदवाडा हे श्री. हरिभाऊंचे मोक्षदाते सद्गुरू. समर्थ संप्रदायातील कल्याण स्वामींच्या परंपरेतील सातवे पुरुष समर्थभक्त श्री. मोहिनीराजबाबा सागडे आसिफाबाद, हे त्यांचे ज्ञानदाते सद्गुरू होत. प्रज्ञाचक्षू मधुराद्वैताचार्य ज्ञानेश्वरकन्या श्री. गुलाबरावमहाराजांचे पट्टशिष्य व उत्तराधिकारी श्री. बाबाजीमहाराज पंडित ह्यांचा श्री. गुलाबराव महाराजांचे संमतीने हरिभाऊंना कृपालोभही लाभला. अशा तीन ब्रह्मनिष्ठ व श्रोत्रीय गुरुवर्यांच्या मार्गदर्शनाखाली श्री. हरिभाऊंनी प्रपंच परमार्थाची सांगड घालीत आपलं जीवन व्यतीत केलं.

१९३१ साली नागपूर येथे प. पू. श्री. बाबाजीमहाराज ग्रामस्थ ह्यांनी स्वत:हून श्री. हरिभाऊ धनकरांना अनुग्रह दिला. बाबाजीमहाराजांनी दिलेल्या उपासनेनुसार प्रपंच परमार्थ करीत ते चंद्रपूरच्या न्यू इंग्लिश हायस्कूलमध्ये १९३७च्या सुमारास स्थिरावले. १९४३ साली त्यांचे सद्गुरू श्री बाबाजीमहाराज ग्रामस्थ ह्यांनी स्वत:ची ब्रह्मलीन होण्याची वेळ आली असं पाहून श्री. हरिभाऊंना बोलावलं व त्यांना "तू माझ्या पादुका घेऊन जा" असं म्हणाले. श्री. हरिभाऊ म्हणाले, 'लाकडाच्या पादुका नेऊन काय

करू?' मला तुमच्या पादुका नकोत. बाबाजी म्हणाले, "मग तुला काय पाहिजे?" तेव्हा हरिभाऊ म्हणाले, "असं काही तरी भव्य द्या जेणेकरून जन्ममरणाचा फेरा चुकेल." तेव्हा बाबाजीमहाराज म्हणाले, "अच्छा मैं तुम्हे चांदा में (चंद्रपूरचं जुनं नाव) एक सालबाद मिलूँगा!" कालांतराने बाबाजीमहाराजांनी देह ठेवला.

१९४४ साली याच न्यू इंग्लिश स्कूल विद्यालयात समर्थभक्त श्री. मोहिनीराज सागडेबाबा शिक्षक म्हणून रुजू झाले. वर्गशिक्षकांच्या कक्षात परस्परांची आयुष्यात प्रथमच भेट झाली, तेव्हा श्री. सागडेबाबा म्हणाले ह्यांना म्हणाले, "आपण एक वर्षानंतर भेटत आहो." मोक्षदाते सद्गुरू श्री बाबाजीमहाराज ग्रामस्थ यांच्या कृपेने ज्ञानदाते सद्गुरू श्री सागडेबाबा ह्यांना लाभले व परमार्थातील प्रगतीचा नवा पर्वकाळ सुरू झाला. श्री. सागडेबाबा यांनी त्यांना श्री. हंसराजस्वामी यांच्या "वाक्यवृत्ती"च्या साहाय्याने परमार्थ शिकवला. सोबतच श्री एकनाथी भागवत, वेदेश्वरी, दासबोध आदी ग्रंथांवरून १९४४ ते १९४८ पर्यंत चंद्रपूर मुक्कामी ज्ञान प्रदान केले.

"परमार्थ हा शिकवता येतो व तो मला श्री. सागडेबाबांनी शिकविला" असे श्री. हरिभाऊ धनकर नम्रतेने मुमुक्षूंजवळ सांगावयाचे. श्री सागडेबाबांनी इ. स. १९४८ च्या अखेरीस न्यू इंग्लिश हायस्कूलची नोकरी सोडली व ते आपले मूळ गावी आंध्र प्रदेशातील 'आसिफाबाद' येथे स्थायिक झाले. यानंतर श्री. हरिभाऊ धनकर यांचे परस्पर चंद्रपूर-आसिफाबाद असे जाणे-येणे असायचे. श्री सागडेबाबा यांच्यानंतर स्थानिक श्री नानाजीमहाराज त्रिपुरवार, यांच्या श्रीराम मंदिरात श्री. हरिभाऊंची प्रवचनसेवा सुरू झाली. याच साधनकाळात श्री सागडेबाबा यांचे कनिष्ठ चिरंजीव ॲडव्होकेट नारायणराव सागडे या अद्वैत प्रेमात सामील झाले.

मार्गशीर्ष वद्य प्रतिपदा इ. स. १९५१ साली श्री सागडेबाबा ब्रह्मलीन झाले आणि श्री. हरिभाऊ धनकर व ॲडव्होकेट नारायणराव सागडे ह्या द्वयीने दासबोध, श्री हंसराज स्वामींचे ग्रंथ, ज्ञानेश्वरी, श्रीमद्भागवत यांचे अध्ययन करून ते भक्तिसाधनेच्या अंतरंगी रमले. याच काळात प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज यांच्या कृपेने त्यांचे पट्टशिष्य वेदान्तकेसरी श्री बाबाजीमहाराज पंडित यांच्या आंतरिक मार्गदर्शनाचा लाभ ह्यांना मिळाला. इ. स. १९७२ पासून श्री. निकालस मंदिराचे श्रीनिकालसभक्त **प. पू.** श्री. रामभाऊ महाराज कावडकर यांच्याशी सुद्धा वरील श्रेष्ठद्वयांचा आंतरिक धागा जुळून आला.

श्री. हरिभाऊ धनकर हे दि. २५ ऑक्टोबर १९८८ (आश्विन वद्य प्रतिपदेस) रोजी ब्रह्मलीन झाले. त्यांच्या पश्चात सध्या आसिफाबाद निवासी श्री नारायणराव सागडे हा स्वानंदाचा वारसा आपले बंधुतुल्य स्नेही श्री. मधुकरराव आचार्य यांच्या सहकार्याने चालवीत आहेत. श्री नारायणराव व श्री. मधुकरराव ह्या दोघांनी मिळून श्री. सागडे महाराजांनी स्थापन केलेल्या आसिफाबाद येथील हनुमान मंदिरात, श्री सागडेबाबा व श्री. हरिभाऊ धनकर ह्यांनी दिलेल्या मार्गदर्शनानुसार रामोपासना आजतागायत अव्याहत सुरू ठेवली आहे.

श्री. समर्थ संप्रदाय, दत्तसंप्रदाय, वारकरी संप्रदाय व मधुराद्वैत संप्रदाय ह्यांच्या वाङ्‌मयाचा श्री. हरिभाऊंचा गाढा व्यासंग होता. ह्याच संप्रदायाचे सत्पुरुषही त्यांच्या जीवनात आले व त्यांना कृतार्थ करून गेले. हंसराजस्वामींच्या ग्रंथांचाही त्यांचा खूप व्यासंग होता. त्यांना हंसराजस्वामींचा साक्षात्कारही झालेला होता.

श्री समर्थांच्या उद्धव स्वामींच्या परंपरेतील सातवे पुरुष परमहंस हंसराज स्वामी ह्यांच्या 'आगमसाराचे' श्री समर्थांच्याच कल्याण स्वामींच्या परंपरेतील सातवे पुरुष श्री मोहिनीराजबाबा सागडे यांचे कृपांकित श्री. हरिभाऊ गणपतराव धनकर ह्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त होणारे हे प्रकाशन, हा श्री समर्थ रामदास स्वामींच्या कृपेने आलेला एक सुंदर योगच म्हणावयाचा!

**–वा. शं. राजयोगी, चंद्रपूर**



# श्री सद्गुरू हंसराज स्वामी, परंडा



जन्मशक श्रावण शु. १४ शके १७२७, परभणी, समाधिशक वैशाख शु. ८ शके १७७८, परंडा

श्रीमत् परिव्राजकचक्रचूडं ज्ञानोपदेशाय गृहीतमूर्तिम् ।
अनुग्रहं धारयन्तं जनेषु नारायणं तं गुरुमानतोऽस्मि ।।

# समाधीस पाहून

निशिंदिनिं झुरतां हा जातसे जन्म वाया
न च कुणि भवपाशांपासुनी सोडवाया
म्हणुनि शरण आलों तारि रे पामरा या
त्यजुनि झणिं समाधी धांव रे हंसराया - १

श्रवण मनन जें त्या नित्य जातों कराया
गुरुविण करि जे त्यां व्यर्थता ये उपाया
तरि तव पदसेवा शिष्यभावें घडाया
त्यजुनि झणिं समाधी धांव रे हंसराया - २

दिशिं दिशिं फिरलों रे सद्गुरूंते वराया
परि मुख फिरवीती पाहुनी दुर्भगा या
तुजविण कुणि नाहीं दुःख माझें हराया
त्यजुनि झणिं समाधी धांव रे हंसराया - ३

क्षण न तुजसि "पूर्णानंद"[१] ते उद्धराया
तदनु करिसि "योगानंद"[२] उत्तीर्णमाया
झडकरि तरि माते मुक्त तेवी कराया
त्यजुनि झणिं समाधी धांव रे हंसराया - ४

"चिमणकवि"[३] निघाले पैलतीरास जाया
तंवचि तव कृपेनें "गोडबोले"[४] सजाया
अगतिक भवतप्ता सेवका शांतवाया
त्यजुनि झणिं समाधी धांव रे हंसराया - ५

मज निकटनिबद्धा एकली एक जाया
म्हणसि तरि तिलाही वेळ नाहीं त्यजाया
परि तव करुणेची साउली ती कराया
त्यजुनि झणिं समाधी धांव रे हंसराया - ६

त्रिभुवनिं भरलेली मोहिते ईशमाया
तळमळ हृदयाची शब्द नाहीं वदाया
तुजसम मज नाहीं स्थान कोठें रमाया
त्यजुनि झणिं समाधीं धांव रे हंसराया - ७

नमन करुनि आतां शीर्षसाष्टांग पायां
विनवि तुजसि देहाहंकृती घालवाया
सविनय सुमपद्यें अर्पिली स्वीकराया
त्यजुनि झणिं समाधी धांव रे हंसराया - ८

---

१. स्वामींचे शिष्य
२. स्वामींचे मित्र व पंचदशीचे प्राकृत टीकाकार
३. स्वामींचे शिष्य व "हंसपद्धति" ग्रंथाचे कर्ते.
४. स्वामींचे शिष्य व "हंसकोश", "भारतवर्षीय प्राचीन आणि अर्वाचीन कोश" इत्यादी ग्रंथांचे कर्ते.

# श्रीमत् प.प. हंसराजस्वामी यांचे चरित्र

श्रीमत्सद्गुरू हंसराजस्वामींचे शिष्य चिमणकवि व संजीवन यांनी केलेल्या 'हंसपद्धति' नामक ओवीबद्ध ग्रंथात स्वामींची गुरुपंरपरा व शिष्यमंडळ यांसह श्रीस्वामींचे विस्तृत चरित्र वर्णिले आहे. हा ग्रंथ वाचकांच्या अवलोकनात असेल असे नाही, आणि त्यांना या चरित्राची जिज्ञासा असणारच. त्यांच्यासाठी येथे ते चरित्र थोडक्यात दिले आहे.

**पूर्वजवृत्त**

गोदावरीच्या उत्तरेस १०/१२ कोसांवरील परभणी नामक गावी शालिवाहन शकाच्या १७व्या शतकाच्या उत्तरार्धात रामचंद्रपंत नावाचे सावकार राहत असत. त्यांच्या मुलाचे नाव गंगाधर; त्यांस रेणुकाबाई नामक पत्नीपासून तीन मुलगे झाले; त्यांपैकी मधल्याचे नाव नारायण. हाच पुढे हंसराजस्वामी या नावाने प्रख्यात झाला. गंगाधरपंतांनी वडिलार्जित सावकारीचा धंदा न करिता, मामलती पेशकारी करण्याचा पेशा पत्करला होता.




जन्मलग्न : ६ रा. १ अं. ३४ क. ८ वि.

रघुनाथशास्त्री गोडबोलेकृत हंसकोश व भारतीय अर्वाचीन कोश यात श्रीहंसराजस्वामींच्या जन्मशकाबद्दल वेगवेगळे उल्लेख असल्याने जन्माचे वर्ष निश्चित करणे फार कठीण झाले होते; पण हंसपद्धतीतील ("श्रावणमासी श्रवण अभिजितावरी । जन्मले बाळ ।।" "अभिजित मुहूर्तीच माध्यान्हकाळीं । बाळ जन्मे गंगाधर कुळीं ।।") या उल्लेखाच्या धाग्याच्या साह्याने शक १७२० की १७२७ यांचा निर्णय केसरीचे माजी संपादक श्री. तात्यासाहेब करंदीकर, ज्योतिषाचार्य डॉ. ह. स. राजंदेकर प्रभृति ज्योतिषशास्त्रवेत्त्यांनी करून महाराजांची कुंडली वरीलप्रमाणे सिद्ध करून दिली, संकेतकुबडीच्या वाचकांचे हे सुदैव होय असे आम्ही समजतो.

श. १७२७ श्रावण शु. १४ शुक्रवार घ. २३ प.८, उत्तराषाढा घ.८ आयुष्मान योग घ.३१

प.१९, दि.मा.घ.३२ प.२ (दिनांक ९/८/१८०५) जन्मेष्ट घ.१२ प.३० (दुपारी ११वा. ५१ मि.) या समयास हंसराजस्वामींचा जन्म झाला. हंसपद्धतीतील श्रावण मास, श्रवण अभिजित, मध्यान्हकाळ आदी सर्व योग या कुंडलीशी मिळत असून भावी फलादेशही पूर्वचरित्रकारांनी केलेल्या वर्णनाशी जुळतो. स्वामीमहाराजांच्या स्वरूपाचे वर्णन रघुनाथशास्त्री गोडबोले यांनी पुढीलप्रमाणे केले आहे.

"यांचा बांधा फार उंच किंवा ठेंगणा, अतिकृश किंवा अतिस्थूल नसून मध्यम प्रतीचा होता. यांची अंगकांति पिवळट गौर वर्णाची होती. नाक सरळ, डोळे मोठे, पावले लहान व आवाज खणखणीत होता."–भारतवर्षीय.....कोश.

या वर्णनाशी व पुढे दिलेल्या चरित्राशी या कुंडलीचा किती मेळ बसतो याचे संशोधन आमच्या वाचकांपैकी ज्योतिषशास्त्रवेत्ते असतील त्यांनी करून आम्हांस कळविल्यास आम्हांवर व एकंदर हंसभक्तांवर त्यांचे उपकार होतील. तथापि ज्या ज्योतिषशास्त्रज्ञांच्या परिश्रमांनी ही जन्मतिथी व कुंडली प्रथम उपलब्ध झाली, त्यांचे येथे अभिनंदन केल्यावाचून आम्हास राहवत नाही; ते आमचे कर्तव्य आहे.

### बालपण व विवाह

स्वामींचे आईवडिलांनी ठेवलेले नाव नारायण असे होते. पुष्कळ थोर लोकांचे बाळपण हालअपेष्टात गेल्याचे इतिहासावरून दिसून येते, त्यास नारायणाचे चरित्र अपवाद नाही. हे मूल सुमारे १। वर्षाचे झाले असेल नसेल इतक्यात, यवनांनी गंगाधरपंतांचे घर लुटले. गंगाधरपंतास रोजगार होता तो सुटून त्यांचे मागे भ्रमंती व विवंचना लागली; ती इतकी की, 'एकचि चक्र करांगुळीसी । ऊर्ध्व रेषा असे चरणासी । हा राजाचि व्हावा निश्चयेसी । परी येक चिन्हे प्रतिबंध ।।' अशा प्रकारे ज्योतिष व सामुद्रिक शास्त्रज्ञ यांनी मुलाच्या पुढील भवितव्याबद्दल प्रतिज्ञापूर्वक आश्वासन दिले होते; तरी तापट स्वभावाच्या गंगाधरपंतांस वाटे की, या पोराच्या पायगुणामुळे आपणास हे दैन्य आले आहे, हा 'मरे तरी बरें होते!'

परभणीचा रोजगार सुटल्यामुळे गंगाधरपंत सकुटुंब पेडगावी काही काळ राहिले, तेथेच नारायणाची मुंज झाली. नंतर कुलाचार म्हणून तुळजापूर व सोनारी येथे आणि पंढरपूर येथेही पंत मुलाबाळांसह दर्शनास जाऊन आले. काही दिवस भाळवणी येथे आपल्या शालकाच्या घरी राहिले; पण उद्योगधंद्याचा मेळ बसेना. टाकळसिंगे, मिरजगाव, बाभुळगाव, पाटेगाव अशा अनेक गावी रोजगार पाहण्यासाठी कधी कुटुंबासह, कधी एकटेच गंगाधरपंत हिंडले. अशा अडचणीत व प्रवासात हे कुटुंब असता कोयाळ (रेणुकाबाईंचे माहेर) येथे कुळकरण्याचे मुलीशी नारायणाचे लग्न झाले. त्या प्रसंगी गंगाधरपंत तेथे नव्हतेच. रेणुकाबाईंनीच सर्व व्यवहार आपले जबाबदारीवर पार पाडला. नारायणाच्या या अल्पवयी पत्नीचे नाव लक्ष्मी.

### गृहस्थाश्रमाचा पूर्वार्ध

कोयाळ येथे नारायणाचा विवाह होऊन लक्ष्मी घरात आली आणि तेथून हे कुटुंब मांडवगण येथे येताच नारायणाचा वडील बंधू वेगळा निघाला. तेव्हा राहिलेली दोन मुले व सून यांसह रेणुकाबाई

आपल्या बहिणीच्या आश्रयास हिंगणी येथे जाऊन राहिली आणि गंगाधरपंत रोजगारासाठी गावोगावी हिंडू लागले. वर्ष सहा महिने रोजगार पहात हिंडावे, पुन: बायकापोरांजवळ येऊन चार दिवस रहावे, असे त्यांचे चालले होते. घरी असता एक दिवस ते चिंताग्रस्त मनाने उद्गारले ''वडील मुलाची अक्कल कळली, या नारायणाचे भविष्य फार चांगले आहे, असे भटजींनी मागे सांगितले, पण नशिबाची रेषा कोठे आडवी आली आहे समजत नाही! काय करावे? हा प्रपंचाचा गाडा कसा चालावा?'' त्यावर नारायणाने उत्तर केले, ''घाबरू नये । प्रयत्नाचा करीत जावा उपाय । सोडूं नये धैर्यासी ॥'' एवढे बोलून तो थांबला नाही, तर वडीलमातोश्रींची दूर जाण्यास अनुज्ञा मिळणार नाही हे जाणून त्यांना न कळविता, एक सोबती बरोबर घेऊन तशा अल्पवयात प्रवासाच्या तत्कालीन अडचणींनी न घाबरता तो सुरतेस गेला. तेथे एक आप्त भेटला, त्याने यास काही द्रव्य देऊन वाटे लाविले. सोबत्याला घेऊन नारायण सुरतेहून नवसरीस आला, दोघांनी पातीमध्ये काही धंदा करून एक वर्षांत 'दशगुणे द्रव्य मेळविले'. हा सोबती दुराचारी आहे असे नारायणास नवसरी येथे कळून आले. तथापि त्या सोबत्याच्या संगतीने त्याने आपले शील किंचितही बिघडू दिले नाही. वर्षानंतर दोघेही मिळालेल्या द्रव्यासह घराकडे परतले. पण वाटेत चोरांनी लुटले. घरी आल्यावर मातापित्यास सर्व वृत्त कळले. सगळेच खिन्न झाले, पण उपाय काय? नारायण पुन: प्रयत्नास लागला. आईची रुक्मा नावाची एक बाळमैत्रीण ग्वाल्हेरीस राजघराण्यात दिलेली होती, तिच्या वशिल्याने कार्यभाग झाल्यास पहावा, म्हणून नारायण ग्वाल्हेरला गेला तेथे आदरसत्कार ठीक झाला. पण प्राप्तीचे वेळी नशीब आडवे आले. फारसा लभ्यांश न होताच नारायणास परतावे लागले. जे थोडेसे द्रव्य मिळाले होते ते वाटेत एका गरीब ब्राह्मणास देऊन रिक्त हस्तेच नारायण परभणीस आईबापाकडे येऊन पोचला.

**गृहस्थाश्रमाचा उत्तरार्ध**

पुढे परभणी येथेच नारायणरावास पागेचे काम मिळून कुटुंबनिर्वाहाची सोय लागली. आणि याच सुमारास पत्नीही वयात येऊन लक्ष्मीनारायणाचा संसार बाह्यत: ठाकठिकीने चालू झाला. बाह्यत: म्हणण्याचे कारण, नारायणरावांचे अंतरंग या नव्या नवलाईच्या प्रपंचात लुब्ध झाले नव्हते. पूर्व सुकृतामुळे 'संसार मुळीच नासका' हे नारायणास लहानपणातच उमगले होते. 'कोऽहं कथमिदं जातम्' विषयक विचार खेळण्याबागडण्याच्या वयातच त्याच्या मनात थैमान घालू लागत. मधून मधून त्यावर विरजण पडे. परंतु तेच विचार आता इतक्या जोराने उफाळू लागले की, तरुण स्त्रीचा सहवास अथवा मायाममत्वाचे अन्य गृहपाश हे त्याच्या स्वयंभू वैराग्यशील मनास मोह पाडू शकले नाहीत. ''सदा अंतरामाजीं तळमळ । की कधी तुटेल ही कर्म-खळखळ । केव्हा परमार्थसुखाचा होय सुकाळ । केव्हा गुरुदयाळ कृपा करी ॥'' या अंत:करणातील तीव्र तळमळीमुळेच संसारसुखाचे जबरदस्त पाश सभोवार असताही नारायणरावांचे साधन तीव्रतर होत चालले. प्रत्येक दिवशी त्रिकाळ स्नानसंध्या, प्रत्येक वेळी विधिपूर्वक सहस्र गायत्रीजप, पंचायतनपूजा, मानसपूजा, ब्रह्मयज्ञ, बलिहरणापूर्वक वैश्वदेव, नैवेद्य, अतिथिपूजन, सहस्रनामादी स्तोत्रपाठ, भजन, शेजारती, अध्यात्मग्रंथावलोकन, भगवन्नामाचा निदिध्यास

इत्यादी सर्व नेमनिष्ठापूर्वक चालत होते. दैववशात् पागेचे काम सुटले तर, हद्रे व अर्धापूर या दोन महालांच्या सरदेशपांडेगिरीचे काम मिळाले. हद्रे महालाची पेशकारीही गळ्यात पडली. या कामाच्या निमित्ताने हैद्राबादेस जावे लागले. तेथील कार्यभाग आटोपून परत आल्यावर काही निमित्त होऊन हे सर्वच काम सोडून दिले. पण रोजचे नित्यकर्म आणि त्याबरोबरच दासबोध, दीपरत्नाकर, नाथभागवत आदिकरून अध्यात्मग्रंथाचे परिशीलन ही चालूच असत. या व्यासंगामुळे अध्यात्मग्रंथातील ज्ञानरहस्य गुरुकृपेशिवाय अनुभवास येत नाही हे कळून चुकले. पुढे सद्‌गुरुदर्शनाचा ध्यास लागला.

**अनुग्रह व गुरुपरंपरा**

चार कोसांवर पाथरीस एक ब्रह्मनिष्ठ स्वामी आहेत असे कळताच तगमगीच्या भरात नारायणाने त्यांचेकडे जाऊन अपरोक्ष ज्ञानाचा उपदेश व्हावा म्हणून प्रार्थना केली. पण स्वामींनी सांगितले,''तुझे नियत गुरु लक्ष्मणपंत दिवाणजी वसमत येथे आहेत,त्यांचेकडे जा.'' नारायण म्हणाला,''ते रोजगारी आहेत,त्यांच्याजवळ अपरोक्षानुभव कोठचा? त्यांचा माझा पुष्कळ परिचय आहे.'' स्वामींनी उत्तर केले, ''बाकीच्या भानगडीशी तुला काय करावयाचे आहे? तुला अपरोक्ष ज्ञान पाहिजे ना? आम्ही खरे तेच सांगतो. तुझा कार्यभाग लक्ष्मणपंतांकडूनच होणार आहे. तू मुकाट्याने जा.''त्याच पावली नारायणराव वसमतकडे निघाले. तेथे पोहोचवयास चार दिवस लागले.मार्गात एके रात्री स्वप्नात एक वानर नारायणास रागे भरून म्हणतो,''लक्ष्मणहंसांविना अन्यत्र तुझे काम होणार नाही. स्वामींनी खरे तेच सांगितले असता उगीच का संशयात पडलास?''हे स्वप्न पाहताच नारायण खडबडून जागा झाला. संशय घेतल्याबद्दल सद्‌गदित अंत:करणाने सद्‌गुरुमाउलीची मनातले मनात क्षमा मागून मार्गक्रमण करीत वसमत येथे लक्ष्मणपंतांचे घरी यथाकाल जाऊन पोहोचला. लक्ष्मणपंत ओसरीवर बसले होते. त्यांना पाहताच नारायणाचा प्रेमभाव उचंबळून येऊन त्याने आंगणातच सद्‌गुरूस साष्टांग प्रणिपात घातला. पंतांनी हां हां म्हणता खाली उडी घेऊन नारायणास क्षेमालिंगन दिले आणि स्वहस्ते त्याचे अश्रू पुसिले.

''कोणीकडे येणे झाले?'' म्हणून लक्ष्मणपंतांनी विचारिले. परंतु कंठ दाटल्यामुळे नारायणास बोलवेना. गहिवर जरा ओसरल्यावर नारायण म्हणतो, 'मी शरण आलो चरणालागुनी । तरी उपदेशावें अनन्या ॥' त्यावर लक्ष्मणपंत म्हणतात, 'आताच काय गडबड आहे? प्रपंचाचा पुरता अनुभव आल्यावर परमार्थाचा उदय आपोआप होतोच.' हे त्यांचे उत्तर ऐकताच नारायणाने गुरुचरणांपाशी लोळण घेतली आणि 'आश्वासन मिळाल्याशिवाय उठायचा नाही' असे सांगितले. तो त्याचा निर्धार पाहून लक्ष्मणपंत त्यास आश्वासून म्हणतात, ''माझ्याजवळ पक्वान्ने नाहीत. पण माझ्या गुरुरायाचे कृपेने कण्याभाकरीची कमती नाही. पोटभर मिळेल.'' त्यावर नारायणाने ''शाखा मज अंगुलि दावा । तेणे चंद्ररूप पावेन स्वानुभवा । येर पाल्हाळाचा न लगे गोवा । हे विनवोन वंदिले ॥' सद्‌गुरुरायांनी अभय देताच नारायणास अत्यंत हर्ष झाला.

परंतु त्याच दिवशी लक्ष्मणपंतास आपल्या सरदेशपांडेगिरीच्या कामासाठी शेवाळ्यास जावयाचे

होते. भोजनोत्तर गुरुशिष्य दोघेही तिकडे निघाले. पहिल्या खेपेस शेवाळे येथे सद्गुरुसान्निध्यात नारायण सुमारे महिनाभर राहिला. लक्ष्मणपंत हे औरंगाबादच्या अमृतरायजीचे वंशज (बहुधा पणतु असावेत) आणि श्रीसमर्थ रामदासस्वामींचे प्रथम शिष्य उद्धवस्वामी यांच्या स्वानुभवी शिष्यपरंपरेतील श्रीसमर्थांपासून सहावे पुरुष होत. तेही अनुभवी होते.

आदिनारायणं विष्णुं हंसं ब्रह्माणमद्वयम् ।
वसिष्ठं श्रीरामचंद्रं रामदासं तथैवच ।।
उद्धवं माधवं रुद्रं नागनाथं च लक्ष्मणम्.....इमां वंदे परम्पराम् ।।

अशी त्यांची गुरुपरंपरा आहे. लक्ष्मणपंत प्रपंचात जसे सावध-साक्षेपी दक्ष होते तसेच परमार्थातही पूर्ण स्वानुभव-संपन्न होते. त्यांनी नारायणास प्रथम शिवमंत्रोपदेश देऊन पुढे त्याच्या तीव्र धारणेस अनुसरून अपरोक्षानुभवाचा उपदेश यथाक्रम चालविला. महिनाभर हा उपदेश प्रक्रियेसह चालला **होता.** 'ऐकताचि सद्गुरुवचन । वृत्ति धृतीमाजी जाली लीन । स्वरूपी स्वरूपचि स्वानुभवावीण । उर्वरित उरले।। दोन मुहूर्त निवांत ठेला ।....शरीरीं रोमांच उठिले । थरथरा कापूं लागले । नेत्रीं अश्रूंचे ओघ लोटले । विस्मय पावले । मनादि गुरुचरणीं मिठी घालून । मंदमंद करितसे स्तवन । हे गुरुराया काय होऊं उत्तीर्ण ।। मजमाजी मज मेळविले ।।'' यानंतर विवेकसिंधूचेही श्रवणमनन झाले.

अशा स्वानंदात एक महिना लोटल्यावर दोघे गुरुशिष्य वसमतास परत आले. तो तेथे गंगाधरपंतही मुलाचे शोधार्थ येऊन पोहोचले होते. लक्ष्मणहंसांनी आपल्या शिष्यास घरी जाऊन सेवाशुश्रूषेने मात्यापित्यांना संतुष्ट करण्याची आज्ञा केली. पण शिष्यवराने हात जोडून विनविले की, ''आता मी प्रपंच करीना जनी । एक सदा असावे गुरुचरणी । की स्वेच्छा संचारु ।।'' त्यावर 'सद्गुरु म्हणती नव्हे ऐसे । तुज दृढ अपरोक्ष जाले नसे । तेचि खलोनि वृत्ति अभ्यासे । अतिदृढ करी ।। **जैसी देहबुद्धि होती** बळकट । ऐसी ब्रह्मबुद्धि करी निघोट । परी हे प्रपंचीच साधेल अवीट । प्रपंच त्यागिता नव्हे ।। स्वजनी असोनि मी माझे जावे । व्यापारात असता कर्तृत्व न उठावे ।।'' सद्गुरूंच्या आज्ञेस्तव नारायणराव प्रपंचाकडे वळून वडिलांबरोबर परभणीस परत आले.

**गृहस्थाश्रमाचा उत्तरार्ध**

हा गुर्वनुग्रह शके १७४९-५०चे सुमारास घडला असावा. घरी आल्यावर वऱ्हाडात अनसिंग येथील सरदेशपांडेगिरी प्रारब्धाने आली; ते काम पत्करून तिकडे गेले. धाकटा बंधू मागाहून तेथेच रोजगार मिळाल्याने नारायणरावांचे जवळ राहिला. पत्नी आणि आईबाप हीही सर्व मंडळी तेथेच जाऊन राहिली. पण नारायणरावांनी—नव्हे नारायणहंसांनी सर्व घरचा कारभार भावाकडे सोपवून आपण आपले वर्तन घरप्रपंचात व बाहेरच्या व्यवहारात असून नसल्यासारखे-अगदीच कामापुरते बोलणे चालणे ठेविले. त्या वेळची दिनचर्या पुढीलप्रमाणे होती– प्रात:कर्मानंतर कचेरीचे काम पहावे, नंतर स्नानसंध्या, लोकसंग्रहार्थ श्रीरामपूजनादि ब्रह्मकर्म झाल्यावर भोजन करावे. भोजनोत्तर वामकुक्षी झाल्यावर

'काही वाची चर्चा करी । एकांती जाऊन विवरी । नाना ग्रंथ ।।' पुढे कचेरीचे काम असल्यास ते पाहून देवदर्शन घेऊन घरी यावे. रात्रौ सायंसध्या, वाचन, भजन, फलहार झाल्यावर शरीर निद्राधीन होईपर्यंत आत्मचिंतन असा क्रम श. १७५२ पर्यंत म्हणजे सुमारे तीन वर्षे चालू होता. पण घरचा-बाहेरचा प्रपंच म्हटला की काही तरी उणे अधिक बोलावे-चालावे लागतेच. तथापि तेही नारायणहंसांच्या अंत:करणास टोचू लागले आणि कारभार, प्रपंच सगळा सोडून देऊन एकट्याने संचार करण्याची वृत्ती उसळू लागली. ही मन:स्थिती पत्नी लक्ष्मीबाईला सांगून तिला घरी ठेवावे व आपण सद्‌गुरूकडे जावे असे त्यांनी स्वत:शी ठरविले; परंतु लक्ष्मीबाई पडली आर्य संस्कृतीतील अर्धांगिनी, तीही पतीबरोबर निघाली. दोघे पतिपत्नी एके रात्री अंगावरील वस्त्रानिशी घरून निघाले आणि डोंगरगावावरून शेवाळ्यास लक्ष्मणहंसांसन्निध जाऊन पोहोचले.

सद्‌गुरूंनी नारायणहंसास एक कोमटी शिष्याचे घरी वहीखाते लिहिण्याची नोकरी लावून दिली. ती कामगिरी करीत नारायणहंसांनी 'ब्रह्मानुभवचिंतनी उदासीनत्वे असावे, पडेल ती गुरुसेवा करावी आणि गुरुमाउलीच्या सहवासात दासबोधादी ग्रंथांचे श्रवणमनन, भजन वगैरे कार्यात मध्यरात्रपर्यंत रहावे असा क्रम स्वीकारला. हा क्रम दोन वर्षे चालला. या अवधीत लक्ष्मीबाई गरोदर झाल्या आणि सातव्या महिन्यात प्रसूत होऊन पुत्र झाला तो जन्मताच आटोपला व पाचवे दिवशी लक्ष्मीबाईही दिवंगत झाल्या. लगेच संसाराची वारसार करून नारायणहंस गुर्वाज्ञेने संचारार्थ मोकळे झाले.

### वानप्रस्थाश्रम व देशपर्यटन

मातापूर-माहूर येथे पूर्वी लक्ष्मणहंस, परमगुरु नागनाथहंस आणि परात्परगुरु रुद्रामहंस यांचे वास्तव्य काही काही काळ झाले असल्याने नारायणहंस प्रथम माहुरास गेले. तेथे सर्वतीर्थावर सहा महिने त्यांनी गुरुमंत्राचे पुरश्चरण केले. श्री दत्तमहाराजांचे साक्षात दर्शन घडले. पुढे कोठे जावे तो शेवाळ्यास सद्‌गुरू लक्ष्मणहंस आजारी असल्याचे वृत्त कळल्यावरून परत शेवाळ्यास गेले आणि सद्‌गुरुसेवेत निमग्न राहिले. गुर्वाज्ञेवरून 'गुरुभक्तिसार' नावाचा ग्रंथ रचून श्री गुरुचरणी समर्पिला. पुढील काही महिने ब्रह्मनिष्ठेच्या प्रखर कसोटीत घालवावे लागले. पण नारायणहंसांचे ठायी गुरुसेवेचे एवढे अद्‌भुत प्रेम उत्पन्न झाले होते की, 'अंगे हंस असोनि निरवडी । हंसदास्य त्याची अति आवडी। निज ब्रह्मत्वहि परते सांडी । गुरुसेवेपुढे ।।'

त्या निष्ठापूर्वक सेवेने सद्‌गुरुराय संतुष्ट होऊन शिष्यवरास जगदुद्धारार्थ संचाराची आज्ञा देते झाले. तदनंतर श. १७५५चे अखेरीस नारायणहंसांनी शेवाळ्याहून निघून परभणीस घरी महिनाभर वास्तव्य करून तेथे मातेचा शोक दूर केला. त्यानंतर मात्र यथेच्छ संचारास प्रारंभ झाला. पाय वळतील तिकडे जावे, कोणताच हेतू अंतरी नाही. कोण कोठचे अशी विचारपूस कोणी मार्गात केलीच तर 'विजयपुराहून आलो नि आनंदगडास जातो' असे काही तरी उत्तर मिळे. 'बाहेरी पिशाच्च अंतरीं शाहणा। सदा ब्रह्मीं जाणा निमग्न तो ।।' अशासारखे एकंदर वर्तन यावेळी होते. परभणीहून जांबेस गेले,

तेथे ५ दिवस मुक्काम झाल्यावर गोदातीरी गुंजमूर्ती येथे सूर्यग्रहणात गुरुमंत्राचे पुरश्चरण करून तेथून पुढे उकंडगाव, रामपुरी, शेवती, राजापूर, तलवडे, खांडवी, नामलगाव, बीड, आनंदगड, चौसाळे, ईट असे मुक्काम करीत करीत शके १७५६च्या दासनवमीच्या नवरात्रात तडवळे येथे दहा दिवस राहिले. तेथून धाराशीवची लेणी, तुळजापूर या स्थलांवरून श. १७५७चे गुढीपाडव्यास श्रीकल्याणस्वामींचे समाधिस्थान श्रीक्षेत्र डोमगाव येथे पोहोचले. यावेळी डोमगावचे मठात सखारामबुवा महाराज नावाचे वेदान्तशास्त्रवेत्ते प्रसिद्ध कीर्तनकार होते. रात्री नारायणहंसांनी त्यांचे कीर्तन 'दुरी दीनासारखे' बसून ऐकावे आणि दिवसा वेड्यापिशासारखे कोठे तरी भटकत असावे. पंधरा दिवस तेथे मुक्काम होता, पण आपल्या अंतरंगाची ओळख त्यांनी कोणास होऊ दिली नाही. पण पंढरीचा पूर्वपरिचित जनार्दन उत्पात तेथे आला होता, त्याने सखारामबुवांस यांचे वृत्त कळविले. आणि नंतर उभयतांचा जो अकृत्रिम व गाढ स्नेह जमला तो आमरण वाढतच चालला. सखारामबुवा डोमगावकरांमुळेच स्वामींचे वास्तव्य डोमगाव परंडा भागात पुढे अधिक झाले. डोमगावाहून जनार्दन उत्पात, सखारामबुवा व नारायणहंस असे त्रिवर्ग श्रीक्षेत्र पंढरी येथे गेले. प्रथम १।। महिना मुक्काम जनार्दन उत्पाताचे घरी होता. याच ठिकाणी नारायणहंसास एक दिवस श्रीसमर्थांचा दर्शन-साक्षात्कार झाला. त्यामुळे सखारामबुवांची निष्ठा नारायणहंसांचे ठिकाणी इतकी जडली की, ते त्यांस डोमगावीच राहण्याचा प्रेमाग्रह करू लागले. परंतु त्या वेळी तरी नारायणहंसांचे राहणे चातुर्मास पंढरीसच झाले, डोमगावी गेले नाहीत.

तथापि जनार्दन उत्पाताचे घरी न राहता, देवालयाचे एका ओवरीत श्री पूर्णानंद नावाचे एक परिपूर्ण अधिकारी स्वामी राहत, त्या ओवरीत नारायणहंसांनी आपले आसन ठेविले. परस्परांनी परस्परांचा अधिकार जाणला होता. एक दिवस पूर्णानंद स्वामींनी यांना 'नारायणस्वामी' म्हणून हाक मारिली. 'मी स्वामी केव्हा झालो?' म्हणून नारायणहंसांनी विचारता पूर्णानंद आवेशाने म्हणतात, 'भगवी वस्त्रे असती आम्हांसी । परी तूं होसी पांढरा संन्यासी । यात संशय असेना ।।' पूर्णानंदांनी उत्तर हिंदुस्थानात जाताना नारायणहंसांस प्रसाद देऊन सांगितले की, "तुम्ही निश्चितपणे संन्यासी व्हाल' प्रेषोच्चार लिहून देऊन वाटेल तेव्हा संन्यास घेण्याची अनुज्ञाही त्यांनी देऊन ठेविली आणि आपण निघून गेले.

### परमहंस दीक्षा

पुढे श्री पूर्णानंदांच्या भाकिताप्रमाणे नारायणहंसांनी लवकरच म्हणजे श. १७५७चे कार्तिक शुद्ध सप्तमीस विधिपूर्वक संन्यासाश्रम धारण केला. पण काषाय वस्त्रांखेरीज दंडादी इतर बाह्य दीक्षा स्वीकारली नाही. संन्यासग्रहणानंतर रथसप्तमीपर्यंत पंढरीक्षेत्रातच वास्तव्य झाले. चतुर्थाश्रमातील नाव 'नारायणतीर्थ' होते. नंतर सखारामबुवांच्या निरोपावरून डोमगावी गेले आणि श. १७५८ची रामनवमी तेथे झाल्यावर गुरुदर्शन व मातृभिक्षा यासाठी शेवाळे व परभणी येथे जाऊन महिन्याभरात परत पुन्हा डोमगावीच आले. ते तेथे १-१।। वर्ष राहिले. १७५९च्या चातुर्मासानंतर डोमगावाहून पांगरी, तुळजापूर, पंढरपूर या मार्गे दासनवमीचे उत्सवात श्री सज्जनगडी जाऊन पोहोचले. तेथेही साक्षात्कारपूर्वक

श्रीसमर्थदर्शन पहिलेच दिवशी होऊन तो उत्सव आटोपल्यावर श्री दासनवमीचे उत्सवासाठी चाफळ येथे गेले. तेथून श. १७६०चा चातुर्मास नांदगाव येथे केला. सज्जनगडापासून सखारामबोवा डोमगावकर समागमे होतेच. त्यांनी डोमगावी चलण्याचा आग्रह धरल्यावरून श. १७६०चे अखेरीस स्वामी महाराज पुन्हा डोमगावी आले. डोमगावाहून केव्हा केव्हा परांड्यास येत. लऊळ व पांगरी येथे एकवेळ गेले. पण सखारामबुवांच्या आग्रहास्तव परत डोमगावी यावे लागले. या श. १७६१च्या डोमगावच्या मुक्कामात 'संकेतकुबडी', 'आगमसार', 'पूर्वारंभ गाथा' व 'सदाचार' असे चार ग्रंथ झाले.

श. १७६२च्या चातुर्मासात कीर्तनासाठी म्हणून सखारामबुवा हैद्राबादकडे जाण्यास निघाले. त्यांच्याबरोबर महाराज परंड्यापर्यंत आले. पण पुढे न जाता परंड्यासच राहिले. तिकडे सखारामबाबांना हैदराबादेतच देवाज्ञा झाली. त्यामुळे स्वामी पुन्हा डोमगावास गेलेच नाहीत. परंड्यासच त्यांचे कायमचे वास्तव्य झाले.

परंडा येथे प्रथम केशवराजाच्या देवालयात राहत. तेथे मनाबाई रजपूत नावाच्या एका निष्ठावंत साध्वीस लिहिणे वाचणे शिकवून तिला वेदान्तरहस्य सुलभ गोष्टींच्याद्वारा समजावून सांगावे म्हणून कथाकल्पलता रचिली. महाराजांनी धूळपाटीवर प्रथम लिहावे आणि नंतर मनाबाईने ते उतरून घ्यावे असा क्रम चालला होता.

बाळोबा ऊर्फ बाळनाथ नावाचा धाराशीव येथील एक निष्ठावंत पण भोळा भाविक भक्त श. १७५६ पासून स्वामींचा अनुग्रहीत झाला होता. स्वामींचे राहणे डोमगाव परंडा भागात होऊ लागल्यापासून तोही गुरुसेवा घडावी म्हणून परंड्यास कुटुंबासह येऊन राहिला होता. इतर भाविक भक्तसंख्या वाढत होती आणि त्या सर्वांच्या प्रेमास्तव स्वामींचे वास्तव्य पुढे शेवटपर्यंत परंड्यास झाले. केशवराजांचे देवालयानंतर श्रीराममंदिरात काही दिवस महाराज राहत होते. पुढे त्यांच्या स्वतंत्र निवासासाठी राममंदिराच्या पिछाडीस श. १७७० मध्ये गुंफा निर्माण झाली. (या पुस्तकातील स्वामींच्या चित्रात मागचे बाजूस या गुंफेचा देखावा स्पष्ट आहे.) या गुंफेच्या पूर्व बाजूचे भिंतीत बाहेरच्या आंगास मारुतीरायाची स्थापना स्वामीमहाराजांचे एक वैराग्यभाग्यसंपन्न भक्त रामचंद्र पोतदार यांचे हस्ते झाली. या गुंफेच्या रचनाकौशल्याबद्दल हंसपद्धतीत म्हटले आहे की, "सर्व तत्वांची रचना जितुकी । जडचंचलकोशादि अनेकी । गुंफेशी योजिली असती तितुकी । समजून पहावी ।।"

श्रीराममंदिरात महाराजांचे वास्तव्य असता (श.१७६२ ते १७६९) चूडालाख्यान 'वेद' नावाची पदे, अभंग, शिवगीतेवरील 'वेदेश्वरी' टीका हे ग्रंथ रचिले. सद्गुरू लक्ष्मणहंसांच्या प्रेरणेने चिमणकवी व संजीवन यांच्याकरवी 'हंसपद्धति' निर्माण झाली.

शके १७७१त लक्ष्मणहंस परंड्यास येऊन चार महिनेपर्यंत राहिले. ते परत गेल्यावर श्रीमच्छंकराचार्यांच्या लघुवाक्यवृत्तीवर 'वाक्यवृत्ती' नामकटीका, ईशावास्यावर 'वेदाज्ञा' नामक टीका, अनुभवामृत (अमृतानुभव-समओवी टीका), तत्वझाडा इत्यादी ग्रंथ रचिले.

**निर्याण**

शके १७७२मध्ये श्री. रघुनाथ भास्कर गोडबोले यांस करमाळे येथे जाऊन उपदेश दिला. श. १७७६च्या माघी पौर्णिमेस एकाएकी ध्यानस्थ झाले. ध्यानोत्तरही अबोलच राहिले. पण रघुनाथशास्त्री गोडबोले यांस लवकर येण्यासाठी पत्र लिहिले. ते फाल्गुनी पौर्णिमेस आले. ते आल्या क्षणापासून सतत ३६ तासपर्यंत गुरुशिष्यांचा प्रेमानंदपूर्वक संवाद चालला होता. किंबहुना महाराजांचाच प्रेमसागर हेलावला आणि त्या भरात तेच एकसारखे बोलत होते. इतर सर्व नित्यक्रम या वेळी बंद होते. फाल्गुन व.२चे पहाटे महाराजांनी एक पेढा खाल्ला व रघुनाथरावाहाती पाणी आणवून प्याले. नंतर नित्यक्रम सुरू झाला.

शके १७७८ वैशाख शु. ८ सोमवारी पहाटे आपण चौरंगावर बसून आपली पूजा करण्यास महाराजांनी बाबा जोशी यास आज्ञा केली. यथाविधी पूजन झाल्यावर असलेली मंडळी हात जोडून उभी राहिली. "ब्राह्मी मुहूर्त उत्तम काळ । मुखासी पाहत असता सकळ । तव एकाएकी अंतराळ । तेजो भरित जाहले ।।" सर्व वातावरण इतके देदीप्यमान झाले की, जवळ असणाऱ्यांचे डोळे दिपले. अर्ध घटकेनंतर डोळे उघडून पाहतात तो श्रीसद्‌गुरू हंसराज आत्मरूपी विराम पावले.

**भक्त व शिष्य**

श्रीसखारामबुवा डोमगावकर हे जसे श्रीहंसराजांच्या सहवासास लुब्ध झाले होते, तसेच सोनपेठकर स्वामी,दीक्षित स्वामी आणि परमगुरु नागनाथहंसांचे पुत्र रामकृष्णहंस हेही महाराजांच्या सहवासार्थ मधून मधून परांड्यास येऊन राहत असत. शिष्यमंडळात बाळनाथ,रघुनाथशास्त्री गोडबोले, चिमणकवी, रामचंद्र हे मुख्य असून यांशिवाय बाबाजी जोशी, नाना जोशी, चतुरचंद गुजर, लक्ष्मणप्रसाद रामकृष्ण, मयूर शिंपी, बहिरव संजीवन, गोविंदराव बाळाबाई, मनाबाई, बहिणाबाई अशी अनेक मंडळी शिष्यपरिवारात होती. स्थलकालाभावी श्रीहंसराजस्वामींचे हे चरित्र आखडते घ्यावे लागले आणि शिष्यपरिवाराचीही माहिती नामनिर्देशापेक्षा अधिक देता आली नाही, त्याबद्दल वाचकांनी आम्हांस क्षमा करावी. श्रीहंसराजस्वामी महाराजांनी कृपादृष्टी होईल तर त्यांचे विस्तृत चरित्र वाचकांस यथाकाल सादर करू.

**अनंतदास रामदासी**

('श्री संकेतकुबडी'च्या प्रास्ताविक भागाच्या आधाराने)



## श्री हंसराजस्वामींची ग्रंथसंपत्ती

### प्रकाशित ग्रंथ

(१) **वेदेश्वरी**-शिवगीतेवरील टीका (ओ.८१९८);
(२) **सदाचार**-श्रीमच्छंकराचार्यकृत 'सदाचार' या प्रकरणावर टीका (ओ.२११८);
(३) **चूडालाख्यान**-(अभंग२२०१);
(४) **अनुभवामृत**-श्रीज्ञानेश्वरकृत अमृतानुभवावर टीका (ओ.८०५);
(५) **वाक्यवृत्ति**-श्रीमच्छंकराचार्यकृत लघुवाक्यवृत्तीवर टीका (ओ.५६००);
(६) **वेदाज्ञा**-ईशावास्थोपनिषदावर टीका (ओ.५२१);
(७) **आगमसार**-उपनिषदातील तत्त्वज्ञानाच्या आधारे वेदान्तप्रक्रिया स्पष्ट करणारा, पण स्वतंत्र ग्रंथ (ओ.३५२६);
(८) **कथाकल्पलता**-कथांद्वारा वेदान्त समजावून सांगणारा स्त्रियांस सुलभ असा ग्रंथ; याच्या १६ प्रकरणांपैकी ८ प्रकरणे मिळाली. तेवढीच प्रसिद्ध झाली आहेत. (ओ.४०३०);
(९) **संकेतबुद्धी**-श्रीदासबोधातील संगती दाखवणारी व चिंतनिका करण्यास उपयोगी (ओ.६४८).
एकूण पद्यसंख्या २७६४७.

### अप्रकाशित पण उपलब्ध ग्रंथ

(१) **पूर्वारंभगाथा**,
(२) **गद्यरूप तत्त्वझाडा**

### अनुपलब्ध ग्रंथ

(१) **गुरुभक्तिसार**,
(२) **स्वात्मादर्श** (संस्कृत),
(३) **कथाकल्पलता** (प्र.१,३,५,६,७,९,१०,११),
(४) वेद या मुद्रेने केलेले अभंग, पदे,
(५) भक्ति-ज्ञान-वैराग्यपर स्फुट अभंग, पदे.

प्रकाशित-अप्रकाशित मिळून सुमारे चाळीस हजारांपर्यंत श्रीस्वामिमहाराजांचे काव्य असावे.

# आगमसार : एक दृष्टिक्षेप

हंसराजस्वामींच्या उपलब्ध ग्रंथांतील हा पहिलाच स्वतंत्र ग्रंथ डोमगावच्या वास्तव्यात लिहिला गेला. परंड्याच्या हंसमंडळाने इ. स. १९४०मध्ये तो छापून प्रसिद्ध केला. त्याला ह.भ.प. सोनोपंत दांडेकरांची एकपानी प्रस्तावना आहे.

या ग्रंथात एकूण १४ पंचिका असून प्रत्येक पंचिकेत अर्थातच ५ समास आहेत, म्हणजे एकूण ७० समास असून ओवीसंख्या ३५२६ इतकी आहे. ग्रंथ छोटेखानी असला तरी स्वामींच्या ग्रंथसंपदेत त्याचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. हा ग्रंथ स्वतंत्र असल्याने विषयाची निवड वा मांडणी याबाबतीत स्वामींवर कोणतीही बंधने पडलेली नाहीत. स्वत:च्या विचारांना कोठेही मुरड न घालता ती परखडपणे मांडण्याचे स्वातंत्र्य त्यांना या ग्रंथात मिळाले आहे. अतिशय मुद्देसूदपणे आणि क्रमवार पद्धतीने स्वामींनी आपले तात्त्विक विचार येथे प्रकट केले आहेत. त्यामुळे एक नीटस, सुबद्ध असा प्रबंध असे या ग्रंथाला स्वरूप आले आहे.

स्वामींनी नेहमीप्रमाणेच या ग्रंथात अनुबंधचतुष्टयाची चर्चा केली आहे. ग्रंथाचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धात स्वामींच्या इतर ग्रंथांतल्याप्रमाणे तात्त्विक चर्चा असून उत्तरार्धात ब्रह्मात्मैक्यप्राप्तीच्या साधनांची चर्चा आहे. तीव्रतरप्रज्ञ अधिकाऱ्याला पूर्वार्धातील तात्त्विक निरूपण मोक्षसिद्धीसाठी पुरेसे होते. पण मंदप्रज्ञ अधिकाऱ्याला मात्र उत्तरार्धातील साधनांची गरज भासते. या साधनांच्या निरूपणालाच अभ्यास असे नाव आहे आणि तात्त्विक चर्चेच्या भागाला स्वामींनी विचार असे नाव दिले आहे. विचार आणि अभ्यास या दोन भागांसाठी स्वामींनी गीताप्रणीत सांख्य आणि योग असे पर्यायी शब्दही सुचविले आहेत. "सांख्य म्हणिजे विचार । योग म्हणिजे चित्त स्थिर। विचारें पावले परपार । तें योगेंहि पावे ।।" (आगम.८.१.७) गीतेच्या 'यत्सांख्यै: प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।' या सुप्रसिद्ध वचनाचा स्वामींनी हा नवीनच अर्थ सुचविला आहे.

पूर्वार्धाच्या सात पंचिका असून उत्तरार्धाच्याही सात पंचिका आहेत. प्रत्येक पंचिकेला तिच्यातील विषयाला धरून स्वतंत्र नाव आहे. उदा. ज्ञानप्रतिष्ठा, अद्वैतसिद्धिविवेचन, सहजस्थितिलक्षण इत्यादी. पंचिकेतील प्रत्येक समासाला पुन्हा विषयाप्रमाणे स्वतंत्र नाव आहे. उदा. तनुत्रितयनिरसन (५.१), शून्यखंडन (११.३), मिथ्यात्वलक्षण (१२.१) इत्यादी. पूर्वार्धात एकूण २०८३ ओव्या असून उत्तरार्धात १४४३ ओव्या आहेत. पूर्वार्धाच्या मानाने उत्तरार्ध बराच लहान आहे.

पूर्वार्धात सांख्य म्हणजे तात्त्विक विचाराचे प्रतिपादन आहे. विचाराच्या साहाय्याने पिंडब्रह्मांडातील नित्यानित्य वस्तूंचा विवेक करून स्वत:च्या अभेदरूप ब्रह्मस्वरूपाची ओळख करून घेणे, हा या

भागाचा प्रमुख विषय. त्यासाठी वेदान्ताच्या दृष्टिकोणातून जीव, जगत्, परमेश्वर, अविद्या, माया, कूटस्थ, ब्रह्म यांची स्वरूपे व त्यांचे परस्परसंबंध इत्यादींचे वर्णन स्वामींनी या भागात केले आहे. ते करताना इतर भिन्न मतांचा जागोजागी परामर्श त्यांनी केला आहे. श्रवणमननाच्या साहाय्याने आणि गुरुकृपेच्या योगाने जीवाला प्रथम आत्मस्वरूपाचे यथार्थ ज्ञान होते आणि नंतर विचारांच्या साहाय्याने तो अपरोक्षज्ञान प्राप्त करतो, असे स्वामींच्या प्रतिपादनाचे एकंदरीत सूत्र दिसते.

उत्तरार्धात योगाचा विचार केला आहे. हा योग पतंजलिप्रणीत योगाहून वेगळा आहे. हे दाखवण्यासाठी त्यांनी शंकराचार्यांच्या अपरोक्षानुभूतीत जी ध्यानाची १५ अंगे सांगितली आहेत. त्यांचा अनुवाद केलेला आहे. जरी त्या संज्ञा योगशास्त्राशी जुळणाऱ्या असल्या तरी त्या या संदर्भात वेगळ्या अर्थाने कशा वापरल्या आहेत, हे त्यांनी स्पष्ट केले आहे. अभ्यासाचे प्रत्यक्ष वर्णन फक्त ८व्या पंचिकेत आले आहे. बाकीच्या भागात या अभ्यासाने साध्य होणाऱ्या फलांचा विचार क्रमशः केला आहे. अभ्यास म्हणजे ध्यानाच्या साहाय्याने ब्रह्मात्मैक्य साध्य करण्याचा मार्ग. तो करीत असताना अनेक विघ्ने येतात. त्यांचे निरसन कसे करावे, तो साध्य झाला की क्रमाक्रमाने जीवन्मुक्ती, विदेहमुक्ती, सहजस्थिती इत्यादी उत्तरोत्तर श्रेष्ठ अशा अवस्थांची प्राप्ती होऊन दृढापरोक्षस्थितीला साधक कसा पोहोचतो याचे विवेचन स्वामींनी तपशिलाने केले आहे. शेवटच्या पंचिकेत आध्यात्मिक दृष्टीने व्यवहारातील चार वर्ण, चार आश्रम, देहादिकांच्या जागृत्यादी अवस्था यांच्या नवीन अर्थाची फोड करून सांगितली आहे. शेवटी संत, गुरुभक्त इत्यादींची स्तवने करून ग्रंथ संपविला आहे. ग्रंथाच्या शेवटचे पसायदानही खास वेदान्ती आहे.

ग्रंथाला 'आगमसार' नाव देण्याचे कारण पुढील ओवीत स्पष्ट केलेले आहे. "उपनिषदादि आचार्य संमति । वेदान्तसागर जया म्हणती । त्यांतील सारार्थ प्राकृतीं । यथामति काढिला ॥" (आगम.१४.४.२) म्हणजे या ग्रंथात, श्रीशंकराचार्यांच्या आधाराने उपनिषदांचे मी सार काढले आहे, असे स्वामी म्हणत आहेत. ग्रंथाच्या आरंभीच्या भागातही त्यांनी आपल्या या ग्रंथाचे स्वरूप सूचित केले आहे. "वंदूनिया श्रोतेजन । कीजे वेदान्तकथन । उपनिषदांचा अर्थ गहन । प्राकृतीं प्रगटे ॥" (आगम.२.१.२). उपनिषदांच्या आधारे सर्व वेदान्तप्रक्रिया सुसंगतपणे एकत्र मांडणे हा स्वामींचा या ग्रंथाच्या रचनेमागचा हेतू दिसतो. त्याप्रमाणे या ग्रंथात जागोजागी उपनिषद्वाक्यांचा अनुवाद केला आहे. तैत्तिरीय उपनिषदातील भृगुवल्लीचा स्पष्ट उल्लेख करून तिचा सारांश पंचकोशविवरणाच्या निमित्ताने स्वामींनी सांगितला आहे. (आगम.५.२) बृहदारण्यकातील याज्ञवल्क्य आणि मैत्रैयी यांच्या संवादाचा संदर्भ आगमसार १.४.२९ मध्ये आला आहे. कठोपनिषदातील आत्मा हा रथी असून देह हा रथ आहे या सुप्रसिद्ध रूपकाचा अनुवाद आगम.१५.३१ मध्ये आढळतो. अशा तऱ्हेचे कितीतरी औपनिषदिक संदर्भ आगमसारात जागोजागी आढळतात. बृहदारण्यक, छांदोग्य, कठ, केन, मुंडक, तैत्तिरीय, श्वेताश्वतर, ऐतरेय, कैवल्य, ईशावास्य या सर्व प्रमुख उपनिषदांचे संदर्भ कधी उल्लेखपूर्वक तर कधी उल्लेख न करता आगमसारात आले आहेत. भगवद्गीतेलाही स्वामी श्रुती म्हणूनच मानत

असल्याने तिच्या वचनांचा अनुवादही श्रुतिवचने म्हणूनच स्वामी देतात. अशा तऱ्हेने उपनिषदांची उद्धरणे तर या ग्रंथात आहेतच, पण त्यापेक्षाही महत्त्वाचे म्हणजे या ग्रंथातील सर्व निरूपण उपनिषदांच्या आधारानेच केले आहे. उपनिषदांत जो विस्कळीतपणा आहे, विसंगती आहे, क्वचित गूढता आहे, ते सर्व दोष दूर करून त्यांच्यातील वेदान्तप्रक्रियेचे एक सलग, सुटसुटीत व सुसंगत स्वरूप आपल्याला या ग्रंथात पाहावयास मिळते.

या ग्रंथासंबंधीच्या हंसमंडळाच्या निवेदनात ''श्रीसमर्थ रामदासस्वामीकृत श्रीग्रंथराज दासबोधातील वेदान्ताचे रहस्य समजण्यास हा ग्रंथ फार उपयोगी पडेल'' (संकेतकुबडी मलपृष्ठ ३) असे विधान आहे. त्यावरून बऱ्याच जणांची अशी समजूत झालेली आहे की, दासबोधातील वेदान्त स्पष्ट करण्यासाठीच या ग्रंथाची निर्मिती झाली आहे. पण तशी वस्तुस्थिती नाही. तशी परिस्थिती असती तर हंसपद्धतिकारांनी तसा निर्देश केला असता. दासबोधाचा वेदान्त स्पष्ट करण्यासाठी 'संकेतकुबडी' या ग्रंथाची रचना अगोदरच केली असताना पुन्हा तसाच प्रयत्न दुसऱ्या ग्रंथात स्वामी करतील असे वाटत नाही. हंसराजस्वामी समर्थपरंपरेतील होते. त्यामुळे त्यांच्यावर समर्थांच्या तत्त्वज्ञानाचा, विचारसरणीचा, भाषाशैलीचा प्रभाव असणे स्वाभाविक आहे. हंसपद्धतिकारांनी हे नमूद केले आहे. ''ज्ञानपरंपरा समर्थांची आली । श्रीदत्तांची प्रसन्नता वरी झाली । निरूपणपद्धती आचार्यांची उमटली । एवं तीन ओघ येथे आले ॥'' (हं.प. १०.७.१०८). यादृष्टीने दासबोधातील निरूपणाच्या अनेक छटा या ग्रंथात आढळतात. उदा. दासबोध ४.४.८-९ या ठिकाणी समर्थांनी उल्लेखिलेल्या सप्त भूमिकांचा ऊहापोह स्वामींनी समर्थांचा आदरपूर्वक उल्लेख करून केला आहे. (आगम.११.१.११) दासबोधातील विविध तापांचे वर्णन, सृष्ट्युत्पत्ती, पंचप्रलय, पंचीकरण इत्यादी विषय आगमसारात आढळतात. पण एवढ्यावरून हा ग्रंथ दासबोधातील वेदान्ताचे रहस्य समजावून देण्यासाठी लिहिण्यात आला असे म्हणता येणार नाही. कारण हे विषय इतर अनेक संतांच्या ग्रंथांतसुद्धा आढळतात. साधारणपणे सर्वच मराठी संत हे तत्त्वज्ञानाच्या बाबतीत शांकराद्वैती आहेत. तेव्हा सर्वांच्याच ग्रंथांतून वरील विषयांचे उल्लेख आढळतात. त्यामुळे आगमसाराचे ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत यांसारख्या ग्रंथाशीदेखील साम्य आढळते. मुकुंदराजांच्या विवेकसिंधूशी तर त्याचे पुष्कळच साम्य आढळते. तेव्हा आगमसाराचा संबंध केवळ दासबोधाशी जोडणे चुकीचे ठरेल. कारण दासबोधात न आढळणारे अनेक विषय आगमसारात येतात. त्यांची उपपत्ती त्यामुळे लागत नाही. अभ्यासनिरूपण, साधनचतुष्टयाची चर्चा, जीवसृष्ट, ईश्वरसृष्ट अशी सृष्ट पदार्थांची विभागणी इत्यादी विषय दासबोधात आढळणार नाहीत. तसेच दासबोधातील अनेक विषय आगमसारात वगळलेले आहेत. उदा. चतुर्दश ब्रह्मांचे निरूपण, भक्तिविषयक संपूर्ण विवेचन इत्यादी. या वस्तुस्थितीची संगती वरील निवेदनाने लागत नाही.

वस्तुस्थिती अशी आहे की, हंसराजस्वामी हे ग्रंथ लिहिताना परिपक्व दशेस पोहोचलेले होते. त्यांची एक तात्त्विक भूमिका एव्हाना तयार झाली होती. त्यामुळे प्राचीन काळी प्रस्थानत्रयीवर भाष्ये लिहिणारे आचार्य स्वतःच्या तत्त्वज्ञानाशी सुसंगत अर्थ प्रस्थानत्रयीतून काढण्याचा प्रयत्न करीत तसा

हंसराजस्वामींनी 'संकेतकुबडी' या ग्रंथामध्ये दासबोधाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी दासबोधाचा केवळ वेदान्तनिष्ठ अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे दासबोधाच्या वाचकांचा संकेतकुबडीच्या वाचनाने थोडासा गोंधळ उडतो. पण आगमसारात स्वामींच्या भूमिकेचे स्पष्ट चित्र असल्यामुळे एकदा ती समजली की, संकेतकुबडीचे आकलन सुलभ होते. तेव्हा दासबोध समजण्यासाठी नव्हे, तर 'संकेतकुबडी' समजण्यासाठी आगमसार या ग्रंथाची शिफारस करायला हरकत नाही. बारकाईने विचार केल्यास एक गोष्ट स्पष्ट दिसते ती ही की, आगमसारात स्वामींवर पंचदशी या विद्यारण्यस्वामींच्या ग्रंथाचा प्रभाव पडलेला आहे. पंचदशीकारांनी संस्कृत वेदान्ती ग्रंथातून पुष्कळ विचारांचे अनुसरण केले आहे. त्यांचा सुंदर समन्वय साधलेला आहे. त्याप्रमाणे आगमसारातही स्वामींनी अनेक पूर्वसूरींच्या वचनांचा आधार घेत त्यांचा एक सुंदर समन्वय साधलेला आहे. प्रत्यक्ष पंचदशीतील दृष्टान्त आणि सिद्धान्त यांचाही त्यांनी अनुवाद केला आहे. पण ग्रंथाचा समतोल ढळू न देता त्याची एकात्मता टिकवून ठेवण्यात यश मिळवले आहे.

हा ग्रंथ कोठेही पाल्हाळिक न होता अगदी बंदिस्त स्वरूपाचा आणि सारगर्भ असा झाला आहे. पारिभाषिक संज्ञांच्या वापरामुळे तो जडजंबालही होऊ दिलेला नाही. विषयाच्या स्वरूपामुळेच त्यात थोडीशी क्लिष्टता आली असण्याची शक्यता आहे. पण एकंदरीत त्याची शैली अगदी प्रासादिक आहे. स्वामींनी दृष्टान्तांचा वापर फार मोठ्या प्रमाणावर केला आहे. हे दृष्टान्त काव्यमय असण्यापेक्षा प्रतिपाद्य विषयावर प्रकाश टाकणारे आहेत. बरेचसे दृष्टान्त पारंपरिक असले तरी काही दृष्टान्तांत नावीन्य आढळते. ज्ञानोत्तर काळात प्रारब्धभोगार्थ देहधर्म चालू असताना जीवन्मुक्ताला कामक्रोधांचा त्रास होणार नाही का, अशी आशंका आक्षेपकांनी घेताच स्वामी तिचे समाधान करतात–

"जैसी जिवंत उंदिरे । न होती मांजरासमोरें ।
मेल्या मारिती मांजरें । काशावरोनी ।।" (आगम.९.१.२६)

तो जेव्हा साधकावस्थेत होता तेव्हासुद्धा कामक्रोध त्याला पीडा देत नव्हते. मग आता कसे देतील, असे त्यांना म्हणावयाचे आहे. हा जीवन्मुक्त स्वैर आचरण कशावरून करणार नाही? या शंकेला उत्तर देताना ते सांगतात, जी नदी पावसाळ्यातसुद्धा तीराचे बंधन पाळते, ती उन्हाळ्यात पाणी आटल्यावर तीर फोडून धावेल, असे कधी होईल काय? (आगम.१०.१.३४-३५) ब्रह्मासंबंधीच्या कोरड्या चर्चेने ब्रह्मप्राप्ती होत नसते, ते जाणून घेतले पाहिजे असे सांगताना ते म्हणतात, "जैसी कोरडी लेखणी । न निघे अक्षरश्रेणी । ब्रह्म न जाणतां मनीं । सर्वब्रह्मता उमटेना ।।८।। अंत:करण गुहास्थानीं । ब्रह्म निहित श्रुतिवचनीं । त्या मषींत बुद्धिलेखणी । अभ्यासें चुबकळी ।।९।।" (आगम. ८.३.८-९) असे कितीतरी दृष्टान्त दाखविता येतील.

दृष्टान्तांप्रमाणेच क्वचित सांगरूपके, क्वचित काही कल्पित कथा यांचाही वापर स्वामींनी केला आहे. नवव्या पंचिकेतील पहिला समास म्हणजे संपूर्ण रामकथेवर केलेले अध्यात्माचे रूपक आहे.

(आगम.१२.१) आपल्या लघुशंकेत शेपटी बुडवून हत्तींचे दळ मारणाऱ्या कोल्ह्याची गोष्ट त्यांनी एके ठिकाणी (आगम.१२.४) सांगितली आहे.

आगमसाराचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यातील सुटसुटीत व्याख्या. वेदान्ताच्या निरूपणात पदोपदी आढळणाऱ्या संज्ञांच्या सुस्पष्ट कल्पना देणाऱ्या सुंदर सुंदर व्याख्या आगमसारात जागोजागी आढळतात. उदाहरणार्थ, शम, दम इत्यादींच्या व्याख्या पाहा: ''या नांव बोलिजे शम । जे अंतरी निष्काम । येणे रीतीं जाणिजे दम । जे बाह्येंद्रिय निग्रह ॥'' (आगम.१.५.७) अन्वय आणि व्यतिरेक यांच्या व्याख्या पहा. ''कार्यामाजी अनुवृत्ती । कारणाची त्या अन्वय म्हणती । कारणीं कार्याची व्यावृत्ती। हा व्यतिरेक ॥'' (आगम.१.१.४८) अशा अनेक व्याख्या आगमसारात आहेत.

आगमसार हा ग्रंथ दासबोधाप्रमाणेच गुरुशिष्य संवादात्मक आहे. हा संवाद गीतेतील संवादाप्रमाणे प्रत्यक्ष संवाद नाही. येथील शिष्य ही एक अमूर्त व्यक्ती आहे. कधी ती जिज्ञासूची भूमिका घेते, कधी आक्षेपकाची. स्वामी त्याचे प्रश्न वा आक्षेप जाणून घेऊन त्यांचे समाधान करतात. या निमित्ताने अनेक मार्मिक प्रश्न उपस्थित करण्यात आले आहेत, व त्यांची तितक्याच मार्मिकतेने उत्तरेही देण्यात आली आहेत. या निमित्ताने वाचकाला एक बौद्धिक झटापट पाहायला मिळते.

वेदान्ताचा अधिकार कोणाला आहे, हे सांगताना स्वामींनी उदार दृष्टिकोण स्वीकारला आहे. ते म्हणतात, ''येथें सर्वां असे अधिकार । अनधीत आणि स्त्रीशूद्र । वैराग्ययुक्त आणि विचार । इतुके साचार पाहिजे ॥'' (आगम.१४.४.१३). यावर शंकाकार प्रश्न विचारतो, ''स्त्रीशूद्रांना वेदान्ताच्या ज्ञानाने मोक्ष मिळतो, असे असेल तर, 'वेदांच्या अध्ययनाने मोक्ष मिळतो'' या श्रुतिवचनाला बाध येतो. तेव्हा सद्‌गुरू उत्तर देतात की, ''स्त्रीशूद्रादिकांनी या जन्मी वेदाध्ययन केलेले नसले तरी मागच्या जन्मी ते केले असलेच पाहिजे. त्यामुळेच त्यांची या ज्ञानाकडे प्रवृत्ती झाली. दुसरे असे की, गतजन्मात त्यांना वेदाध्ययनाने परोक्षज्ञान झाले असले पाहिजे. अपरोक्षज्ञानासाठी ते आता वेदान्ताकडे वळत आहेत.'' अशा तऱ्हेने जुन्या पारंपरिक विचारसरणीचा व आपल्या सदसद्विवेकबुद्धीचा समन्वय साधण्याचा हा स्वामींचा प्रयत्न त्यांच्या संतत्वाला शोभेल असाच आहे.

आगमसारातही स्वामींनी आपण केलेल्या मराठी रचनेचे समर्थन केलेच आहे. ते म्हणतात, ''विष्णुशंकरादी देव स्वर्गातच राहते, तर त्यांचे महत्त्व पृथ्वीवरील लोकांना कसे कळते? त्यांनी अवतार घेतले म्हणून तर सर्वांना त्यांचे महत्त्व कळले. त्याप्रमाणे संस्कृतमधील अर्थ प्राकृतात आणला म्हणून तर सामान्यांना त्यांचा लाभ झाला.'' (आगम.१४.४.९-१२) आक्षेपकाने असा आक्षेप घेतला आहे, की पूर्वी अनेक संस्कृत ग्रंथांतून हा विषय मांडला गेला आहे. पूर्वीच्या प्राकृत ग्रंथांतूनही याची चर्चा झाली आहे, तेव्हा तुम्ही हा ग्रंथ का लिहिता? त्यावर स्वामींचे उत्तर असे की, 'सर्व श्रीमंत लोक अन्नसंतर्पण करतात. एखाद्या दरिद्री माणसाला द्रव्याचा साठा सापडला आणि त्यालाही अन्नसंतर्पण करण्याची इच्छा झाली तर त्याला हरकत का असावी? त्याने संतर्पण केले नाही तर जगाचे काही

नुकसान होते असे नाही. पण "आपुल्या श्रेयार्थ तत्त्वता । करितसे तो ॥" (आगम.१४.४.३१). त्याचबरोबर आपल्या हातून गुरुभक्त साधकांची सेवा घडावी म्हणून मी हे पूर्वसूरींचे उच्छिष्ट बोल या ग्रंथाच्या निमित्ताने सांगितले आहेत.' (आगम.४-४.३३-३७)

शेवटच्या समासात 'हा ग्रंथ कोणी केला?' असा प्रश्न उपस्थित करून स्वामींनी स्वत:च्या कर्तृत्वाचा वेदान्ती भूमिकेतून निषेध केला आहे. ते म्हणतात, "ग्रंथनिर्मिती या शब्दप्रयोगात नवीन कर्तृत्वाचा अर्थ सूचित होतो. पण तसे येथे काहीच नाही. मातृकादी वर्ण पूर्वीचेच आहेत. ब्रह्म हा विषय पूर्वीचाच आहे. यात नवीन केले काय? आणि करणारा तरी कोण? देह, प्राण, आत्मा यांपैकी कोणालाच हे कर्तृत्व घडत नाही. "मागील वर्ण पुढे जोडी । पुढील नेणें मागिले कडी । इतुक्या हेतु उगाचि बडबडी । कर्तेपणें ॥" (आगम.१४.५.१३) एवढ्याच कारणाने कर्तृत्वाची चर्चा करायची. पण "सद्गुरुनाथ हे मीपण । उरोचि नेदी आपण । सर्व जालें जें निरूपण । कोणें रीती कळेना ॥१४॥ आदि अंती हा सद्गुरू । मध्येंही तयाचा विस्तारू । मी मी हा कैसा चोरू । उरला तेथे ॥" (आगम.१४.५.१४-१५) असे म्हणून स्वामींनी ग्रंथाचे कर्तृत्व सद्गुरूंवर ढकलले आहे. ग्रंथात कुठेही त्यांनी स्वनाम, रचनाकाळ इत्यादी तपशील दिला नाही, हे त्यांच्या वेदान्ती भूमिकेला साजेसेच होते.

या ग्रंथात अनेक ठिकाणी स्वामींची शैली वक्तृत्वपूर्ण झाली आहे. उदा. ब्रह्मात्मैक्यस्थितीचे वर्णन (आगम.७.५), आचार्योपासनेचे वर्णन (आगम.८.५). हे दोन्ही विषय स्वामींच्या अगदी जिव्हाळ्याचे असल्यामुळे त्यांच्या विवेचनात वक्तृत्वाची धार चढणे स्वाभाविकही वाटते.

साधारणपणे सर्व ग्रंथाचे स्वरूप तर्कसुसंगत आणि प्रसन्न आहे, हे खरे. तथापि काही अपवादात्मक ठिकाणी थोडेसे खटकल्यासारखे वाटते. उदा. ज्ञानोत्तर कर्मे करण्यासाठी श्रीकृष्णाचा आग्रह का या प्रश्नाचे उत्तर म्हणून स्वामी सांगतात की, श्रीकृष्ण हा देव आहे आणि सर्व देव प्रवृत्तीचे अभिमानी असल्याने त्याने कर्माचा आग्रह धरणे स्वाभाविक आहे. (आगम.१३.५.१९) सद्गुरूची कायिक वाचिक आणि मानसिक पूजा कशी करावी याचे मार्गदर्शन करताना 'पात्री राहिले जे शेष । तेचि सेविले सावकाश । तस्तीचें उदक नि:शेष । उच्छिष्टपान ॥' (आगम.८.५.३५) इथपर्यंत शिष्याची तयारी असावी असे स्वामी सांगतात ते ओंगळ वाटते. गुरुभक्ताचा आपपरभाव लोपलेला असतो, हे सांगताना स्वामी सांगतात, "आपुली कांता परपुरुषीं । आपण पाहता दृष्टीसी । तो परू हा मी न ये मानसीं । मा क्रोध तो केवी ॥"(आगम.१४.२.२१) असल्या अक्रोधत्वाची शिफारस स्वामींनी करायला नको होती, असे राहून राहून वाटते. अर्थात हे विचार स्वामींनी अद्वैतानुभवाच्या संदर्भात सांगितले आहेत. त्यामुळे त्यांच्या तत्त्वज्ञानाशी ते शंभर टक्के सुसंगत आहेत याबद्दल संशय नसावा.

ग्रंथाचा समारोप स्वामींनी वरदाष्टकाने केला आहे. स्वामी संतांपाशी मागणे मागत आहेत आणि संत 'तथास्तु, तथास्तु' असे अभिवचन देत आहेत,अशी या वरदाष्टकाची भूमिका आहे. ज्ञानेश्वरांच्या पसायदानाशी तुलना करू पाहता या दोघा संतांमधील फरक जाणवतो. ज्ञानेश्वर निरपेक्षवृत्तीने सर्व

प्राणिमात्रांच्या अंत:करणात सद्भाव नांदावा, सर्वत्र सज्जनांची मांदियाळी वाढावी अशी विश्वात्मक देवाला प्रार्थना करत आहेत, तर स्वामी साधकाच्या आध्यात्मिक श्रेयाची काळजी वाहत आहेत. ''सद्गुरूंसी जे अनन्यशरण । तत्काल व्हावें द्वैतखंडन । संत म्हणती सुप्रसन्न वदन । तथास्तु तथास्तु॥३५॥ अहंकाराचा वारा । न लागो तया सुकुमारा । निघती संत मुखोद्गारा । तथास्तु तथास्तु॥'' (आगम.१४.५.३५-३६)

स्वामींची भाषा ओघवती असून तिला आंगिक क्लिष्टता कोठेही नाही. पण काही ठिकाणी पारिभाषिक संज्ञांमुळे क्लिष्टता येते. उदा. 'निराकार अशा ब्रह्माचे अगोचर अशी मन आणि बुद्धी कसे ग्रहण करू शकतील' या आशंकेचे उत्तर देताना स्वामी, ''फलव्याप्तीविण । वृत्तिव्याप्तीचें प्रयोजन । इंद्रियेंवीण जाणे मन । म्हणोनि विषय ॥'' (आगम.१.२.१३) अशी तांत्रिक भाषा वापरतात. किंवा 'ब्रह्माचे सद्रूप असत्च्या अपेक्षेने ठरते' या आक्षेपाचे उत्तर देताना स्वामी सांगतात, ''हे शब्दप्रतियोगी असती । वस्तुप्रतियोगी न होती । वैखरी अभावें शब्द नासती । अर्थ न जाय त्यासवें ॥'' (आगम.३.१.४९) अशा तांत्रिक परिभाषेची उदाहरणे सुदैवाने थोडी आहेत.

उपनिषदांमध्ये बराचसा भाग सांकेतिक स्वरूपाचा असतो. तो तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने फारसा पोषक नसतो. तेव्हा त्याचा अनुवाद करण्याची आवश्यकता नसताना स्वामी तो कशासाठी करतात हे समजत नाही. उदा. ४.३मधील २२ ते ३१ या ओव्यांतील विराटाचे अवयव सांगणारे वर्णन केवळ पारंपरिक आहे. तसेच सप्तान्नांचे वर्णन (आगम.६.३.१५-१९) तेथील संदर्भात अनावश्यक वाटते. अर्थात अशी स्थळे फार थोडी आहेत. दासबोधाप्रमाणे ओवीच्या चतुर्थचरणाची पुढील अनेक ओव्यांमध्ये स्वामी पुनरावृत्ती करतात. विशिष्ट मुद्दा ठसवण्यासाठी स्वामी असे करतात.

अध्यात्मातील सूक्ष्मातिसूक्ष्म अनुभव स्वामी योग्य शब्दांत वर्णन करू शकतात, हा त्यांचा विशेष आहे. तसेच वरीलप्रमाणे एखाद-दुसरा अपवाद वगळता स्वामींचे लेखन सगळीकडे नेटके आणि नेमके आहे. जास्त फापटपसाऱ्याच्या मोहात ते पडत नाहीत. त्यामुळे हा ग्रंथ अगदी आटोपशीर आणि बंदिस्त झाला आहे. भावनांचा घोळ न घालता अगदी वस्तुनिष्ठ पद्धतीने अध्यात्मातील विषयांचे हवे तेवढेच वर्णन सरळ प्रासादिक भाषेत स्वामी देत असल्याने या ग्रंथातील विवेचन सुसंगत व रेखीव झाले आहे.

**कल्याण काळे**

('परंड्याचे हंसराजस्वामी : चरित्र,वाङ्मय आणि तत्त्वज्ञान' या ग्रंथाच्या आधारे)



# अनुक्रम

# आगमसार-संहिता

## पूर्वार्ध

# उत्तरार्ध

**विषय** (ओवीसंख्या) **पृष्ठांक**

# आगमसार - पूर्वार्ध

श्रीगणेशाय नमः ।। श्रीसरस्वत्यै नमः ।। श्रीरघुपतये नमः ।। श्रीसद्गुरवे नमः ।। श्रीरामो जयति ।।
ब्रह्मानंद परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं । द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यं ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं । भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ।।

## पंचिका १ली- उपक्रम

### ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - मंगलाचरण

**जयजयाजी सद्गुरू । न कळे स्वरूपाचा पारू । जेथें मायेचा बडिवारू । सर्वथा न चले।।१।। अहो आतां कैसें करावें । पुरली उपायांची धावें । अलक्षासी लक्षावें । कोणेपरि ।।२।। मंगलाची लक्षणें । स्मृति स्तुति नमन । या तिहींवाचुन आन । चवथें नाहीं ।।३।। निरवयवासी कैसें ध्यावें । अनिर्वाच्या कैसें स्तवावें । निरंजनासी वंदावें । कोणेपरी ।।४।। तथापि धिवसा धरिला । अनंतरूपीं रिघ केला । परि विवेकेसहित मनाला । निष्प्रचारु होय ।।५।। बुद्धी निश्चया थोटावली । अहं निमोनी अंग घाली । म्हणोनि ध्यानाची पुरली । हाव अपैसी ।।६।।जेथें परा विराली । पश्यंती देखूनी**

---

### पंचिका १ली, समास १ला - मंगलाचरण

सद्गुरुमहाराज, आपला जयजयकार असो. आपल्या स्वरूपाचा अंत लागत नाही. मायेचे सामर्थ्य आपल्यापुढे मुळीत चालत नाही.(१)अहो, आता काय करावे? सर्व साधनांची मर्यादा येथे संपते. त्यामुळे अलक्ष्य (अज्ञेय, अतर्क्य) अशा सद्गुरूंचे ध्यान कसे करावे हे कळेनासे झाले आहे.(२) ग्रंथाच्या आरंभी जे मंगल करतात त्याचे तीन प्रकार आहेत. स्मरण, स्तवन आणि नमन असे ते तीन प्रकार होत. या तिहींखेरीज चौथा प्रकार नाही.(३)पण जो अवयवविहीन आहे त्याचे स्मरणरूप ध्यान कसे करावे? जो अनिर्वाच्य (म्हणजे वर्णन करण्याच्या पलीकडचा) आहे त्याची स्तुती कशी करावी? आणि जो निरंजन (म्हणजे निर्विकल्प,मायाविरहित, गुणरहित) आहे, त्याला वंदन तरी कसे करायचे?(४) तरी धैर्य धरून अनंताच्या रूपामध्ये मी प्रवेश करू लागलो; पण विवेकयुक्त (सदसद्विचारयुक्त) असूनसुद्धा मनाला तेथे प्रवेश करण्यास मनाई आहे!(५) बुद्धीची निश्चय करण्याची शक्ती तेथे नष्ट झाली, अहंकार जमीनदोस्त होऊन नष्ट झाला. या कारणाने ध्यान करण्याची हौस आपोआप फिटली. (म्हणजे मन, बुद्धी,अहंकार इत्यादी ध्यानाची साधने निरुपयोगी ठरल्यानंतर ध्यान कसे करणार?)(६)

**मुरडली मध्यमा बाहेरी घाबरली । अंग न धरी ।।७।। तेथें वैखरीचा पवाड । काय करील द्वाड । मज लागलेंसें वेड । जें स्तऊं पाहे ।।८।। चित्सागर तो अगाध । केवळ आनंदाचा कंद । तेथें कैंची पदद्वंद । तरी नमन कैसें ।।९।। असो कोणेही प्रकारिं । मंगलासी नाहीं उरि । चिदंभोधींत लहरी । मृगजळाची ।।१०।। तैसी माया जेथें स्पर्शेना। तेथें हिंपुटी कल्पना । तरी आतां स्तवावे ना । हेंचि बरें ।।११।। तरी इष्ट दैवत गुरूवांचुनी । न देखोचि त्रिभुवनीं । कारण मायेची करणी । तेथें शाश्वतता नसे ।।१२।। आतां एक सुचलें बुध्दी । मुख्य स्वरूपाची नातुडे शुध्दि । मायायोगें निषेध विधि । अवसान श्रुतीचें ।।१३।। अणु नव्हे म्हणोनी गुरू । पार नव्हे म्हणोनि अपारू । विकार नव्हे निर्विकारू । हें निषेधमुख ।।१४।। सद्रूप आणि ज्ञानघन । आनंद अनंत पूर्ण । हें विधिमुखें श्रुतीचेंवचन । अवधिशेष ।।१५।। तटस्थ आणि स्वरूप लक्षणें । हीं दोन्ही**

---

सद्गुरूंच्या बाबतीत परा वाणी विरून गेली, पश्यन्ती त्यांना पाहाताच मागे फिरली, मध्यमा बाहेरच्या बाहेर घाबरून गेली; भीतीने तिचे सामर्थ्यच गळून गेले.(७) अशा परिस्थितीत वैखरी वाणीचे सामर्थ्य बिचारे काय करू शकणार? अशातही मी सद्गुरूंची स्तुती करू पाहात आहे, याचा अर्थ मला वेडच लागले असले पाहिजे.(८) सद्गुरू म्हणजे ज्ञानाचा सागर; तो किती अगाध आहे! केवळ आनंदाचा तो गाभाच होय. तेथे दोन पावले कोठून असणार? मग त्यांना नमस्कार तरी कसा शक्य होईल?(९) तेव्हा स्मरण, स्तवन आणि मनन या तीनही प्रकारांनी मंगलाला अवसर नाही. (मंगल शक्य नाही.) ज्ञानसागरात कल्पनारूप मृगजळाची लाट उठणे अशक्यच! (म्हणजे वरील तिन्ही व्यापार कल्पनारूप आहेत आणि निखळ ज्ञानाच्या ठिकाणी कल्पनेला वावच नसतो.) (१०) जेथे माया स्पर्श करू शकत नाही,तेथे कल्पना कष्टी (निराश) होणारच.म्हणून स्तुती करू नये,हेच रास्त ठरेल.(११) पण सद्गुरूवाचून दुसरे इष्ट दैवत सबंध त्रिभुवनात आढळत नाही. कारण जे जे मायानिर्मित ते ते अशाश्वत असते. (कारण मायेचे जे जे कार्य असते ते कधीच शाश्वत नसते. त्रिभुवन हे मायाकार्यच आहे. तेथे सद्गुरूंसारखे नित्य,शाश्वत असे तत्त्व कसे भेटणार?)(१२) आता यावर बुद्धीला एक उपाय सुचला. मुख्य स्वरूप जर असे वर्णनाच्या आवाक्यात येत नाही, तर मग मायेच्या साहाय्याने विधिनिषेधरूप मार्गांनी त्याचे वर्णन करावे, हे बरे. वेदांचीही मर्यादा तेवढीच आहे. (१३) श्रीसद्गुरू हे अणू नाहीत म्हणून गुरू आहेत. (अणू म्हणजे सूक्ष्म आणि गुरू म्हणजे थोर.) त्यांचा पार (दुसरी कड) लागत नाही म्हणून ते अपार आहेत. त्यांच्या रूपात विकार नाहीत म्हणून ते निर्विकार होत, अशी ही निषेधरूप वर्णनाची पद्धत होय.(१४) याउलट सद्गुरू हे सद्रूप, ज्ञानघन, आनंदमय, अनंत आणि परिपूर्ण आहेत, अशा प्रकारचे हे वेदांतील वर्णन विधिरूप आहे. या प्रकारच्या वर्णनापर्यंतच वेदांची मर्यादा जाते. (त्या पलीकडे वेद अधिक काही सांगू शकत नाहीत.)(१५) सद्गुरुस्वरूपाची ओळख पटावी

**ओळखोचीं चिन्हें । बोलिजेती मायागुणें ।शास्त्रसिद्ध।।१६।।जें त्रिकालीं अबाधित। तया नांव बोलिजे सत् । स्वप्रभत्वें सदोदित।।१७।। परमानंदाची खाणी । जेथें सुखदु:खाची हानी । हें जाणिजें स्वरूपलक्षणीं । अव्यावर्तक ।।१८।। आतां तटस्थ लक्षण । कादाचित्कत्वें चिन्ह । हें तित्तिरीचें वचन ।[१] व्यावर्तकत्व ।।१९।। ज्यापासून हे सर्व जालें । आणि जया स्वरूपीं वर्तलें।शेवटीं जेथें लया गेलें । तें अधिष्ठान गुरु ।।२०।। एवं हें गुरुस्वरूपाचें ज्ञान । यथार्थ नव्हे हें प्रमाण । जरि गुरुकृपें गळें मीपण । तरी मग तेंचि तें ।।२१।। मायायोगत्वें जे बोलिलें । काल्पनीक जें जें उद्भवलें । तेंही नामरूपाचे मासले । आस्तिभातिविण नाहीं ।।२२।। जैसें एक मृत्तिकेविण । कैचें घट गाडगें रांझण । तैसें आहे जें कां एकपण । तेंचि तें हें सर्व ।।२३।। असो ऐसा अमूर्ति गुरु । तोचि मूर्तिमान जगदाकारू । नाना धरणें अवतारु । ते मायागुणें ।।२४।। माया अविद्या शक्ती दोन्ही । इयेस्तव जीव-शिव होउनी । क्रीडसी एकला एकपणीं । गुरुशिष्यरूपें ।।२५।।**

---

म्हणून मायेच्या साहाय्याने तटस्थ लक्षण आणि स्वरूप लक्षण ही दोन शास्त्रशुद्ध चिह्ने आता सांगता येतील.(१६) ते तिन्ही काळी अबाधित असते म्हणून ते सत् होय. ते सदा सर्वदा स्वयंप्रकाशी असते हेच त्याचे ज्ञानरूप होय.त्याच्या ठिकाणी सर्व सुखदु:खांचा नाश झालेला असतो म्हणून ते परम म्हणजे सर्वश्रेष्ठ अशा आनंदाची जणू खाणच असते. ही तीन वैशिष्ट्ये स्वरूपाच्या लक्षणांमध्ये अव्यावर्तक म्हणजे कधीही दूर न करता येणारी असतात.(१७-१८)आता त्याचे तटस्थ लक्षण म्हणजे विशिष्ट काळीच त्याला लागू होणारे त्याचे चिह्न. ते तैत्तिरीय उपनिषदात सांगितले असून ते व्यावर्तक म्हणजे प्रसंगी त्याच्यापासून दूर करता येते. (ते नित्यलक्षण नसून बदलणारे लक्षण होय.)(१९)ज्यापासून हे सर्व (विश्व) निर्माण झाले,ते ज्याच्या स्वरूपात राहाते आणि शेवटी ते ज्याच्यात विलीन होते,ते या उत्पत्ति,स्थिती,लयाचे अधिष्ठान असते.तेच श्रीगुरू होत.(२०) गुरुस्वरूपाचे अशा प्रकारे करून दिलेले ज्ञान हे यथार्थ नाही हे खरे;जर गुरुकृपेने मीपण नाहीसे झाले तर मग जे उरते तेच गुरुस्वरूप होय.(२१) मायेच्या साहाय्याने ज्याचे वर्णन केले,कल्पनेपासून ज्याची उत्पत्ती झाली ते सर्व नामरूपाचे मासले (नमुने) आहेत.(नामरूपाचे वेगवेगळे प्रकार आहेत.) त्या सर्वांमध्ये अस्ति (सत्ता),भाति (ज्ञान) आणि प्रिय (आनंद) या ब्रह्मलक्षणांशिवाय दुसरे काही नाही.(२२) एका मातीवाचून घट,गाडगे,रांजण इत्यादी प्रकार कसे संभवतील? त्याप्रमाणे जे एकत्व आहे. तेच हे सर्व (दृश्य विश्व) आहे. (तेच सर्वत्र सर्वदा व्यापून आहे.)(२३)असो,अशा प्रकारे सद्गुरू अमूर्त आहेत,ते जगदाकार धारण करून मूर्तिमान होतात,तेच विविध अवतार धारण करतात. हे ते सर्व मायेच्या प्रभावाने करतात.(२४) (अहो गुरुमहाराज!) माया आणि अविद्या या दोन शक्तींच्या योगाने तुम्ही अनुक्रमे शिव आणि जीव अशी रूपे धारण करता; गुरू आणि शिष्य अशी रूपे धारण करता; एकटेच असूनही तुम्हीच ही सर्व क्रीडा करता.(२५)

**अविद्यावशें मोहिसी । नाथिलें म्हणून उपदेशिसी । शेखीं एकलाची अससी । दोनीपणीं।।२६।। तस्मात् तूंचि अससी दोठाई । आतां मीपणाचें काज काई । मीपणेंविण तूंपणही । सहजची वाव ।।२७।। मी तूं नसतां तूंचि अससी । लहरीविण आपा जैसी । मा उपाधि असतां काई नव्हेसी । तूंचि अघवा ।।२८।। हें तुझिये कृपेंचि कळे । येऱ्हवी सर्वथा नाकळे । तुजसी जें अनन्यत्वें मिळे । त्यासीच कृपा तुझी ।।२९।। कृपा म्हणजे मीपण । हरऊन देसी आपुलेंपण । या नांव आत्मनिवेदन । जे भक्ती नवमी ।।३०।। न जाणतां जीव भ्रमले । केवळ एकदेशी दरिद्र आलें । तेंचि उपदेशून बैसविलें । बोधसाम्राज्यपदीं ।।३१।।दाते उदंड असती । परी निजपद कोणी न देती । जरी ब्रह्मादिक तिन्ही मूर्ती । पद वंचिती आपुलें ।।३२।। ऐसा तूं नव्हेसी । शरणागता आपुलें पद देशी। म्हणवून तुजवीण आणिकासी । वंचकासी न मनी ।।३३।। तुजसारिखा त्रिभुवनीं । दुजा नाहीं नाही गा कोणी । उपमा आणावी कोठुनी । तूं निरुपम ।।३४।। हें असो वेगळें काइसें । जळ तरंगा भेद नसें । जे जें दिसे आणि भासे। तें तूंचि गा गुरुराया।।३५।।**

---

अविद्येच्या साहाय्याने तुम्ही मोह(अज्ञान) निर्माण करता(आणि जगाला त्यात गुंतवून ठेवता.)आणि पुन्हा तुम्हीच हे सर्व मिथ्या आहे म्हणून उपदेश करता.पण या दोन्ही क्रियांमध्ये शेवटी तुम्हीच एकटे असता.(२६)दोन्ही ठिकाणी तुम्हीच असल्याने मग मीपणाचे (अहंकाराचे) कामच काय?(मीपणा व्यर्थच ठरला) मीपणा नसल्याने तूपणाही सहजच व्यर्थ ठरतो.(२७) मी-तू असे द्वैत नसल्याने,लाटा नसतामाही जसे पाणी पाणीरूपाने राहाते,त्याप्रमाणे तुम्हीच (मी-तूपणाची उपाधी नसलेल्या अवस्थेत)एकटे असता.मग(मी-तूपणाची)उपाधी निर्माण झाल्यावर तुम्हीच सर्व कसे नसाल?(या सर्व नामरूपात्मक उपाधींमध्ये तुम्हीच व्यापून असता.)(२८)हे सर्व तुमच्या कृपेनेच कळू शकते.एरवी कळणे अशक्य.तुम्हाला जे अनन्यत्वाने येऊन मिळतात त्यांवरच तुमची कृपा होते.(२९)कृपा म्हणजे तुम्ही मुमुक्षु-साधकाचा मीपणा नष्ट करून त्याला आपलेपण देता.यालाच आत्मनिवेदन म्हणतात.हा भक्तीचा नववा प्रकार होय.(३०)अज्ञानामुळे जीव भ्रमले होते. केवळ त्या संकुचितपणामुळे(एकदेशित्वामुळे)त्यांना दारिद्र्य आले होते.त्यांना उपदेश करून तुम्ही ज्ञानरूपी साम्राज्य पदावर बसवले.(३१)जगात दाते उदंड आहेत.पण स्वत:चे स्थान(निजपद)कोणी देत नाहीत.ब्रह्मादी तीन देव(दाते म्हणून प्रसिद्ध) असले तरी ते आपापली स्थाने सांभाळून असतात.(३२)तुम्ही मात्र असे नाही आहात. शरण आलेल्या भक्ताला तुम्ही आपले स्थान(पद)देऊन टाकता. म्हणून तुमच्याखेरीज दुसऱ्या वंचक देवतांना मी मानत नाही.(३३) तुमच्यासारखा दुसरा कोणीही या त्रिभुवनात नाही.तुम्हाला देण्यासाठी उपमा कोठून आणावी? (तुम्हाला उपमा देता येत नाही.)तुम्ही निरुपम आहात.(३४)हे असू द्यात. तुम्ही वेगळे कुठे आहात?पाणी आणि लाटा यांत भेद असतो काय?सद्‌गुरुमहाराज,जे जे दिसते आणि भासते ते ते आपणच आहात. (३५)

**प्रणवरूप तूं गणपती । जयासी मंगळारंभी स्तविती । तूंचि तूं आदिअंती। त्रिमात्रात्मक।।३६।। चारी वाणी ज्या प्रसिद्धा । ते मायाकुमारी शारदा । तुज सूर्यापासून सदां । मृगजळ वाहे।।३७।।तूं रजोगुण अवलंबिसी। तेव्हां सृष्टीचें सृजन करिसी । चतुरानन म्हणती ज्यासी । ब्रह्मदेव तूं ।।३८।। उत्तम जो सत्वगुण । जाणीवरूपें सृष्टिपालन। करी चतुर्भुज नारायण । तो विष्णु तूंचि।।३९।।तमोगुण जे नेणिव । तेणें संव्हारी सदाशिव । पंचवदन त्रिनयन देव । कैलासवासी तूं ।।४०।। इंद्र चंद्र दिनकर । वरुण वायु कुबेर । आदिकरुन समग्र । दिग्पाल तूं।।४१।।तूंचि काल तूंचि कर्ता । तूंचि मायेचा नियंता । हें असो भूतीं भौतिकता । तुजविण नाहीं ।।४२।। समष्टिरूप तूंचि अघवा । तदंतर्गत व्यष्टीचा कोण केंवा । म्हणोनिया देवाधिदेवा । मीही तो तूंचा ।।४३।।तुवा अधिष्ठूनि मन बुद्धि। वर्तविसी नाना छंदी । लया जाणें तूं अवधी। निर्विशेषरूपा।।४४।।ज्ञानेंद्रिय कर्मेंद्रिय। पंचप्राण पंचविषय । या सर्वत्रीं अन्वय । तुझाचि असे ।।४५।।कार्यामाजी कारण असे । परी कारणामाजीं कार्य नसें ।घटीं मृत्तिका विलसे। मृत्तिकें घट नाहीं।।४६।।मीपणीं जंव पाहिलें । तूंचि तूं प्रतीतीस आलें । निखळ तुझ्या ठाईं अनुमानिलें । न वचेचि मीपण।।४७।।**

---

मंगलारंभी ज्याचे स्तवन करतात असा त्रिमात्रात्मक(अ,ऊ,म)प्रणवरूप(ओंकार स्वरूप) गणपती तुम्हीच आहात. तुम्हीच विश्वाच्या आरंभी होता,त्याच्या अन्तानंतरही तुम्हीच राहणार आहात.(३६)ज्या प्रसिद्ध चार वाणी आहेत त्याच मायाकन्या (मायेपासून निर्माण झालेल्या)शारदा होत.तुम्ही सूर्याप्रमाणे असून त्या चार वाणी मृगजळाप्रमाणे(तुमच्यामुळेच निर्माण झालेल्या)तुमच्यापासूनच वाहत असतात.(३७) तुम्ही रजोगुणाचा स्वीकार करता तेव्हाच सृष्टीची उत्पत्ती करता.ज्याला चतुरानन म्हणतात,तो ब्रह्मदेव तुम्हीच आहात.(३८)श्रेष्ठ अशा सत्त्वगुणाचा आश्रय करून जाणीवरूपाने सृष्टीचे पालन करणारा चतुर्भुज नारायण विष्णू तुम्हीच आहात.(३९)नेणीव हा तमोगुण असून तिच्या साहाय्याने श्रीशंकर विश्वाचा संहार करतो. तो कैलासावर निवास करणारा,पंचमुखी,तीन डोळे असलेला शंकर तुम्हीच आहात.(४०)इंद्र,चंद्र,सूर्य,वरुण,वायू,कुबेर इत्यादी सर्व दिक्पाल तुम्हीच आहात.(४१)तुम्हीच काल,तुम्हीच कर्ता,तुम्हीच मायेचे नियंत्रक आहात. हे राहू द्या.पंचभूतांमधील भौतिकता तुमच्यावाचून नाही.(४२) सर्व समष्टी तुम्हीच असल्याने तदंतर्गत व्यष्टीची काय कथा?म्हणून हे देवाधिदेवा,मीदेखील तुम्हीच आहात.(४३)मन, बुद्धी व्यापून तुम्हीच निरनिराळ्या व्यवसायात गुंतविता. अहो निर्विकल्प गुरुमहाराज, तुम्हीच त्यांचा लय घडवून आणता.(४४) ज्ञानेंद्रिये,कर्मेंद्रिंये,पंचप्राण,पंचविषय या सर्वांत तुमचीच व्याप्ती आहे.(४५)कार्यामध्ये कारण असते.पण कारणामध्ये कार्य नसते. घटामध्ये माती असते,पण मातीत घट नसतो.(४६)जेव्हा मी'मीपणा'मध्ये(डोकावून)पाहिले,तेव्हा माझ्यामध्ये तुम्हीच तेवढे आहात असे प्रत्ययास आले.परंतु तुमच्या निखळ स्वरूपात मात्र'मीपणा'चे अनुमानसुद्धा करता येत नाही.(४७)

**कार्यामाजीं अनुवृत्ती । कारणाची त्या अन्वय म्हणती । कारणीं कार्याची व्यावृत्ती। हा व्यतिरेक[२] ।।४८।। ऐसें मायायोगें स्तविलें।अज्ञानग्रासक जीं पाउलें । देहेंवीण वंदन केलें। तया प्रभूसी ।।४९।। मुख्य रूप तें कैसें । नेणों नेणों मी अपैसें । तेथें मंगल काइसें। मीपणेंविण ।।५०।। म्हणून सद्गुरू वर्णवेना।लाजून सांडिले मीपणा।आतां जैसे असाल तैसे असाना।सद्गुरुराया[३] ।।५१।। अहो कायहो केलें।अलक्षा लक्षण लाविलें।हे बहूत अन्याय घडले।धिःकारू मज ।।५२।। विदेहासी अवयव कल्पिले।निःसंगास संग बोलिलें। निर्विकारा विकारिलें । ते क्षमा क्षमा ।।५३।। जेथे एकपण न साहे।तेथें कल्पिलें सर्व हें । तरी अन्याय हा थोर होय।ते क्षमा क्षमा ।।५४।। भज्यभजकत्व नाथिलें।तेंचि स्तवनें उभें केलें । अनिर्वाच्या वाच्याशें बोलिलें । ते क्षमा क्षमा ।।५५।। अद्वैतीं द्वैत लाजिलें।अद्वैत शब्द होतीं फोलें । आतां मौनही राहिलें।अबोलणेंपणें ।।५६।।**

**इति श्रीमदागमसारे । उपषित्तात्पर्यानुसारे । मंगलाचरणानुकारे । प्रथमसमासः ।।१।।**

---

कार्यामध्ये कारणाची व्याप्ती(पाहणे)म्हणजे अन्वय होय.(उदा.घटामध्ये मातीची व्याप्ती असते)याउलट कारणामध्ये कार्य नसणे म्हणजे व्यतिरेक होय.(उदा.मातीमध्ये घटाचा अभाव असतो.)(४८)अशातऱ्हेने अज्ञानग्रासक सद्गुरूंच्या पावलांचे मायेच्या साहाय्याने स्तवन केले.देहरहित अशा त्या प्रभूंना नमस्कार केला.(४९)मुख्य स्वरूप कसे आहे,ते तर मला मुळीच माहीत नाही.'मीपणा'च नसल्यामुळे मंगल कसे करणार?(५०)आता सद्गुरूंचे वर्णन करणे आपल्याला शक्य नाही,म्हणून लाजून 'मीपणा'चा त्याग केला.तेव्हा सद्गुरुराया,आता जसे असाल तसेच राहा.(५१) अरेरे,हे मी काय केले?अलक्ष्य अशा सद्गुरूंचे लक्षण(व्याख्या)करण्याचा मी प्रयत्न केला.माझ्या हातून खरोखरच मोठा अन्याय घडला.माझा धिक्कार असतो.(५२) विदेह (देहरहित) अशा सद्गुरूंच्या ठिकाणी अवयवांची कल्पना केली;निःसंग सद्गुरूंना संग लावला(म्हणजे निःसंगाच्या ठिकाणी दुसऱ्या वस्तूचा संबंध जोडला);निर्विकार सद्गुरूंच्या ठिकाणी विकारांची कल्पना केली.त्याबद्दल क्षमा मागतो.(५३) वास्तविक पाहता जेथे एकपणही सहन होत नाही,त्या ठिकाणी मी या सगळ्यांची कल्पना केली.हा माझ्याकडून मोठाच अन्याय घडला.त्याबद्दल क्षमा मागतो.(५४) भज्य(पूजनीय देवता)आणि भजक (भक्त) असे दोन्हीही नसताना स्तवनाच्या निमित्ताने मी त्यांची उभारणी केली(कल्पना केली).जे अनिर्वाच्य आहे त्याचे वाच्य शब्दांनी वर्णन केले.त्याबद्दल क्षमा मागतो.(५५) अद्वैताच्या ठिकाणी द्वैत लाजले.अद्वैत हे शब्दसुद्धा फोल ठरतात.आता काहीच बोलणे नसल्याने त्याला मौन म्हणणेसुद्धा योग्य ठरत नाही. (न बोलण्याने मौनसुद्धा तेथे व्यर्थ होते) (५६)

## ।।श्रीराम समर्थ।। समास २रा - अनुबंधचतुष्टय

**होतां वेदांत प्रतिपादन । पाहिजे चत्वारि अनुबंधन । विषय संबंध प्रयोजन । अधिकारी चौथा।।१।।हे अनुक्रमें बोलिजेती । प्रथम विषय जो वेदांति । सकल उपनिषत्संमति । प्रतिपाद्य असे।।२।।आणि संत साधू सज्जन । भूत भविष्य वर्तमान । या सर्वाचें जें ज्ञान। तें एकचि असे।।३।।ब्रह्मीं उपाधी माया । मन उपाधी प्रत्यगात्मया। उपाधियोगें भेदा यया। सत्यत्व नसे।।४।।भेद पारमार्थिक असतां । तरी ज्ञानें कैसा निरसता । ज्ञानेंवीण मोक्षाची वार्ता । बोलोंचि नये।।५।।पूर्वी साधू थोर थोर । शास्त्रें गुरु आत्मविचार । बोलती अपरोक्ष साक्षात्कार । भेद उपाधी निरासें ।।६। ।भेद सत्यत्वें मानिला । तरी या सर्वांसी उच्छेद आला । तरी मग गुरु शास्त्राला । कोण पुसे ।।७।। ऐसें विरोधाचें बोलणें। न स्वीकारिती शहाणे । भेद मिथ्या कोटिगुणें । हें सर्व मान्य ।।८।। जाणावें ब्रह्मतत्त्व निर्गुण । हें मुख्य विषयाचें लक्षण । सर्व वेदांताचे तात्पर्य जाण । जें प्रत्यगात्मा ब्रह्म।।९।।**

---

## पंचिका १ली, समास २रा - अनुबंधचतुष्टय

वेदांताचे प्रतिपादन होत असते.तेव्हा चार घटकांचे परस्परसंबंध स्पष्ट करणे आवश्यक असते. त्या चार घटकांना अनुबंधचतुष्टय म्हणतात. ते घटक म्हणजे विषय, संबंध, प्रयोजन आणि अधिकारी हे होत.(१) त्यांचेच आता अनुक्रमाने विवेचन करावयाचे आहे. त्यांपैकी वेदान्ताचा जो प्रतिपाद्य विषय आहे त्याचे सर्व उपनिषदांच्या संमतीने जे स्वरूप आहे ते पाहू.(२)आणि भूतकाळ, भविष्यकाळ आणि वर्तमानकाळ या तिन्ही काळातील जे संत, साधू, सज्जन असतील त्या सर्वांचे ज्ञान एकच असते.(३) ब्रह्माच्या बाबतीत माया ही उपाधी असून त्याचा व्यक्तिविशिष्ट जो कल्पित अंश प्रत्यगात्मा त्याच्याबाबतीत मन हे उपाधी आहे. उपाधीमुळे निर्माण झालेल्या या भेदाला वास्तवात सत्यत्व नाही.(४) ब्रह्म आणि प्रत्यगात्मा यांच्यातील भेद पारमार्थिक म्हणजे खरा असता तर ज्ञानाने त्याचे निरसन कधी झाले असते काय?(म्हणजे हा जो भेद जाणवतो तो ज्ञानामुळे नष्ट होतो.) म्हणून ज्ञानाशिवाय मोक्ष प्राप्त करण्याच्या गोष्टी बोलूच नयेत.(५) पूर्वी होऊन गेलेले थोर थोर साधुसत्पुरुष, शास्त्रग्रंथ आणि सद्‌गुरू आत्मविचार सांगत असताना भेद आणि उपाधी यांच्या निरसनाने अपरोक्ष साक्षात्कार होतो असे सांगून गेले आहेत.(अपरोक्ष म्हणजे माध्यमाची अपेक्षा नसणारा, प्रत्यक्ष.)(६)या दोहोंतील भेद जर खराच आहे असे मानले तर,वर उल्लेख केलेले साधुसत्पुरुष,शास्त्रग्रंथ,गुरुवचन,आत्मप्रत्यय यांचे खंडन झाले असे होते.असे असेल तर गुरू, शास्त्र यांना कोण विचारील?(त्यांचे काहीच महत्त्व उरणार नाही.)(७)तेव्हा शहाणे लोक अशा परस्परविरोधी गोष्टी स्वीकारीत नाहीत. भेद हा सर्व प्रकारांनी (शब्दशः कोट्यवधी प्रमाणांनी) मिथ्याच ठरतो, हे सर्वमान्य आहे.(८)म्हणून निर्गुण अशा ब्रह्माचे ज्ञान करून घ्यावे,हे या ग्रंथाच्या मुख्य विषयाचे स्वरूप आहे.प्रत्यगात्मा हाच ब्रह्म आहे.हे सर्व वेदान्तशास्त्राचे तात्पर्य ठरते.(९)

**भेद असतां ऐक्य न घडे।उपाधीवीण ज्ञान न जोडे।ऐसें सांकडे दोन्हीकडे।तरी विषय कैसा।।१०।। आणि ब्रह्म तरी निराकार । मन बुद्धी अगोचर । म्हणोनी ज्ञानासी गोचर। नव्हे स्वरूप।।११।। ऐसिये आशंकेचा भाव । याचा कैसा अनुभव । बोलिजे तो अपूर्व। प्रमाणसिद्ध ।।१२।। फलव्याप्तीविण । वृत्तिव्याप्तीचें प्रयोजन ।[४] इंद्रियेवीण जाणें मन । म्हणोनि विषय ।।१३।। वृत्ति म्हणीजे चंचल। तेथें प्रतिबिंब तें फळ। उभय व्याप्तीनें सकळ। विषयाचें ज्ञान होतें।।१४।।बुद्धीनें अज्ञान नासे । आभासें घट स्फुरतसे । उभय व्याप्तीचें कारण असे बाह्यविषई।।१५।। उभयांपूर्वी जें साधारण । तें ब्रह्मतत्त्व प्रकाशमान। व्यापोनिया ज्ञानाज्ञान । जें सहज असे।।१६।।ब्रह्मतत्त्वें बुद्धि प्रकाशे । तरी आभासाचें काज काईसें। याचें उत्तर अपैसें । बोलिजेते।।१७।।विशेषेत्वें घट स्फुरण । हें तो आभासाचें लक्षण । बुद्धीसी जडत्व कारण । म्हणोनिया ।।१८।।स्फुरण होतांची जाय लया । आभास ऐसें म्हणावें तया । मुख्य तत्व अपसया । अंतर्बाह्य सदोदित ।।१९।।**

---

आता यावर एक शंका निर्माण होते. प्रत्यगात्मा आणि ब्रह्म यांमध्ये भेद असेल तर ज्ञान संभवत नाही. पण कोठल्या तरी उपाधीशिवाय ज्ञान होऊच शकत नाही. (ज्ञानासाठी ज्ञाता,ज्ञेय,ज्ञान अशा त्रिपुटीची गरज असते.) अशाप्रकारे या दोन्ही दृष्टींनी संकटच येते.मग ब्रह्मज्ञान हा विषय कसा होऊ शकतो? (हा विषय संदिग्ध आहे, व्यामिश्र आहे.)(१०)आणि ब्रह्म तर निराकार आहे. ते मन, बुद्धी या साधनांनी अनाकलनीय आहे,(अदृश्य आहे),म्हणून स्वरूप म्हणजेच ब्रह्मरूप हे ज्ञानाला अनाकलनीय आहे. (अप्राप्य आहे.)(११) असा या शंकेचा अभिप्राय आहे. याबाबतीत अनुभव काय आहे? तो अपूर्व अनुभव आता प्रमाणांनी सिद्ध करून सांगितला पाहिजे.(१२)फलव्याप्तीशिवाय (म्ह. जीवाच्या व्याप्तीशिवाय) केवळ बुद्धीच्या व्याप्तीने (वृत्तिव्याप्ती) इंद्रियांच्या मदतीशिवाय मन त्या ब्रह्माला जाणू शकते. म्हणून ब्रह्मज्ञान हा वेदान्ताचा विषय ठरतो.(१३)चंचल वृत्तीमध्ये प्रत्यगात्म्याचे जे प्रतिबिंब पडते तेच फल म्हणजे जीव होय. जीव आणि वृत्तीच्या व्याप्तीने सर्व लौकिक विषयांचे ज्ञान होते.(१४) बुद्धीने घटादी पदार्थांविषयीचे अज्ञान नाहीसे होते आणि आभासरूप जीवचैतन्याने घटादी पदार्थ प्रकाशित होतात. अशा तऱ्हेने बाह्य विषयांच्या ज्ञानासाठी बुद्धिवृत्ती आणि जीव या दोहोंच्या व्याप्तीची आवश्यकता आहे.(१५) बुद्धी आणि जीव उत्पन्न होण्यापूर्वी जी सामान्य अवस्था असते तेच प्रकाशमान होणारे ब्रह्मतत्त्व असून ते ज्ञान आणि अज्ञान या दोहोंनाही व्यापून अगदी सहजभावाने असते.(१६)ब्रह्मतत्त्वामुळे जर बुद्धी प्रकाशित होत असेल तर आभासरूप जीवाचे प्रयोजनच काय, याचे उत्तर आता ओघाने सांगितले पाहिजे.(१७)बुद्धी जड असल्यामुळे घटाचे विशेषत्वाने ज्ञान जीवालाच होते.घटादी पदार्थांचे विशेष ज्ञान करून देणे हे जीवाचेच लक्षण आहे.(१८) स्फुरण होताच जे लयाला जाते त्यालाच आभास असे म्हणतात. मुख्य ब्रह्मतत्त्व हे साहजिकच अंतर्बाह्य एकरूप आणि शाश्वत आहे.(१९)

**सामान्य आणि विशेष । मुख्य चैतन्य आणि आभास । बुद्धीस्तव आभासाभास । बुद्ध्याभावीं सामान्य।।२०।।बुद्धी नसतां ज्ञान नासे । आभास जाय तया सरिसें । मुख्य तें असतची असे । तिहीं काळीं।।२१।।म्हणउनी आभास चैतन्य । येणें स्फुरणें बुद्धीस ज्ञान। बोलिलें हें युक्त लक्षण । बाह्यविषयीं उभय व्याप्ति।।२२।।आभास बुद्धिसत्वें आहे।हें एकेविण एक न राहे । तरी दोन म्हणणें न साहे । बुद्धी आणि आभास।।२३।।बुद्धीविण प्रतिबिंब न पडे।चैतन्यावीण बुद्ध्यादि जडें। उभयापेक्षा उजेडे। इंद्रिया विषय।।२४।।हें असो ब्रह्मविषईं। फलव्याप्तीचें काज नाहीं। अज्ञाननिरासार्थ ठाईं ठाईं।वृत्तिव्याप्ती-अंगिकार।।२५।।हें ब्रह्म मी न जाणे। जाणोनीच म्हणे मी नेणें। या अज्ञान निवृत्ति करणें। मी ब्रह्म हे वृत्ति ।।२६।। नसे आभासाचें काज।बोलिलें हें अयुक्त वोज।वृत्ति असतां असे सहज। बाह्य विषयापरी।।२७।। याचें कैसें समाधान । ब्रह्म तरी स्वप्रकाशमान। घटादि जड म्हणऊन। आभासअपेक्षा।।२८।। जैसा चक्षु आणि दीप। मिळतां घटाचें दिसें रूप। पहावया चक्षूनें दीप। अन्यापेक्षा नसे।।२९।। तैसें ब्रह्मतत्व स्वयंप्रकाश। तेथें नलगे आभास। बुद्धीस्तव असतां तयास। अंतर्भूतता घडे।।३०।।**

---

मुख्य चैतन्य म्हणजे सामान्य आणि जीवचैतन्य म्हणजे विशेष. बुद्धीमुळेच जीवचैतन्याचा भास होतो. बुद्धीच्या अभावी सामान्यच असते.(२०) बुद्धी जर नसेल तर ज्ञान नष्ट होईल. त्याजबरोबर जीवचैतन्यही नष्ट होईल.पण मुख्य ब्रह्मतत्त्व मात्र सर्वकाळी तिन्ही काळी असतच असते.(२१) म्हणून आभासचैतन्य म्हणजे जीवचैतन्याच्या स्फुरणामुळेच बुद्धीस ज्ञान प्राप्त होते,असे म्हटले आहे.जीव आणि बुद्धी या दोहोंच्या व्याप्तीची बाह्य विषयांच्या ज्ञानासाठी आवश्यकता असते.(२२)जीवचैतन्याचे अस्तित्व बुद्धीच्या अस्तित्वावर अवलंबून असते.ही दोन्ही एकमेकावाचून राहू शकत नाहीत.म्हणून बुद्धी आणि जीव यांना दोन भिन्न पदार्थ म्हणता येत नाही.(२३)बुद्धीवाचून जीवरूपी प्रतिबिंब पडत नाही,तर जीवचैतन्याच्या अभावी बुद्ध्यादी पदार्थ जड असतात.(म्हणजे या दोहोंना एकमेकाच्या अस्तित्वाची अपेक्षा असते.)आणि या दोहोंमुळेच इंद्रियांना विषयांचे ज्ञान होते.(२४)असो,ब्रह्मप्राप्तीच्या संदर्भात जीवचैतन्याच्या व्याप्तीची आवश्यकता नाही.पण अज्ञानाचे निरसन करण्यासाठी मात्र बुद्धिवृत्तीच्या व्याप्तीचा स्वीकार करावा लागतो.(२५)हे ब्रह्म म्हणजे मी हे न जाणणे,जाणले तरी मी जाणत नाही, असे वाटणे या अज्ञानाचे,'मी ब्रह्म'अशी वृत्ती,निरसन करते.(२६) पण जीवचैतन्याचे येथे कारण नाही,असे म्हणणे अयोग्य आहे. बुद्धी जर असेल तर ब्रह्मज्ञान बाह्य विषयांप्रमाणेच सहज होईल.(२७)या शंकेचे समाधान कसे करायचे? ब्रह्म हे स्वयंप्रकाशी असते.घटादी पदार्थ हे जड असतात. म्हणून त्यांच्या ज्ञानाला जीवचैतन्याची अपेक्षा असते.(२८)घट पाहण्यासाठी डोळा आणि दिवा यांची अपेक्षा असते. पण डोळ्याने दिवा पाहण्यासाठी अन्य पदार्थाची अपेक्षा नसते.(२९)त्याप्रमाणे ब्रह्मतत्त्व हे स्वयंप्रकाशी असल्याने तेथे जीवचैतन्याची अपेक्षा नाही. पण ते जीवचैतन्य बुद्धिवृत्तीसह त्यात अंतर्भूत (समाविष्ट) असते.(३०)

**जैसे सूर्याच्या प्रकाशीं । लावितांही दीपासी । तेणें न प्रकाशी जे सूर्यासी । परि प्रकाशीं अंतर्भूत ।।३१।। येणें रीती बुद्धियोगें । ब्रह्मतत्त्व जाणावें प्रसंगें । येथें श्रोतीं लागवेगें । आक्षेपिलें ।।३२।। अंतःकरणादि जडें । म्हणून ब्रह्म जाणणें न घडे । येथें बोलिजेल उघडें । सप्रतीत ज्ञान।।३३।। अरसियांतील प्रतिबिंब । मुखेंचि जाणिजे स्वयंभ । हे माझिये मुखींची आभ। मजचि दिसे ।।३४।। अरसेविण मुख । नव्हे कदापि सन्मुख । अरसा जड मिथ्यात्व देख । प्रतिबिंबेंसी ।।३५।। तैसी बुद्धी हे आरसा । दिसणें असे प्रतिभासा । परि ते बुद्धी आणि आभासा। पाहणें न घडे ।।३६।।बुद्धी वेगळें ब्रह्म दिसेना। बुद्धी तरी जडत्वें जाणेना । मिथ्या आभासा कळेना । मी हा ऐसा असें ।।३७।। बुद्धिगत चैतन्य असे । तया चैतन्यचि जाणतसे । हा वेदांतसंमती असे । राजयोगु ।।३८।। अज्ञान जेव्हां सरे । तेव्हांचि ज्ञान ओसरें । जैसें सरतांचि कापुरें । अग्नि विझे ।।३९।। एवं ब्रह्म प्रत्यगात्मा होय । हा मुख्य वेदांत-विषय । येणें ज्ञानें पावन होय । मुमुक्षुजन ।।४०।। आतां संबंध तो कोणता । जाणावी साध्य साधकता । साधक मुमुक्षू तत्त्वतां । साध्य ते वस्तु ।।४१।। प्रत्यगात्मा ब्रह्म असतां । कैची ही साध्य साधकता । ऐसें कोणी आक्षेपितां।**

---

ज्याप्रमाणे सूर्याचा प्रकाश पडला असताना जरी दीप प्रज्वलित केला तरी त्या दीपाने सूर्य प्रकाशिला जात नाही पण त्या सूर्याच्या प्रकाशातच सामावून जातो.(३१) अशा रीतीने बुद्धीच्या साहाय्याने ब्रह्मतत्त्वाचे ज्ञान करून घ्यावे. यावर श्रोत्यांनी लगेच आक्षेप घेतला.(३२) अंतःकरणादी पदार्थ जड असल्यामुळे त्यांच्या साहाय्याने ब्रह्मज्ञान होऊ शकत नाही. यावर आता अनुभवासहित ज्ञानाचे स्वरूप स्पष्ट करून सांगण्यात येईल.(३३) आरशातील प्रतिबिंबाचे ज्ञान स्वतः मुखालाच होऊ शकते. माझ्या मुंखाची शोभा ही मलाच दिसू शकते.(३४) आरशाखेरीज मुख आपल्यासमोर कधीच येऊ शकत नाही. आरसा आणि प्रतिबिंब जड आणि मिथ्या आहेत.(३५) त्याप्रमाणे बुद्धीच्या आरशात प्रतिबिंब दिसू शकते. पण ते बुद्धी आणि जीव यांना पांहता येत नाही. (कारण ती दोन्ही अनुक्रमे जड आणि मिथ्या आहेत.)(३६) बुद्धीवाचून ब्रह्म दिसत नाही आणि बुद्धी तर जड असल्यामुळे जाणू शकत नाही. मिथ्या असल्यामुळे आभासस्वरूप जीवचैतन्याला 'मी असा आहे' हे कळत नाही.(३७) बुद्धीच्या ठिकाणी जे चैतन्य आहे, त्याचे ज्ञान मुख्य चैतन्यालाच (ब्रह्मालाच) होते. वेदान्तामध्ये ज्याला राजयोग म्हणतात तो हाच होय.(३८) कापूर संपताच ज्याप्रमाणे अग्नीही विझतो त्याप्रमाणे अज्ञान संपताच ज्ञानही ओसरते.(३९) अशा तऱ्हेने प्रत्यगात्मा हाच ब्रह्म आहे, हाच वेदान्ताचा मुख्य विषय आहे. या ज्ञानाने मुमुक्षू लोक पावन होतात. (म्हणजे कृतार्थ होतात)(४०) वेदान्तातील साध्य कोणते आणि साधक कोण हे जाणणे हाच संबंध होय. येथे मुमुक्षू हा साधक असून मूल वस्तू म्हणजे ब्रह्म हे त्याचे साध्य होय.(४१) वास्तविक प्रत्यगात्मा हाच ब्रह्म अशी स्थिती असताना त्यात साध्यसाधकता

**बोलणें घडे ।।४२।। तेंचि ब्रह्म आपण । असुन मी जीव मज बंधन । साध्य असुन विलक्षण । सहजची जाला ।।४३।। तें ब्रह्म मी कैसा पावेन । कोणतें करावें साधन । रिघाला सद्गुरूसी शरण । या नांव साधक ।।४४।। साध्य ब्रह्म असें सहजें । अज्ञानें केलें दुजें तेंचि ज्ञानें पाविजे । सद्गुरुकृपें ।।४५।। एवं साध्य साधक । उभयरूपें आपण एक । असुन घडे विवेक । संबंधाचा।।४६।।आतां तिसरें लक्षण । अनुबंधाचें प्रयोजन । सांगिजे तें सावधान । होऊन असावें।।४७।।वेद कासयासी बोलिला। आणि सर्व शास्त्रांचा गलबला ।नाना ग्रंथ विचारितां आला। कोण प्रत्यय।।४८।।तरी याचें फळ काय। बोलिजे तें यथान्वय । मागां बोलिला जो विषय । जाणता मोक्ष।।४९।।हें उपोद्घातत्वें बोलिजे । जें अर्थांतरें वर्णन कीजे ।शोकनिवृत्ती आणि दुजें ।आनंदावाप्ती।।५०।। स्वरूपाचें न जाणणें । जें प्रसिद्ध अज्ञान । त्यापासून विक्षेप जाण। जे मी जीव ऐसें ।।५१।। जैसें मागें कर्म केलें ।तेंचि आतां भोगणें पडलें । आतां जें क्रियमाण जालें। तें भोगणें अवश्य।।५२।।**

---

कशी काय निर्माण होते असा कोणी आक्षेप घेतला तर त्याला उत्तर देणे भाग पडते.(४२)आपण ब्रह्म असूनही'मी जीव आहे,मला बंधन आहे'अशा समजुतीमुळे तो मुमुक्षू(प्रत्यगात्मा)स्वत: साध्य असूनही (म्हणजे ब्रह्मरूप असूनही)स्वाभाविकपणेच त्यापासून वेगळा पडतो.(४३)मग ते ब्रह्म मला कसे होता येईल,त्यासाठी कोणते साधन करावे लागेल,अशी चिंता करीत जो सद्गुरूला शरण जातो,त्याला साधक म्हणतात.(४४)साध्य ब्रह्म स्वाभाविकपणे आपणच असूनही अज्ञानामुळे ते दुसरे वाटत होते,तेच सद्गुरुकृपेने ज्ञानाने प्राप्त होते.(४५)अशा तऱ्हेने साध्य आणि साधक या दोन्ही रूपांनी आपण एकच आहोत हा सबंध विचार झाला.(४६)आता तिसऱ्या अनुबंधाचे म्हणजे प्रयोजन या पदार्थाचे लक्षण सांगू.श्रोत्यांनी सावधान होऊन लक्ष द्यावे.(४७)वेद कशासाठी निर्माण झाला?(वेद कशासाठी सांगण्यास प्रवृत्त झाला?)सर्व शास्त्रांचा स्वमताविषयीचा आग्रह कशासाठी चालला आहे?निरनिराळ्या ग्रंथांचा आशय विचारात घेता काय दिसून येते?(४८)तरी या सर्व ऊहापोहाचे फळ काय ते आता सुसंगतपणे सांगितले पाहिजे.मागे जो ब्रह्मज्ञान हा विषय सांगितला त्याच्या ज्ञानाने मोक्ष प्राप्त होणे,हेच येथेप्रयोजन आहे.(४९)मोक्षाचा उद्देश डोळ्यांसमोर ठेवून प्रथम बंधन म्हणजे काय हे सांगून नंतर त्यातून मुक्तता म्हणजे मोक्ष असा पक्ष मांडण्यात येतो.त्याचे प्रत्यक्षातील स्वरूप म्हणजे शोकनिवृत्ती,आनंदप्राप्ती हे सांगण्यात येते.हा उपोद्घात झाल्यानंतर ह्या आशयाचे निरनिराळ्या अर्थाने प्रतिपादन करण्यात येते.(५०)स्वत:चे मूळ रूप न ओळखणे ह्यालाच अज्ञान म्हणतात.त्या अज्ञानापासूनच आपल्या मूळ रूपाच्या ऐवजी'मी जीव आहे'असे विपरीत ज्ञान निर्माण होते.हा विक्षेप होय.(५१)या विक्षेपामुळे जीवाला वाटत असते की,आपण मागे जी कर्मे केली त्यांचीच फळे आता आपण प्रारब्ध म्हणून भोगत आहोत.ती भोगत असताना येथून पुढे जी कर्मे केली जातील ती क्रियमाण कर्मेही भोगावी लागतील.(५२)

**ऐसी वासना बळावली । जन्मतांचि पुन्हा मेली । उसंत नाहीं पावली । नाना कष्ट।।५३।। या नावें बोलिजे शोक । तया नाशी ज्ञानविवेक । ज्ञान म्हणजे प्रतिपादक। जें वेदें केलें।।५४।। संशय विपर्यास जाऊन । जे प्रत्यगात्मा ब्रह्म पूर्ण । या नांव बोलिजे ज्ञान । आत्मशास्त्रगुरुप्रतीति।।५५।।आपण ब्रह्म परिपूर्ण । मग कोणासी जन्ममरण । होय शोकाचें निवर्तन । हें एक फळ ।।५६।। आत्मा ब्रह्म आनंदघन । तेंचि निजांगे आपण। पावला सहज समाधान । निरतिशयानंद ।।५७।। आत्मस्वरूप एव मुक्ति । ऐसे बोले वेदश्रुति । म्हणोनि आनंदावाप्ती । तोचि हा मोक्ष।।५८।।एवं ऐसीं फळें दोन । आनंदावाप्ती शोकापगमन। हेंचि मुख्य प्रयोजन । लक्षण तिसरें ।।५९।। चौथा अधिकारी बोलिजे । सांगिजेल चिन्हीं ओळखिजे । मग तेणें रीती कीजे । साधन साधकीं ।।६०।। ये समासीं लक्षण केलें । अनुबंधचतुष्टय वर्णिलें । पुढिले समासीं निरोपिलें । साधनचतुष्टय ।।६१।।**

**इतिश्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । अनुबंधचतुष्टयप्रकारे। द्वितीयसमासः ।।२।।**

---

अशी दृढ भावना बळावते. तिच्यामुळे जन्म झाला की मृत्यू पावणे (त्यानंतर पुन्हा जन्म, पुन्हा मरण) अशा क्रमाने जराही उसंत न घेता अव्याहतपणे अनेकविध कष्ट भोगत राहतो.(५३) याला शोक असे म्हणतात. अशा या शोकाचा, ज्ञानाचा विवेक नाश करतो. ज्ञान म्हणजे वेदाने ज्याचे प्रतिपादन केले त्याचा विचार होय.(५४) संशय आणि विपर्यास यांचा निरास करून प्रत्यगात्मा तोच ब्रह्म अशी जाणीव होणे यालाच ज्ञान असे म्हणतात. ते आत्मप्रतीती, शास्त्रप्रतीती आणि गुरुप्रतीती या त्रिविध प्रतीतींनी सिद्ध होते.(५५) आपणच परिपूर्ण ब्रह्म आहोत हे निश्चित झाल्यावर जन्म मरण कोणाला असणार? अशा तऱ्हेने शोकाचे निरसन होते. हे त्या ज्ञानाचे एक फळ होय.(५६) आनंदघन ब्रह्म म्हणजेच आत्मा असून आपण स्वतःही तेच आहोत. या निश्चयाने आत्म्याला सहज समाधान आणि अतिशय आनंद प्राप्त होतो.(५७) आत्मस्वरूपज्ञान हीच मुक्ती, असेच वेदांचे म्हणणे आहे. म्हणजे आनंदप्राप्ती हाच मोक्ष होय.(५८) अशा तऱ्हेने आनंदप्राप्ती आणि शोकपरिहार ही जी ज्ञानाची दोन फळे होत. तीच प्राप्त करणे हे या ब्रह्मज्ञानाचे प्रयोजन होय.(५९) चौथा अनुबंध म्हणजे अधिकारी होय. त्याची पुढे सांगण्यात येणाऱ्या चिन्हांनी ओळख पटेल.मग साधकाने तशा प्रकारचे साधन करावे.(६०) अशा तऱ्हेने या समासात अनुबंधचतुष्टय यांची व्याख्यापूर्वक वर्णन केले. पुढच्या समासात साधनचतुष्टय सांगितले आहे.(६१)

**।।श्रीराम समर्थ ।। समास ३रा - नित्यानित्यविचार**

**वेदांत प्रसिद्ध जें ज्ञान । म्हणऊन वेदांत कथन । पूर्वी सांगितलें निरूपण । अनुबंधाचें।।१।। येथें अधिकारी कोणता । तो तीप्रकारें तत्त्वतां । मंद तीव्र तीव्रतरता । प्रज्ञा जयाची।।२।। तीव्रतरउत्तम अधिकारी । अनंत जन्मींची सामुग्री । जरी पुण्य-पुंज असे पदरीं । तत्काळ त्या प्राप्ती।।३।। त्यासि नलगे सायास । एकवेळ होतां उपदेश । करुनी संशयाचा ग्रास। समाधान पावे।।४।। आतां मंदप्रज्ञ कनिष्ठ । तयासि साधनाचें कचाट । विविदिषा असे तरि वाट । सत्संगें शोधावी ।।५।।विविदिषा नसतां तयास । वेदांतिं नसे अवकाश । तेणें कर्म अथवा उपासनेस । सदृढ धरावें ।।६।। तथापि बळेंचि रिग केला। तो इहपरत्रीं नासला । बोलकेंपणें वरपडा जाला । पाषांडमति ।।७।। मंदप्रज्ञ जरी भावार्थी। तया साधनें ब्रह्मप्राप्ती । आतां असो मुख्य वेदांतीं । अधिकारी कोणता ।।८।। तीव्रप्रज्ञ मध्यम। तया वेदांत विचार सुगम । कांही प्रतिबंधास्तव उत्तम । नव्हे, मध्यम बोलावा ।।९।। उपदेशापूर्वी साधनयुक्त। तोचि जाणावा परमयुक्त। तयासीच हें वेदउक्त। ज्ञान लाभे।।१०।।**

---

**पंचिका १ली, समास ३रा - नित्यानित्यविचार**

वेदान्त प्रसिद्ध असे जे ज्ञान आहे त्याचे प्रतिपादन म्हणजे वेदान्तकथन होयत्याच्या अनुबंधांचे निरूपण यापूर्वी केले.(१)या ठिकाणी अधिकारी म्हणजे कोण,असा प्रश्न विचारला तर त्याचे मंदप्रज्ञ,तीव्रप्रज्ञ,तीव्रतरप्रज्ञ असे प्रज्ञेच्या क्षमतेवरून तीन प्रकार आहेत.(२)तीव्रप्रज्ञ हा त्यातील उत्तमअधिकारी होय.जर अनंत जन्माची सामग्री गाठी असेल,पुण्याचा मोठा साठा पदरी असेल तर त्याला तत्काळ ज्ञानप्राप्ती होईल.(३)त्यासाठी त्याला कष्टांची गरज भासणार नाही.श्रीगुरूंचा एकदा उपदेश झाला की त्याच्या सर्व संशयांचा नाश होऊन त्याला समाधान प्राप्त होते.(४)त्यांमध्ये मंदप्रज्ञ हा सर्वांत खालच्या पातळीवरचा अधिकारी असून त्याला साधनांचे खूप कचाट सोसावे लागते.त्याच्या ठिकाणी विविदिषा(जाणून घेण्याची इच्छा,ज्ञानप्राप्तीची इच्छा)असेल तरच त्याने सज्जनांच्या सहवासात या मार्गाचा अवलंब करावा.(५)त्याला जर अशी विविदिषा नसेल तर त्याला वेदान्तशास्त्रात स्थान नाही.त्याने कर्ममार्ग अथवा उपासनामार्ग यांचा दृढतापूर्वक अवलंब करावा.(६)त्याने बळजबरीने वेदान्तमार्गात प्रवेश केला तर त्याचे इहलोकी आणि परलोकी दोन्ही ठिकाणी नुकसान होईल.कारण त्याचे वेदान्तज्ञान केवळ बोलघेवडे ठरून तो पाखंडी बुद्धीचा होईल.(७)मंदप्ररज्ञ जर खरोखरच इच्छुक असेल तर साधन करून त्याला ब्रह्मप्राप्ती होऊ शकते.हे आता राहू देत.वेदान्तमार्गात मुख्य अधिकारी कोणता,याचा विचार करू.(८)(तीव्रतरप्रज्ञही नाही आणि मंदप्रज्ञही नाही)तर मधला जो तीव्रप्रज्ञ आहे त्याला वेदान्तविचार सोपा ठरेल.काही प्रतिबंधामुळे(अडथळ्यांमुळे)त्याला उत्तम अधिकारी म्हणता येत नाही.म्हणून त्याला मध्यम अधिकारी म्हणावे.(९)वेदान्ताचा उपदेश घेण्यापूर्वी जो अगोदरच साधनसंपन्न असेल तोच या

**तथा साधनाचें लक्षण । विशद कीजें निरूपण । जो कां चतुष्टयसंपन्न । साधनयुक्त।।११।। नित्यानित्यवस्तुविवेक। विरक्त असे इहामुष्मिक । संपत्ति शमादिशट्क। मुमुक्षता चौथी।।१२।। हें अनुक्रमें बोलिजेती। ज्याची अनुतापें तप्त मती। तयासीच साधनसंपत्ती । माळ घाली।।१३।। यासी कारण त्रिविधताप । जया घडे अनुताप । कैसें तापाचें स्वरूप। आधीं जाणावें।।१४।। आध्यात्मिक आधिभौतिक।तिसरा तो आधिदैविक।संक्षेपें याचा विवेक। कळला पाहिजे।।१५।। देह प्राणापासून झाले। दुःख इंद्रियानें केलें । किंवा मनें कल्पिलें । नाना आधि ।।१६।।हें आध्यात्मिक या नाव । पूर्वसंचिताचा ठेवा । सुखदुःख भोग सर्व। प्रारब्धाधीन ।।१७।।नाना भूतें पीडा करिती। अथवा भौतिकें दुःख देतीं। जाणावी हे प्रतीति। आधिभौतिकाची।।१८।।या लोकांचे दैवत। अथवा अंतीं यमदूत। अत्यंतचि पीडा करित। हा आधिदैविक।।१९।।त्रिविधतापें जन्मले प्राणी। भोगितातिं नाना जाचणी। परि उपजेना अनुताप मनीं। हेंचि पूर्व पाप।।२०।।जरी जन्मांतरी घडलें। पूर्व पुण्य उभें राहिलें। अनुतापें दुश्चित्त जालें। संसारिं चित्त ।।२१।।**

---

मार्गातील अतिशय योग्य अधिकारी होय. अशा अधिकारी व्यक्तीलाच हे वेदोक्त (वेदात सांगितलेले) ज्ञान लाभेल.(१०)अशा साधकाच्या लक्षणांचे आता स्पष्ट निरूपण करतो.तो चार प्रकारच्या साधनांनी युक्त असावा लागतो.(११)ते साधनचतुष्टय म्हणजे नित्यानित्यवस्तुविवेक,इहलोक आणि परलोकातील सुखांपासून विरक्ती;शमदमादिषद्क संपत्ती आणि चौथी मुमुक्षुता हे होय.(१२)यांचे आता अनुक्रमाने स्पष्टीकरण करतो.ज्याची बुद्धी पश्चात्तापाने दग्ध झाली असेल अशालाच ही साधनसंपत्ती माळ घालील.(१३)ज्याला पश्चात्ताप होतो त्याच्या पश्चात्तापाचे कारण म्हणजे त्रिविध(तीन प्रकारचे)ताप होत.प्रथम त्या तापांचे स्वरूप जाणून घ्यावे.(१४)ते त्रिविध ताप म्हणजे आध्यात्मिक,आधिभौतिक आणि आधिदैविक हे होत.आता यांचा विचार संक्षेपाने जाणून घेतला पाहिजे.(१५)देह व प्राण यांच्यापासून झालेले दुःख,इंद्रियांपासून झालेले दुःख (या सर्व शरीरात उद्भवणाऱ्या दुःखांना व्याधी म्हणतात)किंवा मनाने कल्पिलेल्या चिंता,खेद,उद्विग्नता इत्यादी विविध आधी.(म्हणजे मानसिक दुःखे.)(१६) या सर्वांना आध्यात्मिक ताप असे नाव आहे. सुखदुःखादी भोग हे सर्व प्रारब्धाधीन असून पूर्वसंचिताची सामग्री आहे.(पूर्वी केलेल्या पापपुण्यांचा साचलेला संग्रह आहे.)(१७)निरनिराळी भूते (पृथ्वी,आप,तेज,वायू आणि आकाश)जो त्रास देतात अथवा या भूतांपासून निर्माण झालेले पदार्थ (भौतिक)जी दुःखे देतात,त्यांमध्ये आधिभौतिक तापाचा अनुभव येतो.(१८)या इहलोकातील दैवते अथवा मरणानंतर यमदूत इत्यादी जे अतिशय कष्ट देतात,त्याला आधिदैविक ताप म्हणतात.(१९)या सृष्टीतील सर्व प्राणी या त्रिविध तापांसह जन्म घेतात,निरनिराळे जाच सहन करतात, तरीसुद्धा त्यांच्या मनात पश्चात्ताप उत्पन्न होत नाही,हेच पूर्वपाप होय.(२०)असे पूर्वपाप मागच्या जन्मात आपल्याकडून घडले तरी या जन्मी पूर्वपुण्य उदयाला आले तर त्या प्राण्याचे मन पश्चात्तापामुळे संसारातून उद्विग्न होते.(२१)

**जैसा ऊष्णकाळीं अरण्यांत । गज सांपडे ओणवियांत । सरोवर देखतां अकस्मात् । उडी घाली ।।२२।। तैसा त्रिविधतापें पोळला ।अनुतापें अवघा त्याग केला ।सुखरूप सत्संग धरिला। पुन्हा न सोडी[१] ।।२३।। तयासीच साधन घडे । येरव्ही सर्वथा न जोडे । नाना संसारीं सांकडें । भोगितां कष्ट ।।२४।। असो नित्यानित्यविवेक । तयाचें कैसें रूपक । येथें बोलिजे संक्षेपक । तें अवधारा ।।२५।। नित्य म्हणिजे सत्य । अनित्य जाणावें असत्य । निवाडा करी विचारयुक्त । क्षीर नीर जैसें ।।२६।। नाना ग्रंथ पाहिले । विचारें त्रैलोक्य धुंडिलें । मज जन्मासि येणें पडिलें । कवणें परी ।।२७।। हें जग कासयाचें जालें । आणि यासी कोणी निर्मिलें । मज जन्मासी घातलें । तो कोण देव ।।२८।। मी मी जया म्हणीतलें। ते देह तरी आतां जन्मले । त्यासी नांवही ठेविलें । गोम्यातिम्या ।।२९।। जयासी जन्म होय तत्त्वतां । तो जन्मापूर्वीं होता । देह मरणधर्मी अवचिता । मरुनि जातो।।३०।। बाप आजा पणजा मेला । प्राणी मरतो जो जन्मला । गतगोष्टीनें प्रत्यय आला । मृत्यु न चुके ।।३१।। नाना शरीराचे मासले । पंचभूताचे उभे केले ।**

---

ज्याप्रमाणे उन्हाळ्याच्या दिवसात एखादा हत्ती अरण्याला लागलेल्या वणव्यात सापडला आणि त्याला अकस्मात् एखादे सरोवर दिसले तर त्यात उडी घेतो.(२२) त्याप्रमाणे जो कोणी या त्रिविध तापांनी पोळून निघाला असेल तो पश्चात्तापाने सर्व गोष्टींचा त्याग करतो आणि सुखकारक अशा सज्जनसंगतीचा स्वीकार करतोआणि ती कधीही सोडीत नाही.(२३) त्यालाच साधन घडते. अन्यथा त्याला साधन प्राप्त होत नाही. संसारातील अनेक संकटे भोगताना त्याला कष्टच सहन करावे लागतात.(२४) तर हे राहू द्या, आता नित्यानित्यवस्तुविवेक असे ज्याला म्हणतात, त्याचे रूप काय आहे, ते आता संक्षेपाने सांगतो. ते नीट लक्षपूर्वक ऐका.(२५) नित्य म्हणजेच सत्य आणि अनित्य म्हणजे असत्य. या दोहोंचा हंस ज्याप्रमाणे दूध आणि पाणी यांचा निवाडा करतो त्याप्रमाणे साधक विचारपूर्वक निवाडा करतो म्हणजे नित्यानित्यवस्तुविवेक होय.(२६) त्यासाठी खूप ग्रंथांचे अध्ययन करावे लागते, विचाराच्या साहाय्याने सर्व त्रैलोक्याचा धांडोळा घ्यावा लागतो. मला जन्म कशाप्रकारे प्राप्त झाला?(२७) (हे जग म्हणजे काय?) ते कशापासून निर्माण झाले? त्याला कोणी निर्माण केले? मला जन्माला घालणारा देव कोणता?(२८) ज्याला मी 'मी' म्हणून ओळखतो ('मी' असे म्हणतो) तो देह तर आता म्हणजे अलीकडे जन्माला आला आहे. त्याला (ओळखण्यासाठी) गोम्या, तिम्या असे नावही ठेवले आहे.(२९) खरे पाहिले तर, ज्याला हा जन्म प्राप्त होतो तो, हा जन्म प्राप्त होण्यापूर्वीही अस्तित्वात होता. मरण हा ज्याचा स्वभाव आहे तो देह अचानकपणे मरून जातो.(३०) बाप मेला, आजा मेला, पणजा मेला याप्रमाणे जो जो जन्माला येतो तो तो प्राणी मरण पावतो. हे आतापर्यंत होऊन गेलेल्या घटनांनी अनुभवास येते. तेव्हा मृत्यू हा चुकत नाही.(३१) पंचमहाभूतांपासून बनलेले अनेकविध शरीरांचे प्रकार

**देखत देखतां नासले । तें सत्य कैसें ।।३२।। म्हणोनि भौतिक नाशवंत । सत्य म्हणो जरी पंचभूत । पृथ्वी रचूनिया खचत । आप आटत सर्वदा ।।३३।। अग्नी जळून विझतो । वायु सुटून वितळतो । येणें रीती संहार होतो । पंचभूतासी।।३४।। तस्मात् हे सत्य न होती । असत्य ऐसें विचारी चित्तीं । परि कर्त्याची सामर्थ्य शक्ति। कैसी असे।।३५।।परि हें कोणी केलें । म्हणो ब्रह्मदेवें निर्मिलें । तया ब्रह्मया उत्पन्नविलें । कोण्या देवें।।३६।।यासि विष्णु पालन करी । शेवटीं रुद्र संहारी । पाळितो आणि संहारी। उभयतांसी कोण।।३७।।येथें कर्तेपण दिसेना । केलें तें असत्य नाना । जेथें कर्ता आढळेना । त्यासी कल्पना मूळ।।३८।।नाना पिंड आणि ब्रह्मांड । अवघें कल्पनेचें बंड । कल्पनाच मुळीं थोतांड । असत्य मनाची।।३९।।एवं हें सर्व अनित्य । क्षणक्षणा नासे जन्मत । काल्पनीक हें प्रतीत । खरी आली।।४०।।परि कल्पना कोणासि जाली। मिथ्या परि कोणाची साउली । अधिष्ठानेंविण भ्रमली । न वचे दृष्टी।।४१।।सर्प मिथ्या तरि रज्जूचा जाला । अधिष्ठान सत्यत्व असें त्याला। सत्यत्वेंवीण भ्रमाला । रूप कैचें।।४२।।**

---

पाहता पाहता नष्ट झाले.त्यांना सत्य कसे म्हणावे?(३२)म्हणून पंचमहाभूतांपासून निर्माण झालेले सर्व पदार्थ नाशवंत आहेत.पंचभूतांना सत्य मानले तर,पृथ्वी निर्माण होऊन खचते,पाणी नेहमी आटून जाते.(३३)अग्नी प्रज्वलित होऊन विझतो,वारा सुटतो आणि विरून जातो,अशा प्रकारे पंचमहाभूतांचा संहार होतो.(३४)त्यामुळे ती सत्य नाहीत,ती असत्य आहेत,असा मनात विचार करावा.पण या सर्वांचा निर्माता कोण आहे,त्याचे सामर्थ्य कशा प्रकारचे आहे?त्याच्या ठिकाणी कशा प्रकारची शक्ती आहे?(३५)हे कोणी निर्माण केले?ब्रह्मदेवाने निर्माण केले असे म्हटले तर त्या ब्रह्मदेवाला कोणत्या देवाने निर्माण केले?(३६)याचे(विश्वाचे)विष्णू पालन करतो,शेवटी रुद्र त्याचा संहार करतो असे म्हटले तर या दोघांचे पालन कोण करतो?त्यांचा संहार कोण करतो?(३७)या संदर्भात कोणाच्याही ठिकाणी कर्तेपण दिसत नाही.ज्या कोणी केले ते सर्व अनेकविध पदार्थ असत्य आहेत.जेथे कर्ता आढळत नाही,तेथे कल्पना हीच त्याच्या मुळाशी असते.(म्हणजे हे सर्व काल्पनिक आहे.)(३८)निरनिराळी व्यष्टिरूप शरीरे आणि समष्टिरूप हे सर्व ब्रह्मांड हे सर्व कल्पनेचेच बंड आहे.खुद्द कल्पना हीच खोट्या असलेल्या मनाची खोटी निर्मिती आहे.(३९)अशा तऱ्हेने हे सर्व अनित्य आहे.ते सर्व क्षणोक्षणी जन्माला येते,नष्ट होते.त्यावरून हे सर्व काल्पनिक आहे अशी प्रतीती आली.(४०)पण ही मूळ कल्पना कोणाच्या ठिकाणी निर्माण झाली?सावली खोटी असते,पण ती कुणाची तरी(कुणामुळे तरी)निर्माण झालेली असते.तशी कल्पना कुणाशी संबंधित असते?दृष्टीला भ्रम झाला म्हटले तरी त्याचे अधिष्ठान काहीतरी असतेच.अधिष्ठानावाचून दृष्टीला भ्रम होत नाही.(४१)साप खोटा असला तरी त्याचे अधिष्ठान रज्जू(दोरी)हेच असते.त्या खोट्या सापाला निदान अधिष्ठान सत्यत्व असते.तेव्हा सत्याच्या अधिष्ठानाखेरीज भ्रमाला

**ब्रह्मांड इच्छा जयाची। ते शक्ति माया परि कोणाची। सत्यत्वेंवीण नव्हेची। नाथिलें सर्व।।४३।। ऐसें असत्य निवडिलें। सत्य ब्रह्म ठाईं पाडिलें। आतां मी देह जेणें कल्पिलें। तो मी कोण।।४४।। मी देहापूर्वी होतों। कल्पनेसी जाणतों। निद्रासुखाचा येतो। अनुभव मज।।४५।।तिन्ही अवस्थेचा जाणता। अवस्था नव्हे मी तत्त्वतां। नाथिली कल्पनेची व्यवस्था। मज घडली।।४६।। तो मी सत्यची आहें। माझा नाश कोण पाहे। असत्य तितुकें नासताहे। मज देखतां।।४७।। म्हणऊन मी सत्य असें। ब्रह्म आत्मा दोनि ऐसें। येणें बोलें द्वैत भासे। दोहींच्या सत्यत्वें।।४८।। द्वैत अज्ञानें दिसलें। मिथ्या प्रतीतीस आलें। विचारितां व्यर्थ जालें। दोनिपण।।४९।।म्हणऊन प्रत्यगात्मा ब्रह्म पूर्ण। *या नांव बोलिजें ज्ञान। नित्यानित्यविचार।।५०।। जाला विचार विवेकाचा। ठाव लाधला नित्याचा। यासि हेतुभूत विरक्तीचा। विचार पुढें।।५१।।**

**इति श्रीमदागमसारे। उपनिषत्तात्पर्यानुसारे। नित्यानित्यविचारे। तृतीयसमास।।३।।**

* येथें नाहीं की दुजेंपण।

**।। श्रीराम समर्थ ।। समास ४था - वैराग्यलक्षण**

**इह म्हणिजे या लोकींचे। अमुत्र म्हणजे स्वर्गीचें। तया कल्पित सुखाचें। भोगणें कर्मानुसार।।१।।**

---

अस्तित्व कसे असेल?(४२)त्याप्रमाणे ब्रह्मांड ज्याच्या इच्छेने निर्माण झाले,ती इच्छाशक्ती माया म्हणजे मिथ्या खरी,पण ती कोणाची?सत्यत्वाच्या अधिष्ठानावाचून ती सत्य असूच शकणार नाही.म्हणून सर्वच असत्य आहे.(४३)अशा तऱ्हेने असत्य निवडून काढले तेव्हा सत्य ब्रह्माचे स्वरूप समजले.(पदरात पाडून घेतले.)आता'मी देह'अशी कल्पना करतो तो'मी'कोण?(४४)मी देहापूर्वी होतो,मी कल्पनेला जाणतो,निद्रासुखाचा मला अनुभव येतो.(४५)जागृती,स्वप्न आणि सुषुप्ती या तिन्ही अवस्थांचा जाणता हा(त्या अवस्था नसून)मी आहे.म्हणजे त्या अवस्था म्हणजे मी नव्हे.मिथ्या कल्पनेतून निर्माण झालेली ही व्यवस्था मला म्हणजे माझ्या ठिकाणी घडते.(४६)असा मी सत्यच आहे.माझा नाश कोण पाहतो?जेवढे असत्य असेल ते सगळे माझ्यादेखत नष्ट होते.(४७)म्हणून मी सत्य आहे.आता ब्रह्म सत्य आहे.आत्माही सत्य आहे.या वचनांनी या दोहोंचे सत्यत्व प्रतिपादले असल्यामुळे द्वैत भासू लागते.(४८)पण हे द्वैत अज्ञानामुळे दिसत आहे.ते मिथ्या आहे हे प्रत्ययाला येते.विचार करून पाहता ते द्वैत खोटे ठरते.(४९)म्हणून प्रत्यगात्मा हाच ब्रह्म असून त्याला दुसरेपण संभवत नाही.यालाच नित्यानित्यविवेक म्हणतात हेच ज्ञान होय.(५०)याप्रमाणे विवेक(नित्यानित्यवस्तुविवेक)म्हणजे काय हे कळले आणि नित्य म्हणजे काय हेही कळले.या दोहोंचा हेतू(म्हणजे कारण)जी विरक्ती(वैराग्य)तिचा विचार पुढे करू.(५१)

**पंचिका १ली, समार ४था - वैराग्यलक्षण**

इह म्हणजे या लोकातले, अमुत्र म्हणजे स्वर्गातले अशी जी कल्पित सुखे आहेत, ती सुखे कर्मानुसार

**तेथें विवेके जो विटला । तोचि ज्ञानाचा अधिकारी जाला । विरक्तीवीण ज्ञानाला । दृढता नसे।।२।।विरक्ती म्हणिजे त्याग। विषयाचा जो अनुराग। प्रस्तुत इहलोकींचे भोग। जाणावे आधीं।।३।।स्त्री पुत्र आणि वित्त । माझें माझें जे म्हणत । यासि जे का हेतुभूत। जे मी मी म्हणे।।४।।मी माझें हा संसार । इतुकाचि असे जोजार । या विरहित अणुमात्र। तिसरें नाहीं।।५।।म्हणोनि मीपण शोधावें । मग काय माझें तें पडे ठावें । मी तरी कोणास म्हणावें । शरीरीं नानात्व बहु।।६।।जन्मानंतर ठेविलें नाम । तें मी नव्हे हा नेम । आतां रूपाचा अनुक्रम । बोलिजे तो।।७।।इंद्रिय प्राण अंतःकरण । त्याचीं नामें भिन्न भिन्न । तें तें माझी म्हणतां आन । तो तो मी नव्हे।।८।।जैसी चिरगुटाची बाहुली । अवयवें परम शोभली । हाव भाव कटाक्षें जाली । परम सलक्षण।।९।।तीं लक्षणें आणि हाव भाव। उकलून पाहतां न दिसे ठाव। दिसे परि तें समूळ वाव। आकार असतांही।।१०।।तैसी बहु तत्त्वें मिळालीं। म्हणून काया दिसूं लागली। मी मी ऐसी प्रतीती आली। परि ते मिथ्या।।११।। तत्त्वीं तत्त्वें शोधिलीं। बहुपणें विरोनि गेली । तरी मग मीपणाची भुली। सहजची वाव।।१२।।**

---

भोगायला मिळतात.(१)या सुखांना विवेकाने (विचाराने) जो विटतो. तोच ज्ञानाचा अधिकारी होतो. कारण वैराग्यावाचून ज्ञानाला दृढता येत नाही.(२)विरक्ती म्हणजे विषयसुखांबद्दलचे जे प्रेम त्याचा त्याग होय. आता अगोदर इहलोकीचे भोग म्हणजे काय ते जाणून घेऊ.(३)स्त्री,पुत्र,धन यांना आपण 'माझे, माझे' असे म्हणत असतो आणि 'माझे' असे म्हणणारा जो, त्याला 'मी, मी' असे म्हणत असतो.(४)मी आणि माझे एवढेच आपले विश्व असते.याखेरीज त्यात तिसरे कणभर देखील नसते.(५)म्हणून 'मीपण' म्हणजे काय त्याचा शोध घ्यावा,त्यानंतर 'काय माझे आहे' ते कळते.आता आपल्या शरीराच्या संदर्भात विविध गोष्टी आढळतात.यांपैकी 'मी' नेमके कोणाला म्हणता येईल?(६) मनुष्याचा जन्म झाल्यानंतर त्याचे नाव ठेवतात.ते नाव म्हणजे 'मी' नव्हे,हे निश्चित.आता त्यानंतर रूपाचा क्रम सांगितला जातो त्याचेही स्वरूप पाहू.(७)शरीरात इंद्रिये,प्राण,अंतःकरण अशी अनेक तत्त्वे आहेत. त्यांची भिन्न भिन्न नावे आहेत.त्या तत्त्वांना आपण 'माझी'म्हणून संबोधतो.त्या अर्थी ती तत्त्वे माझ्यापासून भिन्न ठरतात. म्हणून ती तत्त्वे म्हणजे मी नव्हेत.(८)ज्याप्रमाणे चिरगुटे म्हणजे चिंध्यांची बाहुली केलेली असते.तिच्या निरनिराळ्या अवयवांमुळे ती छान दिसते. तिचे हावभाव,कटाक्ष इत्यादींनी तिच्यात काही लक्षणे म्हणजे गुण उतरतात. आता ती उकलून पाहिली तर त्या लक्षणांचा आणि हावभावांचा काहीच मागमूस दिसत नाही. आता ते तर दिसत होते, पण ते आकार असतानाही व्यर्थ ठरले.(९-१०)त्याप्रमाणे अनेक तत्त्वे एकत्र आली म्हणून हे शरीर दिसू लागले. त्याच्या ठिकाणी 'मी, मी' अशी प्रतीतीही आली, पण ते सर्व मिथ्या होय.(११)तत्त्वांच्या साहाय्याने तत्त्वांचा शोध घेतला तर त्यांच्या अनेकत्वामुळेच ती बाद ठरतात, तर मग त्यांच्या ठिकाणी मीपणाचा जो भ्रम होतो तो मुळासहित व्यर्थ ठरतो.(१२)

**मी एक सत्य असावा। तरी माझें हे हा पडे गोवा। तथापि तया भोग्या सर्वा। सत्यत्व नाहीं।।१३।। स्त्रीसंगें बहुत सुख । क्षणीक वाटे परि तें दु:ख । परम लावण्य दिसे मुख। परि तें घाणेरें।।१४।।अस्थि मांस त्वचा रक्त । तेथें काय रे शोभिवंत । नाना दोषें असें प्लुत । वमन जैसे।।१५।।तैसाचि पुत्रही अनर्थ। दु:खरूपासी म्हणती स्वार्थ । पुत्र व्हावा हा हेत। पूर्वी दु:खरूप।।१६।।गर्भापासून मरणवरी । पुत्र पित्यासी दु:खकारी। अनुभवें जाणावें कितीतरी। विस्तार करूं।।१७।।येणें रीतीं राज्य संपदा । ते ते दु:खाची आपदा। अर्जनीं रक्षणीं व्ययीं सदा। क्लेशरूप।।१८।।तस्मात् हें सर्व दु:खमूळ। त्याग करणें हेंचि मंगळ। विषय त्यागितांही सकळ। देह वाचेना।।१९।।या आक्षेपी बोलिजे उत्तर। त्याग करणें प्रीति मात्र। भोगीं बांधिलें जें अंतर। तें दोषदृष्टी त्यागावें।।२०।।अल्प निद्रा अल्प आहार। अल्पचि असावा विहार। साधनासी जो विघ्नकर। तो तो विषय त्यागावा।।२१।। अंतर्त्याग घडे सर्वांसी। उभय त्याग संन्याशासी। तथापि आहार निद्रा तयासी। सर्व सांडितां सुटेना।।२२।।**

---

आता'मी'एक सत्य मानले तरी'माझे'चा गुंता कायम राहतोच.तथापि माझे असे आपण ज्यांना म्हणतो ते सर्व भोग्य(भोगण्यासारखे)या सदरात पडत असल्यामुळे त्या सर्वांना सत्यत्व येतच नाही.(१३)स्त्रीच्या सहवासात पुष्कळ सुख क्षणभर वाटते.पण नंतर ते दु:खरूप ठरते.तिचे मुख अतिशय सुंदर दिसते.पण वास्तवात तेथे घाणच असते.(१४)अस्थी,मांस,त्वचा,रक्त हेच तिथे असते.त्यांमध्ये शोभिवंत असे काय आहे?त्यामध्ये नाना दोष भरलेले आहेत.ते सर्व ओकून टाकलेल्या पदार्थांसारखे आहेत.(१५) त्याप्रमाणे पुत्र हाही अनर्थरूपच होय.जे दु:खरूप आहेत त्याला लोक स्वार्थ(स्वत:च्या हिताचे,उपयोगाचे) मानतात. सर्वजण पुत्र व्हावा हा हेतू मनात बाळगतात.पण पुत्र अगोदर दु:खरूपच असतो.(१६) गर्भधारणेपासून मरण येईपर्यंत पुत्र पित्याला दु:खदायकच असतो.ते सगळे अनुभवाने जाणून घ्यावे.मी त्याचा विस्तार कशाला करत बसू?(१७)याच प्रकारे राज्य,संपत्ती या सर्व गोष्टी दु:खे देणारी संकटेच होत.त्या प्राप्त करताना,त्यांचे रक्षण करताना,खर्च करताना सर्व प्रसंगी कष्टरूपच असतात.(१८)म्हणून या सर्व गोष्टी दु:खाचे मूळ असून त्यांचा त्याग करणे हीच मांगल्यदायक कृती होय.पण सर्व विषयांचा त्याग केला तर देह वाचणार नाही,त्याचे काय?(१९)या आक्षेपाचे उत्तर आता सांगितले पाहिजे.या पदार्थांचा त्याग करावा म्हणजे केवळ त्यांच्याबद्दलची आसक्ती सोडावी हे होय.आपले मन त्यांच्या भोगात गुंतलेले असते.ते दोषपूर्ण मानून त्याचा त्याग करावा.(२०)अल्प निद्रा,अल्प आहार,अल्प विहार(फिरणे)असा नियम करून साधनेला जो जो विघ्नकारक असेल त्या त्या विषयाचा त्याग करावा. (२१) त्यागाचे दोन प्रकार आहेत.अंतस्त्याग आणि उभयत्याग.अंतस्त्याग हा सर्वांना शक्य आहे.म्हणजे विषयाबद्दल जे प्रेम(आकर्षण)असते त्याचा त्याग करणे सर्वांना शक्य आहे.संन्याशांनी मात्र उभयत्याग करावा.म्हणजे विषयाबद्दलची आसक्ती आणि साक्षात् विषय या दोहोंचा त्याग करावा.पण संन्याशाला

**म्हणून विवेकसहित त्याग । हाचि जाणावा विराग । अंतरीं निरोपिले जे भोग । विषप्राय त्यागावें ।।२३।। भोगीं कांही सुख नाहीं। सुख भोक्त्याचे ठाईं । भोक्ता असतां नवाई। विषय सुखाची ।।२४।। जैसें श्वान हाडें चघळी । गोड लागे मुखीची लाळी । परि तें समजे तये वेळीं । हाडची गोड ।।२५।। पोट न भरे होय शीण । पडे दांत लागतां कठिण। नुसधें क्लेशासी कारण । त्या पशुसी न कळे ।।२६।। आपण सुखरूपची असे। भोगीं कांही सुख नसे । तथापि मानिलें अविश्वासें । वियोगें दुःखरूप ।।२७।। आपुलिया सुखाकारणें । पडे विषयांचे घेणें । तया भोग्यार्थ न घडे वचनें । श्रुतीची ऐसी।।२८।। याज्ञवल्कि म्हणे मैत्रेयी । पतिसाठीं पति प्रिय नाहीं । पुत्रवित्तादि सर्वही। आपणासाठीं[६] ।।२९।। सर्वामाजीं आवडता । अत्यंत असे जो तत्त्वतां । तयाचा अंतरी शोध घेतां । उडे ममता सर्वांची ।।३०।। येणे रीती इहलोक भोग । सर्वस्वेंसी करावा त्याग । भोक्त्यास्तव कर्म उद्योग । स्वर्गार्थ करणें ।।३१।। क्लेशें यज्ञादि करणें । तेणें स्वर्गासी जाणें । तेथेंही कर्मानुसार भोगणें । स्वर्गांगनामृतपान।।३२।।जयाचें कर्म अधिक।**

---

इतर सर्व गोष्टींचा त्याग केला तरी आहार आणि निद्रा सुटत नाहीतच.(२२)विवेकपूर्वक केलेला त्याग हेच वैराग्य म्हणून समजावे.आपल्या मनात जे भोग घट्ट पाय रोवून राहिलेले असतात ते विषप्राय समजून त्यांचा त्याग करावा.(२३)खरे म्हणजे भोगात काहीच सुख नसते.सुख भोक्त्याच्या ठिकाणी असते.भोक्ता असेल तरच विषयसुखाचे अपूर्वत्व असते.(२४)एखादे कुत्रे हाड चघळत असते.तेव्हा आपल्या तोंडातील लाळच त्याला गोड लागत असते.परंतु ते हाड चघळत असते म्हणून ते हाडच गोड आहे असे त्याला वाटत असते.(२५)त्या कृतीने त्याचे पोटही नीट भरत नाही.उलट श्रमच जास्त होतात.ती कृती त्याला यातना देण्यासच कारणीभूत होते.पण त्या प्राण्याला ते कळत नाही.(२६)वास्तविक आपण(आत्मा)सुखरूपच असतो.भोगामध्ये काही सुख नसते.परंतु अविश्वासाने आपण स्वत:ला भोगातच सुखरूप मानतो आणि त्या भोगाच्या वियोगाने दु:खरूप मानतो.(२७) आपल्या (आत्म्याच्या)सुखासाठी आपल्याला विषयांचा स्वीकार करावा लागतो.भोग्य विषयासाठी नव्हे.वेदांची वचनेसुद्धा अशीच आहेत.(बृहदारण्यक २.४.२-५)(२८) याज्ञवल्क्य स्वत:ची पत्नी मैत्रेयी हिला म्हणतात,पती हा पती आहे म्हणून प्रिय नाही.पती,पुत्र,वित्त ही सर्व आपल्यासाठी(आत्म्याच्या अस्तित्वामुळे) प्रिय आहेत.(२९)जो सर्वात अधिक आवडतो,त्याचा आपल्या अंत:करणात शोध घेऊ लागतो असता इतर सर्व पदार्थांबद्दल वाटणारी ममता उडून जाते.(त्यांबद्दलचे ममत्व नष्ट होऊन जाते.)(३०) अशा प्रकारे इहलोकातील भोगांचा सर्वप्रकारे त्याग करावा. आपली सर्व कर्मे, उद्योग,स्वर्गसाधने ही सर्व आपण आतल्या भोक्त्यासाठी करत असतो.(३१) आपण अनेक कष्ट घेऊन यज्ञादी कर्मे करतो, त्याद्वारे स्वर्गाला जातो, तेथेदेखील स्वर्गातील अप्सरांचा सहवास,अमृतपान इत्यादी सुखांचा स्वकर्मानुसार भोग घेतो.(३२)

**तयासी भोग अलोकिक । न्यून तरी अवश्यक । अल्प भोग ।।३३।। ऐसें न्यून अधिक पाहतां । मत्सरची उठे तत्त्वतां । तेणें गुणें सुखाची वार्ता । बोलोंचि नये ।।३४।। तेंही शाश्वत नाहीं । कर्मक्षीणें सरे भोगही । पुढे गर्भवास योनी सर्वही ।फिरणे लागे[७]।।३५।। बचके काउळा आला । तैसा नरदेह लाधला । फुकट कामासाठीं वेंचला।पुन्हा कैचा।।३६।। असो स्वर्गसुखाचें फळ । प्रतीतीवीण खळखळ।स्वर्गी सुख असें पुष्कळ । कोणी लिहून धाडिलें ।।३७।। शास्त्रीं जरी सांगितलें । तेणें ज्योतिष्टोमादि केलें । परि तें प्रतीतीस आलें। कैसें सांगा ।।३८।। एवं नाशवंत आणि उधार । हें न गणावें साचार । इहलोक आणि परत्र । एकरूप ।।३९।। ब्रह्मलोकादि तृणान्त । तें तें अवघें नाशवंत । जें जें दिसे आणि भासत । तें तें नासत कल्पान्ता ।।४०।। जें जें कांही उत्पन्न होतें । तें तें सर्वही लया जातें ।प्रतीत रोकडी पाहणें तें । यासि काय ।।४१।। आदि अंती नाश ज्यासी। त्याची इच्छा ते कायसी । ऐसी दोष दृष्टि सर्वासी । काकविष्ठेसम मानी ।।४२।। हें विरक्ती नव्हे भाग्य । ज्ञानाचें केवळ सौभाग्य । विरक्ती नसतां अभाग्य । ज्ञान कैचें।।४३।।**

---

ज्याचे कर्म अधिक त्याला अलौकिक(खूप)भोग मिळतात,कमी असेल त्याला निश्चितपणे अल्प भोगच मिळतात.(३३)अशा प्रकारचा कमी अधिक भेदभाव पाहिल्यावर(सुख भोगत असताही)खरोखर मत्सरच निर्माण होत असतो. त्यामुळे (त्या सुखात) सुखाची गोष्टच बोलू नये.(३४) (तेथे जे सुख मिळते) तेही शाश्वत नाही. कर्म क्षीण होताच भोगही संपतात.त्यानंतर गर्भवास, सर्व योनीत फिरणे इत्यादी भोग वाट्याला येतात.(३५)बचकेत अचानक कावळा सापडावा तसा हा नरदेह आपल्याला मिळाला आहे. पण तोही व्यर्थ कर्मकटकटीतच पुन्हा का बरे खर्च करावा?(३६) हे असू द्या,स्वर्गसुखाच्या फळाची अपेक्षा धरणे म्हणजे प्रतीतीवाचून खळखळ करण्यासारखे आहे.स्वर्गात पुष्कळ सुख असते,असे कोणी आपल्याला लिहून पाठवले आहे काय?(३७)शास्त्रात जरी सांगितलेले असते की,जो स्वर्गात जातो,त्याने ज्योतिष्टोम इत्यादी यज्ञ केलेले असतात, तरी पण याचा प्रत्यय कसा आला हे प्रथम स्पष्ट सांगायला पाहिजे.(३८) तेव्हा अशाप्रकारे जे सुख नाशवंत आणि उधार स्वरूपाचे आहे ते सत्य मानू नये. इहलोक आणि परलोक याबाबतीत एकरूपच (सारखे) आहेत.(३९) ब्रह्मलोकापासून अगदी गवताच्या काडीपर्यंत सर्व काही नाशवंत आहे. जे जे दिसते आणि भासते ते ते सर्व कल्पान्ती नाश पावणार आहे.(४०) जे जे काही उत्पन्न होते ते ते सर्वच लयाला जाते. याबाबतीत प्रत्यक्ष अनुभव पहावा, याहून अधिक काय?(४१) आरंभापासून अखेरपर्यंत ज्याला नाश आहे त्याची इच्छा कशासाठी धरायची? सृष्ट पदार्थांकडे अशा प्रकारच्या दोषदृष्टीने पाहून त्यांना काकविष्ठेसमान मानून त्यांचा त्याग करावा.(४२)(यालाच विरक्ती म्हणतात.)ही विरक्ती नसून भाग्याची गोष्ट समजावी.ही ज्ञानाचे सौभाग्य समजावे.(ज्ञानाची ही कृतार्थता समजावी.)विरक्ती नसलेल्या अभाग्याला ज्ञान कसे प्राप्त होईल?(४३)

**ऐसें विवेकवैराग्य दोनीं।साधकाची जनक जननी।तत्काळ घालिती नेउनी। पूर्व भूमिकेस।।४४।। पुढें दोनीं लक्षणें असतीं। षट्कसंपत्ति मुमुक्षा चौथी । अधिकारिया सहज होती । जरी अत्यंत चाड ।।४५।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तापर्यानुसारे । वैराग्यलक्षणप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

### ।। श्रीराम समर्थ ।। - समास ५वा - शमादिषट्क व मुमुक्षत्व

**दोनी लक्षण अधिकारीयाचें । या समासीं निरूपण साचें । जेणें साधनें ज्ञानाचें । ऐश्वर्य बाणें ।।१।। शम दम उपरती जाण । तितिक्षा श्रद्धा समाधान । येणें साधनें पावन । बहुत जालीं ।।२।। प्रत्यगात्मा ब्रह्म पूर्ण । हेंचि मनासी मनन । सांडुनी अन्य कल्पन । स्वरूपसागरीं लहरी ।।३।। बुद्धी निश्चया सोंकली । तेणेंचि तिची सिद्धी जाली । स्वरूपनिश्चयें पावली । समाधान ।।४।। तेंचि चित्ताचें चिंतन । मी ब्रह्म हा अभिमान । येणें रीती अंतःकरण । निर्विकार जाली ।।५।। वेगळेंपणें विषयध्यान । तंवचि त्यासी**

---

अशा प्रकारे विवेक आणि वैराग्य ही दोन साधकाचे मातापिताच आहेत. ही दोन्ही साधकास ताबडतोब आपल्या मूळ भूमिकेला नेऊन पोचवितात.(४४) यापुढे आणखी दोन अधिकारिलक्षणे सांगावयाची आहेत. ती म्हणजे शमदिषट्क संपत्ती आणि चौथी मुमुक्षा (मोक्षाची इच्छा) ही होत. अधिकाऱ्याला जर अत्यंत तळमळ असेल तर ही दोन्ही सहजपणे प्राप्त होतील.(४५)

### पंचिका १ली, समास ५वा - शमदिषट्क व मुमुक्षुत्व

या समासात वेदान्ताच्या अधिकारी व्यक्तीच्या लक्षणांचे निरूपण करावयाचे आहे. या साधनाच्या योगाने ज्ञानाचे ऐश्वर्य अंगी बाणते.(१) शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा आणि समाधान अशी ही शमादिषट्क संपत्ती आहे. या(सहा) साधनांनी अनेक लोक पावन झाले आहेत.(२) (मन, बुद्धी, चित्त, अहंकार आणि अंत:करण या पाचांचे मिळून अंत:करणपंचक होते. या पाचही इंद्रियांच्या वृत्ती ब्रह्मावर केंद्रित करून त्याच्याशी एकरूप होऊन राहणे हा शम होय. तेच क्रमाने सांगतात.)ब्रह्माखेरीज इतर कल्पना म्हणजे स्वरूप सागरावरील (ब्रह्मरूपी सागरावरील)लाटा होत. त्यांचा त्याग करून प्रत्यगात्मा हाच ब्रह्म आहे असे मनाने मनन केले जाते.(३) निश्चय करते ती बुद्धी. तिला त्याचीच चटक लागलेली असते. या निश्चयरूप व्यापारानेच तिची सिद्धता होते, तर अशी ही बुद्धी स्वरूपविषयक (ब्रह्मासंबंधीचा) निश्चय करून समाधान पावते.(४) ब्रह्माविषयीचे चिंतन करणे हेच चित्ताचे कार्य होय. 'मी ब्रह्म आहे' असा अभिमान बाळगणे हेच अहंकाराचे स्वरूप होय. अशाच तऱ्हेने अंत:करण हेही निर्विकार होते.(५)जोपर्यंत ही अंत:करणे (अंतरिंद्रिये) वेगळी राहून विषयाचे ध्यान करत असतात,

**नामाभिधान। स्वरूपीं राहतां अभिन्न। मुळींच असती।।६।।या नांव बोलीजे शम। जें अंतरीं निष्काम।येणें रीती जाणिजे दम। बाह्येंद्रियनिग्रह।।७।।इंद्रियवृत्ति विषयाकार। बहिर्मुखेंचि व्यापार। शब्द स्पर्शादि अपार। भोगींच प्रीती।।८।।अंत:करण उपशम जालिया। इंद्रियनिग्रह कासया। तरी इंद्रियें धांवता विषयां। मनासी ओढिती।।९।।मन धांवे इंद्रियांसवें। मनें इंद्रियां विषय फावे।इंद्रियेवीण मन धावे।परि तो इंद्रियाध्यास।।१०।।एवं परस्परां साह्यभूत। याचा निग्रह तोचि एकांत। म्हणोनिया सावचित्त। इंद्रियें आवरावीं।।११।।तरी जो जयाचा विषय। तो तेणेसी वेगळा न होय। तरि निग्रहाचा उपाय। तो कैसा करावा।।१२।।तरी याचें उत्तर। दिधलें पाहिजे साचार। जालें अवघें सचराचर। परि विषय पांच।।१३।। शब्द स्पर्श रूप रस गंध। हा पंचवृत्त्यात्मक भेद। येथें बोलिजे विशद। उपोद्घातत्वें।।१४।।नाम रूप हे मायेचे।अस्तिभाति प्रियत्व ब्रह्मीचें।नामरूप बोलिलें साचें। तेंचि आधीं ओळखावें।।१५।।**

---

तोपर्यंतच त्यांना वेगळे नाव असते.पण तीच इंद्रिये जर स्वरूपाच्या (ब्रह्माच्या) ठिकाणी अभिन्नत्वाने असतील तर ती त्यामध्येच असतात.(आपल्या मूळरूपातच असतात.)(६)अशा रीतीने अंत:करणपंचकाच्या व्यापारातून अखंडपणे ब्रह्माचा अनुभव घेण,अंत:करणात निष्काम असणे यालाच शम असे म्हणतात.अशाच प्रकारे बाह्य इंद्रियांचा निग्रह म्हणजे दम होय.(बाह्येंद्रिये म्हणजे श्रवण,त्वचा,चक्षू, जिव्हा,नासिका यांचा शब्द,स्पर्श,रूप,रस,गंध या विषयांकडे ओढा असतो. त्यावर नियंत्रण ठेवणे म्हणजे दम होय.)(७)इंद्रियांची धाव विषयांकडे असते. त्यांचे व्यापारही बहिर्मुख असतात आणि त्यांची शब्द,स्पर्श इत्यादी भोगांवरच प्रीती असते.(८)आता अंत:करणे (मन, बुद्धी, चित्त, अहंकार इत्यादी इंद्रिये)शांत झाल्यावर म्हणजे त्यांचे समाधान झाल्यावर इंद्रियनिग्रह कशासाठी करायचा? या प्रश्नाचे उत्तर असे की,इंद्रिये विषयांकडे धाव घेत असताना ती स्वत:बरोबर मनालाही ओढून नेतात.(९)मन इंद्रियांबरोबर धावू लागते.मनामुळे इंद्रियांना विषय भेटतात.कधी कधी इंद्रिये नसतानाही मन विषयाकडे धावते.पण त्यावेळी मनावर इंद्रियांचा आरोप झालेला असतो.(अध्यास म्हणजे मन इंद्रियरूप नसताही इंद्रियरूप असल्याची त्याची कल्पना.)(१०) अशा तऱ्हेने मन आणि इंद्रिये परस्परांना साहाय्य करतात.म्हणून यांचा निग्रह करणे आवश्यक ठरते. असा निग्रह जेव्हा शक्य होईल तेव्हाच खरे एकांताचे सुख मिळेल. म्हणून सावधानतापूर्वक इंद्रियांना आवरावे.(११) पण जो ज्याचा विषय असेल तो त्यापासून वेगळा करता येत नाही. अशा परिस्थितीत निग्रहाचा उपाय कसा आचरणात आणावा?(१२) याचे (खरे) उत्तर आता दिले पाहिजे.सर्व चराचर विश्व निर्माण झाले तरीपण विषयांची संख्या पाचच आहे.(१३) शब्द,स्पर्श, रूप,रस,गंध या विषयांनुसार पाच वेगवेगळ्या वृत्ती निर्माण होतात.त्यांचे आता उपोद्घात रूपाने स्पष्ट विवेचन करू.(१४) त्या विषयांचे ठिकाणी असणारी नामरूपे मायाजनित असून त्यांच्या ठिकाणी असणारी अस्ति,भाति, प्रिय ही लक्षणे ब्रह्माची आहेत.आता प्रथम नाम आणि रूप यांचे स्वरूप आधी ओळखून घेऊ.(१५)

**नाना अळंकारीं भिन्न भिन्न। एकची जैसें सुवर्ण। व्यवहारार्थ नामें अगाध। आकार तें रूप।।१६।। अळंकारी सुवर्ण असे । पाहतांही सुवर्णचि दिसे । आणि आवडी ही असे। सुवर्णाचे ठाई।।१७।।तैसें दृश्य नामरूपाचें । परि ते अस्तिभातिविण कैचें । जरी जालें विषयाचें। इंद्रियां नानात्व।।१८।।जयाचें अस्तित्वें असती । जयाचें स्फुरणेंची भासती। जेणें सुखेंचि होती। सुखरूप सदा।।१९।।सुवर्णावांचून कांहीं। अळंकारा रूप नाहीं। तैसें या सर्वांच्या ठाई। अस्ति भाति असे।।२०।।ऐसें बुद्धीसी बोधावें। मग इंद्रिया तेंचि फावें। विषय घेतां आठवें। अस्ति भाति प्रियत्व।।२१।।श्रवणीं जें जें ऐकावें। शब्द अंतर्बाह्य स्वरूप आघवें। नेत्रें जें जें अवलोकावें। तें तें अस्ति भाति।।२२।।मृदु कठिण स्पर्श होतां। नाना रस जिव्हा सेवितां। अथवा नाना गंध घेतां। स्वरूपेंवीण नाहीं।।२३।।इंद्रिय आणि विषय। तिजा व्यापार जो होय। या सर्वा अंतर्बाह्य। व्यापून असे।।२४।।व्यापक सहजची आहे। विचारुनी कोणी न पाहे। स्मरणें विचारितां लाहे । स्वरूपस्थिति ।।२५।। ऐसें इंद्रिय आणि मन ।**

---

निरनिराळ्या अलंकारांमध्ये जसे एकच सोने असते,तसे व्यवहाराच्या सोयीसाठी अनेक नामे देण्यात आलेली असतात.तसेच त्यांचे रूप म्हणजे आकारही भिन्न भिन्न असतात.(१६)अलंकारांमध्ये सुवर्ण असतेच.ते पाहू गेल्यास सुवर्णच दिसते आणि सुवर्णाबद्दल सर्वांना आवडही असते.(१७)त्याप्रमाणे कोणतेही दृश्य घेतले तरी त्याला नाम आणि रूप असते. पण अस्ति, भाति आणि प्रिय या लक्षणांखेरीज तिथे दुसरे काय असते? इंद्रियांना विषय भिन्न भिन्न वाटले तरी त्या सर्वांच्या ठिकाणी अस्ति,भाति,प्रिय हीच लक्षणे असतात.(अस्ति म्हणजे आहेपणा अथवा सत्ता,भाति म्हणजे ज्ञानविषय होणे,दिसणे आणि प्रिय म्हणजे आवडणे.)(१८)ज्याच्या अस्तित्वामुळे या अलंकारांना अस्तित्व प्राप्त होते,ज्याच्या स्फुरणामुळे त्यांचे ज्ञान होते,अथवा ते भासतात,तसेच ज्याच्या सुखरूपामुळे ते नेहमी सुखरूप वाटतात.(१९)अशा सोन्यावाचून अलंकारांना रूप नाही,त्याप्रमाणे या सर्व सृष्ट पदार्थांच्या ठिकाणी ब्रह्माचेच अस्तिभाति प्रियत्व असते.(२०) असे बुद्धीला समजावून द्यावे.मग इंद्रियांनाही ते सर्व पदार्थ तसेच जाणवतील.विषयाचा अनुभव घेत असता त्यांचे अस्तिभातिप्रियत्वच आठवत राहील.(२१) कानांनी जे जे ऐकावे ते शब्द म्हणजे अंतर्बाह्य सगळे स्वरूपच म्हणजे ब्रह्मच होत.डोळ्यांनी जे जे पाहावे ते सर्व दृश्य म्हणजे अस्ति-भाति-प्रिय स्वरूपी ब्रह्मच होय.(२२)मृदू,कठीण अशा स्पर्शाचा अनुभव घेताना किंवा जिभेने निरनिराळ्या रसांचा(चवींचा)अनुभव घेताना किंवा निरनिराळे गंध(वास)घेताना स्वरूप म्हणजे ब्रह्मावाचून वेगळे काहीच नसते.(२३) इंद्रिये, विषय आणि तिसरा व्यापार या सर्वांना ते स्वरूपच(ब्रह्मच)अंतर्बाह्यव्यापून असते.(२४) ते व्यापक तत्त्व सहजपणेच सिद्ध आहे. कोणी त्याचा विचार करत नाहीत. (त्याची दखलही घेत नाहीत) इतकेच.पण स्मरणपूर्वक विचार केल्यास त्या स्वरूपस्थितीची प्राप्ती होते.(२५) अशा तऱ्हेने इंद्रिये आणि मन ही स्वरूपामध्ये मग्न

**व्यापारता स्वरूपीं निमग्न । मग विषयांचे ग्रहण । सहजची राहे।।२६।।उगाचि निग्रह करितां । नाटोपती हे सर्वथा । नाना कष्टें दांत खातां । शीणची होय।।२७।।नाना वल्ली एकरसें । वाढणें घडे अपैसें। ब्रह्मसुख सर्वां तैसें। एकची विषय।।२८।।चित्त स्वरूपींच खेळें । नित्य सुखाचे सोहळे। मग इंद्रियाचें लळे। क्रियेवीण पुरती ।।२९।। सुख अपार देखिले । तरी तेथेंचि सोकलें । पूर्व विषय विसरले । हळूं हळूं ।।३०।। आत्मा हा रथस्थ । देह हाचि रथ । इंद्रिय घोडे उन्मत्त । मन वाग्दोर[८] ।।३१।। बुद्धि हे चपळ सारथी। दुष्ट तरी अश्व नावरती । बळेंचि ओढोनि नेती । विषयभूमी ।।३२।। जरी सारथी असे उत्तम । सहजीं इंद्रियां उपरम । येणें रीती हा दम । ओळखावा ।।३३।। आतां तिसरी उपरती। मागां बोलिली जे विरक्ती। दोषदृष्टीनें आसक्ति । कोठेंचि नाहीं।।३४।। वीट आला सर्वांचा । छंद लागला स्वरूपाचा । इंद्रिय आणि मनाचा । संचार स्वरूपीं।।३५।। जैसें ढोर भागलें । त्या निवांत घर सांपडलें । पुन्हां उठवितां मोडिले । हातपाय ।।३६।।**

---

होऊन व्यापार करू लागली म्हणजे विषयांचा अनुभव आपोआपच थांबतो.(२६) पण तसे न करता नुसता इंद्रियनिग्रह करत राहिलो तर हे विषय आटोक्यात येणार नाहीत. उलट कष्टपूर्वक त्यांच्यावर दात ओठ खाल्ल्याने उगीचच शीण मात्र होईल.(२७) निरनिराळ्या वेली केवळ एकाच रसतत्त्वाने आपोआप वाढतात तशाच प्रकारे ब्रह्मसुख हाच सर्वांना एकमेव विषय होतो.(२८) चित्त स्वरूपाच्याच ठिकाणी क्रीडा करते. त्यामुळे त्याला शाश्वत सुखाचे सोहळे प्राप्त होतात. मग इंद्रियांचे लाडही कोणत्याही कृतीवाचून पुरविले जातात.(२९)ब्रह्मसुखासारखे सुख पाहताच सर्व इंद्रिये तेथेच लालचावतात व पूर्वीचे सर्व विषय हळूहळू विसरून जातात.(हे शमाचे वर्णन होय. शम म्हणजे मनोनिग्रह.)(३०) आत्मा हा रथात बसलेला असून देह हाच त्याचा रथ होय. इंद्रिये हे त्या रथाचे उन्मत्त घोडे होत आणि मन हा त्याचा वाग्दोर (लगाम)होय.(३१) बुद्धी ही चपळ सारथी आहे. असे असले तरी या रथाचे इंद्रियरूपी दुष्ट घोडे या सारथ्याला आवरत नाहीत आणि ते या रथाला विषयभूमीवर बळेच ओढून नेतात.(३२) जर सारथी उत्तम असेल तरच त्या इंद्रियांवर नियंत्रण ठेवू शकतो. याप्रकारे दम म्हणजे इंद्रियनिग्रहाचे स्वरूप कळते.(३३) आता तिसरी जी उपरती,तिचे स्वरूप पाहू. मागे(चौथ्या समासात) जे वैराग्याचे वर्णन केले ते वैराग्य म्हणजेच उपरती होय. उपरती म्हणजे सर्व सृष्ट पदार्थ सदोष (नष्ट होणारे,अशाश्वत) आहेत असे जाणून कशावरच आसक्ती न ठेवणे होय.(३४) सर्वांचा वीट येऊन स्वरूपाचा (ब्रह्मस्वरूपाचा) छंद लागला म्हणजे इंद्रिये आणि मनाचा व्यापार स्वरूपाच्या ठिकाणी होऊ लागतो.(३५) जसे एखादे दमलेले जनावर एखादे निवांत निवाऱ्याचे ठिकाण सापडले की तेथेच बसून राहते. त्याला पुन्हा उठवण्याचा प्रयत्न केला तरी ते हातपाय मोडल्याप्रमाणे जागच्या जागीच बसून राहते. तशी त्या इंद्रिये आणि मनाची अवस्था होते.(३६)

**हेचि जाणावी उपरती। विषयेंवीण उपशांती । आतां तितिक्षा जयेतें म्हणती । सर्व सहन।।३७।। परमार्थीं जो लागला। देहाचें सुख कैचें त्याला। प्रारब्धावरी टाकिला । सुखदुःखात्मक।।३८।। जें जें होणारें तें न चुके । नव्हेल तें करणें फिकें । या बोधें राहिला एकें । निजस्वरूपीं।।३९।। भोगी जें जें प्राप्त होतां । अप्राप्ताची न करी चिंता। देहावरील ममता । सांडिली जेणें।।४०।। लोक कोणी पीडा करिती।कोणी नेऊनी पूजिती। कोणी देखोनी निंदिती। स्तविती एक।।४१।। अंतरात्मा अवघा एक । तेथें कैचे असती लोक । सुखदुःखाचे दायक । हे न होती।।४२।। सुखदुःख मनें कल्पिलें।तें बळें स्वरूपाकार केलें।बाह्य कायेसी जें जें जालें।साक्षी तयाचा।।४३।। सुख अथवा दुःख। भोगणें देहा अवश्यक। प्रतिकार करणें ना ग्राहक।दोन्ही नाहीं।।४४।।येणें रीती जें जें जाले।तें तें सहजत्वें साहिलें।निरूपण समाप्त जालें। तितिक्षेचें।।४५।।आतां पांचवी श्रद्धा।जे परमार्थाची संपदा। गुरुशास्त्राचे ठाईं सदा। बळकट विश्वास।।४६।।विषयसुख सांडिलें।गुरुसेवे शरीर विकलें।प्रपंचासी दिधले।तिलोदक।।४७।।**

---

तिलाच उपरती असे म्हणतात. उपरती म्हणजे विषयांच्या अभावी इंद्रिये आणि मन यांची शांत, स्थिर अवस्था. आता तितिक्षा असे जिला म्हणतात ती तितिक्षा म्हणजे सर्व सहन करणे होय.(३७) आता ज्याला परमार्थमार्गाचा ध्यास लागलेला आहे, त्याला देहाचे सुख कोठून मिळणार? त्याने आपला देह सुखदुःख स्वरूपी प्रारब्धावर सोडून दिलेला असतो.(३८) जे जे होणार असेल ते काही टळत नाही. न होणार त्याची आसक्ती न धरता त्याच्या बाबतीत उदासीनता धारण करतो आणि तो एका निजस्वरूपात (स्वतःच्या ब्रह्मरूपात) निमग्न राहतो.(३९) भोगामध्ये जे जे प्राप्त होईल ते सर्व (उदासीन वृत्तीने) तो सहन करतो. जे अप्राप्त असेल त्याची काळजी करत नाही, देहाबद्दलची ममता (माझेपणाची भावना) त्याने सोडून दिलेली असते.(४०)कोणी लोकांनी त्याला त्रास दिला,कोणी घरी नेऊन त्याची पूजा केली,कोणी त्याला पाहताच निंदा करायला लागले, कोणी स्तुती करायला लागले.(४१) तर (तो विचार करतो की) सगळ्यांचा अंतरात्मा एकच आहे, तेथे हा मी, हे लोक असा विचार कसा संभवतो? त्यामुळे हे लोक मला सुखदुःख देतात हे म्हणणे चुकीचे आहे.(४२) सुख, दुःख या कल्पना मनाने कल्पिलेल्या आहेत. ते मनच प्रयत्नपूर्वक स्वरूपाकार (ब्रह्मस्वरूप) केले तर बाह्य शरीराला जे प्राप्त होईल त्याचा मी केवळ साक्षी ठरतो.(४३) सुख असो अथवा दुःख असो ते देहाला भोगावेच लागणार तेव्हा त्याचा प्रतिकार अथवा स्वीकार या दोन्ही कृतींना काही अर्थच राहत नाही. (४४) अशा प्रकारे (असा विचार करून) जे जे होईल ते ते तो सहजपणे सहन करतो. तितिक्षा या गुणाचे निरूपण येथे संपते.(४५) आता पाचवा गुण म्हणजे श्रद्धा होय. श्रद्धा ही खरी परमार्थाची संपत्ती आहे. गुरू, शास्त्र यांच्या ठायी दृढ विश्वास म्हणजे श्रद्धा होय.(४६) सर्व विषयसुखांचा त्याग करून गुरुसेवेला आपले शरीर वाहून टाकणे आणि प्रपंचाला तिलोदक देणे (त्याग करणे).(४७)

**गुरुपदीं अत्यंत आवडी। वेदान्त विषयाची गोडी। मननें अर्थांतर काढी। स्वानुभवानुसार।।४८।। पुरते कोणाकडे पाहेना । पुरते कोणासी बोलेना । आवडी गुंतली गुरुचरणा । व्यापारा उसंत नाहीं।।४९।।काया गुरुसेवे गुंतली । वाणी गुरुभजनीं रातली । अंत:करणीं सांठविली। गुरुमूर्ती सदा।।५०।।गुरुवचन हाचि वेदांत । गुरुवचन हाचि सिद्धांत । गुरुवचनीं अनन्य रत । या नांव श्रद्धा।।५१।।होतां पांचही परिपूर्ण । तेचि जाणिजे समाधान । संपत्तीचें लक्षण । सहावें जें कां।।५२।।दु:ख अवघेचि ओसरलें । देहबुद्धीचें पाप गेलें । सुखरूप कोंदाटलें । पुण्य परब्रह्म ।।५३।। जन्ममरण विसरला । मायेचा ठावची पुसिला। देहीं असोनि विदेही झाला । नि:संगपणें ।।५४।। गेली अवघी तळमळ । जाला सुखरूपची केवळ । सागरामाजीं निवळ । लवण जैसें ।।५५।। हे सहा मिळोनी तिसरें साधन । नेहटून पाहतां हेंचि ज्ञान । निश्चयालागीं श्रवण मनन । करणें लागे ।।५६।। आतां चौथी मुमुक्षुता। म्हणजे मज व्हावी मुक्तता। अन्य पदार्थीं असक्तता। इच्छा बळकट मोक्षाची।।५७।।**

---

गुरुचरणांबद्दल अत्यंत प्रेम असणे,वेदान्त विषयाची गोडी असणे आणि शास्त्रीय ग्रंथांचा मननपूर्वक आणि स्वानुभवानुसार अर्थ लावणे(ही या श्रद्धावंताची लक्षणे आहेत.)(४८)तो कोणाकडेही पुरते पाहतसुद्धा नाही.कोणाशी जास्त बोलतही नाही आणि गुरुचरणावर आत्यंतिक प्रेम गुंतल्यामुळे इतर व्यापार करायला त्याला उसंतही मिळत नाही.(४९)त्याचे शरीर गुरुसेवेमध्ये गुंतलेले असते.वाणी गुरूंच्या भजनात रमलेली असते.त्याने अंत:करणामध्ये सदैव गुरुमूर्ती साठवून ठेवलेली असते.(५०)गुरूंचे वाक्य हाच त्याचा वेदान्त,गुरूंचे वाक्य हाच त्याचा सिद्धान्त असतो.गुरूंच्या वचनामध्ये तो अनन्यभावाने रममाण झालेला असतो. यालाच श्रद्धा म्हणतात.(५१)या पाचही गोष्टी पूर्ण झाल्यानंतर जे प्राप्त होते त्यालाच समाधान म्हणतात.समाधान हे सहाव्या संपत्तीचे लक्षण आहे.(५२)या अवस्थेमध्ये सगळे दु:ख ओसरून गेलेले असते.देहबुद्धीचे पाप (मी देह आहे ही जाणीव)नाहीसे झाले आणि सुखरूप असे पुण्यकारक परब्रह्म सर्वत्र भरून राहिलेले असते.(५३)त्या साधकाला जन्ममरणाचा विसर पडतो,त्याच्या दृष्टीने मायेचे अस्तित्वच पुसून टाकलेले असते आणि नि:संगपणामुळे (कशाचीच आसक्ती उरलेली नसल्यामुळे)तो शरीर धारण करणारा असूनही विदेही (देहविरहित) झाल्यासारखा झालेला असतो.(५४)त्याची सर्व तळमळ नाहीशी झालेली असते. तो पूर्णपणे सुखरूप झालेला असतो. समुद्रामध्ये जसे मीठ विरघळून जाते तसा तो सुखस्वरूप ब्रह्मामध्ये पूर्णपणे मिसळून गेलेला असतो.(५५)अशा या सहा गुणांचे मिळून तिसरे शमदिषट्क संपत्ती हे साधन पूर्ण होते. खरे पाहता ही संपत्ती हेच खरे ज्ञान होय. पण त्या ज्ञानाचा निश्चय होण्यासाठी श्रवण,मनन इत्यादी करावे लागते.(५६)आता चौथे साधन म्हणजे मुमुक्षुता अथवा मोक्षाची इच्छा हे होय. मुमुक्षुता म्हणजे मला मुक्ती मिळावी ही इच्छा होय. सर्व पदार्थांमधील आसक्ती नष्ट होऊन मला मोक्ष मिळावा ही बळकट इच्छा म्हणजे मुमुक्षुता होय.(५७)

**येथें आक्षेप असे थोर । मोक्ष तो अपरोक्ष साक्षात्कार । प्रमाणसिद्ध हा विचार । न कळतां इच्छा नसे।।५८।।प्रमाणसिद्ध जरी कळलें । तरी प्राप्तविषया न वचे इच्छिलें । तस्मात् मोक्षेच्छा जी नाव बोलिले । असंभवतिचें।।५९।।तरि याचें कैसें उत्तर । सुखचि इच्छिती सर्व नर । हा धर्म अंतःकरणाचा साचार । कळला पाहिजे।।६०।।येथें प्रमाणाचें काज नाहीं । सुखार्थ इच्छिती सर्वही । तें सुख अन्यविषयीं नाहीं । जे सुखरूप आत्मा।।६१।।अन्य अन्या पाहती । अन्य अन्यासी जाणती । तयासी अल्प म्हणे श्रुती। छांदोग्याची[१]।।६२।।अन्य अन्यासी न पाहे । अन्य अन्या जाणणें नोव्हे। तेचि भूमत्व सुखरूप आहे । म्हणोनि इच्छा संभवे।।६३।।सुखार्थ इच्छी परि मोक्ष कैसा। अनुमान असे जरी ऐसा । अविद्या आच्छादन आनंदाशा । तीच वृत्ति तो मोक्ष।।६४।।तरी हें सर्वांसी कां न संभवे । या आक्षेपी बोलिजे बरवें । अविद्येस्तव नेणती सर्वे। म्हणती विषय सुखरूप ।।६५।। अनंत जन्मींचा पुण्य ठेवा । जरी गांठी असे बरवा। विषईं त्रास उपजे जीवा । तोचि इच्छि येरा नाहीं ।।६६।। असो मुमुक्षूचें चिन्ह । सादर करावें श्रवण । मुख्य विषयीं उदासीन ।परमार्थी आवडी।।६७।।**

---

या संदर्भात एक मोठा आक्षेप आहे.मोक्ष म्हणजे प्रत्यक्ष साक्षात्कार होय.अशा मोक्षाची इच्छा असा शब्दप्रयोग संभवत नाही.कारण मोक्षाचे यथार्थ(प्रमाणांनी सिद्ध असे)स्वरूप कळल्याशिवाय मोक्षाची इच्छा संभवतच नाही आणि ते यथार्थ स्वरूप जर कळून आले तर हस्तगत झालेल्या विषयाची इच्छा संभवत नाही.त्यामुळे जिला मोक्षाची इच्छा(मुमुक्षा)असे म्हटले ती स्थिती असंभवनीय ठरेल.(५८-५९)या प्रश्नाचे उत्तर असे की,सर्व माणसे सुखाचीच इच्छा करतात.अंतःकरणाचा हा धर्म अगोदर बरोबर कळला पाहिजे.(६०)याबाबतीत अन्य प्रमाणांची गरज नाही.कारण सर्व प्राणिमात्र सुखाची इच्छा करतात.आता सुखरूप आत्म्याचे सुख आहे ते इतर कोणत्याही विषयात नाही.(६१) ज्यावेळी एक द्रष्टा एका दृश्याला पाहतो किंवा एक ज्ञाता दुसऱ्या ज्ञेयाला जाणतो अशी द्वैताची स्थिती असते त्यावेळी जे सुख होते,ते अल्प असते असे छान्दोग्य उपनिषदात म्हटले आहे.(६२) आणि एक द्रष्टा दुसऱ्या एका दृश्याला पाहत नाही,एक ज्ञाता दुसऱ्या ज्ञेयाला पाहत नाही.त्या अद्वैतातील सुख पुष्कळ असते,म्हणून त्याबाबतीत इच्छा संभवते.(६३) मनुष्यप्राणी सुखाची इच्छा करतो हे खरे पण त्या सुखाची प्राप्ती म्हणजे मोक्ष हे कसे ठरते अशी शंका असल्यास त्याचे उत्तर असे की आत्मस्थितीमध्येच अविद्या नष्ट होऊन आनंदप्राप्ती होते.त्यामुळे तोच मोक्ष होय.(६४) मग असा मोक्ष सर्वांना का प्राप्त होत नाही, या आक्षेपाचे उत्तर असे की, सर्व जणांना अविद्येमुळे ते सुख समजत नाही आणि त्यामुळे ते विषयसुखालाच सुख मानतात.(६५) अनंत जन्मांच्या पुण्याचा ठेवा गाठी असेल तरच जीवाला विषयसुखांचा उबग येईल आणि तोच मोक्षाची इच्छा करील.ती इच्छा इतरांना संभवत नाही.(६६) हे असू देत.आता मुमुक्षूचे लक्षण आदरपूर्वक ऐकावे.मुमुक्षू हा विषयांच्या बाबतीत प्रामुख्याने उदासीन

**मज हा अलभ्य लाभ जाला । नरदेह अवचिता प्राप्त जाला । तो म्यां विषई वेंचला । धि:कारू मज ।।६८।। श्वानशूकरादीं नाना योनी । भोगितां चिळस ये मनीं । येथें तेंचि भोगितां जनीं ।मज लाज नये।।६९।।हे प्रारब्धा माझिया दुष्टा । मज कां भोगविसी कष्टा। हा हे विधातिया श्रेष्ठा । काय अदृष्टा लिहिलें ।।७०।। या प्रारब्धावरी बिंदुलें । घालिती सद्गुरु पाउलें । हें जाणोनि बोभाइलें। सखया सद्‌गुरुसी ।।७१।। व्याघ्रसमुदाईं गाय । सांपडतां मोकली धाय । घाबरी चहूंकडे हाय । वास पाहे कैवारियाची ।।७२।। अहो अहो जी सद्गुरु। दुःखसागर कैसा तरूं । धावे पावे न धरी धिरूं । उडी घाली लागवेगीं।।७३।। विश्वचक्षूं तूं म्हणविसी। माझी उपेक्षा केली कैसी। चंद्रे काय चकोरासी। आव्हेरु केला।।७४।। चातका न वर्षे घन । तरी कां दधिमधू करी सेवन । मी तुझिया चरणा शरण । अन्यथा नव्हे ।।७५।। तान्हें पडतां आरण्यीं । सुख निद्रा नये जननी । मज टाकुनी निर्वाणी । कोठे असस़ी दयाळे ।।७६।। किंवा सन्नीधची अससी । लपून कौतुक पाहसी । हेंचि खरें परि प्राणासी । निर्वाण आलें ।।७७।। कांही शब्द साचूल जाला । वाटे दयाळू पावला।**

---

असतो आणि त्याला परमार्थामध्ये रुची असते.(६७) मला त्या नरदेहाची अचानक प्राप्ती झाली, हा मला झालेला अलभ्य लाभ होय.परंतु हा देह मी विषयसुखासाठी खर्च केला. माझा धिक्कार असो.(६८) श्वानशूकरांचे (कुत्री, डुकरांचे) अनेक जन्म भोगत असताना मनात किळस निर्माण होते. या जन्मातही तीच सुखदु:खे भोगताना मला लाज कशी वाटत नाही!(६९) हे माझ्या दुष्ट प्रारब्धा, मला हे कष्ट का भोगायला लावतोस? हे श्रेष्ठ ब्रह्मदेवा, माझ्या नशिबात काय लिहून ठेवलेस?(७०) सद्‌गुरूंचे चरण या प्रारब्धाचा शेवट करतील हे जाणून साहाय्यक सद्‌गुरूंना साद घातली.(७१) वाघांच्या समुदायात जर गाय सापडली तर ती मोठ्याने हंबरडा फोडते, घाबरून चोहीकडे पाहू लागते आणि कोणी आपल्याला सोडवायला येतो का याची वाट पाहते. (माझी अवस्था तशीच झाली आहे.)(७२) अहो सद्‌गुरुमहाराज, हा दु:खाचा सागर कसा पार करू? माझ्यावर प्रसन्न व्हा आणि धावत या, मला आता धीर धरवत नाही. ताबडतोब माझ्या या संकटात उडी घाला (आणि मला त्यातून सोडवा.)(७३) तू स्वत:ला विश्वचक्षू म्हणवतोस आणि माझी उपेक्षा का केलीस? चंद्राने कधी चकोराचा अव्हेर केला आहे काय?(७४) मेघाने जर चातकासाठी वर्षाव केला नाही तर तो काय कधी दही, मध यांचे सेवन करील का? मी त्याप्रमाणे तुझ्या पायांशी शरण आलो आहे, हे सत्य आहे.(हे काही खोटे नाही.)(७५) आपले तान्हे मूल अरण्यात पडले असताना आईला कधी सुखाची झोप येईल काय? हे दयाळू सद्‌गुरुमाउली, मला या संकटात टाकून तू कुठे जाऊन बसलीस?(७६) अथवा तू अगदी जवळच असशील, आणि लपून तू कौतुक पाहत असशील. तुझे हे वागणे खरे असेलही, पण इकडे माझ्या प्राणावर संकट आले आहे ना!(७७) काही शब्दाचा आवाज झाला की वाटते की दयाळू परमेश्वरच

**निरखून पाहतां नव्हेसा जाला । पुन्हां अंग घाली।।७८।।जें जें दृष्टीस दिसतें । तें तें सद्गुरूच ऐसें वाटतें । परि उपदेशून दुःखापरतें । मज कोण करी।।७९।।स्त्रीपुत्रादि पुढें आले । सद्गुरूच म्हणून चरण धरिलें । इतुके वेळ कोठें क्रमिले। सांगा स्वामी ।।८०।।अथवा वृक्ष शिळा श्वापद।म्हणे हे गुरु सच्चिदानंद। ऐसा लागला असे छंद। गुरुवीण न स्मरे।।८१।। लोक म्हणती लागलें वेड। अंतरीं सांठवला घबाड। देहबुध्दीचें कबाड। नेणेचि तो।।८२।। अथवा पुसे भलत्या प्रती । मज सद्गुरू कैं भेटती । चंचल जड नये प्रतीती । गुरु म्हणोनि हाक फोडी।।८३।।नेत्रीं गुरुरूप कैं पाहीन । हा मस्तक चरणीं ठेवीन । ऐसें म्हणोनि ठेवी आनन । पाषाणावरी।।८४।।लोक लाज अवघी गेली । क्षुधा तृषा जितची मेली। आपुली देखतां साउली। सद्गुरु आला म्हणे।।८५।।जरी निद्रेनें व्यापिला। स्वप्नीं वाटे गुरु आला। धाऊनी खांब पोटाळिला । ओळखितां अंग घाली।।८६।। ऐसा ध्यासें गुरुचि जाला । परि तें न कळे तयाला । रात्री कीं दिवस उगवला । गुरुवीण झाला कासावीस।।८७।।**

---

प्रसन्न झाला. निरखून पाहू लागतो तेव्हा तू नाहीसा होतोस, मग मी पुन्हा जमिनीवर अंग टाकतो.(७८) दृष्टीने जे जे दिसते,ते ते सर्वच सद्गुरूच आहेत असे वाटते. पण मला उपदेश करून मला दु:खापासून कोण मुक्त करील?(७९) स्त्री, पुत्र इत्यादी पुढे आले तर सद्गुरूच आले आहेत, म्हणून त्यांचे पाय धरले आणि विचारले, की "स्वामीमहाराज, आपण इतका वेळ कोठे घालवलात?"अशी त्याची अवस्था झाली.(८०) किंवा वृक्ष, शिलाखंड, हिंस्र प्राणी यांनाच "हेच माझे सच्चिदानंदस्वरूपी सद्गुरू आहेत" असे म्हटले. असा छंद लागला. गुरुवाचून अन्य काही त्याला आठवतच नाही.(८१) हे पाहून लोक म्हणू लागले की, याला आता वेड लागले आहे. त्याच्या अंत:करणात खूप काही साचलेले आहे. पण देहबुद्धीचे दारच त्याला माहीत नाही. (अंत:करणात पुष्कळ विचार आहेत पण मानवी व्यवहाराची भाषा तो विसरून गेला आहे. म्हणजे तो असंबद्ध बोलू लागला आहे.)(८२) किंवा भलत्याच माणसाला विचारू लागला की, मला सद्गुरू केव्हा भेटतील? त्याला हे जड आहे, हे जंगम आहे, असा भेदच कळेनासा झाला. दिसेल त्याला 'गुरुमहाराज' म्हणून हाक मारू लागला.(८३) 'डोळ्यांनी गुरुरूप कधी पाहीन,त्यांच्या पायावर माझा माथा कधी टेकवीन' असे म्हणून तो दगडावरच डोके टेकवू लागला.(८४)त्याला लोक-लाज वाटेनाशी झाली. ती नष्टच झाली. तो जिवंत असूनही त्याची तहान भूक मरून गेली आणि आपली सावलीदेखील पाहिली की 'माझे सद्गुरू आले' असे म्हणू लागला.(८५)त्याला झोपेने घेरले तरी स्वप्नामध्येही 'सद्गुरू आले' असे वाटू लागले. किंवा कधी धावत जाऊन खांबालाच गुरू म्हणून आलिंगन दिले. थोड्या वेळाने खांबाची ओळख पटल्यावर अंग जमिनीवर टाकून दिले.(८६)अशा ध्यासाने तो स्वत:च गुरू झाला. पण तेही त्याला कळेना. ही रात्र आहे की दिवस आहे हे भानही त्याचे नाहीसे झाले. गुरूवाचून तो अगदी कासावीस झाला.(८७)

**ऐसी बळकट जाली बुद्धि। नेणे आपपर शुद्धी। हें जाणोनि त्रिशुद्धी। स्वरूप खळबळिलें।।८८।। मी निर्विकार नाठवतां । विकारची होय तत्त्वतां । अमूर्तचि परि तयाकरितां । देहचि धरी।।८९।। मग तया आवड तयासी । धुंडीत चालले देशोदेशीं । अकस्मात् असोसी । पुरली दोघांची ।।९०।। धन्य धन्य ते धरणी । जेथें गुरुशिष्यांची मिळणी । एकमेकां नयनीं । अवलोकिलें ।।९१।। परस्परें बाणली खूण । येरें घातलें लोटांगण । गुरुमाउली ये धाऊन । पोटेसी धरियेला ।।९२।। एकमेकां पडली मिठी । सुखरूप कोंदली सृष्टी । तया सुखाची चावटी । केवि करूं ।।९३।। हें मुमुक्षूचें लक्षण । संक्षेपे केलें कथन । जालें चत्वारी साधन । अधिकारीयाचें ।।९४।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । शमादिषट्कमुमुक्षत्वप्रकारे । पंचमसमासः ।। इति पंचिका संपूर्णा ।।१।। ओवी संख्या ३०७**

---

अशी दृढबुद्धी बळावली. त्याला आपले-परक्याचे हे ओळखण्याची शुद्धही राहिली नाही. हे लक्षात आल्यावर साक्षात परब्रह्माच्या ठिकाणी खरोखरच खळबळ निर्माण झाली.(८८) आपण निर्विकारी आहोत हे विसरून ते विकार पावले, आणि स्वत: अमूर्त असूनही या मुमुक्षूकरिता त्याने देह धारण केला.(८९) मग त्याला त्या मुमुक्षूची आवड निर्माण झाली आणि ते देशोदेशी त्याला शोधीत निघाले आणि मग एकदा अकस्मात् दोघांचीही इच्छा एकदमच पूर्ण झाली.(९०) ज्या ठिकाणी या गुरुशिष्यांची भेट झाली, त्यांनी एकमेकांचे अवलोकन केले, ती भूमी धन्य होय.(९१) त्या दोघांना एकमेकांची ओळख पटली. तेव्हा शिष्याने गुरूपुढे लोटांगण घातले. तेव्हा गुरुमाउली धावून आली आणि त्या शिष्याला त्यांनी पोटाशी कवटाळून धरले.(९२) एकमेकांनी एकमेकाला आलिंगन दिले. सबंध सृष्टी सुखरूप होऊन त्या भावनेने दाटून गेली. त्या सुखाचे वर्णन केवळ शब्दांनी मला कसे करता येईल?(९३) अशा प्रकारे हे मुमुक्षूचे संक्षेपाने लक्षण सांगितले. आणि अधिकारी व्यक्तीची चारप्रकारची लक्षणेही सांगितली.(९४)



# पंचिका २ री - ज्ञानप्रतिष्ठा

## ।। श्रीराम समर्थ ।। - समास १ला - ज्ञानसाधनप्रकार

**गणेश शारदा सद्‌गुरु । संत सज्जन कुलेश्वरू । सर्वही माझा रघुवीरू सद्‌गुरुरूपें[१०] ।।१।। वंदुनीयां श्रोतेजन । कीजे वेदांत कथन । उपनिषदांचा अर्थ गहन । प्राकृतीं प्रगटे ।।२।। मुख्य मोक्ष म्हणिजे ज्ञान । ऐका तयाचे साधन । जैसें करितांचि मंथन। अग्नि प्रगटे ।।३।। गुरु शास्त्र आणि विचार । तरीच निरसे अंधःकार । ज्ञानप्रकाश होय थोर । आपआपणा भेटे ।।४।। तें तरी निजरूप आपुलें । जरि गुरुशास्त्र न विचारिलें । तरी तें दुरी दुरावलें। अति दूरतर ।।५।। जैसा काष्ठीं अग्नि असे । मथनेंवीण प्रकाश नसे । तरी अंधकारू निरसें । कवणेपरी ।।६।। आचार्य तो पूर्वारणी । शिष्य जाणिजे उत्तरारणी । शास्त्रविचार मथनीं। ज्ञानाग्नि[११] प्रगटे।।७।।पृथकाकारें सांगिजेल । मुख्य सद्‌गुरु जैं भेटेल । शब्दब्रह्मीं परब्रह्मीं असेल । निपुण जो का ।।८।। तरिच अधिकारियासी । ज्ञान होय निश्चयेसी ।**

---

### पंचिका २ ली , समास १ ला - ज्ञानसाधनाप्रकार

गणेश, शारदा, सद्‌गुरू, संत-सज्जन, कुलदैवत ही सर्वही माझ्या सद्‌गुरूंच्या रूपातील माझा रामच होत.(१) आता श्रोतेजनांना नमस्कार करून वेदान्ताचे निरूपण केले जाईल. त्यायोगाने उपनिषदांचा गहन अर्थ प्राकृत भाषेत प्रकट होईल.(२) मुख्यत: मोक्ष म्हणजेच ज्ञान आहे. त्या ज्ञानाचे साधन ऐका. (अग्नीसाठी) काष्ठांचे मंथन म्हणजे घर्षण केल्यानंतर जसा अग्नी प्रकट होतो, त्याप्रमाणे(३) गुरू, शास्त्र आणि विचार या तीन गोष्टी असतील तरच अज्ञानरूपी अंधकार नष्ट होईल आणि ज्ञानाचा प्रकाश वाढेल, आणि या ज्ञानाच्या प्रकाशात आपण आपल्याला भेटतो.(४) जर गुरू, शास्त्र यांचा विचार घेतला नाही, तर ते आपले आत्मरूप आपल्यापासून दूर दूरवर जाते. (आपल्यापासून दुरावते.)(५) काष्ठामध्ये अग्नी असतो. पण त्याचे मंथन केल्याखेरीज त्याचा प्रकाश मिळत नाही. तो मिळाला नाही तर अंधकाराचे निरसन कोणत्या प्रकाराने होईल? (तसाच हा प्रकार होय.)(६) या ज्ञानाग्नीच्या मंथनप्रक्रियेत आचार्य अथवा गुरू हे खालची अरणी (मंथन काष्ठ) असून शिष्य हा वरची अरणी समजावी. शास्त्रविचार पाहणे हे मंथन होय. अशा मंथनातून ज्ञानरूपी अग्नी प्रकट होतो.(७) वेगळ्या प्रकाराने हे सांगता येईल. जे शब्दब्रह्म (म्हणजे शास्त्रविचार) आणि परब्रह्म (अध्यात्मविचार) यांत पारंगत असतील असे सद्‌गुरू जेव्हा भेटतील,(८) तेव्हाच अधिकारी शिष्याला निश्चितपणे ज्ञान प्राप्त होते. सद्‌गुरूंच्या कृपेनेच आपली आपल्या स्वरूपाशी गाठ पडते.(९) एखादा परब्रह्माच्या ज्ञानाच्या-

**मिळे आपण आपणासी । सद्‌गुरु प्रसादें ।।९।। परब्रह्मीं निष्णात असे । प्रबोधशक्ति शब्देंवीण नसे । अवघा शब्दब्रह्म जाणतसे । परि अनुभव नाहीं ।।१०।। तरी गुरुत्व न ये तयासीं । उभयीं निपुण अहर्निशीं । तो सद्‌गुरु सच्छिष्यासी । मिळणी करी ।।११।। एक ब्रह्मज्ञानेवीण । जो जो उपदेश तो तो शीण । मंत्र यंत्र उपासन । अधिकारिया न लगति ।।१२।। सद्‌गुरुमुखें सच्छास्त्रश्रवण । हें सद्‌गुरुचिया आधीन । मनन आणि निदिध्यासन । हें शिष्याकडे ।।१३।। गुरुवीण शास्त्र पाहिलें । तें जाणावें बाष्कळ जालें। निश्चयासीं बाणलें । न वचे कदां ।।१४।। गुरुपदीं जो अनन्य । वेदांत तोचि जें गुरुवचन। तरी सच्छास्त्राचें प्रयोजन । काय असे ।।१५।। हें सत्य परि शास्त्राधारें । आवडी सद्‌गुरुपदीं थोरें । ऐकिलें नसतां निर्धारें । अनन्यत्व कैंचें ।।१६।। मागें गुरुशिष्य अपार । उपदेश असे शास्त्राधार । वर्तमानीं अथवा पुढें होणार । वेदवचनेंवीण नाहीं।।१७।। तूं तें ब्रह्म अससी । वेदाचीं वचनें ऐसीं । अनुभवें खंडी संशयासी । सद्‌गुरुनाथ ।।१८।।**

---

अनुभवाच्या बाबतीत निपुण आहे, पण शब्दज्ञानाच्या अभावी त्याच्याजवळ दुसऱ्याचे प्रबोधन करण्याची शक्ती नाही; किंवा सर्व प्रकारच्या शब्दज्ञानाचा जो जाणकार आहे, परंतु परब्रह्माच्या ज्ञानाचा त्याच्याकडे अनुभव नसेल.(१०) या दोघांनाही गुरुत्व प्राप्त होत नाही. पण जे या दोन्ही प्रकारात रात्रंदिवस निपुण असतात. असेच सद्‌गुरू शिष्याची स्वरूपाशी भेट घालून देऊ शकतात.(११) एक ब्रह्मज्ञान नसेल तर जो जो (कोरडा) उपदेश केला जाईल. तो उपदेश म्हणजे केवळ श्रम होत. तेव्हा अधिकारी शिष्याला सद्‌गुरूखेरीज मंत्र, यंत्र अथवा उपासना यांपैकी कशाचीही गरज भासत नाही.(१२) सद्‌गुरूंच्या मुखातून सच्छास्त्रश्रवण करण्याची संधी मिळणे हे सद्‌गुरूंच्यावर अवलंबून आहे. पण श्रवण केलेल्या ज्ञानाचे मनन आणि निदिध्यास या गोष्टी मात्र सर्वस्वी शिष्यावर अवलंबून आहेत.(१३) गुरूंचा अव्हेर करून शास्त्रग्रंथांचा अभ्यास केला तर तो अभ्यास बाष्कळ ठरतो. त्याला कधीच निश्चयाचे स्वरूप येत नाही.(१४) एखादा शिष्य गुरुचरणांपासी पूर्णपणे अनन्यगतिक, एकनिष्ठ असेल, सद्‌गुरूंच्या मुखातून जे निघाले तो वेदान्त अशी त्याची श्रद्धा झाली असेल तर त्याला इतर शास्त्रग्रंथांची काय आवश्यकता?(१५) हे खरे असले तरी शास्त्राच्या आधारानेच सद्‌गुरुचरणांवरची भक्ती स्थिर होते. जर शास्त्रांचे श्रवण झालेच नसेल तर सद्‌गुरूंबद्दल निश्चयपूर्वक, अनन्यगतिक निष्ठा कशी होईल?(१६) मागे जे अनेक (अगणित) गुरुशिष्य होऊन गेले, त्यांचाही उपदेश शास्त्रवचनानुसारच होत होता. वर्तमानकाळात जे गुरुशिष्य असतील आणि येथून पुढे जे निर्माण होणार असतील त्यांचाही उपदेश वेदवचनांशिवाय होणार नाही.(१७) वेदांमध्ये 'तूच ते ब्रह्म आहेस' (तत्त्वमसि) अशा प्रकारची वचने आहेत. या वचनांच्या बाबतीत संशय निर्माण झाला तर ज्यांनी या वचनांचा प्रत्यक्ष अनुभव घेतला आहे असे सद्‌गुरुमहाराज तो अनुभव त्या शिष्याला देऊन त्या संशयाचे खंडन करून निराकरण करतात.(१८)

**शास्त्रेंवीण संशय न जाय । गुरुवीण अनुभव न होय । वेदवचनें गुरुसेवनें लाहे । समाधान।।१९।। वेद हा स्वतःप्रमाण । कदां नव्हे अप्रमाण । प्रमाणसिद्ध जें ज्ञान । तेणेंचि अविद्यानिवृत्ति ।।२०।। वेदें जरी ब्रह्मज्ञान । तरी जैमिनीचें ऐसें वचन । कीं क्रियापरत्व संपूर्ण । वेदासि असे ।।२१।। सर्व वेदासि क्रियात्व आलें । तरी वेदासी दूषण लागलें । सच्चिदानंद ब्रह्म कळलें । काशावरुनी ।।२२।। विधि निषेध नामधेय । अर्थवाद[१२] मंत्रान्वय । त्रिकांड वेदाचें तात्पर्य । हें काय मिथ्या ।।२३।। सच्चिदानंद हा विधि । तन्न तन्न या निषेधी । उभयरूपें अवधी । ज्ञानकांडीं ।।२४।। नामधेय उपासन । मंत्रसिद्धि क्रिया पूर्ण । अर्थवाद साधारण । त्रिकांडासी ।।२५।। क्रियापरत्वचि मानावें । तरी ब्राह्मण कासया व्हावें । सर्व वेदार्था आणावें । दूषण कैसें।।२६।।तरी त्या वचनाची काय गती । अपेक्षा असे चित्तीं । सकळ कुळा दोष लागती । तो पुत्र परित्यजावा।।२७।।**

---

शास्त्रावाचून संशय जाणार नाही आणि गुरूवाचून अनुभव प्राप्त होणार नाही.अशा प्रकारे वेदवचने आणि गुरुसेवा या दोहोंच्या साहाय्याने समाधान प्राप्त होते.(१९)वेद हा स्वत:प्रमाण म्हणजे इतर ग्रंथांवर अवलंबून न राहता स्वतंत्र असे प्रमाण आहे.तो कधीही अप्रमाण (अविश्वसनीय, मिथ्या) ठरणार नाही.जे ज्ञान प्रमाणांनी सिद्ध झालेले असते त्यानेच अविद्येची म्हणजे अज्ञानाची निवृत्ती होत असते.(२०)पण वेदांनी ब्रह्मज्ञानाची प्राप्ती होते असे असले तरी त्याबाबत एक अडचण आहे.पूर्वमीमांसाकार जैमिनीने असे म्हटले आहे की संपूर्ण वेद क्रियापर आहेत.(क्रियेचा आग्रह धरणारे आहेत.)(२१)सर्व वेदच जर असे क्रियापर ठरले,तर वेदांवर मोठाच दोष येतो.(ब्रह्मज्ञान हे विचारानेच प्राप्त होते.असा सिद्धान्त आहे.वेद तर क्रियापर ठरले.मग ब्रह्मज्ञानाच्या बाबतीत वेद अप्रमाण ठरतात.मग ते ज्ञान कोणत्या शास्त्राने होते?)मग सत्,चित्,आनंद या स्वरूपाचे ब्रह्म कसे कळते?(२२)वेदांची तीन कांडात विभागणी होते.ज्ञान,कर्म आणि उपासना.या त्रिकांड वेदांचे तात्पर्य त्यातील विधिवाक्ये,निषेधवाक्ये, नामोच्चार,त्यातील अर्थवाद(फलश्रुती),आणि मंत्रांचे परस्परसंबंध यांवरून ठरते.हे मिथ्या ठरेल काय?(२३) तसे होणार नाही.वेदही ज्ञानपरच आहेत.ब्रह्म हे सत्,चित्,आनंदस्वरूपी आहे,हे त्यातील विधिवाक्य होय.ब्रह्म म्हणजे'तत् न'या प्रकारच्या निषेधवाक्यांवरून कळते. वेदाच्या ज्ञानकांडात ह्या दोन्ही प्रकारची वाक्ये आहेत.(२४)नामोच्चारण म्हणजे उपासना,त्यातील मंत्रपदे इत्यादी गद्य-पद्य प्रकार म्हणजे मंत्रसिद्धी होय आणि त्रिकांडात्मक संपूर्ण वेदातील फलश्रुती'मोक्ष'हीच आहे.ती सर्व कांडांना समानच आहे.(२५)वेद संपूर्ण क्रियापर मानला तर(ब्रह्म जानाति इति ब्राह्मण:)ब्राह्मणत्व व्यर्थच ठरेल. मुख्य म्हणजे अशा(जैमिनीच्या) विधानांनी संपूर्ण वेदांना दूषण आणणे योग्य ठरेल काय?(२६)मग जैमिनीच्या या वचनाचे काय करायचे? असा मनात विचार येत असेल तर त्याचे उत्तर असे की, ज्यामुळे संपूर्ण कुळाला जर दोष (डाग,कलंक) लागत असेल असा पुत्र जरी असला तरी त्याचा त्याग करावा.(२७)

**ग्रामासाठीं कुळ सांडिजे । देशाकरितां ग्राम दंडिजे । ऐशा न्यायार्थे जाणिजे । वचन मिथ्या।।२८।।स्वर्गार्थ यज्ञ करावा। या वचनेंचि विश्वास जिवा। अन्य प्रमाणाचा गोवा। न इच्छी कोणी।।२९।।म्हणउनी वेद स्वतःप्रमाण । तत्काळ होय अज्ञान खंडण । तेणेंचि स्वरूप प्रगटमान । साधकां होय।।३०।।परि विचाराची अपेक्षा असे। तेणें असंभावना नासे। विपरीतत्वहि जातसे । तयासवें।।३१।।वेद स्वतःप्रमाण म्हणतां। आणि विचार करावाही सांगतां। तरी स्वतःप्रमाण आतां । काशावरूनी।।३२।।जैसा दीपु लाविला। तेणें अंधकारु नाशिला। परी निर्वातत्व वाती तेला । अपेक्षा असे।।३३।।तूं ब्रह्म हे श्रुति बोले। बहुधा गुरुमुखें ऐकिलें। प्रतिबंधें असत्य वाटलें । हे असंभावना।।३४।।मी किंचिज्ज्ञ मज कर्तेपण । ब्रह्म कैसा मी परिपूर्ण । हा विपर्यय याचें हनन । विचारचि करी।।३५।। विचार म्हणिजे मनन । अनुभवानुसार तर्क करण। नाना कुतर्क दंडून । वृत्ति स्थिरावे।।३६।।**

---

गावाच्या हितासाठी आपल्या कुळाचा त्याग करावा, देशाच्या हितासाठी गावाला शासन करावे, या न्यायाच्या अनुरोधाने वरील (जैमिनीचे) वचन मिथ्या आहे असे समजावे.(२८) 'स्वर्गप्राप्ती'साठी यज्ञ करावा या वचनावरच सर्वसाधारण जीवांचा विश्वास असल्याने इतर प्रमाणांच्या गुंतागुंतीत कोणी पडत नाही. (इतर प्रमाणांच्या गुंतागुंतीत पडण्याची इच्छा कोणी जीव धरत नाहीत.)(२९) म्हणून वेद स्वतःप्रमाण आहेत. (त्यांना अन्य प्रमाणांची गरज नाही) त्यांच्या श्रवणाने अज्ञानाचे तत्काळ खंडन होते, त्याच योगाने साधक असतील त्यांना स्वरूप प्रगट होते. (स्वरूपाचा साक्षात्कार होतो.)(३०) परंतु त्यासाठी विचाराची अपेक्षा आहे. विचारामळे संशयरूप असंभावना नष्ट होते. त्याचबरोबर विपरीत ज्ञानही नाहीसे होते. (असंभावना आणि विपरीतभावना हे ज्ञानाच्या मार्गातील दोष आहेत.)(३१) यावर शंका अशी की एकीकडे तुम्ही वेदाला स्वतःप्रमाण म्हणता आणि लगेच वेदाच्या जोडीला विचाराची अपेक्षा आहे असे म्हणता,मग वेद स्वतःप्रमाण कसे ठरतील? वेदालाही विचारांची मदत घ्यावी लागते असे यावरून ठरते.(३२) शंका बरोबर आहे. पण असं पहा, दिवा लावला आणि त्याने अंधार नाहीसा केला. पण त्या दिव्याला वारा नसणे,(निर्वातत्व) वात आणि तेल यांची अपेक्षा असतेच की नाही?(३३) वेदाने सांगितले की, तू ब्रह्म आहेस. हे वचन बहुधा गुरुमुखातून ऐकलेले असते. पण ऐकणाऱ्याच्या ज्ञानामध्ये अडथळा असल्यामुळे त्याला ते असत्य वाटते, हीच असंभावना होय. (म्हणजे आपणच ब्रह्म कसे असू हा संशय.)(३४)मी तर अल्पज्ञानी, माझ्या ठिकाणी कर्तेपणाचा अभिमान आहे. असा मी ते परिपूर्ण ब्रह्म कसा असू शकेन?असा विपरीत विचार मनात येणे यालाच विपरीत ज्ञान म्हणतात. विचारच या विपरीतज्ञानाचा नाश करतो. (म्हणजेच असंभावना आणि विपरीतता यांचा नाश करतो.)(३५) विचार म्हणजे मनन करणे. म्हणजे आपल्याला जो अनुभव येत असेल त्यानुसार तर्क करणे. त्यायोगाने निरनिराळ्या कुतर्कांचे खंडन होऊन वृत्ती स्थिर होते.(३६)

**जरी विचार अपेक्षा जाली । तेणें वृत्ति बळावली । इतुकेनें वेदाची काय गेली । स्वत:प्रमाणता ।।३७।।गुरु शास्त्र आणि विचार। श्रवण मनन सारासार। निदिध्यासें साक्षात्कार। अधिकारी पावती।।३८।।नाना संशय छेदुन । मी ब्रह्म प्रतीति पूर्ण । त्रिविधा परि सत्य गहन । श्रवण या नांवे।।३९।।तेंचि मी हें अनुसंधान। भेदबुद्धीचें करी हनन । या नांव बोलिजे मनन । निदिध्यास पुढें।।४०।।जागृती अथवा स्वप्नीं । नाठवेंचि दुजे मनीं । एकतान समाधानी। हा निदिध्यास।।४१।।पुढें सहज साक्षात्कार। आपुला आपण निर्धार। गळे वृत्तीचा विकार। निर्विकार सहज।।४२।।प्रतिबंधें न वचे निर्धारिलें। तेंचि पाहिजे बोलिलें। अंतरीं पाहिजे कळलें । प्रतिबंध कोणते।।४३।।भूत भावि वर्तमान । प्रतिबंधाचीं लक्षणें तीन । अनुक्रमें साधकें ओळखून। परिहार योजावा।।४४।।मागें जे विषय भोगिले । स्त्रियादि सुख अनुभविलें । संन्यस्ता उपरी बैसलें । अंत:करण तेथें।।४५।।तेणें गुणें श्रवण मनन । होतां न पविजे समाधान। हा भूत प्रतिबंध याचें निरसन। तेंचि कैसें।।४६।।पाहतां स्त्रियादिकांचे ठायीं । आत्मा आत्मी भेद नाहीं । त्या त्या विषयाचें समुदाईं । अधिष्ठान काय ।।४७।।**

---

जरी वेदाला येथे विचाराची आवश्यकता भासली तरी त्याने वृत्ती दृढ झाली. एवढ्याने वेदाची स्वत:प्रमाणता कशी काय नष्ट होते?(३७) गुरू,शास्त्र आणि विचार,श्रवण,मनन सारासारविवेक आणि निदिध्यास या सगळ्यांमुळे अधिकारी साधकाला स्वरूप साक्षात्कार होतो.(३८) श्रवण म्हणजे निरनिराळ्या संशयांचे खंडन होऊन 'मी ब्रह्म आहे' असा पूर्ण अनुभव येणे. गुरू, शास्त्र आणि अनुभव या तिन्ही मार्गांनी त्याच्या सत्यत्वाची प्रतीती येणे, हे होय.(३९)'मीच ब्रह्म आहे' असे चिंतन करून भेदबुद्धी नाहीशी करणे याला मनन म्हणतात. निदिध्यास म्हणजे काय ते पाहू.(४०)जागृतीत अथवा स्वप्नात दुसऱ्या कशाचेही स्मरण नसणे आणि सतत समाधानी असणे याला निदिध्यास म्हणतात.(४१)त्यानंतर सहज साक्षात्कार होऊन आपल्या स्वरूपाचा आपल्याला निश्चय होतो आणि वृत्तीचा विकार नष्ट होऊन मनुष्य निर्विकार बनतो.(४२) पण प्रतिबंधामुळे निर्धार होत नाही. त्यामुळे प्रथम प्रतिबंधाचे स्वरूप कळले पाहिजे, कोणकोणते प्रतिबंध आहेत ते मनोमन कळले पाहिजे.(४३) प्रतिबंधांचे तीन प्रकार आहेत. भूत प्रतिबंध,भावी प्रतिबंध आणि वर्तमान प्रतिबंध.साधकाने ते प्रकार क्रमश: ओळखून त्यांच्या निराकरणाचे उपाय करावेत.(४४) मागे जे विषयांचे सेवन केले असेल,स्त्रियादी सुखांचा अनुभव घेतला असेल,त्यांच्या ठिकाणी संन्यस्त साधकाचे मन गुंतून राहते.(४५) त्यामुळे श्रवण, मनन इत्यादी करू लागले असता मिळावयाचे ते समाधान मिळू शकत नाही. याला भूत प्रतिबंध म्हणतात. याचे निरसन कसे करावे?(४६) स्त्रियादिकांचा विचार मनात येताच, स्त्रीपुरुष अथवा पुरुष या सर्वांच्या ठिकाणी एकच आत्मा वास्तव्य करतो. पुरुषांचा तो आत्मा आणि स्त्रियांचा तो आत्मी असा भेद तेथे नाही आणि या निरनिराळ्या विषयांच्या ठिकाणी कोणते अधिष्ठान आहे. सर्वत्र आत्माच तर आहे.(४७)

**नामरूप जें जें आलें । तें तें मिथ्यात्वें विदारिलें । अस्ति भाति कोंदाटलें । विषय कैंचा।।४८।। विषयाभावीं भोग कैंचा । भोक्त्याभावीं कैंची इच्छा । येणे रीती संकल्पाचा। छेद कीजे ।।४९।। आतां जाणिजे वर्तमान । प्रतिबंधाचे कैसें चिन्ह । तयाचें चत्वार लक्षण । तेंचि अवधारा ।।५०।। प्रज्ञामांद्य आणि कुतर्क । दुराग्रह विपर्यय देख । वेगळालें याचें रूपक। पाहून त्याग कीजे ।।५१।। अर्थ न कळे प्रज्ञा थोडी । कुतर्के भलताचि अर्थ काढी। दुराग्रहें बळेंचि ओढी । म्हणे माझें खरें ।।५२।। विपर्ययें कष्टविलें। मी जीव म्हणोनि भ्रमलें । हे चारि मिळोनि बोलिलें । वर्तमान प्रतिबंध ।।५३।। अथवा विषयासक्ति स्वीकारिजे।विपर्यय दुराग्रह एक कीजे । एवं चारीचें हें लक्षण जाणिजे । प्रज्ञामांद्य कुतर्कादि ।।५४।। यासि करावें श्रवणमनन । तेणें याचें निरसन । बळेंचि आवरावें मन। विश्वासबळें ।।५५।।भावि प्रतिबंध ऐकिला । भरता त्रिजन्मीं मोक्ष जाला। वामदेवहि पावला । गर्भी समाधान ।।५६।।संशयरहित अपरोक्ष ज्ञान । त्याविशीं राहे जो अनुमान । मग अंतकाळीं जें आठवण । तेचि तया प्राप्ति ।।५७।।यासि करावें निदिध्यासन।**

---

जे नामरूपात्मक आहे ते सर्व मिथ्या आहे असे जाणून त्यांचा निरास करावा.सर्व विश्वच अस्ति,भाति,प्रिय या लक्षणांनी युक्त असलेल्या ब्रह्माने कोंदाकोंदी व्यापून टाकले आहे,तेव्हा तेथे विषय आणि विषयांचा भोक्ताअशा भेदाला वाव कसा असेल?(४८)विषयच जर नसेल तर त्यांचा भोग कसा शक्य होईल?आणि भोक्ताच जर नसेल तर तेथे इच्छा कशी संभवेल?असा विचार करून मूळच्या स्मरणरूप संकल्पाचे निरसन करावे.हे भूत प्रतिबंधाचे निरसन होय.(४९)आता वर्तमान प्रतिबंधाचे चिह्न जाणून घेऊ.त्याची चार लक्षणे आहेत.ती प्रथम लक्षात घ्या.(५०)प्रज्ञामांद्य,कुतर्क,दुराग्रह,विपर्यय ही ती चार लक्षणे होत.त्यांची वेगवेगळी रूपे जाणून त्यांचा त्याग करावा.(५१)प्रज्ञामांद्य म्हणजे मंद बुद्धीमुळे अर्थ कळत नाही अशी स्थिती.कुतर्क म्हणजे चुकीचे अथवा दुष्ट तर्क करून भलताच अर्थ काढणे आणि दुराग्रह म्हणजे माझे म्हणणे खरे आहे,असे म्हणून बळेच ताणून धरणे.(५२)विपर्यय म्हणजे विपरीत भावना.तिने प्राण्यांना फारच कष्ट दिले आहेत.आपण आत्मा असताना त्याला जीव मानणे हा विपर्यय होय.या चारींना मिळून वर्तमान प्रतिबंध असे म्हणतात.(५३)किंवा विपर्यय आणि दुराग्रह या दोन चिह्नांचे एकत्रीकरण करून रिकाम्या झालेल्या जागी विषयासक्ती हे चिह्न घालावे.प्रज्ञामांद्य,कुतर्क इत्यादी चारी चिह्नांचे अशा तऱ्हेने लक्षण समजून घ्यावे.(५४)या प्रतिबंधाचे निरसन करण्यासाठी श्रवण,मनन या साधनांचा अवलंब करावा आणि विश्वासाच्या बळाने मन बळेच आवरावे.(५५)भावी प्रतिबंधाच्या स्वरूपासंबंधी असे ऐकिवात आहे की,भरताला हरणाच्या ध्यासामुळे तीन जन्म घ्यावे लागले.वामदेवालाही गर्भवास स्वीकारून त्यात समाधान प्राप्त करावे लागले.(५६)संशयरहित जे अपरोक्ष ज्ञान त्याविषयी संशय बाळगला की,अंतकाळी जी स्मृती असेल त्याप्रमाणे त्याला गती मिळते.(५७)त्याच्या निरसनासाठी

**अखंड राखावें अनुसंधान । साक्षात्कार अपरोक्ष ज्ञान । येथेंचि होय ।।५८।। तथापि तैसेंचि अवसान आलें । अपरोक्ष ज्ञान नाहीं जालें । तरी जन्मांतरी समाधान पावलें। पूर्वील ध्यासें ।।५९।। मुख्य अनुसंधान न सोडावें । तेणेंचि एक पावन व्हावें । श्रवणमनन केलेंचि करावें । साक्षात्कारा पावेतों ।।६०।। मंदमतीचिया कृपा । हा प्रस्तावो निरोपिला बापा। येरांसी कायसे पां । लागती सायास ।।६१।। सद्गुरुपदीं अनन्यता । तरि तुजसी काय बा चिंता । बोलिलें अर्था श्रुति समस्ता । अनायासें तया प्राप्ति ।।६२।। पावतां मुख्य अधिकार । वरि गुरु शास्त्र विचार । श्रवणमननें साक्षात्कार । विलंब नाहीं।।६३।। हें यथार्थचि बोलिलें । विवेकें कल्पनेसी सांडिलें । मग अपैसेंचि उरलें । श्रुतिसिद्ध तत्त्व।।६४।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ज्ञानसाधनप्रकारे । प्रथमसमासः ।।१।।**

## ।। श्रीराम समर्थ ।। समास २रा - मतखंडन

**ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान । अध्यात्मविद्या जया अभिधान । नाना मतांचें पेखण । कामा नये सर्वथा।।१।।अध्यात्मविद्या तेचि विद्या । परंपरा साधन अन्य विद्या । मोक्ष बोलिला परि**

---

निदिध्यास धरावा, अखंड अनुसंधान ठेवावे. त्यायोगाने याच जन्मी साक्षात्कार व अपरोक्ष ज्ञान होते.(५८) तथापि जरी साक्षात्कार न होताच मृत्यू आला तरी पुढच्या जन्मात मागच्या निदिध्यासाने अपरोक्ष ज्ञान होऊन समाधान प्राप्त होते.(५९) तेव्हा साक्षात्कार होईपर्यंत अनुसंधान सोडू नये. श्रवण, मनन पुन्हा पुन्हा करावे आणि पावन व्हावे.(६०) मंदमती अधिकाऱ्यांची कणव येऊन हा उपाय सांगावा लागला. इतरांना काय सायास पडणार आहेत?(६१) सद्गुरुचरणांशी जर अनन्यता असेल तर तुला चिंता करण्याचे कारण काय? श्रुतींनी हा सगळा भावार्थ सांगितला आहेच. गुरुभक्ताला विनासायास अपरोक्ष ज्ञानाची प्राप्ती होते.(६२) एक मुख्य अधिकार प्राप्त झाला, त्यावर सद्गुरू, शास्त्र आणि विचार यांची प्राप्ती झाली, आणि त्याला श्रवणमननाची जोड देताच साक्षात्काराला उशीर लागत नाही. (ताबडतोब साक्षात्कार होतो.)(६३) विवेकाने कल्पनेचा त्याग केला की मग आपोआपच जे उरते तेच श्रुतींनी सिद्ध केलेले तत्त्व म्हणजे ब्रह्म होय;हे असे जे म्हटले आहे ते यथार्थच आहे.(६४)

## पंचिका २ री, समास २रा - मतखंडन

ज्ञान म्हणजे आत्मज्ञान, त्यालाच अध्यात्मविद्या असे नाव आहे. ज्ञानाच्या बाबतीत विविध मतांचे अवडंबर उपयोगाचे नाही.(१) अध्यात्मविद्या हीच खरी एकमेव विद्या होय. इतर विद्या केवळ परंपरा टिकवणाऱ्या आहेत. त्यांनीही मोक्षच सांगितला असला तरी त्यांचे ते सांगणे अर्थवादात्मक म्हणजे

**आद्या । तो अर्थवाद।।२।।तूं मोठा पुण्यवान । कोणी नाहीं तुजसमान । ऐसें जिव्हेनें करी स्तवन । तो अर्थवाद।।३।।विद्या तरी अवघ्या किती । तेथील कैसी फळश्रुति । अल्पसंकेतें यथामती । निवडोनि दाऊं।।४।।ऋग्यजु:सामाथर्वण । हे मुख्य चत्वारि वेद पूर्ण । शिक्षा कल्प व्याकरण । छंद निरुक्त ज्योतिष।।५।।ऐसीं साही शास्त्रें भिन्न भिन्न। ऐका उपांगाचे लक्षण। न्याय मीमांसा पुराण। धर्मशास्त्र।।६।।ही उपांगें चारी असतीं । एवं विद्या चतुर्दश म्हणती । सांख्य पातंजलादि होती । अंतर्भूत त्याचे।।७।।उपांगाच्या ठाई मतें । बोलती परस्परें विरोधातें। अध्यात्मविद्या म्हणणें जीतें। ते मीमांसा उपांगीं।।८।।वैशेषिक न्यायाच्या पोटीं । पुराणिं पुराणाची थाटी । धर्मशास्त्रीं दाटी । बहुत नामाची।।९।।सांख्य पातंजली पाशुपत।वैष्णव रामायण महाभारत।या इतुकियांचा संकेत। धर्मशास्त्रीं।।१०।।आतां उपांगाच्या ठाई। मोक्षातें बोलती काई। तो तो अर्थवाद नाहीं । सिद्धांत एक।।११।।देहेंद्रिया अतीत। आत्मा विभु नव गुण मिश्रित । षट्प्रमाणें बुद्धिस होत । साक्षात्कार जरि।।१२।।वृत्तिसहित नव गुण । याचें होय नि:शेष हनन । तरिच मोक्ष अभिधान । वैशेषिक बोलती ।।१३।।प्रमेयादि षोडश पदार्थ । ज्ञानें द्वादश वर्गाचा घात । श्रवणमननें होत । मिथ्याज्ञाननिवृत्ति।।१४।।**

---

पक्षगौरवासाठी असते.(२)'तू मोठा पुण्यवान आहेत,तुझ्यासारखे कोणी नाही'अशा प्रकारे जिव्हेने स्तुती करणे म्हणजे अर्थवाद होय.(३)आता एकूण विद्या किती आहेत त्यांच्या फलश्रुती काय आहेत, हे थोडक्यात यथामती स्पष्ट करून सांगतो.(४)ऋग्वेद,यजुर्वेद,सामवेद,अथर्ववेद हे मुख्य चार वेद आहेत.शिक्षा (उच्चारशास्त्र),कल्प(यज्ञक्रियाविधिशास्त्र),व्याकरण,छन्द:शास्त्र,निरुक्त(व्युत्पत्तिशास्त्र) आणि ज्योतिषशास्त्र.(५)अशी भिन्न भिन्न सहा शास्त्रे आहेत.आता वेदांची उपांगे ऐका.न्याय,मीमांसा (वैदिक कर्मकांडाचे समर्थन करणारे शास्त्र),पुराणे,धर्मशास्त्र.(६)अशी चार उपांगे आहेत.या सर्व मिळून चौदा विद्या आहेत.त्यातच सांख्यशास्त्र,पातंजल म्हणजे योगशास्त्र इत्यादी त्यात समाविष्ट होतात.(७)उपांगांमध्ये परस्परविरोधी मते मांडली जातात.जिला अध्यात्मविद्या म्हणतात.ती मीमांसा या उपांगाच्या पोटात समाविष्ट होते.(८)वैशेषिकमत हे न्यायाच्या पोटी समाविष्ट आहे.पुराण या उपांगामध्ये सर्व पुराणांचा समुदाय अंतर्भूत होतो.धर्मशास्त्रामध्ये अनेक धर्मशास्त्रपर ग्रंथांची दाटी झाली आहे.(९)धर्मशास्त्रामध्ये सांख्य,पातंजल (योगशास्त्र),पाशुपत (शैवग्रंथ),रामायण,महाभारत हे वैष्णवग्रंथ या इतक्या ग्रंथांचा समावेश होतो.(१०)आता उपांगांच्या ठिकाणी काहीजण मोक्षाचे प्रतिपादन करतात.पण ती मते एक सिद्धान्त नसल्याने त्यांना अर्थवाद समजावे.(११)वैशिषिकांच्या म्हणण्यानुसार आत्मा देहेंद्रियातीत असून विभू म्हणजे सर्वव्यापक आणि नवगुणमिश्रित असतो.बुद्धीस सहा प्रमाणे आहेत आणि साक्षात्कार म्हणजे–(१२)वृत्तीसहित नव गुणांचा नि:शेषनाश होणे होय.त्यालाच वैशेषिक मोक्ष असे म्हणतात.(१३) प्रमेयादी सोळा पदार्थ,तसेच बारा वर्ग यांचा ज्ञानाने नाश होतो.श्रवण मनन निदिध्यास यांच्या साहाय्याने

**आणि शरीरादि एकवीस भेद । याचा आत्यंतिक उपमर्द । हा असे मोक्षवाद । न्याय शास्त्राचा।।१५।। ज्ञानावांचून नित्यानुष्ठान । काम्य निषिद्ध वर्जून । नव्हें पुढें क्रियमाण । अपर तार्किक बोलती ।।१६।। वैदिक कर्मानुष्ठान विहित । आत्मज्ञान उभय मिश्रित । देहेंद्रियांचा धर्म नासत । भोगमात्रें ।।१७।। सकळ होऊन उच्छेद । हाचि मोक्ष अनुवाद। जाणिजे तो अर्थवाद । पूर्वमीमांसकाचा ।।१८।। जडचेतन आत्मा असे । ज्ञानकर्मे दुःख नासे । नित्य सुख उल्लसे । मोक्ष त्यास भट्ट म्हणे।।१९।। प्रकृति पुरुष विवेक करितां। सत्वपुरुषाचें ज्ञान होतां । प्रवृत्ति नव्हे भोगार्था। निरोध त्रिविध दुःखाचा ।।२०।। परि उपास्य उपासक भेद । हेंचि श्रेय नव्हे अभेद। हा जाणिजे मोक्षवाद । सांख्यशास्त्रींचा।।२१।। प्रकृतिपुरुषाचा विवेक । आणि वैराग्याचा परिपाक । यमनियमादि अष्टक । असंप्रज्ञात समाधि ।।२२।। संकल्पादि वृत्तीचा निरोध । धर्ममेध बोलती शब्द । हा पातंजलीचा संवाद । मोक्ष ऐसा ।।२३।। ब्रह्म जीव भेदाभेद । कार्य कारणीं लया जातसे । ज्ञानकर्मसमुच्चयें भेद नासे । हा मोक्ष त्रिदंडीचा ।।२४।। अन्य त्रिदंडी बोलती । होय जरी**

---

मिथ्या ज्ञानाची(विपरीत कल्पनांची)निवृत्ती होते.(१४)आणि शरीर इत्यादी एकवीस भेद आहेत. त्यांचा आत्यंतिक नाश होणे,हाच न्यायशास्त्राच्या दृष्टीने मोक्ष होय.(१५)इतर तार्किक असे सांगतात की, काम्य कर्मे,निषिद्ध कर्मे वर्ज्य करून नित्य आणि विहित कर्मांचे ज्ञाननिरपेक्ष(अशा कर्तृकत्वाचे ज्ञान न बाळगता)अनुष्ठान केले तर पुढे काही करायला उरत नाही.(१६)(मुमुक्षूला क्रियमाण कर्माची बाधा होत नाही.)हाच त्याचा मोक्ष होय.वैदिक धर्माप्रमाणे विहित कर्मांचे आचरण करून आत्मज्ञान व कर्माचरण यांच्या समुच्चयातून देहेंद्रियांचे धर्म भोगाने समूळ नष्ट करून मोक्ष प्राप्त होतो,असा पूर्व मीमांसकांचा युक्तिवाद आहे.तो समजून घ्यावा.(१७-१८)आत्मा जड व चेतन उभयरूप असून ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयाने दुःखाचा नाश होतो आणि नित्य शाश्वत सुखाची प्राप्ती होते.त्याला भट्टमतानुयायी मीमांसक मोक्ष म्हणतात.(१९)प्रकृती-पुरुष यांच्यातील भेद विचारपूर्वक समजून घेऊन त्यातील मुख्य पुरुषाचे(सत्त्वपुरुषाचे)ज्ञान करून घेतल्यानंतर भोगाकडे प्रवृत्ती होत नाही.त्रिविध दुःखांचा नाश होतो.(२०)परंतु उपास्य आणि उपासक यात द्वैत मानणे हेच खरे श्रेय होय.अभेद किंवा अद्वैत नव्हे;हा सांख्यशास्त्रातील मोक्ष होय.(२१)प्रकृती म्हणजे काय,पुरुष म्हणजे काय या दोहोतील भेद जाणून घेणे आणि कडक वैराग्य पाळणे;यम,नियम,प्राणायाम इत्यादी अष्टांग योगाचे आचरण आणि असंप्रज्ञात समाधी म्हणजे निर्विकल्प समाधी,(२२)संकल्प इत्यादी वृत्तींचा निरोध यांना धर्मयज्ञ किंवा धर्ममेध म्हटले जाते.यालाच पातंजल योगशास्त्रात मोक्ष असे म्हटले आहे.(२३)ब्रह्म आणि जीव यांच्या सबंध द्वैत आणि अद्वैत असा उभयात्मक आहे;कार्याचा कारणामध्ये लय होत जातो;ज्ञान आणि कर्म या दोहोंच्या साहाय्याने सर्व भेद नष्ट होणे हा त्रिदंडी(संन्यास)पंथाच्या मते मोक्ष होय.(२४)त्रिदंडी(संन्यास)मार्गातील दुसरे लोक

**परमेश्वरप्राप्ति। तरीच होय मुक्ति। साधकासी।।२५।।सतरंग निस्तरंग सागर। स्वरूप सविकार निर्विकार। कर्मज्ञानें जाय विकार। हा मोक्ष एकाचा।।२६।।शैवधर्म आचरावे। तेणें देहांतीं शिवलोका जावें। मोक्ष जाणिजे या नांवें। पाशुपत पुराणीं।।२७।।वैष्णव पुराणीं।वैष्णव धर्माचरणीं।विष्णु लोकाचिये गमनीं। मोक्ष बोलती।।२८।।करिती पंचाग्नीसाधन। अर्चिरादि मार्ग क्रमून। हिरण्यगर्भी जाय मिळून।हैरण्यगर्भी मोक्ष।।२९।।नाना शक्तींचे अर्चन। तेणें कीजे मद्यपान । सुरतक्रीडा भ्रम जाऊन। शाक्त मोक्ष हा ।।३०।।केशोत्पाटन करावें। आणि दुःख किमपि न व्हावें। पाषांडी बोलती सर्वे। हाचि मोक्ष।।३१।।याहिपरी नानाभेद। मोक्षविशीं जे जे वाद। उदंड असती विवाद। न वचे कळला।।३२।।जितुके देव तितुके भक्त। तैसी तैसी क्रिया करित। जें जें मनासि आवडत। तो तो मोक्ष त्याचा।।३३।। नाना शास्त्रीं प्रतिपादिलें।पंडितमान्य जरी जालें। नवरसिकही बोलिले । येणें तृप्ति कैची।।३४।।**

---

असे मानतात की, साधकाला परमेश्वराची प्राप्ती होणे हाच मोक्ष होय.(२५)समुद्र ज्याप्रमाणे लाटांसहित असतो,अथवा लाटा नसलेल्या अवस्थेतही असतो;त्याप्रमाणे ब्रह्मस्वरूप विकल्पयुक्त असते तसे विकल्परहितही असते.स्वरूपामध्ये जाणवत असलेले विकार,कर्म,ज्ञान यांच्या मार्गाने नाहीसे होणे हाच मोक्ष होय असे काही लोक मानतात.(२६)पाशुपत पुराणात शैवधर्माचे आचरण करावे आणि त्यायोगे देहान्तानंतर शिवलोकाची प्राप्ती व्हावी हाच मोक्ष सांगितला आहे.(२७) तर विष्णुविषयक पुराणांमध्ये वैष्णव धर्माच्या आचरणाने विष्णुलोकाला जाणे याला मोक्ष असे म्हटले आहे.(२८) हिरण्यगर्भाचे (ब्रह्मदेवाचे)उपासक मोक्षासाठी पंचाग्निसाधन करतात आणि त्याद्वारे अर्चिरादी मार्गाने (गीतेत आठव्या अध्यायात अर्चिरादी व धूम्रादी असे दोन मार्ग सांगितले आहेत.) त्यांपैकी पहिले हिरण्यगर्भा (ब्रह्मदेवा)मध्ये एकरूप होऊन जाणे यास मोक्ष मानतात.(२९) अथवा शक्तीची विविध प्रकारे उपासना करून म्हणजे त्यांमध्ये मद्यपान, सुरतक्रीडा, नशा इत्यादींचा अवलंब करून शेवटी भ्रांतिरूप अज्ञान नष्ट झाल्यानंतर तल्लीन होण्याने मोक्ष मिळतो.(३०) हा शाक्तपंथीयांचा मोक्ष होय.हाताने केस उपटावेत, ते करत असताना यत्किंचितही दुःख मानू नये. याला सर्व पाखंडी लोक मोक्ष असे म्हणतात. (पाखंडी म्हणजे वेदावर विश्वास न ठेवणारे,जैन,बौद्ध इत्यादी लोक.जैनांमध्ये भिक्षू डोक्यावरील केस हाताने उपटून टाकतात. पण हा विधी म्हणजे मोक्ष असे ते मानतात. हे मत चुकीचे आहे.)(३१) याप्रमाणे मोक्ष कल्पनेसंबंधी विविध प्रकारचे वाद आहेत,ती सर्व मते कळणे शक्य नाही.(३२)थोडक्यात हे समजून घ्यावे की जितके म्हणून देव आहेत तितके त्यांचे भक्तही असतात आणि त्या देवतेच्या आवडीप्रमाणे ते क्रिया करत असतात त्यामुळे त्यांच्या मनाला जे जे आवडते (इष्ट वाटतो त्यांचा)मोक्ष होय.(३३) अनेक शास्त्रग्रंथांतून या मोक्षाचे स्वरूप वर्णन करून सांगितले आहे ते विद्वान लोकांना पटणारे असले आणि ते त्यांचे प्रतिपादन खूप रसाळ जरी असले तरी त्या प्रतिपादनाने तृप्ती कशी होईल?(३४)

**सद्गुरुमुखें वेदांतश्रवण। प्रत्यगात्मा ब्रह्म अभिन्न।अविद्यानिवृत्ति हें ज्ञान। अध्यात्मविद्या।।३५।। असो बंधचि सत्य असावा। तरिच मोक्षहि असे बरवा। नाना मतांचा गोवा। काय काज।।३६।। येथें नलगे कीं वित्पत्ति । न शास्त्राची भरती । हृदयीं वसिल्या कृपामूर्ती । सद्गुरुस्वामी।।३७।। अंधकार होतां गहन । नाना दीपाचा करणें शीण। तों अकस्मात् सूर्य येऊन । गृहामाजीं राहिला ।।३८।। इतुकें आयुष्य कोणास आहे । जें सकळ शास्त्र शोधून पाहे । सद्गुरुप्रसादेंच लाहे । येरां चाड नाहीं ।।३९।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । मतखंडणप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ ।। समास ३रा - पूर्णज्ञाननिरूपण

**धन्य धन्य हें ज्ञान । सकळ साधू मुनिजन । भूत भविष्य वर्तमान । येणेंचि ज्ञानें।।१।। ज्ञानासारिखें पवित्र नाहीं। श्रुतिस्मृती देती गाही । देवमानव सर्वहि । येणेंचि ज्ञानें पावन।।२।। जो वैकुंठीचा राणा। नित्य मुक्त व्यापकपणा। कैलासवासी डुल्ले स्मशाना। येणेचि ज्ञानें।।३।।**

---

सद्गुरूंच्या मुखातून वेदान्ताचे श्रवण करून प्रत्यगात्मा (देहातील आत्मतत्त्व) आणि ब्रह्म यांतील अभेद ओळखणे आणि अज्ञानाचा नाश करणे या ज्ञानाला अध्यात्मविद्या असे म्हणतात.(३५) मुळात बंधन जर सत्य असेल तरच मोक्षही सत्य असेल याबाबतीत निरनिराळ्या मतांची आवश्यकताच काय?(३६) हृदयामध्ये कृपेचे मूर्त रूप सद्गुरूस्वामींचे वास्तव्य असेल तर बाकीच्या व्युत्पत्तीची (पांडित्याची) गरज लागत नाही, की शास्त्रज्ञानाची भरताडही कामाची नाही.(३७) अंधार दाटून राहिला असेल त्यावेळी अनेक दिवे लावण्याचा खटाटोप करावाच लागतो. पण अशा प्रसंगी प्रत्यक्ष सूर्यच घरात येऊन राहिला तर कसे होईल? तसे शास्त्रे, पांडित्य यांची प्रत्यक्ष सद्गुरूच हृदयात वसतीला आले असताना काय आवश्यकता आहे?(३८) सगळे शास्त्र बारकाईने अभ्यासण्यासाठी आवश्यक असणारे एवढे दीर्घ आयुष्य कोणास असते? तेव्हा सद्गुरूंच्या कृपाप्रसादानेच हवे ते ज्ञान मिळते. तेव्हा त्याव्यतिरिक्त अन्य साधनांची गरज नाही.(३९)

## पंचिका २री, समास ३रा - पूर्णज्ञाननिरूपण

हे ब्रह्मज्ञान खरोखरच धन्य होय. सगळे साधू, मुनिजन, भूत, भविष्य, वर्तमान इत्यादी सर्व काही या ज्ञानानेच व्यापले आहेत.(१) ज्ञानासारिखे पवित्र काही नाही, अशी श्रुती, स्मृती साक्ष देतात. देव, मानव हे सर्वजण या ज्ञानानेच पवित्र झाले आहेत.(२) जो विष्णू वैकुंठाचा राजा आहे आणि तरीही जो नित्य मुक्त आणि सर्वव्यापक आहे; तसेच जो शंकर कैलासावर राहतो आणि स्मशानातही (आनंदाने) डोलतो, ते हे दोघेही या ज्ञानामुळेच या गोष्टी करू शकतात.(३)

**ब्रह्मा आदि सनत्कुमार । वसिष्ठ नारदादि अपार । या सर्वांचें साचारज्ञान एकचि।।४।। तेंचि ज्ञान परंपरा । पावलेंसे गुरुद्वारा । वर्तमानी पुढें होणारा । ज्ञानचि गति ।।५।। दीपें दीप लाविला । कोण थोर कोण धाकुला । आणि नामहि तयाला । दुसरें नाहीं ।।६।। तैसा गुरुराज शिष्यासी बोधी । परि शिष्यपणा उरों नेदी । निरसतांचि देहबुद्धी । गुरुची होय ।।७।। अन्य विद्या श्रमें शिकतां । अभ्यास आवृत्ति न होतां । निर्मूळ होती तत्वतां। तैसी विद्या हे नव्हे ।।८।। एक वेळ अपरोक्ष ज्ञान । होतां पेटे प्रलयाग्न । जाळून अज्ञान इंधन । सकार्य नाशी[१३]।।९।। अग्नि काष्ठींच प्रगटतो । त्या काष्ठासहित सर्वांते जाळितो। तैसें देहप्राणादिका बोध तो । उरो नेंदी सहसा ।।१०।। जग जीव ईश्वर । उरोंचि नेदी भेद मात्र । येकसरा सकळां संहार । करीत उठे।।११।।इंधन असे तों जाळिलें।महातेजीं अवसान जालें । अज्ञान सकार्य नाशिलें। स्थिर जालें निजरूपा ।।१२।। म्हणतां ज्ञानें सर्व जळालें । परी एकहि नाहीं गेलें। याविशीं ऐकिलें। पाहिजे उत्तर ।।१३।। ज्ञानें सर्व मिथ्या कळलें । भेदाचें खंडण जालें । तरि मग दृश्य जरी दिसले। तेणें विशेष काय।।१४।।**

---

ब्रह्मदेव,सनत्कुमार इत्यादी तसेच वसिष्ठ नारद इत्यादी अनेक लोक या सर्वांचे ज्ञान खरोखरच एकच आहे.(४)तेच ज्ञान गुरुपरंपरेने आपल्यापर्यंत येऊन पोचले आहे. वर्तमानकाळातील आणि भविष्यकाळातील लोकांना ज्ञान हेच आश्रयस्थान आहे.(५)एका दिव्याने दुसरा दिवा पेटवल्यानंतर त्या दोहोंमध्ये कोणता लहान आहे,कोणता मोठा आहे असा भेद असतो काय?बरे,या दोन्ही दिव्यांना दिवा हे एकच नाव आहे.ते दोन दिवे दिसत असले तरी त्या दोहोत अजिबात भेद नसतो. त्यांना भिन्न नावेही नसतात.(६)त्याप्रमाणे सद्गुरू शिष्यास उपदेश करतात,तेव्हा त्या शिष्याला शिष्यपणाने राहूच देत नाहीत.त्या शिष्याच्या देहबुद्धीचे निरसन होताच तो स्वतः गुरूच होऊन जातो.(७)इतर सामान्य विद्या परिश्रमपूर्वक शिकाव्या लागतात.त्यांचा पुढे अभ्यास अथवा आवृत्ती झाली नाही,तर त्या विद्या नष्ट होतात.तशी ही ब्रह्मविद्या नाही.(८)एकदा का अपरोक्ष ज्ञान झाले की आत्यंतिक प्रलयाचा ज्ञानाग्नी पेट घेतो आणि तो अज्ञानरूपी इंधन त्याच्या कार्यासह जाळून टाकतो.(९)अग्नी लाकडातच प्रकट होतो.तो त्या लाकडासह सर्व काही जाळून टाकतो.त्याप्रमाणे ते अपरोक्ष ज्ञान देह,प्राण इत्यादींना एकाच वेळी(सहसा)जाळून त्यांपैकी काहीही शिल्लक ठेवत नाही.(१०)जग,जीव,ईश्वर याप्रकारचा यत्किंचितही भेद तो ज्ञानरूपी अग्नी शिल्लक ठेवत नाही.तो सगळ्यांचा एकदम संहार करत सुटतो.(११)इंधन असेल तोपर्यंत तो अग्नी जाळून टाकतो,त्या इंधनाचा महातेजात नाश होतो.त्याप्रमाणे ज्ञान अज्ञानाचा त्याच्या कार्यासहित नाश करते आणि शेवटी मूळ स्वरूपात ते स्थिर म्हणजे शांत होते.(१२)ज्ञानाने सर्व काही जळून जाते म्हणता,पण प्रत्यक्षात काहीही नष्ट होत नाही हे कसे?याचे उत्तर आता ऐका.(१३)ज्ञानामुळे सर्व पदार्थ मिथ्या आहेत असे कळते,तेव्हा सर्व भेदाचे खंडन होते.मग त्यानंतर दृश्य विश्व दिसले तरी त्यात

**मृगजळ डोळां दिसतें। म्हणउनी सत्य म्हणावें त्यातें। दिसण्यासाठीं अज्ञान कार्यातें। सत्य मानावें ।।१५।। सर्व हे मिथ्या जाणावें। स्वरूपीं स्वरूपचि व्हावें। मुख्य ज्ञानाचें जाणावें। लक्षण ऐसें ।।१६।। श्रोतीं पुन्हा आक्षेपिलें। न दिसावे निशेष नाथिलें। द्वैत निरसना श्रुति बोले। अद्वैत तेंचि ज्ञान।।१७।। जेथें आत्माचि असतो। तेथें कोण कोणा पाहतो। कोण कोणा जाणतो। दुसरें नाहीं।।१८।। घेउनी श्रुतीचा आधार। द्वैत नसे तें ज्ञान साचार। बळावला आक्षेपु थोर। याचें उत्तर कैसें।।१९।। हें श्रुति जे बोलें वचन। सुषुप्ति प्रलयपर असे जाण। किंवा जीवन्मुक्तीचें लक्षण। हे विचारीं पां।।२०।। मुक्तीविषई श्रुति बोले। तरी आमुचें बोलणेंयथार्थ जालें। सुषुप्तिप्रलयपर कल्पिले।तरि अवधारि पां ।।२१।। सुषुप्तिकालीं प्रलयकालीं। ज्ञानेंवीण लया गेली। तरी सर्व मुक्त जाली। हे अतिव्याप्ति।।२२।। ज्ञानेंवीण मुक्त होती। तरी सद्गुरू कासया करिती। शास्त्रादि साधनसंपत्ति। व्यर्थचि जाली।।२३।। ज्ञानेंचि मोक्ष जोडे।हे काय श्रुतीचे बोल कुडे। मद्यपीयापरि घडे। उन्मत्त प्रलाप ।।२४।। वादी म्हणे ऐसें नव्हे । ज्ञान होऊनसर्व जावें । तरी श्रुति अविरोध बरवे।**

---

विशेष असे काय आहे?(१४) डोळ्यांना मृगजळ दिसते एवढ्याच कारणासाठी त्याला सत्य मानायचे असल्यास माना. त्याच तऱ्हेने अज्ञानकार्य दिसते म्हणून त्याला सत्य मानायचे असल्यास मानावे.(१५) पण, हे सर्व दृश्य विश्व मिथ्या आहे हे समजून घ्यावे आणि मूलस्वरूपात मिसळून स्वत:च स्वरूप होऊन जावे. हेच ज्ञानाचे मुख्य लक्षण समजावे.(१६) यावर श्रोत्याने पुन्हा शंका घेतलेली आहे. संपूर्णपणे मिथ्या असेल ते दिसू नये हे ठीक आहे. श्रुतीचा आग्रह फक्त द्वैत नष्ट व्हावे एवढ्यापुरताच आहे. द्वैताचा अभाव म्हणजे अद्वैत, तेच ज्ञान होय.(१७) जेथे केवळ आत्माच असतो, तेथे कोण कुणाला पाहत असतो? कोण कोणाला जाणतो? अर्थात कोणीच नाही. कारण येथे दुसरा पदार्थ नसतोच.(१८) तेव्हा या श्रुतिवचनाचा आधार पाहाता जेथे द्वैत नसते तेच खरे ज्ञान होय. तेव्हा 'दृश्य दिसले तरी काय बिघडले?' असे कसे म्हणता येईल? असा आक्षेप बळावतो. त्याचे उत्तर काय?(१९) आता श्रुतीचे मुक्तीविषयीचे जे वचन आहे ते सुषुप्ती, प्रलय यांच्या संदर्भात आहे की, ते जीवन्मुक्तीचे लक्षण आहे, याचा विचार करावा.(२०) श्रुतीचे वचन मुक्तीविषयी असेल तर आमचेच बोलणे खरे ठरेल. पण ते सुषुप्ती, प्रलय यांना उद्देशून असेल तर नीट लक्ष दे.(२१) झोपेच्या वेळी अथवा प्रलय काळी ज्ञान न होताच सर्व दृश्य सृष्टी लयाला गेली तर सर्वच जीव मुक्त झाले, असे म्हणणे म्हणजे अतिव्याप्तीचा दोष येईल.(२२) ज्ञानावाचून कोणी मुक्त होत असतील तर मग सद्गुरू कशासाठी करायचा? अशा परिस्थितीत शास्त्रे इत्यादी साधनसंपत्ती व्यर्थच ठरेल.(२३) ज्ञानानेच मोक्ष मिळतो, हे श्रुतीचे वचन खोटे समजावयाचे काय? तसे बोलणे म्हणजे दारुड्या माणसाच्या उन्मत्त प्रलापांचे त्याला स्वरूप येईल.(२४) यावर वादी म्हणेल की, माझ्या बोलण्याचा अभिप्राय असा नाही. ज्ञान

**अतिव्याप्तीहि नसे ।।२५।। सुषुप्ति अथवा प्रलयकाली । अज्ञानाची नव्हे होळी । ज्ञान होतांचि समूळीं। नासावें हें उत्तम।।२६।। तरि याचें उत्तर कैसें। बोलिजे तें अपैसें। सर्वनाश ज्ञानें होतसे। तरि जीवन्मुक्ति बुडाली।।२७।। मागें उदंड ज्ञातें जालें। परि ते नाहीं लया गेले । लया जाती तरी उपदेशिलें । कोणे कोणा ।।२८।। लय न हो उपाधीचा। परि लेश नाहीं सविकल्पाचा । निर्विकल्प समाधीचा । तोचि ज्ञाता ।।२९।। येणें बोलेंहि उपदेश न घडे । म्हणून गुरुत्वाचें सांकडें। काष्ठप्राय होतां मढें। तरि जीवन्मुक्ति कैची।।३०।। निर्विकल्प समाधिकाळीं व्हावें । उपदेशकाळीं सविकल्प असावें । याज्ञवल्क्यादि आघवे। आचार्य या रीती ।।३१।। तरी समाधिकाळी असे ज्ञान । उपदेशकाळी काय अज्ञान। हें बोलणें अप्रमाण । तुजचि साजे ।।३२।। आणिक बोले उत्तर । द्वैतहानी मिथ्यत्वें व्यापार। उभय मिळोन ज्ञान साचार । बोलिजेत असे ।।३३।। उभयांसी ज्ञान कल्पिलें। तरि घटादिक अर्धविभागी जाले । निर्विकल्पत्वें द्वैत देखिलें । नाहींच तेणें।।३४।।**

---

झाल्यानंतर सर्व नष्ट होत असेल, श्रुतीचाही त्याला विरोध नसेल, किंवा तेथे अतिव्याप्तीचाही दोष घडत नसेल,(२५)सुषुप्तिकाळी अथवा प्रलयकाळी अज्ञानाची होळी होत नसेल (म्हणजे अज्ञानाचा नाश होत नसेल) आणि ज्ञान होताक्षणीच ते अज्ञान मुळासकट नष्ट होत असेल,तर उत्तमच होईल.(२६)पण यापक्षी एक अडचण येते ती येथे मांडतो. तिचे उत्तर कसे कराल? ज्ञानाने सर्व सर्वनाश होतो असे म्हटल्यास जीवन्मुक्तीची शक्यताच नाहीशी होते. (जीवन्मुक्तीची आशाच बुडाली असे म्हणावे लागेल.)(२७)पूर्वी जे अनेक मोठमोठे ज्ञाते झाले ते लय पावले नाहीत.ते लय पावले असते तर कोणी कोणाला उपदेश केला असता? (त्यांनी उपदेश तरी कसा केला असता? आणि हा उपदेश तरी त्यांनी कोणाला केला असता?म्हणजे यापक्षी संपूर्ण ज्ञानपरंपराच खंडित झाली असती.)(२८)यावर उत्तर असे की,ज्ञानदशेत उपाधीचा म्हणजे शरीराचा लय होत नाही. पण त्या अवस्थेत सविकल्पाचा अंशही उरत नाही. पूर्णपणे निर्विकल्प समाधीचा ज्ञाता त्यालाच म्हणावे.(२९)याही शब्दांनी (म्हणजे उत्तराने) उपदेशप्रक्रिया शक्य होत नाही आणि गुरुत्व कल्पनाही धोक्यात येते. ज्ञानदशेत शरीर जर लाकडासारखे प्रेतवत जाले तर तिला जीवन्मुक्ती कसे म्हणावे?(३०)समाधिकाळी निर्विकल्प व्हावे आणि उपदेशकाळी सविकल्प असावे. याज्ञवल्क्य इत्यादी सर्व ज्ञानी पुरुष याच प्रकारे आचार्य ठरतात. या प्रकारे या प्रश्नांची सोडवणूक होईल असे म्हणावे तर,(३१)समाधिकाळी त्याच्या ठिकाणी ज्ञान असते आणि उपदेशकाळी त्याच्या ठिकाणी काय अज्ञान असते?याप्रकारे प्रमाणशून्य बोलणे तुम्हांलाच शोभून दिसते.(३२)आता ज्ञान म्हणजे काय? द्वैताचा नाश आणि सर्व व्यापार होत असता ते मिथ्या आहेत असे कळणे या दोहोंना मिळून ज्ञान असे म्हणतात.(३३)या दोन्ही गोष्टींना मिळून ज्ञान असे म्हणायचे असेल तर घट इत्यादी (निर्जीव पदार्थ)जड वस्तू ज्ञानाच्या अर्ध्या हिश्शाच्या वाटेकरी झाल्या म्हणायच्या!

**तुज मिथ्या ज्ञान नाहीं कळलें। द्वैतही निःशेष नाहीं गेलें। समाधिकाळीं ऐकिले। शब्द घुंगुरटाचे ।।३५।। तुजपरीस घटहि बरा । अर्धविभागी असे पुरा। त्याहून तूं निपटारा। अर्धभागहि नसे ।।३६।। मागुती विचारून बोले । म्हणे मिथ्या कळणें हेंचि भलें । तरि सुखरूप असिलें। पाहिजे तुवां[१४] ।।३७।। येथें जालें समाधान । सर्व मिथ्या हेंचि ज्ञान। दग्धवस्त्राचें दिसणें । तैसें जग ।।३८।। जीव जग अविद्या माया । आणि ईश्वरासह मूळमाया । सर्व जातां ज्ञाना यया । सत्यत्व नसे ।।३९।। असत्य हे पूर्वीच बोलिलें। अज्ञान सरतां स्वयें विरालें । सत्यत्वेंचि प्रतिपादिलें । नाहीं ज्ञाना ।।४०।। मिथ्याज्ञानें प्रपंच सरे । हें कैसें मानावें खरें । येविशीं समाधान बारेअवधारी पा ।।४१।। जग जरि सत्य असतें तरि ज्ञानाच्या बापें न जातें । मुळींच मिथ्या तयातें । मिथ्या ज्ञानचि नाशी।।४२।। अज्ञानें जें जें जालें।तें तें ज्ञानेंचि लया गेलें ।रज्जू न कळतां भासलें। सर्पादिक।।४३।। तावत्काल सत्यत्व यासी । जंव ओळखिलें नाहीं रज्जूसी । तों काल सत्यत्व**

---

कारण त्या निर्विकल्प असल्यामुळे त्यांनी द्वैत पाहिलेलेच नसते.(३४) यावर उत्तर असे की, तुला स्वतःला मिथ्या म्हणजे काय, ज्ञान म्हणजे काय, यांपैकी काहीच कळले नाही. तुझ्या मनातील द्वैताचाही पूर्णपणे निरास झालेला नाही, त्यामुळे तुला समाधिकाळी चिलटांचे आवाज ऐकू येत असतात.(३५) मग तुझ्यापेक्षा घट बराच म्हणायचा! कारण तो तुझ्या म्हणण्याप्रमाणे ज्ञानाच्या अर्ध्या भागाचा तरी वाटेकरी आहे. तू त्याच्याहीपेक्षा निकृष्ट आहेस. कारण तुला तेवढा अर्धभागही प्राप्त नाही.(३६)(त्यानंतर तो म्हणजे वक्ता) विचार करून म्हणतो, सर्व व्यापाराचे मिथ्यात्व कळणे हेच खरे ज्ञान होय. आता तरी तुझे समाधान झाले पाहिजे. (तू सुखरूप व्हावेस.)(३७)अशा तऱ्हेने आक्षेपकाचे समाधान झाले. सर्व मिथ्या कळणे हेच खरे ज्ञान होय. सर्व जग दग्ध वस्त्राच्या घडीप्रमाणे दिसू लागते.(३८)याप्रमाणे जीव, जग, अविद्या, माया, मूळमाया, ईश्वर इत्यादी सर्व मिथ्या म्हणून नष्ट झाल्यानंतर या ज्ञानालाही सत्यत्व येणार नाही (असे आक्षेपक विचारतो.)(३९)यावर श्रोता उत्तर देतो. ज्ञानसुद्धा असत्यच आहे हे आम्ही अगोदरच सांगितले आहे. अज्ञानाचे अस्तित्व संपताच ज्ञान स्वतः विरून जाते. त्यामुळे ज्ञान सत्य आहे, असे आम्ही कधीच प्रतिपादन केले नव्हते.(४०) (यावर आक्षेपाची शंका अशी की,) मिथ्या असलेल्या ज्ञानाने प्रपंच नष्ट होईल, हे आम्ही खरे कसे मानावे? (यावर श्रोता म्हणतो की) या शंकेचे आता मी समाधान करतो. नीट लक्ष देऊन ऐक.(४१) जग जर सत्य असते तर ज्ञानाच्या बापालाही ते नष्ट करता येणार नाही. जे मुळातच मिथ्या आहे त्याचा नाश मिथ्या ज्ञानच करू शकते. (असत्य ज्ञानानेच असत्य जगाचा नाश होतो.)(४२) अज्ञानाने जे जे झाले, ते ते ज्ञानानेच लयाला जाते. जोपर्यंत दोराची ओळख पटत नाही तोपर्यंतच सर्प इत्यादी भासतात.(४३) सर्पादी वस्तूंना, रज्जू (दोर) ओळखला नाही तोपर्यंतच सत्यत्व असते. त्याप्रमाणे ब्रह्म जोपर्यंत जाणले

**जगासी । ब्रह्म जाणिलें नाहीं तों।।४४।।रज्जू जेव्हां ओळखिला । तत्क्षणीच सर्प मेला। ब्रह्मज्ञानें जगाला । ठावचि नाहीं ।।४५।।ब्रह्म जाणणें हें ज्ञान । येथें आक्षेपु असे गहन। सविकल्पासि होय ज्ञान । कीं निर्विकल्पासी।।४६।सविकल्प ज्ञान तें द्वैत । निर्विकल्प तें अद्वैत । अद्वैती पाहतां मात । ज्ञानाची नाहीं।।४७।।द्वैत सविकल्परूप ज्ञान । तें म्हणूं नये यथार्थ ज्ञान । आतां जाणणें हा शीण । ज्ञानचि सिद्ध नव्हे।।४८।।आतां यासी कैसें करावें । बोलिलें पाहिजे आघवें । ब्रह्म सच्चिदानंद जाणावें । अद्वैत जें कां ।।४९।।चित् म्हणिजे स्वयंप्रकाश । मायादि जड परप्रकाश। या जडासी चळण होतसे। स्वरूपाधारें।।५०।। आपुलेनि द्रष्टेपणे । या सर्वांसी ब्रह्म जाणे । द्रष्टयासी नव्हे देखणें । दृश्याचेनि ।।५१।। दृश्याकरितां द्रष्टा नांव। द्रष्टा नसतां दृश्य वाव। जाणतेपण तें अपूर्व । ते एकचि असे।।५२।। जाणणें जाणतयाच्या ठायीं । परोक्षत्व हें काई । कारण जेथें नाहीं । दुसरेंपण ।।५३।।चक्षु चक्षुसी दिसेना।ब्रह्म ब्रह्मासी जाणेना। न दिसे न जाणें तरी आपणा।चक्षु ब्रह्म चुकलें।।५४।। सर्व जेणें जाणितलें । तेंचि ब्रह्म निश्चया आलें । सर्व जेणें देखिलें । तोचि डोळा।।५५।।**

---

नाही तोपर्यंतच जगाला सत्यत्व असते.(४४) ज्यावेळी रज्जूची ओळख पटली त्याक्षणीच सर्प मरण पावतो. त्याप्रमाणे ब्रह्मज्ञानानंतर जगाला अस्तित्वच उरत नाही.(४५)ब्रह्म जाणणे म्हणजे ज्ञान असे असेल तर येथे एक मोठा आक्षेप घेता योते. ब्रह्माचे ज्ञान सविकल्पाला होते की निर्विकल्पाला?(४६) सविकल्प ज्ञान हे द्वैतस्वरूप असते.निर्विकल्प म्हणजे अद्वैत होय. अद्वैतानुभवात ज्ञानाला वावच नाही. (ज्ञानाची गोष्टच काढता येत नाही.)(४७)सविकल्परूप ज्ञान हे द्वैतयुक्त असते.त्याला यथार्थ ज्ञान म्हणता येणार नाही.म्हणजे उभयपक्षी ज्ञानच सिद्ध होत नसल्याने जाणण्याचा हा खटाटोप शीणच ठरतो.(४८)यावर उत्तर देताना वक्ता म्हणतो की,आता या शंकेवर काय उत्तर द्यावे?उत्तर तर दिले पाहिजे.ब्रह्म सच्चिदानंद असून अद्वैतस्वरूप आहे.(४९)चित् म्हणजे स्वयंप्रकाश.ब्रह्म स्वयंप्रकाशी असून मायादी जड तत्त्वे परप्रकाशी आहेत.या जड तत्त्वांमध्ये स्वरूपाच्या(म्हणजे ब्रह्माच्या)आधारानेच चलनवलन होते.(५०)ब्रह्म स्वत: द्रष्टा असल्याने या द्रष्टेपणाच्या सामर्थ्याने ते या सर्वमायादी दृश्यपदार्थांना जाणते.पण दृश्याला मात्र द्रष्ट्याचे ज्ञान शक्य होत नाही.(५१)या दृश्यसृष्टीमुळेच त्या स्वरूपाला द्रष्टा हे नाव प्राप्त झाले.पण द्रष्टा नसेल तर दृश्य सृष्टी व्यर्थ ठरते.द्रष्टेपण अथवा जाणतेपण हे असे अपूर्व एकमेव(एकटेच) असते.(५२)आता जाणत्याच्या ठिकाणी असणारे हे जाणतेपण परोक्ष कसे असेल?कारण त्याच्या ठिकाणी दुसरेपणाला जागाच नाही.दुसरेपणाच्या अभावी ज्ञात्याचे ज्ञान नेहमी अपरोक्षच असते.(५३)डोळा डोळ्याला पाहू शकत नाही त्याप्रमाणे ब्रह्म ब्रह्माला जाणू शकत नाही.पण दिसत नाही म्हणून डोळा आणि ब्रह्म स्वत:ला जाणू शकत नाहीत म्हणून ते आपलेपणाच्या जाणिवेला मुकले.(मी पाहतो,मी जाणतो अशी जाणीव त्यांच्यामध्ये नसते.)(५४)ज्याला ह्या सर्व सृष्टीचे ज्ञान होते

**ऐसें न जाणोनि जाणणें । ऐसीं असतां श्रुतीचीं वचनें । अनुभाव्यरूप अनुभवणें । अनुभवेवीण ।।५६।। न जाणतां तेंचि आपण । अखंडैकरस परिपूर्ण । सहजीं सहजत्वें ज्ञान । यासी बोलिजे ।।५७।। ब्रह्मस्वरूप ब्रह्म स्फुरणें । आपणातें आपण जाणें । सुषुप्तिकाळीं आत्मयातें । जाणीतलें पाहा ।।५८।। तेथें म्हणसी जाणितलें नाहीं । जागृत होतां सांगसी तेंहि । अनुभविल्यावीण कांही । आठऊ न घडे ।।५९।। तैसा समाधि निर्विकल्प। अनुभवी स्वरूपें स्वरूप। अनुभव नसतां सविकल्प–। दशेकाळीं सुख नसे।।६०।। निर्विकल्पीं अनुभविलें। तें सुख सविकल्पीं लोटलें। म्हणउनी वृत्तीसी जालें। परम समाधान।।६१।। आतां सविकल्प कीं निर्विकल्प। आपुला आपण सुखरूप। बोलणें खुंटलें आपेआप। द्वैताद्वैत केंचें ।।६२।। धन्य गुरु धन्य शास्त्र । धन्य ज्ञानाचा विचार।** येणें ज्ञानें अपार। साधक सिद्ध झाले ॥६३॥

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । पूर्णज्ञाननिरूपणप्रकारे। तृतीयसमासः ।।३।।**

---

तेच ब्रह्म असे निश्चयाला येते. त्याच न्यायाने सर्व दृश्य ज्याने पाहिले तोच डोळा असे निश्चित करता येते.(५५) अशा प्रकारे न जाणता जाणते, अनुभवावाचून अनुभाव्याचा अनुभव घेते, ते ब्रह्म अशी श्रुतीची (वेदाची) वचने आहेत.(५६) काही जाणत नाही तेच स्वरूप होय. ते अखंड, एकरस आणि परिपूर्ण असते. यालाच सहजावस्थेतील सहजज्ञान म्हणतात.(५७) ब्रह्मस्वरूप होऊन ब्रह्माचे स्फुरण होणे, आपण आपणाला जाणणे, झोपेत आत्मस्वरूपाला ओळखणे हे शक्य असते.(५८) झोपेत आत्म्याचे ज्ञान होत नाही असे म्हणत असशील तर जागे झाल्यानंतर हे कसे सांगू शकतोस? अनुभव घेतल्याखेरीज काही स्मरणच होणार नाही.(५९) त्याप्रमाणे निर्विकल्प समाधी असते. तिच्यामध्ये स्वरूप होऊन स्वरूपाचा अनुभव घेता येतो. हा अनुभव नसेल तर सविकल्पकाळी सुखप्राप्ती (सुखाचाअनुभव) येणार नाही.(६०) जे आपण निर्विकल्प समाधीमध्ये अनुभवतो त्या आनंदाचा प्रत्यय आपल्याला सविकल्प दशेमध्ये येतो. त्यामुळे आपल्या वृत्तीला परम समाधान प्राप्त होते.(६१) आता हा अनुभव सविकल्प की निर्विकल्प हा विचार न करता आपले ठायी आपण सुखरूप असतो. त्या अवस्थेत बोलणे आपोआपच थांबते. तेथे द्वैत की अद्वैत या विचाराला थारा कोठून मिळणार? (मागच्या ४८व्या ओवीतील शंकेचे हे निरसन झाले)(६२) खरोखरच हे निरसन करणारे सद्गुरूही धन्य होत, ते शास्त्रही धन्य होय. त्यातील ज्ञानाचा विचारही धन्य होय. यांच ज्ञानाने साधक सिद्धावस्थेला पोहोचतात.(६३)

## ।। श्रीराम समर्थ ।। समास ४था - वेदविनियोग

**पावावया समाधान । पाहिजे ते मुख्य ज्ञान । तरी वेदाचें निरूपण । त्रिकांड कां।।१।। एक ज्ञानचि प्रतिष्ठावें। दुजें कांहीं न बोलावें। स्त्रीपुत्रादि विषय भोगावे। हेहि आज्ञा वेदाची।।२।।वेद त्रिगुणात्मक नाना। तूं गुणातीत होई अर्जुना।भगवद्गीतेचिया वचना। म्हणून विरोध[१५]।।३।।वेद जरी न बोलता। एक ज्ञानचि प्रतिष्ठिता। तरी जीव कासया भ्रमता। नाना सुखदुःखीं।।४।।म्हणून वेदेंच बंधन केलें। ऐसे शंकेतें बळाविलें। वेदवाक्यासी कल्पिलें। थोर दूषण।।५।।वेदाचें तात्पर्य सकळ। ज्ञानपरचि असे केवळ। मंदमती जे बाष्कळ। वेद बरळ भाविती।।६।।बापाचा पुत्र आवडता। सर्वमान्य असावा जाणता। पूर्ण विद्या शिकतां। पिता संतोषे।।७।।म्हणऊन अभ्यास करविती।परि त्या न कळे बाळमती। खेळावरी अवघी प्रीति। शिकणें गोड न वाटे।।८।।गांवाबाहेरी धांवे। सवें सौंगडे मेळवावे। खाणेंपिणेंहि नाठवें। उष्णशीत स्मरेना।।९।।पिता तळमळी अंतरीं। दुःखें कष्टतो हा भारी। हातपाय मोडे जरी। यासी काय कीजे।।१०।।शिकविल्या तरी नायके। मग उपाय**

---

## पंचिका २री, समास ४था - वेदविनियोग

जर समाधान प्राप्त करावयाचे असेल तर त्यासाठी मुख्यत्वे ज्ञान झाले पाहिजे. मग वेदाचे निरूपण ज्ञान, उपासना आणि कर्म अशा तीन कांडांत करायची काय आवश्यकता होती?(१) वेदांनी एक ज्ञानाचीच प्रतिष्ठापना करायला हवी होती. त्यांनी इतर दुसरे काही बोलायला नको होते. पण इथे तर स्त्रीपुत्रादी विषय भोगावेत अशी वेदच आज्ञा करत आहेत.(२) वेद त्रिगुणात्मक असून अर्जुना, गुणातीत हो, असे भगवद्गीतेचे वचन म्हणून हा विरोध जाणवतो.(३) वेदाने असे काही न सांगता एका ज्ञानाचीच प्रतिष्ठा वाढवली असती, तर जीव निरनिराळ्या सुखदु:खांमध्ये का फिरत राहिला असता?(४) म्हणून वेदानेच जीवासाठी बंधन निर्माण केले आहे,अशी शंका बळावते आणि वेदवाक्यालादूषण देण्याची कल्पना मनात येते.(५) यावर उत्तर असे की, संपूर्ण वेदाचे तात्पर्य ज्ञानपरच आहे. पण जे मंदमती बाष्कळ (बडबड करणारे) लोक असतात त्यांना मात्र वेद असंबद्ध बोलतो असे वाटते.(६) बापाचा आवडता पुत्र असतो. तो ज्ञानी आणि सर्वमान्य व्हावा, असे त्याला वाटत असते, तो जर संपूर्ण विद्या शिकला तर त्यामुळे बापाला संतोष होतो.(७) म्हणून तो त्याच्याकडून अभ्यास करवून घेतो. पण तो बालमती असल्याने त्याला काही कळत नाही. त्याचे खेळावरच अतोनात प्रेम असते. त्याला शिक्षण गोड वाटत नाही.(८) तो गावाबाहेर धावतो, आपल्या बरोबरचे सवंगडी गोळा करतो, त्याला खाण्यापिण्याचेही भान राहात नाही.ऊन, थंडी यांचेही स्मरण रहात नाही.(९) बापाला अंत:करणात तळमळ वाटते. हा पोरगा विनाकारण धडपडतो, कदाचित हातपाय मोडून घेईल, याला काय करावे, याचा तो विचार करतो.(१०) शिकवले तरी ऐकत नाही, अशी चिंता त्याला लागते. मग बापानेच एक

**कल्पिला जनकें । चक्रे चेंडू कवतिकें । आणिक नाना खेळ।।११।।मग आपुलिये आंगणी । बाळें मेळविलीं चिमणीं । येथें खेळावें म्हणुनि। बापें आज्ञा दिधली।।१२।।तैसें वेदाचें ठायीं जाण । जीव व्हावें ज्ञानसंपन्न । परि हे भुलले अविद्येनें। विषयचि आवडे।।१३।। आडळेल तेंचि खावें। देखिल्या स्त्रियेसी भोगावें। मनीं वाटें तेथें करावें । पशूपरी शयन।।१४।। ऐसें अनावर जालें । तेणेंगुणें दुःख वाढलें । परि तयासी न कळलें । सुखचि मानी।।१५।। वेद म्हणे कैसें करावें । याचे भोग कैसे सुटावे । आणि यासी प्राप्त व्हावें । कैसें ज्ञान।।१६।। मग ब्राह्मणादि केले वर्ण। स्वजातीसी लावी लग्न। धाकुटी वय समान । पाणिग्रहण करवी।।१७।। अग्नि द्विज वेदाधार। आश्रम केले चत्वार। त्यांत ग्रहस्थाश्रमचि थोर । प्रतिपादिलें।।१८।। कारण कीं यथेष्ट नाचरावे। भोगा परि बंधन असावें । पित्यापरि स्वभावें। हळु हळू भोगा न्रिवर्तवि ।।१९।। भोगों नये ऐसें म्हणावें । बाळापरि न मानि स्वभावें । येथें आक्षेपिलें बरवें । की दंड करावा होता।।२०।। प्रपंचीं सुखदुःखें शिणती । हाचि दंड परि नये प्रतीति । विषयार्थ कोणी न विटती । वाढे प्रीति अधिक।।२१।।**

---

उपाय शोधून काढला.त्याने चक्रे, चेंडू आणखी इतर अनेक खेळ मोठ्या कौतुकाने आणवून घेतले.(११) मग आपल्याच घराच्या अंगणात लहान लहान मुलांना जमवले आणि त्यांना 'तुम्ही येथेच खेळा' अशी त्याने त्यांना आज्ञा केली.(१२) तसेच वेदाच्या बाबतीत असे समज. जीव ज्ञानसंपन्न व्हावेत अशी वेदाची इच्छा आहे. पण जीव तर अविद्येमुळे भुललेले आहेत. त्यांना विषयातच रुची आहे.(१३) जे सापडेल ते खावे, एखादी स्त्री पाहिली की तिचा भोग घ्यावा आणि मनात येईल तेथे एखाद्या पशूप्रमाणे शयन करावे,(१४) अशा प्रकारे ते अनावर (आवरण्यात कठीण) झाले, त्यामुळे त्यांचे दु:ख वाढले. पण त्यांना ते कळत नव्हते, उलट त्या दु:खालाही ते सुखच मानत राहिले,(१५) तेव्हा वेदाने म्हटले की, आता काय करावे? या मुलांचे हे भोग कसे सुटतील? आणि यांना ज्ञान कसे प्राप्त होईल? (अशी काळजी त्याला वाटली.)(१६)तेव्हा (विचार करून) त्याने ब्राह्मणादी वर्ण निर्माण केले.त्यांना स्वजातीतच विवाह करावेत,लहानपणीच वयात फारसे अंतर नसेल अशांचाच विवाह करावा,(१७) अग्नी,ब्राह्मण आणि वेदांचा आधार घेऊन चार आश्रमांची व्यवस्था केली, त्यात गृहस्थाश्रमच श्रेष्ठ असे सांगितले.(१८) हेतू हा की,त्या जीवांनी स्वैरपणे स्वत:च्या इच्छेप्रमाणे वागू नये,विषयांचा उपभोग घ्यावा पण त्यावर बंधन असावे.अशा तऱ्हेने एखाद्या पित्याप्रमाणे वेद जीवांना त्यांची मर्जी सांभाळत त्यांना भोगापासून परावृत्त करतो.(१९) विषयांचा भोग घेऊ नका असे म्हणावे तर ती जीवरूपी मुले आपल्या स्वभावधर्मानुसार ऐकणार नाहीत,म्हणून वेदाने हा मार्ग शोधून काढला.यावर कोणी आक्षेप घेईल की,वेदाने जीवांच्या कलाने घेत न बसता,त्यांना चांगला दंड करायला हवा होता.(२०) यावर उत्तर असे की,प्रपंचातील सुखदु:खांनी जीवांना खूप कष्ट होतात. हाच त्यांना मोठा दंड होय. पण त्यांना त्याचा प्रत्यय (जाणीव)

**विश्वास नव्हे वेदवचनीं । ऐसा कोण जन्मला प्राणी। ऐसी आशंका असे मनीं । तरि अवधारि पां ।।२२।। प्रजार्थ ऋतुकाळीं गमन। पुत्र जालिया मातेसमान । ऐसें वेदाचें वचन सत्य कां न वाटे।।२३।। इच्छा असतां विवाह करा। इच्छा नसतां माघारे फिरा। याहि वचनासी अव्हेरा । काय म्हणोनि ।।२४।। आवडीसारिखें घेती वचन । म्हणती शास्त्राची नाहीं अडचण। सुखें विषय भोगिती आपण। वेदें काय करावें ।।२५।। आतां ऐका कर्माचे फळ । नित्यनैमित्तिक करून सकळ। होय अंतःकरण निर्मळ। विविदिषा होय।।२६।। हें मुख्य फळ वेदाचें।न करिती कोणी साचें।मग त्या त्या कर्मीं फळाचे।रुचिकर बोलिलें।।२७।। तेणें कामचि वाढला । नेणे कोणी मुख्य फळाला । अनेक धर्मादि विधि केला। परि कामना वाढे ।।२८।। पुत्रासि होतां रोग । नाना औषधाचे योग । माता करी लगबग । परि तो नेघे ।।२९।। मग गूळखोबरें साखर । देईन तूं हें घेसी जर । मग त्या लालुची लाऊनी नेत्र । घटघटा घेतलें ।।३०।। म्हणे म्यां औषध घेतलें । म्हणून मज लाडू**

---

येत नाही. त्या विषयभोगांचा (सुखदुःखदायक असूनही) त्यांना वीट तर येत नाहीच,उलट त्यांचे विषयांबद्दलचे आकर्षण अधिकच वाढते.(२१) यावर आक्षेपकाचे म्हणणे असे की, वेदवचनांवर विश्वास नाही, असा कोणी प्राणी जन्माला आला आहे काय?अशी आशंका मनात असेल तर नीट लक्ष दे.(२२) स्त्रीला ऋतू असतानाच केवळ प्रजोत्पत्तीसाठी तिच्याशी संभोग करावा, तिला पुत्र होताच तिला मातेसमान मानावे, असे वेदाचे वचन असताना जीवांना का बरे सत्य वाटत नाही?(२३) तुमची इच्छा असेल तर विवाह करा,अन्यथा इच्छा नसेल तर माघारी फिरा,याही वेदवचनाचा काय म्हणून अव्हेर केला जातो?(२४) जे वेदवचन आवडीसारखे असते तेवढेच स्वीकारतात आणि याबाबतीत शास्त्राची अडचण नाही असे शेखीने सांगतात आणि आपल्या इच्छेप्रमाणे विषय भोगत सुटतात, याला वेदाने काय करावे?(२५) आता हेही लक्षात घ्या की, नित्य नैमित्तिक इत्यादी सर्व विहित कर्मांचे फळ म्हणजे अंत:करणाची शुद्धी होणे हे होय, चित्तशुद्धी झाल्यानंतर जीवाच्या ठिकाणी ज्ञान प्राप्त करण्याची इच्छा (विविदिषा) निर्माण होते.(२६)वेदाच्या मते कर्मांचे हे मुख्य फळ होय.पण ते कोणीही विधियुक्त पद्धतीने करत नाही. म्हणून वेदाने त्या त्या फळाची आवड निर्माण होईल अशा प्रकारे त्या त्या कर्माची भलावण करावयास सुरुवात केली.(२७)(पण झाले उलटेच.) त्यामुळे उलट कामच (कर्मासक्ती) वाढत गेला आणि मुख्य कर्मफळ कोणीचजाणून घेतले नाही. वेदाने अनेक धार्मिक कृत्यांचे विधान सांगितले,पण त्यायोगे कामनाच बळावत गेल्या.(२८) पुत्राला काही रोग होताच आई तातडीने काही औषधांचे इलाज करते, पण तो ती औषधे घेतच नाही.(२९) मग त्यावर ती, तू हे औषधे घेतलीस तर तुला गूळ,खोबरे, साखर देईन, अशी प्रलोभने त्याला दाखवते. तेव्हा तो ती औषधे डोळे मिटून घटघटा घेऊन टाकतो.(३०) मग तो सांगत सुटतो की,मी औषध घेतले म्हणून

**मिळाले। तैसें म्हणे पूर्वी कर्म केलें । प्राप्त जालें पुत्रादिक।।३१।।तिक्ताम्ल अवपथ्य जाली। तेणें रोगनिवृत्ति बुडाली। पुत्रादि फळाशेनें मुकली। हृत्‌शुद्धीते।।३२।।जैसा वेल लाविला। फुलें तोडितां मुके फळाला। तैसा हा प्रसंग जाला। सकामनेनें।।३३।।म्हणुनी काम्य निषिद्ध सांडुनी।प्रवर्ततां कर्माचरणीं।सहज होतां ईश्वरार्पणीं।अंतःकरणशुद्धि।।३४।।हा वेदाचा अभिप्राय।परंपरा ज्ञान उपाय।येथें अन्यथा न होय।हा कर्माचा विनियोगू।।३५।।फळ ऐका उपासनेचें।जें स्थिरत्व व्हावें चित्ताचें।डोंगर हरपती दुःखाचे।आणि आनंदप्राप्ति।।३६।। चित्तस्थैर्य आनंदप्राप्ति।येविशीं कोण उपपत्ती।तरी पाहाना का सुषुप्ति।चित्ताभावी सुखरूप।।३७।।आवडी उपासावें निर्गुण।परी तें नकळे अज्ञानपणें।म्हणवून जालासे सगुण। कृपा अत्यंत जीवाची।।३८।।जैसी आवडी जीवासी। तैसीं रूपें धरी अपैसीं। धरणें नाना अवतारासी। ते भक्तांस्तव।।३९।।सर्व सांडूनी भजा मजला। तेणें सुख पावेल तुम्हांला। तेथेंहि कामनेनें घाला। घातिला बळें।।४०।।देहेंद्रिया व्हावें सुख । ऐसें मानोनियां मूर्ख ।**

---

मला लाडू मिळाले.त्याप्रमाणे जीवही सांगत सुटतो की,मी पूर्वी चांगली कर्मे केली त्यामुळे मला पुत्रप्राप्ती इत्यादी सुखे मिळाली.(३१)कडू,आंबट इत्यादी पदार्थांच्या सेवनाने कुपथ्य झाले आणि त्यामुळे रोगापासून मुक्तता होऊ शकली नाही.त्याप्रमाणे पुत्रादी फळांच्या आशेने चित्तशुद्धीचे फळ चुकले.(३२)ज्याप्रमाणे आपण वेल लाविला त्यावर फुले आली.ती फुले तोडल्यामुळे आपण त्याच्या फळांना मुकतो.त्याप्रमाणे पोटी कामना धरल्यामुळे ही वेळ आली.(चित्तशुद्धिरूप फळ प्राप्त झाले नाही.)(३३)म्हणून काम्य आणि निषिद्ध कर्मे सोडून जर कर्माचरण केले,(निष्काम भावनेने विहित कर्मे केली तर)आणि ते सहजपणे ईश्वरार्पण केले तर अंत:करणशुद्धी होते.(३४)हा वेदाचा अभिप्राय असून त्याप्रमाणे आचरण केले तर तो परंपरेने ज्ञानाच्या प्राप्तीचा मार्ग आहे.(निष्काम कर्मे–ईश्वराला फळे अर्पण–चित्तशुद्धी–ज्ञानप्राप्ती अशी परंपरा) या मार्गात काहीही विपरीत होत नाही.हा कर्मांचा खरा विनियोग आहे.(३५)आता उपासनेचे फळ ऐका.चित्ताचे स्थिरत्व होते.दु:खाचे डोंगर नाहीसे होतात आणि आनंदप्राप्ती होते.(३६)चित्तस्थैर्य होते आणि आनंदप्राप्ती होते याला आधार काय?(यामागे कोणता युक्तिवाद आहे?)तर झोपेमध्ये चित्ताचा अभाव असल्याने जीव सुखरूप असतो,हाच तो युक्तिवाद होय.(३७)खरे म्हणजे निर्गुण ईश्वराची आवडीने उपासना करावी,पण ते अज्ञानामुळे कळत नाही,म्हणून परमेश्वर सगुण रूप धारण करतो.कारण त्याला जीवांवर कृपा करण्याची अत्यंत आवड आहे.(३८)त्यामुळे जीवाच्या आवडीनुसार तो स्वेच्छेने रूपे धारण करतो.तो जे जे अवतार धारण करतो ते सर्व भक्तांसाठीच होत.(३९)त्याची अपेक्षा अशी असते की,भक्तहो,सर्व गोष्टींचा त्याग करून तुम्ही माझी भक्त करावी.त्यामुळे तुम्हाला सुखाची प्राप्ती होईल.पण नेमकी येथेच आपली फलाकांक्षा घाला घालते.(४०)मूर्ख लोक फक्त देह आणि इंद्रियांना सुख व्हावे म्हणून 'मला अणिमादी

**अणिमादि ऐश्वर्य देख। मज असावें।।४१।।अत्यंत धारणा जाली। तेणें अणिमादि पावली। सालोक्यादि लाधली। मुक्ती तीन्ही।।४२।।परि ते निजसुखा चुकले। मुख्य फळ तें राहिलें। ऐश्वर्यासी भुलले। नैश्वर्य न कळे।।४३।।यासि नैश्वर्य कैसें म्हणतां। ऐसी आशंका असे चित्ता। तरी सांग पतन अवचिता। जयविजया कोठोनी जाले।।४४।।म्हणोनि यांसी नाशआहे। खरें विचारूनि पाहे। अविनाश तें एकचि आहे। जें कामनातीत।।४५।।काम नाहीं जयातें। तेणें जिंकिलें असे मातें। ठाईं ठाईं भगवंतें। निरूपण केलें[१६]।।४६।।काम नाहीं जयाचे चित्तीं। ऐसे भक्त थोडे असती। आर्त जिज्ञासु अर्थार्थी। कामनागुणें ।।४७।।ज्ञानी भक्त तो मज आवडे। अन्यथात्वें बोलणें न घडे। म्हणुनिया हें सांकडें। कामना त्यागावी[१७]।।४८।। हेंचि उपासनेचे फळ। होय वासनेचें निर्मूळ। उठती सुखाचे कल्लोळ। निवळतां ज्ञान।।४९।।हा विनियोगु उपासनेचा। त्रिकांड आशय वेदाचा। अधिकारास्तव बोले वाचा। परि अवसान ज्ञानी।।५०।।म्हणून ज्ञानावांचून कांहीं। वेदासि बोलणेंचि नाहीं। या वचनासी गाही। अनुभवी असती।।५१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । वेदविनियोगप्रकारे। चतुर्थसमासः ।।४।।**

---

सिद्धींचे सामर्थ्य प्राप्त व्हावे अशी इच्छा मनात बाळगतात.(४१)त्यांची ही धारणा जेव्हा अत्यंत उत्कट होते तेव्हा अणिमादी सिद्धी त्यांना प्राप्त होतात आणि सलोकता,समीपता,सरूपता या तिन्ही मुक्ती त्याला(क्रमाने)प्राप्त होतात.(४२)पण ते आत्मसुखाला मात्र मुकतात.त्यांना मिळावयाचे तेच मुख्य फळ होय.पण नेमके तेच राहून जाते.ते ऐश्वर्याला भुलतात पण त्याची नश्वरता त्यांच्या लक्षात येत नाही.(४३)ही जी त्यांना फळे मिळतात,त्यांना नश्वर कसे म्हणता?अशी आशंका जर मनात असेल तर सांग बरे,जय-विजय यांचे अचानक पतन कसे झाले?(४४) म्हणजेच या ऐश्वर्याला नाश आहे.खरे काय ते नीट विचार करून पहा.जे कामनेच्या पलीकडचे आहे ते अविनाशी तत्त्व एकच आहे.(४५)ज्याच्या मनात काही इच्छा नाही,त्याने मला जिंकून घेतले,असे भगवंतांनी निरनिराळ्या ठिकाणी प्रतिपादन केले आहे.(४६)ज्यांना अजिबात काही इच्छा नाही असे भक्त थोडेच असतात.बाकीचे भक्त कामनेमुळे आर्त,जिज्ञासू,अर्थार्थी या तीन प्रकारात मोडतात.(आर्त म्हणजे पीडित,जिज्ञासू म्हणजे जाणून घेण्याची इच्छा असणारा आणि काही अर्थ लाभाची इच्छा धरणारा तो अर्थार्थी होय.)(४७)ज्ञानी भक्त मला आवडतो.त्याखेरीज अन्यांबद्दल बोलायला नको असे परमेश्वराने म्हटलेले आहे.त्यानेच ही अट घातली आहे,की कर्मे करताना कामनेचा त्याग करावा.(४८)उपासनेचे हेच फळ आहे की,वासनांचे समूळ निर्मूलन होते व शुद्ध ज्ञान झाले की,सुखाचे कल्लोळ उठू लागतात.(४९)हा उपासनेचा विनियोग (उपयोग)आहे. हाच त्रिकांडात्मक(ज्ञानकांड,कर्मकांड,उपासनाकांड)वेदाचा आशय आहे. वेद तोंडाने अधिकारपरत्वे वेगवेगळा उपदेश करत असला तरी त्याची परिणती ज्ञानातच होते.(५०)म्हणून वेदाला ज्ञानावाचून दुसरे काही सांगायचेच नाही.जे अनुभवी लोक आहेत ते या वचनाची साक्ष देतील.(५१)

## ।। श्रीराम समर्थ ।। समास ५वा - ज्ञानप्रतिष्ठा

**वेद म्हणिजे ज्ञान । ज्ञान म्हणिजे नव्हे अज्ञान । सर्वकाळ जाणतेपण । स्वप्रभ आत्मा।।१।। निरसावया अज्ञान । तें एकचि समर्थ ज्ञान । प्रकाश तमाचें निरसन । करि जैसें।।२।। यासि उपायचि दुजा नाहीं । हें सत्य सत्य अन्यथा नाहीं । कर्म अथवा उपासना ही । परंपरा साधन ।।३।। तरि आतां हेंचि कैसें । ज्ञानावांचून उपाय नसे । बोलणें घडे अपैसें । श्रुति युक्ति अनुभवे ।।४।। सत्य शब्द वाटे कठिण । असत्ये होय मनरंजन । परि सत्यावीण समाधान । सर्वथा नाहीं ।।५।।धरील माइकाची भीड । तें काय बोलेल द्वाड । असत्यांतील सत्य जाड । कैसें कळे।।६।। मायिक म्हणिजे जालें नाहीं । वेगळें दिसतांहि सर्वही । जैसा रज्जूवरील अही । दिसे परि मिथ्या ।।७।। रज्जू न कळतां सर्प जाला । तो रज्जू ज्ञानेंचि नाशिला । ब्रह्माज्ञानें प्रपंच भासला । नासे ब्रह्मज्ञानें ।।८।। अज्ञानास्तव जग जालें। तरि यास सत्यत्व कैसें आलें । पूर्वभासानें सर्पादि जाले । परि त्या सत्यत्व नसे ।।९।। तरि याचें उत्तर कैसें । रज्जू सर्पाते जाणत नसे । मी हा सर्प जालों असे । सर्पही नेणें।।१०।। दोहींहून तिसरा अन्य । तयासी भासला कल्पनागुणें । पूर्वभास होतां प्रमाण**

---

## पंचिका २री, समास ५वा - ज्ञानप्रतिष्ठा

वेद म्हणजे ज्ञान होय. ज्ञान म्हणजे अज्ञान नव्हे. ते आत्मा स्वयंप्रकाश असून त्याच्या ठिकाणी सर्वकाळी जाणतेपण असते.(१) ज्याप्रमाणे प्रकाश अंधाराचे निरसन करतो त्याप्रमाणे अज्ञानाचे निर्मूलन करण्यास एकटे ज्ञानच समर्थ आहे.(२) या संदर्भात दुसरा मार्गच (उपाय) नाही हे अगदी सत्य असून कर्म आणि उपासना ही फक्त परंपरासाधने आहेत, ती येथे असमर्थ ठरतात.(३) तर ज्ञानावाचून दुसरा उपाय नाही, हा विचार येथे श्रुती, युक्ती आणि अनुभव यांच्या आधाराने ओघाने आले म्हणून सांगतो.(४) सत्य शब्द उच्चारताच ते कठीण वाटायला लागते. असत्यामुळे मनाची करमणूक होते. परंतु खरे समाधान सत्यावाचून होत नाही.(५) मायिक गोष्टीची भीड बाळगणारी कुत्सित व्यक्ती मायिकाखेरीज दुसरे काय बोलणार? असत्यातील टळटळीत सत्य त्याला कसे कळेल?(६) मायिक म्हणजे जे झालेच नाही ते. सर्व पदार्थ स्पष्टपणे वेगळे दिसत असूनही ते मुळात अस्तित्वातच नसतात. दोरीच्या जागी साप दिसतो खरा, पण तो मिथ्याच असतो. तसाच हा प्रकार आहे.(७) दोर न कळल्यामुळे साप झाला. त्या सर्पाचा नाश दोराच्या ज्ञानानेच झाला. त्याप्रमाणे ब्रह्माच्या अज्ञानामुळे प्रपंच भासला. तो ब्रह्माच्या ज्ञानाने नष्ट झाला.(८) अज्ञानामुळे जग निर्माण झाले. मग त्यास सत्यत्व कसे आले? अगोदरच्या भासामुळे सर्पादी निर्माण झाले. पण त्यांना सत्यत्व नसते. (मग त्यांनाही सत्यत्व कसे आले?)(९) आता या प्रश्नाचे उत्तर कसे द्यायचे? रज्जूला सर्प माहीत नसतो. मी सर्प झालो आहे, हे सर्पालाही माहीत नसते.(१०) या दोघांहून वेगळा असा जो तिसरा असतो त्यालाच तो

**चैतन्य । सर्पाकार परिणमलें।।११।।तैसें ब्रह्म नेणें जगासी । जड प्रपंच नेणें आपणासी। प्रपंचभान होय ज्यासी । तो तिसरा वेगळा।।१२।।सत्यत्व ब्रह्मींचे घेतलें । जड मी हें ऐसें कल्पिलें । तया अभिमानें आणिलें । जगा सत्यत्व।।१३।।पूर्वभास कैसा त्यासी । मी मी स्फुरण दिवानिशी । ब्रह्माकारे असतां तयासी । देहाकारत्व आलें।।१४।।तें देहाकारत्व जैं जाय। ब्रह्माकार ज्ञान होय। तरीच हा प्रपंच होय मिथ्या ऐसा।।१५।।रज्जू न कळता सर्प न जाय। ब्रह्म नेणतां प्रपंच न जाय। उभयांसीही उपाय । कळल्यावीण नाहीं।।१६।। रज्जूसर्प जावया लागीं। नाना सायास आरंभी वेगीं। करीत असती वाउगीं। वेगळालीं ऐकिजे।।१७।। वाळू मंत्रून आणिली । ते चहूंकडे टाकिली । अथवा दिग्बंधने केलीं । हें एक साधन।।१८।। गारोडी साह्य केला । तेणें सर्प तात्काळ धरिला। परि आपण तेथून पळाला । कांप सुटला सर्वांगी ।।१९।। गारोडी म्हणे हाती घेई । हा तुज न करी काई। बाहेरी टाकी लवलाही। मज भय वाटतें ।।२०।। आतां तिसरें साधन । धीटपणें कंबर बांधून । शस्त्रास्त्र मेळवी संपूर्ण । काठ्या भाले ।।२१।। अंधारी रज्जू बडविती । सर्प**

---

सर्प त्याच्या कल्पनेमुळे भासला. अशा पूर्वकाळी अनुभवलेल्या भासामुळे अंत:करणच (प्रमाणचैतन्य) सर्पाकाराने परिणाम पावते.(११) त्याप्रमाणे ब्रह्म जगाला जाणत नाही. जड प्रपंच (जग) स्वत:ला जाणू शकत नाही. ज्याला प्रपंचाची जाणीव होते तो या दोहोंहून वेगळाच असतो.(१२) ब्रह्माच्या ठिकाणी असलेले सत्यत्व घेतले, जड देहाला मी अशी कल्पना केली, त्या अभिमानाने मग जगालाही सत्यत्व आणले.(१३) त्याला पूर्वीचा भास कसा येतो, तर 'मी-मी' हे स्फुरण रात्रंदिवस चाललेले असते. त्यामुळे मुळात ब्रह्माकार असलेल्या त्याला देहाकार प्राप्त झाला.(१४) ते देहाकारत्व ज्यावेळी संपते त्यावेळी ते ज्ञान ब्रह्माकार होते. त्यायोगेच हा प्रपंच मग मिथ्या होतो.(१५) जोपर्यंत रज्जू(दोरा)चे ज्ञान होत नाही, तोपर्यंत सर्प नष्ट होत नाही. तसे ब्रह्माचे ज्ञान झाले नाही तोपर्यंत प्रपंचही जात नाही. दोन्ही (सर्प व प्रपंच) ही नष्ट होण्यासाठी ज्ञानाशिवाय दुसरा मार्ग नाही.(१६) रज्जुसर्पाचा (रज्जूवरील सर्पाच्या भासाचा) नाश करण्यासाठी लोक वेगवेगळे प्रयत्न करत असतात. पण ते वाया जातात.(१७) त्यापैकी एक साधन असे की, वाळू मंत्रून आणतात. ती चहूकडे टाकतात किंवा सर्व दिशांना टाकून दिशांची नाकेबंदी करतात.(१८) अथवा एखाद्या गारोड्याची मदत घेतात. तो त्या सर्पाला ताबडतोब पकडतो. पण त्याच्या सर्वांगाला भीतीने कंप सुटल्यामुळे तो सर्प सोडून देऊन स्वत: तेथून पळून जातो.(१९) अथवा तो गारोडीच दुसऱ्याला म्हणतो की हा सर्प हातात धर, तो तुला काही करणार नाही, पटकन त्याला धरून बाहेर नेऊन टाक. मला मात्र त्याची भीती वाटते.(२०) आता तिसरे साधन असे की, भोवतालचे लोक धीटपणाने कंबर कसून सर्व प्रकारची काठ्या, भाले इत्यादी शस्त्रास्त्रे मिळवून(२१) अंधारातच त्या दोरीला बडवतात. मग 'सर्प मेला रे मेला' असे म्हणतात. काही जणांची

**मेलारे म्हणती । कांहीं दृष्टी चळतां भाविती । जिवंत आहे ।।२२।। शीणचि होय साधनें करितां । निर्फळ जाले दीप लावितां । म्हणे काय होइतुकें आता । श्रम पावलों ।।२३।। ऐसें दार्ष्टान्ती जाणावें। साधनें करिताती सर्वे । परि ज्ञानावांचून आघवें । शीणचि पावती।।२४।। नित्यनैमित्तिक आचरती। कांही दानधर्मे करिती। व्रतें तपें आरंभिती। म्हणती संसार तरूं।।२५।। नाना परीचीं कर्मे करणें। तेणें देहासीच लागे येणे। कांही प्रपंचातील नव्हे उणें । दिग्बंधनापरी।।२६।। उपासनेचा केला आधार । देव भेटे साक्षात्कार । वैकुंठ कैलासादि अपार । लोकप्राप्ति जाली ।।२७।। तरी अज्ञान नासेना । भय कदापि जाईना । कोणी करील कल्पना । देवाजवळी भय कैचें ।।२८।। जैसा राजियाचा प्रधान । सकळ राज्य तया आधीन । अंतरी भय असें दारुण । राजाज्ञेचें ।।२९।। अंगे जो राजा जाला । मग कोणाचें भय त्याला । देव न होतां सन्निध** राहिला । त्यासी निर्भयता कैंची।३०।। **स्वतां योग आरंभिला । बहु कष्टें सिद्धी गेला । ब्रह्मांडी जाउनी कोंडिला । वायुबळें ।।३२।।**

---

तशात दृष्टी थोडीशी चळते आणि त्यांना तो हलल्यासारखा वाटतो. मग त्यांना तो जिवंत आहे असे वाटू लागते.(२२) अशा तऱ्हेची साधने (उपाय) करता करता त्यांना श्रमच फक्त होतात. मग दिवा लावून पाहातात तो आपले कष्ट फलहीन झाले हे त्यांच्या लक्षात येते आणि मग इतका वेळ आपण विनाकारणच श्रम करत होतो हे त्यांच्या लक्षात येते.(२३) दार्ष्टान्तामध्ये (म्हणजे उपमेयपक्षी किंवा मुख्यार्थपक्षी) असेच समजून घ्यावे. सर्व प्रकारची सर्वजण साधने करतात. पण एक ज्ञानाच्या अभावी सर्वजण विनाकारण शीण पावतात.(२४)काही लोक नित्य, नैमित्तिक विहित कर्मांचे आचरण करतात, काहीजण दानधर्म करतात; काहीजण व्रते, तपे यांचे, त्यांच्या साहाय्याने आपण संसार तरून जाऊ या भावनेने आचरण करतात.(२५) निरनिराळी कर्मे करण्याने पुढच्या जन्मी पुन्हा देहच धारण करावा लागतो. सर्पनाशासाठी  केलेल्या दिशांच्या नाकेबंदीप्रमाणे ती कर्मे व्यर्थ ठरतात. प्राप्त झालेल्या प्रपंचाचे काहीही कमी होत नाही.(२६) उपासनेचा आधार घेतला तर देव भेटतो. साक्षात्कार होतो; वैकुंठ, कैलास इत्यादी विविध लोकांची प्राप्ती होते.(२७) तरी त्यामुळे अज्ञान नष्ट होत नाही. प्रपंचाचे भय काही केल्या जात नाही. यावर कोणी कल्पना करील की देवाच्या सांनिध्यात भय कसे असेल?(२८) ज्याप्रमाणे एखाद्या राजाचा प्रधान असतो. सगळे राज्य राजाच्या अधीन असते आणि प्रधानाच्या मनात राजाज्ञेचे अतिशय भय असते.(२९) पण जो स्वत:च राजा झालेला असतो त्याला कोणाचे भय असणार? त्याप्रमाणे स्वत: देव न होता केवळ त्याच्या सांनिध्यात राहिल्याने त्याला निर्भयता कशी वाटेल?(३०) हा प्रकार गारोड्याच्या दृष्टांताप्रमाणे झाला. त्यायोगे अज्ञानाचा नाश होत नाही. आता प्रपंचाचा निरास करण्याचे तिसरे साधन ऐक.(३१) स्वत:च योगाभ्यास सुरू केला. पुष्कळ कष्टाअंती तो योगाभ्यास सिद्धीलाही गेला. ब्रह्मांडात(ब्रह्मरन्ध्रात) जाऊन बळेच वायूचे निरोधन केले.(३२)



हे गारोडियापरी। अज्ञानाची नव्हे बोहरी। आतां तिसरें साधन अवधारीं। प्रपंच-निरसनार्थ ॥३१॥

**तेथे अष्टसिद्धि आल्या । पुरविती पदार्था इच्छिल्या । साधु म्हणउनी कीर्ति गेल्या । दिगंतरासी ।।३३।। लोकें मनांत भाविलें । तेथेंच त्यासी दर्शन दिधलें । कैलासीं जाऊन आले । क्षणामाजीं।।३४।। काळवंचना केली। अकल्प तनु वांचविली । क्षणें म्हणे जन्ममरण मेली । क्षणा धोका वाहे ।।३५।। पंचभूतांसी नाश होय । तेथेंचि मानिला सत्य काय । बहु काल रक्षितांहि जाय । अकस्मात् पुढें ।।३६।। भ्रमाचें निर्मूळ नाहीं जालें । केले सायास व्यर्थ गेले । अंतरी रज्जुत्व न ओळखिले । मारितां कष्ट ।।३७।। तेथें दीपचि पाहिजे । मिथ्या ज्ञानेंचि जाणिजे । मग तयाचें ओझें । कांहींच नाहीं ।।३८।। विनोदें रज्जूसी क्रीडतां । भयचि नाहीं तत्वतां । तैसे प्रारब्ध भोगितां । भीतिच नाहीं ।।३९।। आपण ब्रह्म निर्गुण । कोणासि यावें जन्म मरण । येचि देहीं समाधान । पावला ऐसा।।४०।। भवसर्प भयानक । लावितां विवेकदीपक । जालें सर्वहि सार्थक । ज्ञानेंचि पावन।।४१।। निश्चयेंसी होय ज्ञान । गुरुमुखें वेदान्तश्रवण। विचारें मनन निदिध्यासन । हेंचि साधन दुजें नाहीं ।।४२।।वेदान्त कासया म्हणावें । काय गुरुमुखें ऐकावें । ऐसिया आक्षेपिं स्वभावें।**

---

त्यावेळी तेथे अष्ट महासिद्धी आल्या. त्या सर्व इच्छित पदार्थ पुरवू लागल्या. त्या योग्याची महान साधू अशी कीर्ती होऊन दिशादिशात पसरली.(३३) लोकांनी मनात आणताच त्यांना बसल्या जागी दर्शन दिले. एका क्षणात कैलासाला जाऊन परत आले.(३४) अथवा काळवंचना केली (म्हणजे आलेला मृत्यू थोपवून धरला) आणि कल्पान्तापर्यंत आपला देह वाचवला. एखाद्या क्षणी आपले जन्ममरण आता टळले असे म्हणत असतानाच दुसऱ्या क्षणीच जन्ममरणाचे भय त्याला जाणवत असते.(३५) पंचमहाभूतांचा नाश होतो. पण याने मात्र आपला देह सत्य मानला. आणि पुष्कळ दिवस त्याचे रक्षण केले, पण तरीसुद्धा पुढे तो अचानकपणे जायचा तो जातोच.(३६) पण एवढा खटाटोप करूनही भ्रम निर्मूळ गेला नाहीच. केलेले सर्व कष्ट वाया गेले. मनात सर्पाचे रज्जुत्व न ओळखल्याने तो मारण्यासाठी केलेले कष्ट वायाच जातात, तसेच येथे झाले.(३७) अशा वेळी तेथे दिवाच पाहिजे. तसेच सर्पाचे खोटेपण ज्ञानानेच ओळखले पाहिजे. ते एकदा ओळखले की, मग त्याच्या भीतीचे काहीच ओझे राहात नाही.(३८) सहज विनोदाने दोराबरोबर खेळ करत असताना मनात काहीच भीती वाटत नाही, त्याप्रमाणे सहज भावनेने प्रारब्ध भोगत असता काहीच भीती वाटत नाही.(३९) आपणच निर्गुण ब्रह्म असल्यावर जन्म, मरण इत्यादी अवस्था कोणाला येणार आहेत? अशा तऱ्हेने याच देहात त्याला असे समाधान प्राप्त होते.(४०) संसाररूपी सर्प अतिशय भयानक आहे. तथापि विवेकाचा दिवा लावताच सर्व कष्टांचे सार्थक होते. अखेर तो साधक ज्ञानानेच पवित्र होतो.(४१) निश्चयपूर्वक ज्ञान व्हावे, गुरुमुखाने वेदान्तश्रवण घडावे, विचारपूर्वक त्यावर मनन व्हावे, त्याचा निदिध्यास घडावा, हेच एकमेव साधन आहे. त्याला दुसरा पर्याय नाही.(४२) पण वेदान्त कशाला म्हणतात, गुरुमुखाने कशाचे श्रवण

**सांगिजेल ।।४३।। जाणावें ब्रह्म निर्गुण । मायेचें काय लक्षण । नियंता ईश्वर तिजलागुन। तोहि ओळखावा ।।४४।। जीव कैसा तो ओळखावा । कूटस्थ कोण तो जाणावा । अविद्याबंधन जीवा । तेंहि ओळखावें ।।४५।। जग समष्टी व्यष्टिरूप । जाणावा अपवाद अध्यारोप । त्वंपद तत्पदाचें रूप । असिपदीं ऐक्य कैसें ।।४६।। इतुकें निर्धारें जाणावें। सत्य असत्य धुंडावें । संशयरहित व्हावें । निःसंदेह ।।४७।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ज्ञानप्रतिष्ठायोगप्रकारे । पंचमसमासः ।।५।। इति ज्ञानप्रतिष्ठारूपपंचिका संपूर्णा ।।२।। ओवीसंख्या ।।२६४।।**

---

करावे, असा आक्षेप कोणी घेतल्यास ते सर्व आता सांगतो.(४३) निर्गुण ब्रह्माची ओळख व्हावी, मायेची लक्षणे काय आहेत, ती जाणून घ्यावीत. त्या मायेचा नियामक जो ईश्वर त्याचीही ओळख व्हावी.(४४) जीवाचे स्वरूप समजून घ्यावे, कूटस्थ कोण तो ओळखावा, जीवाला अविद्येचे (अज्ञानाचे) बंधन पडलेले असते तेही ओळखून घ्यावे,(४५) पिंड ब्रह्मांडरूप (व्यष्टिसमष्टि) जग जाणून घ्यावे, सृष्टीचा संहार (अपवाद) आणि उत्पत्ती (अध्यारोप) कसे होतात ते समजून घ्यावे, त्वंपद म्हणजे काय, तत्पद म्हणजे काय आणि असिपद म्हणजे काय,(जीव, ब्रह्म आणि त्यांचे ऐक्य) त्यांचे ऐक्य कसे होते,(४६) इतके सगळे निश्चयपूर्वक जाणून घ्यावे. सत्य काय, मिथ्या काय यांचा शोध घ्यावा आणि संशयरहित, निःसंदेह व्हावे हेच वेदान्तश्रवण होय.(४७)



# पंचिका ३री - ब्रह्ममायाजीवेशस्वरूप

## ।।श्रीराम समर्थ ।। समास १ला- ब्रह्मलक्षणनिर्धार

**सृष्टिपूर्वी सतचि आहे । हे सौम्य विचारुन पाहे । निश्चयें श्रुती म्हणताहे । बृहदारण्यीं[१८] ।।१।। आत्माचि अग्रिं असे । अरणीषट्क[१९] बोलतसे । नांवें दोनि परि असे । एकचि रूप।।२।। तें प्रत्यक्ष ज्ञाना नव्हे विषय । तेथें अनुमानें करावें काय । न चले शब्दाचा उपाय । दृष्टान्तहि कैंचा ।।३।। तरि तें कैसें जाणावें । जाणिल्यावीण समाधान नव्हे । बुध्दि इंद्रिया स्वभाव। अगोचर असे ।।४।। परि न्यायाचे चत्वार लक्षण । येणेंचि होय ब्रह्मज्ञान । मनेंचि जाणोनि पावन । श्रुति ही ऐसी ।।५।। मना ज्याचेनिं मनपण । परि मना नकळे अधिष्ठान[२०]। ऐसें श्रुतीचें वचन । येणें रीतीं जाणावें ।।६।। अशब्द अस्पर्श अरूप । अरस अगंध अमुप । अनणु अदीर्घ निर्विकल्प । श्रुति वचनेंचि सांगे ।।७।। शब्द तरी चालेना । शब्देंविणही कळेना । म्हणउनि श्रुति तन्न तन्ना । प्रवर्तली शब्दें ।।८।। अर्थ**

---

### पंचिका ३री, समास १ला - ब्रह्मलक्षणनिर्धार

बृहदारण्यक उपनिषदात श्रुती निश्चयपूर्वक सांगते की,''हे सौम्य, सृष्टी उत्पन्नापूर्वी सत्तत्वच होते. हे नीट विचार करून पहा.''(१) अरणीषट्क (छान्दोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात) असे सांगते की,''आत्माच सर्व सृष्टीच्या अगोदर होता.''या दोन्ही विधानांत 'सत्' आणि 'आत्मा' अशी दोन वेगवेगळी नावे दिसली तरी 'सत्' आणि 'आत्मा' ह्यांचे रूप एकच आहे.(२) ते प्रत्यक्ष ज्ञानाचा विषय नाही.तेथे अनुमानाने काय करावे? शब्दप्रमाणाचाही तेथे उपाय चालत नाही,मग दृष्टान्त कसा चालेल?(३) अशा परिस्थितीत त्याचे ज्ञान कसे व्हावे? जाणल्याशिवाय तर समाधान होणार नाही. ते स्वभावत:च बुद्धी आणि इंद्रियांना अदृश्य आहे.(४) पण न्यायशास्त्रामध्ये ज्ञानाची चार प्रमाणे सांगितली आहेत. (प्रत्यक्षज्ञान, अनुमानज्ञान,शब्दज्ञान व दृष्टान्त) तेव्हा याच प्रमाणांनी ज्ञान होते. 'मनानेच त्या ब्रह्मतत्त्वाचे ज्ञान करून घ्यावे' असे श्रुतीही सांगते.(५) ''मनाला ज्यामुळे मनपण येते, पण त्या मनाला आपले अधिष्ठान असूनही जे कळून येत नाही'त्यालाच ब्रह्म असे जाणून घ्यावे, असे श्रुतीचे वचन आहे.(६) ते ब्रह्म, अशब्द,अस्पर्श,अरूप,अरस,अगंध,अमूप,अनणू, अदीर्घ, निर्विकल्प आहे असे श्रुती शब्दांनीच सांगते.(७) पण त्या ब्रह्माच्या बाबतीत शब्द उपयोगाला येत नाही. पण शब्दाशिवाय ते कळत नाही. म्हणून श्रुती 'ते तसे नाही, ते तसे नाही' (नेति, नेति) असे शब्द वापरण्यास उद्युक्त झाली.(८)

**बोधोनि शब्द जाय। म्हणउनी शब्दचि उपाय। उपमा नसे त्यासि काय। करावें ऐका।।९।। सर्व साम्यता तरि न घडे। एकांशीं साहित्य पडे । तें जाणावें रोकडें । आकाश ऐसें।।१०।। विभु व्यापक निरंश असे । ब्रह्म व्योमा भेद नसे । ब्रह्मीं चैतन्य अधिक असे । म्हणोनि उपमा ।।११।। हा जगद्भ्रम भासला । परि सत्य अधिष्ठान असे याला । अधिष्ठानेंवीण भ्रमाला । कोठें न देखों ।।१२।। हें अनुमानें कळें ऐसें । आतां प्रत्यक्ष ज्ञान तें कैसें । ब्रह्म आत्मा भेद नसे । उपाधि निरसतां ।।१३।। प्रत्यक्षासी प्रमाण काय । हें सर्वथा बोलों नये। परि अप्रमाण न होय । महावाक्य पहा ।।१४।। ब्रह्म सच्चिदानंद पूर्ण । सत्य ज्ञान अनंत घन । हें श्रुतीचें वचन । स्वरूपरूपें ।।१५।। असतची पूर्वी होते । श्रुतीच सिद्ध करी शून्यातें। अनुभवास येइना तें । तरी सत् कैसें।।१६।। असत् जरी म्हणसी । तरी असत् कळे कोणासी । कोणती जिव्हा पुससी । जिव्हेनेंचि ।।१७।।तथापी असत् आहे किं नाहीं। यांत विचारून बोले कांही। जरी म्हणसी असत् नाहीं। नाहीं ते नाहीं कदा।।१८।।**

---

शब्द अर्थाचे ज्ञान करून देतो आणि स्वत: लोप पावतो,असे त्याचे स्वरूप आहे. तरीही शब्दावाचून दुसरा उपायच नाही. ज्याला कशाची उपमाच देता येत नसेल त्याच्या संदर्भात काय करावे, ते ऐका.(९)उपमेच्या संदर्भात ब्रह्माशी संपूर्ण साम्य सांगता येईल. अशी सापडणे शक्य नाही. एकांगाने साम्य दाखवणे शक्य आहे. असा स्पष्टपणे पण लक्षात येणारा पदार्थ म्हणजे आकाश होय.(१०) ते मोठे आहे.व्यापक आहे,अंशरहित आणि निरवयव आहे.या दृष्टीने ब्रह्म आणि आकाश यांत भेद नाही. ब्रह्मामध्ये चैतन्य अधिकचे आहे.तेवढा गुणधर्म सोडल्यास त्या दोहोंमध्ये उपमा होऊ शकते.(११)हा जगाचा पसारा भ्रमरूप आहे,असे भासले तरी त्याला सत्याचा(सत्पदार्थाचा)आधार आहे.कारण कोणताही भ्रम मूळ आधारावाचून वेगळा असा कोठेही आढळणार नाही.(१२)अनुमानप्रमाणाच्या साहाय्याने वरील सत्य कळू शकते. पण त्याचे प्रत्यक्ष ज्ञान कसे होऊ शकेल?आत्मा हा अज्ञानाच्या उपाधीमुळे जीवरूपाने ब्रह्माहून वेगळा भासत असला तरी ती उपाधी बाजूला सारताच आत्मा आणि ब्रह्म यांमध्ये मुळीच भेद उरत नाही.(१३)पण असा अनुभव प्रत्यक्ष येऊ शकतो याला प्रमाण काय? पण अशी शंका घेऊ नये. कारण कोणतेही महावाक्य अप्रमाण मानता येत नाही.(१४)वेदांनी ब्रह्माचे स्वरूप-लक्षण सांगण्याच्या निमित्ताने ब्रह्म हे सत्,चित्,आनंद,पूर्ण,सत्य,ज्ञान,अनंत,घनरूप(सर्वत्र ठासून भरलेले)आहे,असे स्पष्ट शब्दांत सांगितले आहे.(१५)'पूर्वी सर्वत्र असत्‌च होते'या शब्दांनी श्रुती शून्यवाद सिद्ध करते.दुसरे असे की,त्या ब्रह्माचा जर अनुभव येत नसेल तर त्याला 'सत्' कसे म्हणता येईल?(१६) मग त्याला 'असत्' असे म्हटले तर ते 'असत्' आहे असे कोणाला समजते?आपल्याच जिव्हेने आपली कोणती जिव्हा आपण पुसून टाकू शकतो?(म्हणजे जिव्हेने जिव्हा पुसता येत नाही.)(१७) तरीसुद्धा ते ब्रह्म असत् आहे की नाही,याबाबतीत नीट विचार करून सांग.जर तू असे म्हणशील की

**जरी असत् आहे म्हणतां। हाचि व्याघात तत्वतां। हा दोष तुज न कळतां। बोलत अससी।।१९।। असत् तें सर्वथा नाहीं । तरि आहे हें कोणास पाही । शून्य म्हणसी आहे कांही । तेंचि सद्रूप ।।२०।। सत् आहे म्हणतां । हाही दोष द्विरुक्तिता । तरि वासना अति दृढ होतां। आदरें द्विरुक्ती ।।२१।। बोलणें तें बोलतों । करणें तें करितों । सत् आहे तैसे तो । द्विरुक्ति दोष नाहीं ।।२२।। सत् कालत्रयीं नासेना । सृष्टि स्थिति प्रलय रचना । होतां जातां चळेना । जैसे तैसें ।।२३।। ब्रह्म सत् व्हावया योग्य असे । जें कालत्रयीं न नासे । नासें तें सत्ही नसे । घटाचे परी ।।२४।। ज्ञान म्हणजे स्वप्रकाश। जाणतें सर्व जडास । सर्वांसि जरी होय नाश । तरि देखणा आहे ।।२५।। दिसे तयासी पाहतो । भासे तयासी जाणतो । शून्यास स्वतां अनुभवितो । सुषुप्तिपरी ।।२६।। म्हणसी स्वप्रभ कळेना । बुद्ध्यादिकां भासेना । परप्रकाशें तत्वें नाना । वर्तती त्यां नकळे ।।२७।।चक्षु घटातें पाहे।**

---

'असत्'नाही तर मग जे नाही ते केव्हाही नाहीच,असे ठरते.(१८) जर 'असत् आहे' असे म्हणत असशील तर ते आपल्याच विधानाचे आपणच खंडन केल्यासारखे होईल.हा व्याघात दोष होय. तो तुझ्या लक्षात न आल्याने तू असे म्हणत आहेस.('असत्' अस्तित्वात नसलेले 'आहे' असे म्हणणे विसंगत आहे.ज्याला आपण 'असत्' असे म्हणतो तो पदार्थ 'आहे' असे कसे म्हणता येईल?)(१९) 'असत्'हे सर्व प्रकारे नाहीच,असे असताना 'आहे'असे आपण कोणास म्हणतो?त्याला शून्य असे तू म्हणत असशील आणि ते आहे असे म्हणत असशील,तर त्या'आहे'असे म्हणण्यानेच ते सद्रूप ठरते.(२०) 'सत् आहे'असे तुम्हीसुद्धा म्हणता.तो द्विरुक्तीचा दोष सिद्ध होत नाही का?असा आक्षेप घेशील तर त्याला उत्तर असे की,प्रेम अगदी दृढ असेल तेव्हा तेथे द्विरुक्तीचा दोष क्षम्य ठरतो. तेथे द्विरुक्तीचा आदरच केला जातो.(२१)मी बोलायचे ते बोलतो,करायचे ते करतो,असे आपण म्हणतो.तसेच 'सत् आहे' असे म्हणतो.अशा प्रकारच्या बोलण्यात द्विरुक्ती हा दोष मानत नाहीत.(२२) 'सत्' म्हणजे सदैव असणारे.ते कालत्रयीही नष्ट होत नाही.जगामध्ये उत्पत्ती (सृष्टी),स्थिती आणि प्रलय या घडामोडी सतत चालत असताना जे 'सत्' आहे ते अजिबात चळत नाही. ते जसे आहे तसेच राहते.(२३) एक ब्रह्मच तेवढे असे सत् होण्याच्या योग्यतेचे आहे.ते कालत्रयीही नष्ट होत नाही.नाश पावणाऱ्या घटाप्रमाणे जे नाश पावणारे असते त्याला'सत्'म्हणता येत नाही.(२४) चित् म्हणजे ज्ञान. ते स्वयंप्रकाशी असते.ते सर्व जड पदार्थांस जाणते. सर्व पदार्थांचा नाश झाला तरी त्या नाशाचाही ते द्रष्टा असते.(२५) असा स्वयंप्रकाशी द्रष्टा जे जे दृश्य आहे त्याला पाहतो,जे जे भासते त्याला जाणतो आणि सर्वनाशानंतर उरणाऱ्या शून्याचाही अनुभव घेतो. असा शून्याचा अनुभव झोपेत येतो.(२६) असा स्वयंप्रकाशी कोण ते आपल्याला कळत नाही, बुद्धी इत्यादींना तो भासत नाही,इतर अनेक पदार्थ किंवा तत्त्वे परप्रकाशाने व्यवहार करतात, त्यांनाही तो कळत नाही, असे म्हणत असशील तर त्याचे उत्तर असे की,(२७)

**चक्षु घटासी गोचर नव्हे । तैसें बुद्ध्यादिकां जाणताहे । बुद्ध्यादि नेणती।।२८।।सर्वदा असे जाणतां । यथार्थ न वाटे तत्वतां । उपाधियोगें जाणें पाहतां । येऱ्हवीं नाहीं ।।२९।। ऐक चक्षु घटातें पाहे । तेव्हांचि देखणी दशा आहे । घटाभावीं चक्षु का राहे । अंधळा होऊनी।।३०।।सर्व असतां जाणितलें। नसता काय नेणणें आलें। म्हणसि उपाधिसवें लया गेलें । तें पाहिलें कोणें।।३१।।ज्ञानाचा लय ज्ञानें पाहिला। तरि आपणा देखतां आपण मेला। ऐसा नाहीं आयकिला। हाही दोषचि।।३२।।ज्ञान तरि दुसरें नाहीं। कीं ज्ञान लया होईल गाही। यासी प्रमाणही नसे कांही। नाश कैसा मानावा।।३३।।ब्रह्म चिद्रूप व्हावया योग्य आहे। स्वप्रभत्वें सर्वां जाणताहे । न जाणे तें चिद्रूपहि नव्हे । घटाचे परि ।।३४।। ब्रह्म अनंत परिपूर्ण। त्रिविधा परिच्छेदविहीन। तया परिच्छेदाचें लक्षण। अवधारा आधीं।।३५।। आहे अमुके देसीं। नसे कांही अन्य देशी । ऐसें जें का एक देशीं । तो देशपरिच्छेद।।३६।। पर्जन्य काळीं दिसती । उष्णकाळीं हरपती ।काल परिच्छेद तयाप्रती । बोलिजेतो।।३७।।**

---

डोळा घटाला पाहू शकतो, पण घटाला चक्षू दिसू शकत नाही, त्याप्रमाणे हा स्वयंप्रकाशी चिदात्मा बुद्धी इत्यादी तत्त्वांना जाणतो पण बुद्धी इत्यादी तत्त्वे त्याला जाणत नाहीत.(२८) तो सर्वकाळ जाणणारा असूनही आपल्याला तो सत्य वाटत नाही. कारण पदार्थमात्रांच्या उपाधिगुणांमुळे त्या पदार्थमात्रांचे आपल्याला ज्ञान होऊ शकते. येरवी उपाधिअभावी ते ज्ञान झालेच नसते.(२९) डोळा घटास पाहतो तोपर्यंतच त्याची द्रष्टा अशी अवस्था असते आणि घट नसताना तो डोळा आंधळा होऊन राहतो काय?(३०) सर्व पदार्थ असताना त्यांना आपण जाणतो. ते पदार्थ नसतील तेव्हा आपण अज्ञानी बनतो काय? तू म्हणशील की आपले जाणणे (ज्ञान) उपाधीबरोबरच लयाला जाते, पण मग ते ज्ञान लयाला गेले (नाहीसे झाले) हे कुणाला कळते?(३१) ज्ञानाचा लय ज्ञानानेच पाहिला असे म्हणणे म्हणजे आपणासमोरच आपण मेलो असे म्हणण्यासारखे होईल. असे कधी ऐकिवात नाही. हाही दोषच ठरेल ना?(३२) बरे ज्ञानच ज्ञानाच्या लयाचे साक्षी होईल असे म्हणावे तर दोन ज्ञाने संभवत नाहीत (ज्ञान एकच असते). बरे ज्ञानाचा नाश झाला, याला प्रमाण काय? तेव्हा ज्ञानाचा नाश कशाच्या आधारावर मानावा?(३३) ब्रह्म चिद्रूप होण्यास योग्य आहे. ते स्वयंप्रकाशी असून सर्व जाणणारे असते. जे जाणत नाही त्याला चिद्रूप म्हणता येत नाही. घट हे त्याचे उदाहरण होय. तो कुणाला जाणत नसल्यामुळे त्याला चिद्रूप म्हणता येत नाही.(३४) ब्रह्म हे अनंत असून (सगळीकडे ओतप्रोत भरलेले असे) परिपूर्ण आहे. त्याचे परिच्छेद म्हणजे विभाग पडत नाहीत. त्या परिच्छेदाचे स्वरूप आधी ऐकून घ्या.(३५) एखादा पदार्थ अमुक देशात आहे. अन्य देशात नाही. अशाप्रकारे विशिष्ट देशाशी तो निगडित असतो याला देशपरिच्छेद म्हणतात.(३६) एखादा पदार्थ पावसाळ्यात दिसतो, उष्ण काळात (उन्हाळ्यात) हरपून जातो (नाहीसा होतो) याला कालपरिच्छेद म्हणतात.(३७)

**पृथ्वीमाजीं दिसे कांही । अपामाजीं निःशेष नाहीं। काशांत आहे काशांत नाहीं । हा वस्तुपरिच्छेद ।।३८।। ब्रह्म व्यापकपणें अगाध । यास्तव नसे देशपरिच्छेद । नसे कालाचा परिच्छेद । नित्यत्व हेतू ।।३९।। सर्वी सर्वावभासक। नव्हे वस्तुपरिच्छेदक । त्रिविध प्रकारें वस्तु एक । परिच्छेदशून्य ।।४०।। परिच्छेदशून्य जे वस्तू । तेचि जाणिजे अनंतु। श्रुति निर्धारिं बोलतु । आनंदही तया ।।४१।। आनंद वृत्तीचा स्वभाव । मानितील कोणी अभिप्राव। आनंदकोशीं पंचमावयव । पुच्छत्वें वर्णिला ।।४२।। सुखदुःख उद्भवे वृत्ती । प्रत्यय दाउनि लया जाती । तैसा नव्हे आदिमूर्ती । आनंदरूप ।।४३।। त्या आनंदासी नाश नाहीं । असतचि असे सर्वदांही । दुजा अनुभवी नसतांही । अनुभाव्यरूप ।।४४।। योग्य असे ब्रह्मानंद । सुखदुःखहीन स्वानंद । सुखदुःखें उठे खेद । नव्हे आनंदवृत्तीपरी।।४५।। कोणी प्रतियोगी कल्पिती। असतास्तव सत् म्हणती। जडामुळें भाविती। चिद्रूप ऐसें।।४६।। दुःख प्रतियोगी आनंद । हें नव्हे प्रमाणसिद्ध। राजयासी मांडिलें युद्ध । वांजेच्या कुमरें।।४७।।**

---

एखादा पदार्थ पृथ्वीमध्ये दिसतो. आपतत्त्वामध्ये (पाण्यामध्ये) दिसत नाही. अशा प्रकारे विशिष्ट वस्तूशी निगडित असणे याला वस्तुपरिच्छेद म्हणतात.(३८) ब्रह्म सर्वव्यापक असल्यामुळे त्याचा अंत लागत नाही. ते अगाध आहे म्हणून त्याच्या ठिकाणी वस्तुपरिच्छेद नाही. ते नित्य असल्यामुळे त्याच्या ठिकाणी काळाचाही परिच्छेद नाही.(३९) ते सर्व पदार्थात असून सर्वांना प्रकाशित करणारे असल्यामुळे त्याच्या ठिकाणी वस्तुपरिच्छेदही नाही अशा प्रकारे वस्तु म्हणजे ब्रह्म हे तिन्ही प्रकारांनी परिच्छेदशून्य असे एकमेव आहे.(४०) असे परिच्छेदरहित जे ब्रह्म ते अनंत आहे, हेही समजून घ्यावे. वेद त्यालाच निश्चयपूर्वक आनंदरूपही मानतात.(४१) आनंद हा वृत्तीचाच स्वभाव आहे, असे कोणी मानतील. याच आनंदाला तैत्तिरीय उपनिषदामध्ये आनंदकोश मानले असून ब्रह्माचे पाचवे अंग म्हणजे पुच्छरूपाने त्याचे वर्णन केले आहे.(४२) वृत्तीमध्ये सुखे आणि दुःखे उत्पन्न होतात. त्यांचा अनुभव देऊन ती लय पावतात. ब्रह्म हे जे आद्यतत्त्व (आदिमूर्ती) आहे ते या सुखदुःखांसारखे नसून प्रत्यक्ष आनंदरूपच आहे.(४३) त्या आनंदाला नाश नाही. तो सर्वकाळ असतो. त्याचा अनुभव घेणारा दुसरा कोणी नसतानाही तो अनुभव घेण्याजोगा आहे.(अनुभाव्य)(४४) ब्रह्मानंद प्राप्त करण्यास योग्य असून सुखदुःखरहित असा निखळ आनंदरूप आहे. आनंदवृत्तीमध्ये सुखे दुःखे निर्माण होतात, त्यामुळे खेद वाटतो. ब्रह्मानंद हा त्याप्रकारचा वृत्तिरूप आनंद नाही.(४५) कोणी तद्विरुद्ध वस्तूच्या अथवा धर्माच्या अपेक्षेने ब्रह्माच्या ठिकाणची ही सत्, चित् आणि आनंद ही लक्षणे अस्तित्वात आहेत असे मानतात. म्हणजे असत्च्या अपेक्षेने ब्रह्म सत् आहे असे मानतात, जडाच्या अपेक्षेने ते चित् स्वरूप आहे असे मानतात.(४६) आणि दुःखाच्या अपेक्षेने आनंदाचे अस्तित्व मानतात. पण हे त्यांचे मत प्रमाणांनी सिद्ध होत नाही. वांझेच्या पुत्राने राजाबरोबर युद्ध सुरू करावे तसा हा प्रकार ठरेल.(४७)

**तैसें असज्जड दु:ख कांही । उत्पन्नची जालें नाहीं । सच्चिदानंदास तें काहीं । प्रतियोगी नव्हे।।४८।।हे शब्दप्रतियोगी असती। वस्तुप्रतियोगी न होती । वैखरीअभावें शब्द नासती। अर्थ न जाय त्यासवें।।४९।।तरी सच्चिदानंद नांव । मायेनें कल्पिला देव । म्हणसी तरी मायेचा अभाव । त्यापूर्वी तें काय आहे।।५०।।रज्जूचा सर्प जाला । तेणें न वचे रज्जु कल्पिला । सर्पाभावींही रज्जूला। रज्जुत्व असे।।५१।।म्हणुन आहे तेंचि आहे । चिदानंद कल्पित नव्हे। शब्द फोल परि तो आहे । शब्देंविणही।।५२।।ब्रह्म एक परिपूर्ण। सच्चिदानंद हें लक्षण । किंवा असती गुणिगुण । कीं अंशांशी।।५३।।ती प्रकारें विकल्पिलें। प्रथम पक्षा अंगिकारिले। इतर दोनी जे उरले । दूषण दे त्यासी।।५४।। ब्रह्मगुणी सतादि गुण । तरि जाले ब्रह्म सगुण । मायेस्तव सत्वादि गुण । त्यासी नाश बोलिला ।।५५।। सतादिकां नाश नाहीं । यास्तव गुणीगुणत्व नाहीं। अंशांशी भाव तोही । सांश वस्तूतें।।५६।।**

---

त्याप्रमाणे असत्,जड,दु:ख असे जे आपण म्हणतो ते मुळात उत्पन्नच झाले नाही.त्यामुळे सत्,चित्,आनंद या त्रयीला ते काही प्रतियोगी होऊ शकत नाहीत.(४८)हे तीन केवळ शब्दरूपातील प्रतियोगी होत.वस्तुरूपातील(वास्तवातील)प्रतियोगी नव्हेत वैखरी नसेल तर शब्द नाश पावतील.पण अर्थ नाश पावत नाही.(अर्थ शब्दांबरोबर त्यांच्या मार्गाने जात नाही.)(४९)आता असे म्हणशील की,सच्चिदानंद हे नाव व ते धारण करणारा देव हे मायाकल्पित आहेत तर मायेचा अभाव असताना तिच्यापूर्वी कोणते तत्त्व होते?(५०)रज्जूचा सर्प झाला की त्याच्याकडे रज्जू म्हणून पाहता येत नाही, पण सर्प नसतानाही रज्जूच्या ठिकाणी रज्जूपणा असतोच.(५१)म्हणून जे आहे ते प्रथमपासूनच आहे. चिदानंद ब्रह्म हे कोणी कल्पना केल्याने झालेले नसते.त्याचा निर्देशक जो चिदानंद हा शब्द व्यर्थ होऊ शकेल.पण त्या शब्दाअभावीही ते असतेच असते.(५२)ब्रह्म हे परिपूर्ण सर्वत्र भरलेले असे आहे. ब्रह्म हे लक्ष्य असून सच्चिदानंद हे त्याचे लक्षण आहे,किंवा ब्रह्म हे गुणी असून सच्चिदानंद हे त्याचे गुण आहेत,किंवा ब्रह्म हे अंशी असून सच्चिदानंद हे त्याचे अंश आहेत.(५३)आता ब्रह्म आणि सत्, चित्, आनंद यांच्या परस्परसंबंधांबद्दल ही जी निरनिराळी तीन पर्यायी मते नोंदवली आहेत,त्यातील पहिल्या पक्षाचा आम्ही स्वीकार करतो. बाकीचे जे दोन पर्याय उरतात.(गुणी-गुण,अंशी-अंश)त्यांचा दोषयुक्त म्हणून आम्ही त्याग करतो.(५४)ब्रह्म गुणी मानले तर त्याचे सत्,चित्,आनंद हे गुण ठरतात. त्यामुळे ब्रह्म सगुण ठरते.मायेपासून निर्माण झालेले सत्व,रज आणि तम त्या गुणांचा तर नाश होतो,असे सांगितले जाते.(५५) ब्रह्माच्या सत्,चित् आणि आनंद या लक्षणांना नाश नाही.त्यामुळे ब्रह्म आणि सत्,चित्,आनंद यांच्यामध्ये गुण गुणी संबंध मानता येत नाही.त्याचप्रमाणे ब्रह्म आणि त्याची सत्,चित् इत्यादी लक्षणांमध्ये अंश आणि अंशी असाही संबंध मानता येत नाही.कारण अंशी-अंशी असा संबंध फक्त सांश वस्तूंनाच लागू होतो.ब्रह्म हे अंशविरहित असल्याने त्याच्या संदर्भात तो लागू होत नाही.(५६)

**वस्तूचा एकदेशीं लक्षण। त्यासी अंश म्हणावें जाण। तिसरें लक्ष्यलक्षण। अंगिकारिलें।।५७।। लक्ष्य एक लक्षणें आन । म्हणसी होय द्वैतपण । शब्दास्तव दिसती भिन्न । परि एकार्थ असे ।।५८।।अनेक शब्द एकार्थी । शब्द पर्याय तया म्हणती । विप्र द्विजहि नामें असतीं। ब्राह्मणाचीं ।।५९।। नुसतें ब्रह्मचि बोधावें । तरि वेद ब्राह्मणा ब्रह्म नावें । अतिव्याप्तीस्तव स्वभावें । लक्षणें सिद्ध ।।६०।। सत् म्हणतां ब्रह्माच्या ठाईं । जडत्व ऐसें कल्पि कईं । तें निवारणार्थ ज्ञानाचि सोई । जें ब्रह्म चिद्रूप ।।६१।। ब्रह्म ह्मणावें चिद्रूप । तरि वृत्ति ज्ञानापरि असद्रूप। होय म्हणून सच्चिद्रूप। ब्रह्म म्हणावें।।६२।। जरी आनंदरूप नाहीं। मोक्ष पुरुषार्थ नसे कांही । अविद्यानिरासें आनंदही । प्राप्त साधका।।६३।। सच्चिदानंद हें लक्षण । लक्ष्य ब्रह्म हें परिपूर्ण । नांवें मात्र भिन्न भिन्न । वस्तु एक।।६४।।परस्परेंहि एकार्थि । लक्ष्यासी लक्षणें मिळती । सद्ब्रह्म चिद्ब्रह्म म्हणती । आनंदही ब्रह्म।।६५।।**

---

वस्तूचा एक मर्यादित भाग व्यापणारे एक लक्षण हेच तिचा अंश असे मानल्यास तिथे अंश-अंशी संबंध दाखवता येईल.पण लक्षणाला अंश म्हणणे योग्य नाही. या कारणाने हे दोन्ही पर्याय नाकारल्यामुळे तिसरा लक्ष्य-लक्षण संबंध स्वीकारला आहे.(५७) लक्ष्य हे एक असून त्याची लक्षणे त्यापासून वेगळी आहेत त्यामुळे त्यांमध्ये द्वैत मानावे लागते असे म्हणशील तर त्याचे उत्तर असे की, 'लक्ष्य' आणि 'लक्षण' या शब्दांमुळे ते भिन्न वाटत असले तरी त्यांचा अर्थ एकच आहे.(५८) एकच अर्थ असलेले असे अनेक शब्द जेव्हा एखाद्या भाषेत दिसतात, तेव्हा त्यांना शब्दपर्याय किंवा पर्यायी शब्द असे म्हणतात. उदाहरणार्थ, द्विज, विप्र हे पर्यायी शब्द एकाच ब्राह्मण या अर्थाचे निदर्शक होत.(५९) ब्रह्म शब्दाने केवळ ब्रह्माचाच बोध व्हावा, पण वेदांना आणि ब्राह्मणांनाही 'ब्रह्म' असेच नाव आहे. म्हणजे ब्रह्म शब्द उच्चारताच ब्रह्माखेरीज इतर दोन्ही नावांचा बोध होतो म्हणजे येथे अतिव्याप्तीचा दोष येतो. म्हणून सत्, चित्, आनंद ही ब्रह्माची लक्षणे सिद्ध होतात.(६०) केवळ ~~चिद्रूपाला ब्रह्म~~ म्हणावे तर ब्रह्माला जडत्व मानावे लागते. तसे होऊ नये म्हणून ब्रह्माच्या ठिकाणी ही ज्ञानाची जोड देण्यासाठी ब्रह्माला चिद्रूप मानावे लागते.(६१) चिद्रूपाला ब्रह्म म्हणावे तर वृत्तिज्ञानाप्रमाणे ते असद्रूप ठरण्याची शक्यता होती. म्हणून ब्रह्माला 'सच्चिद्रूप' असे मानावे लागते.(६२) आता ब्रह्म जर आनंदरूप नसेल तर मोक्ष हा पुरुषार्थ मानता येणार नाही. पुरुषार्थासाठी काही उद्दिष्ट असावे लागते. आनंद नसेल तर साधकाची ब्रह्मप्राप्तीकडे प्रवृत्ती तरी कशी होईल? अविद्येचा निरास झाल्याने साधकांना आनंद प्राप्त होतो. आनंद हेच ब्रह्मप्राप्तीचे प्रयोजन ठरते.(६३) तेव्हा सच्चिदानंद हे ब्रह्माचे लक्षण असून परिपूर्ण ब्रह्म हे लक्ष्य आहे. त्या ब्रह्माची नावे मात्र भिन्न भिन्न असून सद्वस्तू मात्र एकच आहे.(६४) ही लक्षणे आपापसात एकार्थी (एकाच अर्थाची) असून ती परब्रह्म या लक्ष्याला बरोबर लागू होतात. म्हणूनच सद्ब्रह्म, चिद्ब्रह्म, आनंदब्रह्म अशी नावे ब्रह्मासाठी वापरता येतात.(६५)

**ब्रह्मबोधार्थ ब्रह्मलक्षण । येथें नाहीं कीं दूषण । वस्तु अखंड दंडायमान। भेद कैंचा।।६६।। प्रकाश उष्ण वर्तुळ । एकचि जैसें सूर्यमंडळ । अतिव्याप्ती होय केवळ । अग्निसी एकांश टाकितां ।।६७।। एक एव अद्वितीय ब्रह्म । ऐसा श्रुतीचा अनुक्रम । त्रिविध भेदाचें नाम। खंडिले असे ।।६८।। एक म्हणतां सजातीय भेद । नाही हा श्रुतीचा अनुवाद । वस्तु अखंड अभेद । चित् दुसरें नाहीं ।।६९।। एव या अवधारणें । स्वगत भेदा खंडिले तेणें। निरवयवा बहुधा कोणें । कल्पावें हो ।।७०।। श्रुति अद्वितीय ऐसें बोले । जड-जाता निवारिलें। विजातीय भेदा खंडिलें । येणें रीती ।।७१।। अद्वैत ब्रह्म परिपूर्ण । तेथें कैचें लक्ष्य लक्षण । अनेकचि नाहीं एकपण । कोणें कोणा बोलावें।।७२।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ब्रह्मलक्षणनिर्धारे । प्रथमसमासः ।।१।।**

---

ब्रह्माचे ज्ञान व्हावे म्हणून तर ही ब्रह्मलक्षणे सांगावी लागतात. यात काही दोष नाही. या तीनही लक्षणांमध्ये एकच सद्वस्तू (ब्रह्म) व्यापून राहिलेली आहे. तेव्हा त्यांच्यामध्ये काहीच भेद नाही.(६६) प्रकाश, उष्ण, वाटोळे अशा तिन्ही लक्षणांनी निर्देश होणारे सूर्यमंडळ एकच असते. यातील वाटोळे हे लक्षण गाळले तर ते वर्णन अग्नीला लागू होईल व अतिव्याप्ती हा दोष येईल. (त्याचप्रमाणे बाकीच्या दोन लक्षणांबाबत समजावे. उष्णत्व हे लक्षण गाळले तर चंद्र असा बोध होईल व अतिव्याप्ती होईल. प्रकाश हे लक्षण गाळले तर उष्ण आणि प्रकाश या दोहोत साहचर्य असल्याने कोणतीही वस्तू सिद्ध होणार नाही. मग तेथे अव्याप्ती हा दोष येईल.)(६७) ब्रह्म हे एकटेच आणि अद्वितीय आहे, असे श्रुतीने सांगितले आहे. (एकमेवाद्वितीयं ब्रह्म) आणि त्यामुळे ब्रह्माच्या बाबतीत तीन प्रकारचे भेदही संभवत नाहीत. (सजातीय, विजातीय आणि स्वगत हे तीन भेद होत.)(६८) एक या लक्षणाने ब्रह्माच्या ठिकाणी सजातीय भेद नाही असे श्रुती सांगते. सद्वस्तू अथवा ब्रह्म अखंड, भेदरहित असून चिद्वस्तू ही सद्वस्तूहून वेगळी नसून अभिन्न आहे.(६९) अशा प्रकारे या निश्चित विधानाने ब्रह्माच्या ठिकाणी येणाऱ्या स्वगत भेदाचेही खंडन केलेआहे. जे मुळात निरवयव म्हणजे अवयवहीन आहे त्याच्या ठिकाणी बहुविध प्रकारांची कल्पना कोणाला करता येईल?(७०) श्रुतीने ब्रह्माचे अद्वितीय असे दुसरेही लक्षण सांगितले आहे. त्यायोगे यच्चयावत जड पदार्थांचे तिने निरसन केले आहे. अशा प्रकारे ब्रह्माच्या बाबतीत विजातीय भेदाचेही तिने खंडन केले आहे.(७१) ब्रह्म अद्वैत आणि परिपूर्ण असून तेथे लक्ष्य लक्षण हा भेदही खरे पाहता लागू होत नाही. जिथे अनेकत्वच नाही तिथे एकत्व तरी म्हणता येईल काय? तेथे बोलणारा तरी कोण आणि ऐकणारा तरी कोण?(७२)

## ।। श्रीराम समर्थ ।। समास २रा – मायाविद्याअविद्यावर्णन

**सांगितलें ब्रह्म निर्गुण । जें व्यापक निश्चल परिपूर्ण । तेंचि जाणिजे ब्रह्मज्ञान । परि मायाही समजावी ।।१।। हिरियाचा व्हावया लाभ । गारा पाहाव्या आरंभ । तैसा जाणिजे स्वप्रभ । मायानिरासें ।।२।। न जाणतां नव्हे त्याग । म्हणुन मायेचा प्रसंग । निर्धार होतां इचा मग । निश्चय सत्याचा ।।३।। माया मुळींच न संभवे । तरि निर्धारिं काज नसावें । वंध्यापुत्रासी वधावें। कोण निमित्त ।।४।। तरी ऐसी नव्हे मायाराणी । ब्रह्मादिकां न कळे करणी । शास्त्रें राहिली थोटाऊनी । अंत न लागे।।५।।हे अनंताची अनंती । हे परब्रह्माची शक्ति । सर्व जगाची स्थिति गती । इजवीण नाहीं।।६।।आपण जेथें प्रगटली। त्यासी निजऊन खेळे एकली । प्रकृती असुन जाली । पुरुषरूप आपण ।।७।। दुजेविण मांडिला भोग । अजत्वें उभविलें जग । नाना तत्त्वांची लगबग । एकपणा न मोडतां।।८।। आपण कामधेनु जाली । जीवेश वत्सा प्रसवली। दुग्धपान करऊं लागली । द्वैताचें यथेष्ट।।९।।इच्या स्वरूपाची मर्यादा। बोलतां शीण जाला वेदा । कोण पडे इच्या छंदा। अघटनही घडवी।।१०।।**

---

## पंचिका ३री, समास २रा - मायाविद्याअविद्यावर्णन

आतापर्यंत निर्गुण,व्यापक,निश्चल,परिपूर्ण अशा ब्रह्माचे वर्णन केले त्यालाच ब्रह्मज्ञान असे जाणावे.पण त्याचबरोबर मायाही समजली पाहिजे.(१)हिऱ्यांचा लाभ होण्यासाठी आरंभी गारा कशाला म्हणतात हे पाहिले पाहिजे.(हिरे व गारा यांत गारांचा त्याग करूनच हिऱ्यांची प्राप्ती होते.)त्याप्रमाणे मायेचे निरसन केल्यानंतरच स्वयंभू अशा ब्रह्माचे ज्ञान होते.(२)जर माहितीच नसेल तर त्याग कसा करता येईल?म्हणून मायेच्या वर्णनाची आवश्यकता वाटते.मायेच्या स्वरूपाचे निश्चित ज्ञान झाल्यानंतरच सत्य नेमके कशाला म्हणतात,याचा निश्चय होतो.(३)माया मुळातच उद्‌भवत नाही,अशी स्थिती असती तर सत्याचा निश्चय करण्याचे कारणच नव्हते.वांझेच्या पुत्राला ठार करण्यासाठी निमित्त शोधण्याची गरज आहे काय?(४)पण मायाराणी अशी नाही आहे.मोठमोठ्या ब्रह्मादी देवांनासुद्धा तिची करणी कळत नाही.शास्त्रे तिच्यापुढे थोटी होऊन बसतात,त्यांना तिचा अंत लागत नाही.(५)ही माया अनंताची अनंत शक्ती आहे.ती परब्रह्माची शक्ती आहे.सगळ्या जगाची स्थिती,गती(व्यवहार)हिच्यावाचून अडून बसतात.(६)ही माया अशी आहे,की ती जिथे जन्म घेते त्याला नष्ट करून एकटीच खेळत बसते.स्वत: प्रकृती असूनही स्वत:च पुरुषरूपही धारण करते.(७)ती दुसऱ्या कोणा पुरुषाची मदत न घेता उपभोग घेते व स्वत: न जन्मता जगाची उभारणी करते.स्वत:चे एकपण मोडू न देता निरनिराळ्या तत्त्वांची एकच गर्दी करून टाकते.(८)ती स्वत: कामधेनू बनली,तिने जीव आणि ईश्वर या वासरांना जन्म दिला आणि त्यांना द्वैतभावनारूपी दूध हवे तितके पाजू लागली.(९)हिच्या स्वरूपाची व्याप्ती करता करता वेदांना शीण आला.अघटित(कधीही न घडलेले)असे घडवण्याऱ्या हिच्या नादी कोण लागेल?(१०)

**असो इचा निर्धार। कळला पाहिजे साचार । श्रुति युक्ति लौकिक प्रकार । तीन जाणावे।।११।।**
**तुच्छ आणि अनिर्वचनी । वास्तव असे मायाराणी। ऐका ते सावध होउनी । प्रमाणसिद्ध।।१२।।**
**तुच्छत्वें माया कैसी। जें रूपचि नाहीं इयेसी । अस्ति भाति प्रियत्वासी । व्यवहार इचा।।१३।।**
**शुक्तिकेच्या ठाई काहीं। रजत तिळभरी नाहीं। असणें दिसणें सर्वही । शुक्तिका एक।।१४।।**
**शुक्तिका करून एकीकडे। रजत ताजवां न सांपडे। अस्ति भातिवीण निवडे। कैसी माया।।१५।।**
**अस्तित्व ब्रह्मीचें काढावें।चिद्रूप दिसणें त्यागावें । मायेचे रूप धुंडावें । मग तें कैसें।।१६।।तेथें**
**तरी कांही नाही। शून्यापरी निस्तत्व तेंही । माया निर्धारिंसि पाहिं। तुच्छत्वरूप।।१७।।**
**माया जाण अनिर्वचनीय।जेथें युक्ति क्षीण होय।नव्हे मायेचा निश्चय।नाना विकल्पीं[२१]।।१८।।**
**माया भिन्न कीं अभिन्न।अथवा म्हणावी भिन्नाभिन्न।कीं भिन्नाभिन्नविलक्षण।तेहि नाहीं।।१९।।**
**सावयव ना निरवयव। उभयात्मक उभयहीन वाव। सत् कीं असत् नांव। घेतलें न वचे।।२०।।**

---

तेव्हा हिच्या स्वरूपाचा निश्चय तर चांगल्या प्रकारे झाला पाहिजे त्यासाठी श्रुती (वेदाचा आधार अथवा वेदप्रामाण्य),युक्ती (म्हणजे अनुमान) आणि लौकिक (म्हणजे लोकव्यवहार) असे तीन प्रकार आहेत.(११) माया ही तुच्छ (तिरस्करणीय),अनिर्वचनीय (वर्णन करता न येणारी) आणि वास्तव अशी आहे. ही तिची लक्षणे प्रमाणसिद्ध असून ती सावध होऊन ऐका.(१२) माया ही तिरस्करणीय कशी? तर हिला रूपच नाही.तरी हिचा व्यवहार असणे, दिसणे आणि सुख या गुणांनी होतो.(१३) शिंपला असतो त्याच्यामध्ये चांदी अजिबात नसते. तिथे असणे,दिसणे,सुखकारक होणे या तिन्ही गोष्टी शिंपल्याच्याच असतात.(१४)शिंपला जर बाजूला काढला तर त्याच्यात दिसणारी जी चांदी असते ती काही तराजूने तोलता येत नाही आणि दिसणेही तिथे उरत नसल्याने असणे आणि दिसणे या दोन्ही गोष्टीं तिथे संभवत नाहीत.असणे आणि दिसणे या गुणांशिवाय मायेचा निवाडा कसा करता येईल?(१५)त्याप्रमाणे मुळात ब्रह्माचे ठिकाणी असणे,दिसणे आणि सुखरूपता ही लक्षणे आहेत. त्यातील असणे हे लक्षण काढून घेतले,त्याचे चिद्रूप म्हणजे भातित्व,त्याचा त्याग केला तर मग मायेचे रूप कसे शोधावे?(१६)मायेच्या ठिकाणी तर यांपैकी काहीच नाही.तीही शून्य कल्पनेप्रमाणे नि:सत्त्व आहे.त्यामुळे माया ही निश्चितपणे तिरस्करणीय ठरते.(१७)माया अनिर्वचनीय आहे,हे समजून घे.मायेपुढे युक्तिवाद क्षीण पडतो. कितीही पर्याय पुढे केले तरी मायेचा निश्चय होऊ शकत नाही. (मायेचे नेमके स्वरूप कळत नाही.)(१८)माया ब्रह्मापासून भिन्न आहे की अभिन्न आहे?अथवा ती भिन्नही आहे आणि अभिन्नही आहे,अशी उभयस्वरूपी आहे? किंवा भिन्नही नाही,अभिन्नही नाही,अथवा भिन्नाभिन्न अशी उभयस्वरूपीही नाही?तर तसेही म्हणता येत नाही.(१९)माया सावयव (अवयवांसहित) नाही,की अवयवविरहितही नाही,ती उभयात्मक (दोन्ही प्रकारची) आहे असेही म्हणता येत नाही.अथवा ती उभयहीन म्हणजे भिन्नही नाही,अभिन्नही नाही आणि उभयस्वरूपी नसणारीही नाही.तिच्याबाबतीत यापैकी काहीच बोलता येत नाही.तसेच सत्

**सदसत् उभयात्मक नसे । उभय विलक्षण काइसें । आतां हेंचि कैसें । निवडून दावूं।।२१।। माया म्हणावी भिन्न। तरी हे ब्रह्मशक्ती गहन। निवडितां नये एक क्षण। स्वरूपा वेगळी।।२२।। शुक्तितेहून रजतासी । काढितां नये निश्चयेसी । सच्चिद्‌रूपीं माया तैसी । भिन्न नव्हे।।२३।। जरी म्हणावी अभिन्न । तरी सर्वदां नसे विद्यमान । शक्ताची शक्ती असे जाण । कार्यानुमेय।।२४।।अग्नि असे सर्व काळ । तेथें शक्ति नसे सर्व वेळ । फोड येतां निवळ। कळूं येती।।२५।।तैसें जगत्कार्य जयेचें । तें रूप नव्हे शक्ताचें । जरी म्हणावें स्वरूपाचें। तरी सर्वदां नाहीं।।२६।।कार्यामुळें शक्ति आहे । वेगळी तो शक्त नव्हे । स्वीकार वेगळेपणें आहे। अवश्य भिन्न।।२७।।म्हणून अभिन्न माया नाहीं । उभयात्मक विरोध पाहीं। अंधार आणि प्रकाश कांही । एकत्र नसे।।२८।।भिन्नाभिन्नविलक्षण । येणेंहि बोलें दूषण । म्हणोनियां वचन । बोलतां नये।।२९।। सावयव माया म्हणावी । तरी अरूपा कोणें पाहावी । कार्य दिसे न दिसावी । शक्ति अग्नीची।।३०।।जग कांही माया नव्हे ।**

---

आणि असत् अशी परिभाषाही तिला लागू पडत नाही.(ती सत् नाही.असत् नाही.सदसत् नाही की सदसद्विलक्षणही नाही.)तिच्याबाबतीत याप्रकारचे नाव घेताच येत नाही.(२०)ती सत्,असत् आणि उभयात्मक यांपैकी काहीच नाही,तर मग ती उभयविलक्षणही कशी असू शकेल?आता हेच स्पष्ट करून सांगू.(२१)माया जर भिन्न म्हणावी तर ब्रह्माची शक्ती असणारी ही माया इतकी गूढ आहे की ब्रह्मस्वरूपापासून ती क्षणभरही वेगळी काढता येत नाही.(२२)शिंपल्यापासून त्यावर दिसणारी चांदी वेगळी कधीच काढता येत नाही,त्याप्रमाणे सच्चिद्रूप ब्रह्मापासून माया भिन्न नसते.(२३)जर ती ब्रह्मापासून अभिन्न आहे असे म्हटले तर ती नेहमी विद्यमान नसते.शक्तिमंताची जी शक्ती असते ती तिच्या कार्यावरून अनुमानाने कळत असते.(२४)अग्नी सर्व काळ असला तरी जाळण्याची शक्ती त्याजवळ सर्वकाळ नसते. हाताला फोड आल्यावरच ती लक्षात येते.(२५)ज्या मायेचे जगत् हे कार्य आहे,ते शक्तिमंत ब्रह्माचे स्वरूप नाही. ते ब्रह्माचेच स्वरूप आहे असे म्हटले तर ते (जगत्) सर्व काळ असत नाही.ब्रह्म मात्र सर्व काळ असते.(२६)स्वतंत्रपणे जगनिर्मितीला समर्थ नाही. तिचा वेगळेपणाने स्वीकार करता आला असता तर तिला भिन्न आहे असे अवश्य म्हणता आले असते.(२७)म्हणून माया अभिन्न नाही. आता उभयविध म्हणजे भिन्नाभिन्न आहे असे म्हटले तरी विरोध येतो. अंधार आणि प्रकाश हे एकत्र राहात नाहीत.(२८)जगद्रूपी कार्यावरून ती ब्रह्माची शक्ती आहे असे अनुमानाने ठरवता आले तरी ती मायेला भिन्नाभिन्न विलक्षण म्हणजे भिन्नही नाही आणि अभिन्नही असे म्हटले तर तसे म्हणण्यातही दूषण येते.म्हणून तशाप्रकारचे विधान करता येत नाही.(२९)माया सावयव आहे असे म्हणावे तर ती रूपहीन असल्यामुळे तिला कोठे पहावे? तिचे कार्य दिसते पण ती दिसत नाही. अग्नीची शक्ती दिसत नाही,पण तिचे कार्य मात्र दिसते. तसेच हे आहे.(३०) जगाला माया म्हणून संबोधता

**जग जिचें कार्य आहे। तयेसी कोण पाहताहे। अरूपा ती।।३१।।निरवयव म्हणावी माया। तरि सावयवता जगत्कार्या। मृगजळीं पिकती जैसिया । साळि केळी।।३२।।सावयव निरावयव उभय । हें विरोधि बोलतां नये । उभयहीन तो न होय । पदार्थ कोठें।।३३।।माया सत् कां न म्हणा । तरी प्रवर्तलीं शास्त्रें नाना । गुरु शास्त्र विचारणा । मायानिरासार्थ।।३४।। माया सत् जरी असती। तरी स्वानुभवें न निरसती । साधका ब्रह्मप्राप्ती । कैसेंनी होय।।३५।। आतां तरी माया असत् । तरी जगत्कार्य दिसत। नाभाव परिणमत । न्यायार्थ ऐसा।।३६।। म्हणून असत् म्हणतां नये। सदसत् विरोध होय । विलक्षण सदसत् उभय। तिसरें नाहीं।।३७।। एवं द्वादश विकल्प होतां।मृगजळा नये निर्धारितां। या परि अनिर्वचनीयता। मायेसि असे।।३८।। ब्रह्म माया अनिर्वचनी। एकार्थ मानितील कोणी। ये विशी दृष्टांत देऊनी । साम्य मोडिलें।।३९।। साखर गोड नये सांगतां । मृगजळही नये बोलतां । साकर ब्रह्म तत्वता । माया मृगजळ।।४०।।**

---

येणार नाही,मग जग जिचे कार्य आहे त्या मायेला कोण पाहू शकेल?अर्थात् कोणालाही ते शक्य नाही. म्हणून ती अरूप अशीच आहे.जिला रूपच नाही ती माया सावयव कशी म्हणता येईल?(३१)आता मायेला निरवयव म्हणावे तर तिचे कार्य असलेले जग सावयव आहे. मृगजळापासून साळी केळी कशा पिकतील?(निरवयवापासून सावयव सृष्टी कशी निर्माण होईल?)(३२)माया सावयवही आहे आणि निरवयवही आहे असे परस्परविरोधी विधान करता येत नाही आणि ती उभयहीन म्हणजे सावयवही नाही आणि निरवयवही नाही असेही म्हणता येणार नाही. कारण असा दोन्ही गुणधर्महीन पदार्थ कोठेही मिळणार नाही.(३३)मायेला सत् का म्हणू नये?याचे उत्तर असे की माया सत् नाही हे सांगणारी अनेक शास्त्रे निर्माण झाली आहेत.निरनिराळी शास्त्रे,सद्गुरू आणि निरनिराळ्या विचारप्रणाली ही सर्व मायेच्या निरासासाठीच उत्पन्न झाली आहेत.(३४)माया जर सत् असती तर स्वानुभवाने तिचे निरसन झालेच नसते.तसेच मायेचे निरसन झाल्यानंतरच प्राप्त होणारी ब्रह्मप्राप्ती साधकाला कशी काय झाली असती?(३५)आता मायेला असत् म्हटले तर जगताच्या रूपाने तिचे कार्य दिसते आहे.अभावातून काहीच परिणाम निष्पन्न होत नाही,असा न्यायशास्त्राचा अभिप्राय आहे.(३६)म्हणून मायेला असत् म्हणता येणार नाही. ती सत् आणि असत् अशी उभयस्वरूपी आहे असे म्हणण्यात विरोध आहे. तसेच ती सत् आणि असत् या दोहोहून वेगळी आहे असेही म्हणता येत नाही. कारण असा तिसरा पदार्थच संभवत नाही.(३७)अशा प्रकारचे बारा विकल्प जरी पुढे ठेवले तरी मृगजळाचे अस्तित्व सिद्ध करता येणार नाही.त्याप्रमाणेच माया ही अनिर्वचनीय आहे असेच म्हणणे क्रमप्राप्त ठरते.(३८)आता ब्रह्महीअनिर्वचनीय आहे,मायाही अनिर्वचनीय आहे. तेव्हा ही दोन्ही तत्त्वे एकच आहेत असे कोणी मानतील तर त्यासाठी दृष्टान्ताच्या साहाय्याने त्यांचे साम्य मोडून काढता येईल.(३९)साखर गोड आहे. ती कशी गोड आहे हे सांगता येत नाही. म्हणून ती अनिर्वचनीय आहे. तद्वत् मृगजळाबद्दलही काही बोलता येत

**मृगजळा नव्हे विकल्प। इतुकेनें नव्हे वास्तवरूप। मृगचि मानिती अल्प । बुद्धिहीन ते।।४१।। तैसे सांसारिक जन।तया माया सत्य हें वचन।व्यवहार नव्हे शक्तिवीण। लौकिकीं सत्य।।४२।। तुच्छ म्हणतसे श्रुती । अनिर्वचनी नाना युक्ति । वास्तव ते लोकरीती । त्रिविधा माया।।४३।। हे अज्ञानीं नांदत। ज्ञानीं अंग न धरित । स्वानुभवें असेना सत् । साधका ब्रह्मप्राप्ति।।४४।। जालें मायेचें निरूपण। विद्या अविद्या शक्ति दोन । विद्या म्हणजे ज्ञान । अज्ञान अविद्या।।४५।। रज्जूचें जें आच्छादन। आवरण शक्ति अभिधान। सर्पाचें जें उत्पादन । ते विक्षेप शक्ति।।४६।। स्वरूपासिजे आवरक । दुसीर जगदुत्पादक। आवरण आणि विक्षेपक । शक्ति अनादि दोन्ही ।।४७।। आवरण शक्ति अविद्या । विक्षेप शक्ति ते विद्या । उभयें व्यापिले साद्या। जीव मात्र ।।४८।। विक्षेप शक्ति ज्ञान। न स्वीकारिजें वचन । तरी जडासी नव्हे चळण। जगदांध्य प्रसंग ।।४९।। म्हणोनि विद्या विक्षेप शक्ति । जयेतें शुद्धसत्वा म्हणती । असो**

---

नाही.म्हणून तेही अनिर्वचनीय आहे.पण त्यामुळे साखर आणि मृगजळ एकच ठरणार नाहीत.साखरेची गोडी आपण चाखू शकतो.मृगजळात भिजल्याचा अनुभव आपल्याला घेता येत नाही. ब्रह्म हे साखरेच्या अनुभवासारखे आहे.माया ही मृगजळाच्या अनुभवासारखी आहे,(असे समजावे.)(४०)मृगजळाला सत्,असत्,सदसत्,सदसद्विलक्षण असा कुठलाच विकल्प लागू होत नाही म्हणून त्याला वास्तवपणा येत नाही.मात्र हरिण त्याला वास्तव मानतात,कारण ते अल्पबुद्धीचे अथवा बुद्धिहीन असतात.(४१)त्याप्रमाणे सांसारिक जनांना माया सत्य आहे हे वचन मान्य होते.कारण प्रापंचिक व्यवहार अशा अनिर्वचनीय शक्तीवाचून होत नाही,हे लौकिक सत्य आहे.(४२)वेद मायेला तुच्छ (तिरस्करणीय,त्याज्य) मानतात, निरनिराळ्या युक्तिवादांनी ती अनिर्वचनीय ठरते आणि लोक व्यवहारात ती सत्य ठरते.अशी ही माया तीन प्रकारची आहे.(४३)ही माया अज्ञानामध्ये (सुखाने) राहाते.पण ज्ञानामध्ये तिला अस्तित्व नसते. स्वानुभवाने ती सत् नाही असे ठरते.(मायेचा नाश झाला की)साधकाला ब्रह्मप्राप्ती होतेच.(४४)मायेचे निरूपण झाले.आता मायेच्या विद्या आणि अविद्या अशा दोन शक्ती आहेत.विद्या म्हणजे ज्ञान असून अविद्या म्हणजे अज्ञान होय.(४५)सर्प आणि दोरी या प्रसिद्ध दृष्टान्तामधील दोरी झाकली जाते या प्रकाराला आवरणशक्ती असे नाव आहे आणि दोरीच्या जागी जो सर्प दिसतो त्याला विक्षेपशक्ती असे म्हणतात.(४६)आवरणशक्ती ब्रह्मस्वरूपावर आवरण घालते,तर विक्षेपशक्ती ही त्या जागी जगाची उत्पत्ती करते.अशा या आवरक आणि विक्षेपक दोन शक्ती अनादी(आरंभरहित) आहेत.(४७) आवरणशक्ती म्हणजेच अविद्या आणि विक्षेपशक्ती ही विद्या होय.या दोन्ही शक्तींनी सर्व जीवांना व्यापून टाकले आहे.(४८)विक्षेप शक्ती म्हणजे ज्ञान होय.हे म्हणणे मान्य केले नाही तर जडाच्या ठिकाणी हालचाल उत्पन्न होणार नाही आणि जगदांध्य म्हणजे जंगमाच्या ठिकाणी जाणीव राहणार नाही.(४९)म्हणून विद्या ही विक्षेपशक्ती मानावी लागते.तिला शुद्धसत्त्वा असे म्हणतात.हे असो.आता आवरणशक्तीचे

**आवरण शक्तीची गती । सांगणे नलगे।।५०।। मी जीव मज अज्ञान । मज आहे जन्म मरण । ऐसे जीव भुलले जीचेनें।मळिणसत्व अविद्या।।५१।। न होतां अविद्यानिरसन।कैचें होय स्वानुभव ज्ञान।मोक्ष नव्हे ज्ञानेंविण।ज्ञान पावन सर्वांसी।।५२।। अविद्या हे अनादि। कांही जयेते नसे आदि। परि हे ज्ञानासी विरोधी। तेजा तम जैसें।।५३।। स्वस्वरूप स्वयंप्रकाश।तेथें तमा कैसा अवकाश।करुनिया आशंकेस।बोलता जाला।।५४।। स्वरूप सर्वां अविरोध।नसे पदार्थमात्रीं विरोध।आकाश जैसें स्वतःसिद्ध।तेजा तमासी।।५५।। आकाश सर्वांसी व्यापक। जगत् जितुकें अनेक। होतां जातां अलेपक। निश्चल जैसें।।५६।।तैसें जें जें उद्भवलें। तितुकें स्वरूपींच वर्तलें। अस्तिभातिविण राहिलें। न वचे कदा।।५७।। मूळमायेपासून भूमि।पावेतों तत्वें अनुक्रमीं। या सर्वाची वास्तव भूमि। जें अधिष्ठान ब्रह्म।।५८।। तेजातमा विरोध असे।ज्ञानाज्ञाना एकत्व नसे।ज्ञान होतां अपैसें। अज्ञानहानी।।५९।।बहुता काळाचें विवर।कोंडिलें असतां अंधार।तेथे नलगे कीं उशीर।दीप लावितां नासे।।६०।। जेचक्षणीं ज्ञान होय। तेच क्षणीं अज्ञान जाय। म्हणून ज्ञानाचा उपाय। साधकीं योजावा।।६१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । मायाविद्याअविद्यावर्णनानुकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

---

कार्य वेगळे सांगण्याची गरज नाही.(५०)मी जीव आहे.माझ्या ठिकाणी अज्ञान आहे,मला जन्म-मरण आहेत असा भ्रम जीवांना जिच्यामुळे होतो ती आवरणशक्तिरूप अविद्या होय.तिला मलिन सत्त्वा (रजतमयुक्त)असे म्हणतात.(५१)या अविद्येचे निरसन झाले नाही तर स्वानुभवाचे ज्ञान कसे होईल? ज्ञानाशिवाय मोक्ष मिळणार नाही.ज्ञान हे सर्वांसाठीच पवित्र आहे.(५२)अविद्या ही अनादी आहे,कारण तिला आरंभ नाही,प्रकाशाला जसा अंधकार त्याप्रमाणे ती विद्येला म्हणजे ज्ञानाला विरोधी आहे.(५३)स्वस्वरूप तर स्वयंप्रकाशी आहे,तेथे अंधाराला वाव कोठून असणार?अशी शंका कोणी व्यक्त केली तर त्याचे स्पष्टीकरण असे(५४)स्वरूप म्हणजे ब्रह्माच्या ठिकाणी कोणासही विरोध नाही.सर्व पदार्थ त्यात सामावू शकतात.आकाशात प्रकाशाला, अंधाराला सारखाच वाव आहे.(५५) आकाश सर्व पदार्थांना व्यापून असते.जगामध्ये जे जे अनेक पदार्थ उत्पन्न होतात, नष्ट होतात त्या सर्वांपासून आकाश अलिप्त असते, निर्लेप असते आणि ते सर्वदा निश्चल राहाते.(५६) त्याप्रमाणे जे जे पदार्थ उत्पन्न होतात.ते सर्व ब्रह्मातच राहतात. यांमध्ये ब्रह्माचीच अस्ति-भाति-प्रियत्व ही लक्षणे असतात. त्यांवाचून त्यांना अस्तित्वच मिळू शकत नाही.(५७) मूळमायेपासून भूमीपर्यंत जी तत्त्वे क्रमशः निर्माण झाली त्या सर्वांची मूळ आधारभूमी हे अधिष्ठान ब्रह्मच आहे.(५८)तेज आणि अंधकार यांच्यात विरोध आहे. ज्ञान-अज्ञान ही एक नव्हेत. ज्ञान प्राप्त होताच आपोआपच अज्ञानाचा नाश होणारच.(५९) एखादे विवर पुष्कळ दिवस बंद करून ठेवले तर त्यात दाटून राहिलेला अंधार दिवा लावताक्षणीच नष्ट होतो.(६०) त्याप्रमाणे ज्या क्षणी ज्ञान होते त्याच क्षणी अज्ञान नाहीसे होते. म्हणून साधकाने ज्ञानाचाच मार्ग धरावा.(६१)

## ।। श्रीराम समर्थ ।। समास ३रा - ईशनिर्धार

**आकाशीं वायूचें चलण । तैसें परब्रह्मीं स्फुरण । चंचली बिंबले चैतन्य । तोचि ईश्वर।।१।। मायेमध्ये व्यापिलें । तें सगुण ब्रह्म बोलिलें । मायागुणें त्यासि आलें । सर्वज्ञपण ।।२।। सर्व पुरींचा ईश । म्हणोनि नामें पुरुष । जगदिच्छा जयास । जगदीश ऐसें ।।३।।सर्व जगातें नियमन । सर्वांतरीं राहुन । करी नियंता आपण । अंतर्यामित्वें ।।४।।ऐसिया अनंत श्रुती। यातें जगदीश्वर म्हणती। विक्षेपादि अनंत शक्ति। वर्तवितो सर्वज्ञ।।५।।येथें शास्त्राचें भांडण। मतें स्थापिती अनान। आणि लौकिकीही जन। विपरीत भाविती।।६।।व्हावया मतें खंडण। कीजें सर्वही निरूपण। करिती ईश्वर अनुवादन आवडी सारिखें।।७।।अनंत करचरण। अनंत जयाचें वदन। स्वर्गादि हें त्रिभुवन। अवयव जया।।८।।पुरुषसूक्तीं बोलिला। श्रुतिप्रमाण असे याला । आणि अर्जुनें अवलोकिला । श्रीकृष्णकृपें।।९।।ऐसा हा विराट पुरुष। हाचि सर्वांचा ईश। विराळवादी म्हणती यास। जगदीश्वर।।१०।।हैरण्यगर्भ म्हणें हें कैसें। दृश्यासी ईश्वरत्व काइसें। जेणें ब्रह्मांड चळतसे। तो सूत्रात्मा ईश्वरू।।११।।**

---

## पंचिका ३री, समास ३रा - ईशनिर्धार

आकाशात वायूची झुळूक निर्माण होते,त्याप्रमाणे परब्रह्माच्या ठिकाणी जी स्फूर्ती निर्माण होते,त्या चंचल स्फूर्तीमध्ये जो चैतन्याचा भाग प्रतिबिंबित होतो त्यास ईश्वर म्हणतात.(१)तो भाग मायेने व्यापलेला असल्यामुळे त्यास सगुण ब्रह्म असे म्हणतात.मायेच्या योगाने त्याच्या ठिकाणी सर्वज्ञपण येते.(२)त्याला पुरुष नाव पडण्याचे कारण तो सर्व पुरींचा ईश म्हणजे स्वामी असतो.त्याला जगत् निर्माण करण्याची इच्छा होते म्हणून त्यास जगदीश असे म्हणतात.(३)तो सर्व जगाचा नियामक असून तो सर्वांच्या अंतर्यामी राहून जगाचे नियमन करत असतो.(४)अशाप्रकारे अनंत श्रुती(वेद)याला जगदीश्वर म्हणतात.तो सर्वज्ञ असून विक्षेपादी(मूळ स्वरूपाला झाकून टाकते ती आवरणशक्ती आणि त्या जागी नवीन रूपाची निर्मिती करते ती विक्षेप शक्ती)अनंत शक्तींचे चालन करतो.(५)ईश्वराच्या स्वरूपाबद्दल आणि कार्याबद्दल अनेक शास्त्रे आपापसात भांडत आहेत.शास्त्रे आपापली भिन्न भिन्न मते पुढे मांडत आहेत.त्याचप्रमाणे लौकिक व्यवहारातही सर्व लोक परस्परविरुद्ध कल्पना करत आहेत.(६)इतरांच्या मताचे खंडन करण्यासाठी सर्वजण स्वत:चे निरूपण करतात.ते आपल्या आवडीनुसार ईश्वराचे प्रतिपादन करत असतात.(७)ईश्वराला अनंत हात आहेत,अनंत पाय आहेत.त्याला अनंत तोंडे आहेत. स्वर्ग इत्यादी सर्व लोक हे त्याचे अवयव आहेत.(८)पुरुषसूक्तामध्ये वरीलप्रमाणे त्याचे वर्णन केले आहे.त्या वर्णनाला वेदाची मान्यता आहे आणि अर्जुनाने श्रीकृष्णाच्या कृपेने त्याचे प्रत्यक्ष अवलोकन केले आहे.(पहा-भगवद्गीता अ.११वा)(९)असा हा विराट पुरुष असून तोच सर्वांचा ईश्वर आहे.विराळवादी लोक त्याला जगदीश्वर म्हणतात.(१०)हिरण्यगर्भ पक्षाचे लोक म्हणतात,'हे कसे शक्य आहे?जे दृश्य

**सर्व मणीयांत सूत्र असे । जडीं चलण जें होतसें । सूक्ष्म चांचल्यत्व जया असे । हिरण्यगर्भ ईश्वरू।।१२।।एक म्हणती सृष्टि चलण । दोहोंसी अव्याकृत कारण। तयासी ईश्वर अभिधान । दुजिया नाहीं।।१३।।एक म्हणे माया ईश्वरू। हें जग जयेचा विस्तारू। अर्धनारी नटेश्वरू। दुजा नाहीं।।१४।।एक म्हणे सृष्टि उत्पत्ति। परमाणु पासून होती। म्हणोनि ईश्वरू आणिकाप्रती । बोलोंच नये।।१५।।एक म्हणती चतुरानन । करी सृष्टीचें सृजन। ईश्वर तरी त्याहुन। कोण असे।।१६।।जेव्हा ब्रह्मया संकट पडिलें । तेव्हां विष्णूचें स्मरण केलें। नाना अवतार धरिले। पाळिलें त्रैलोक्य।।१७।।जे जे भक्त पृथ्वीवरि।तयासि नाना संकटीं तारी । ईश्वरु हा निर्धारि । विष्णूच एक।।१८।।जेव्हां विष प्रगटलें । तेव्हां विष्णूनें स्मरण केलें । मग सदाशिवें प्राशिलें । सर्वही विष।।१९।।तेव्हां पंचवदन ईश्वरु। हाचि करिती निर्धारु। तोही स्मरला विघ्नहरु। त्रिपुरवधा जातां।।२०।।ईश्वरु तो गणपति।**

---

आहे त्याला ईश्वर कसे मानता येईल? माळेमधील सूत्राप्रमाणे सर्वांच्या अंतर्यामी राहून जगाचे जो नियमन करतो त्याला हिरण्यगर्भ म्हणतात. तो अंतर्यामी हाच ईश्वर आहे.(११) सर्व मण्यांमध्ये जसे एकच सूत्र अनुस्यूत असते, त्याप्रमाणे सर्व दृश्य सृष्टीला जो व्यापून असतो तोच हिरण्यगर्भ होय. त्याच्या योगानेच जड पदार्थांमध्ये सुद्धा चलनवलन होते (वारा वाहतो, नदी वाहाते, पृथ्वी स्वत:भोवती व सूर्याभोवती भ्रमण करते इत्यादी.) जो सर्व पदार्थांना सूक्ष्म रूपाने व्यापून असतो, जो चंचल असतो त्याला हिरण्यगर्भ, ईश्वर असे म्हणतात,(१२)काहीजण म्हणतात की, सृष्टी आणि चलनवलनाचा व्यापार यांच्यामागे जे अव्याकृत अनिर्वचनीय कारण असते त्यालाच ईश्वर असे म्हणावे. इतर कुठल्याही पदार्थाला ते नाव देता येत नाही.(१३) दुसरे काहीजण म्हणतात की, माया हाच ईश्वर आहे. हे जग तिचाच विस्तार आहे. ती अर्धनारीनटेश्वर आहे. दुसरे कोणी नाही.(१४) दुसरे लोक असे म्हणतात की, सृष्टीची उत्पत्ती परमाणूंपासून होते. म्हणून यांच्याखेरीज इतरांना ईश्वर म्हणूच नये.(१५) काहीजण म्हणतात की, ब्रह्मदेव हाच सृष्टीची उत्पत्ती करतो. मग ईश्वर त्याच्याखेरीज दुसरा कोण असणार?(१६) दुसरे काहीजण म्हणतात, जेव्हा जेव्हा ब्रह्मदेवाला संकट पडले, तेव्हा तेव्हा त्याने विष्णूचे स्मरण केले. त्यानेही त्याच्या विनंतीवरून अनेक अवतार धारण केले आणि त्रैलोक्याचे पालन केले.(१७) पृथ्वीवर जे जे त्याचे भक्त झाले, त्यांना त्याने संकटांतून पार पाडले. त्यामुळे निश्चितपणे हा विष्णूच एकमेव ईश्वर आहे.(१८) दुसरे काहीजण म्हणतात, क्षीरसागराच्या मंथनाच्या प्रसंगी जेव्हा विष प्रगट झाले, तेव्हा विष्णूने शंकरांचे स्मरण केले. तेव्हा सदाशिव श्रीशंकरांनीच सर्व विष प्राशन केले.(१९) तेव्हा पंचमुखी श्रीशिवशंकर हाच खरा ईश्वर आहे, असा ते निश्चय करतात. मग दुसरे म्हणतात की, त्रिपुरांचा वध करण्यासाठी जात असता त्यालाही विघ्नहर्त्या श्रीगणेशाचे स्मरण करावे लागले.(२०) तेव्हा गणपती हाच खरा ईश्वर आहे,असे गाणपत्यांचे

**गाणपत्य म्हणती । शाक्त म्हणती। शक्ति सर्वेश्वरु ।।२१।। सौर म्हणती सूर्य नारायण। एक म्हणे सहस्त्रनयन । ईश्वरु हा सूर्यनंदन । दंडकर्ता ।।२२।। एक म्हणती प्रारब्ध । एक म्हणे आकाश शब्द। एक म्हणती वायू प्रसिद्ध । सर्वा चाळक।।२३।। एक म्हणती अग्निदेव । एक म्हणती आपोदेव । एक म्हणती धरी सर्व । वसुंधरा ।।२४।। पृथ्वी उचलिता शेष । तोचि सर्वांचा ईश । कूर्म वराह सावकाश । म्हणती कोणी ।।२५।। मल्हारी भैरव वेताळ । भूमंडळीचे देव सकळ । किती करिती कोल्हाळ । आपुलाले परी।।२६।। तुळसी पिंपळ पळस । पूजिताती सावकाश । किती सांगावे पाषाणास । धातुपूजन करिती ।।२७।। कुदळी पानें तृण । अवघियांचें करिती पूजन । म्हणती आम्हां ईशान । बहु भाग्य देतो ।।२८।। आवडी सारिखें बोलती । जे ते वादा प्रवर्तती। आपुलेंचि खरें म्हणती । इतर तें खोटें।।२९।। येथें कोणीं आशंका केली। पूजका फळें कैसी जालीं । तरि ते भावनेनें फळली । वासनाबळें ।।३०।। असो हे विरोधाचे बोलणें।**

---

म्हणजे गणपतिभक्तांचे मत आहे. याउलट शक्तीचे उपासक जे शाक्त ते म्हणतात की, शक्ती हीच सर्वेश्वर आहे.(२१)सूर्याचे उपासक असलेले सौर म्हणतात की, सूर्य नारायण हाच खरा ईश्वर होय,तर दुसरे म्हणतात की, हजार डोळे असलेला इंद्र हाच परमेश्वर आहे. तर इतर काहीजण म्हणतात की,मनुष्यांच्या पापपुण्यांचा हिशेब ठेवून मृत्यूनंतर त्यांना शिक्षा करणारा सूर्यपुत्र यमराज हाच खरा ईश्वर आहे.(२२)काही म्हणतात, प्रारब्ध हेच ईश्वर आहे. कोणी आकाशाला ईश्वर मानतात,कोणी शब्द हाच ईश्वर मानतात,तर कोणी सर्वांचा चालक म्हणून प्रसिद्ध असलेला वायू हाच ईश्वर आहे असे मानतात.(२३)काही जण अग्नीला देव मानतात, काही जण आप म्हणजे जल ही देवता मानतात,तर काही जण पृथ्वी ही सर्वांना धारण करते म्हणून तिलाच देव मानतात.(२४) काही जण शेष हा सर्व पृथ्वीचा भार उचलतो म्हणून त्यालाच सर्वांचा ईश्वर मानतात. काही जण कासव,वराह या अवतारांना ईश्वर मानतात.(२५)याप्रमाणे मल्हारी,भैरव,वेताळ इत्यादी पृथ्वीवरच्या सर्व देवांना आपापल्या परीने मोठा गलका करून ईश्वर मानण्याचा अट्टाहास कित्येक लोक करत आहेत.(२६) काही लोक शांतपणे तुळस,पिंपळ,पळस या वृक्षांचीही ईश्वर म्हणून पूजा करतात. आता आणखी किती सांगावे? निरनिराळे लोक पाषाण,धातू यांचीही पूजा करतात.(२७) काही जण कुदळी,पाने,गवत यांची पूजा करतात. ते म्हणतात की आम्हांला आमचा ईश्वर पुष्कळ भाग्य देतो.(२८) प्रत्येकजण आपापल्या आवडीप्रमाणे बोलतो. आपले म्हणणे कोणी ऐकले नाही तर विवाद करायला प्रवृत्त होतात. ते आपलेच खरे असून इतरांचे म्हणणे खोटे आहे असे म्हणतात.(२९)यावर कोणी शंका घेतील की हे भिन्न भिन्न देव खरे नसतील तर त्यांची पूजा करणारांना फळे कशी मिळतात? यावर उत्तर असे की त्यांच्या भावनेमुळे आणि वासनेमुळे ही फळे त्यांना मिळतात.(३०) आता ही परस्परविरोधी मते बाजूला ठेवू.

**अतिव्याप्ती होय येणें । एक ईश्वरु बहुधा कोणें । सत्य मानावें।।३१।।तरि अविरोधि तें कोणतें। तेंचि बोलिजे निगुते। सर्व मतासी मान्य होतें। आणि श्रुतिप्रमाण।।३२।।तृणापासून मूळमायेतें । चैतन्यचि चेष्टवितें । वर्तवून अलिप्त राहतें । तोचि ईश्वरु।।३३।।सर्वव्यापी सर्वाधार । आदि करुनी हरिहर । चैतन्य एक जगदीश्वर । दुसरा नाहीं।।३४।।जेथें जैसा जेणें भाविला। तेथें तैसा तया प्रगटला। ऐसिया वचनें विरोध आला। कोण तो सांगा।।३५।। सर्वज्ञ आणि सर्वशक्ति।तो एकची जगज्जोती। येविशीं अनंत श्रुती। असती वेदाच्या।।३६।।सर्व ईश्वरुचि म्हणतां।पूजकासी फळें विषमता।वेगळालीं दिसतीं तत्वतां।काय म्हणोनि।।३७।।तरी रज तम सत्व गुण। त्रिविधा श्रद्धेचें लक्षण। जैसें जयाचें कल्पी मन। तैसेच फळ तयासी।।३८।। जैसा जयाचा भाव । तैसाचि होतसे देव । येथें न धरावा अभाव । ईश्वरु एकचि।।३९।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषदत्तात्पर्यानुसारे । ईशनिर्धारप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - जीवनिर्धार

**निर्विकारीं जें स्फुरण । तेथेंचि असती ज्ञानाज्ञान । विद्याप्रतिबिंब ईशान । पूर्वीं निरोपिला।।१।।**

---

ही सगळी मते अतिव्याप्ती या दोषाने युक्त आहेत. म्हणजे ईश्वर एकच असताना ईश्वरत्व अनेक व्यक्ती आणि पदार्थांना लागू केले जात आहे. ईश्वर एकच असताना त्याला बहुविध ठरविणारी मते कोण मान्य करील?(३१)तर कोणाचाही विरोध होणार नाही असेच मत आता सांगू. ते सर्व मतवाद्यांना स्वीकार्यही असेल आणि वेदांनाही मान्य होईल.(३२) गवतापासून मूळमायेपर्यंत सर्व पदार्थांना एक चैतन्यतत्त्वच व्यापार करायला लावते. ते चेतन तत्त्व सर्वांना व्यापार करायला लावते आणि स्वत: मात्र अलिप्त राहते. तोच ईश्वर होय.(३३) जे सर्वव्यापी असून हरिहर आदिकरून सर्वांना आधारभूत आहे. ते चैतन्यमय तत्त्वच जगाचा परमेश्वर आहे, दुसरे कोणी नाही.(३४) ज्या ठिकाणी ज्याने त्याची जशी कल्पना केली त्या ठिकाणी त्याच्यापुढे त्याच्या कल्पनेप्रमाणे तो प्रकट होतो असे सांगितल्यानंतर कोणता विरोध येतो सांगा.(३५) जो सर्वज्ञ आहे आणि सर्वशक्तिमान आहे असा जगज्ज्योती अंतरात्मा एकच आहे. या संदर्भात वेदाची अनेक वचने आहेत.(३६) सर्व काही ईश्वरच आहे असे आपण म्हणता मग पूजकांना विषम (असमान) फळे का मिळतात? ही मिळणारी फळे वेगवेगळी का दिसतात?(३७) याचे उत्तर असे की, पूजकाची श्रद्धा सत्त्व, रज, तम या तीन गुणांनुसार तीन प्रकारची असते. ज्याचे मन जशी कल्पना करते, तसेच फळ त्याला मिळते.(३८) ज्याचा भाव जसा असेल तसाच त्याचा देव होतो. येथे अभावात्मक कल्पना करू नये. ईश्वर हा एकच आहे.(३९)

### पंचिका ३री, समास ४था - जीवनिर्धार

निर्विकार अशा ब्रह्माच्या ठिकाणी जे स्फुरण निर्माण होते, त्या स्फुरणातच ज्ञान म्हणजे विद्या आणि

**अविद्या अज्ञान नेणिव । तेथें बिंबलें चैतन्य नांव । तयासी बोलिजे जीव । चिदाभास।।२।। भूतांपासुनी निर्मिलें । सूक्ष्म तत्व जें जें जालें । सप्तदश मिश्रित केलें । हिरण्यगर्भ जें।।३।। सूत्रात्मा जया म्हणती । तेथें व्यापली जगज्जोती । समष्टि तादात्म्यें जें चिति । म्हणुन ईश्वरु ।।४।। तेचि पृथकाकारें विभागलें । चहू खाणींत प्रवेशलें । व्यष्टितादात्म्यें विसरलें । व्यापकपणा ।।५।। म्हणुन व्यष्टीचा अभिमान । लिंगाध्यासें भिन्न भिन्न । तयासी जीव हे अभिधान । बोलिजेतें ।।६।। भूतांचे करुन पंचीकरण । खाणी ज्या केल्या निर्माण । उत्तम मध्यम आणि हीन । ती प्रकारें ।।७।। लिंगाध्यासें चैतन्य । प्रवेशलें भिन्नभिन्न । जितुक्या उपाधि संपूर्ण । तितुकेहि जीव ।।८।। एक असून वेगळें जालें। उपाधि सारिखें विकारलें। तितुकेंचि त्यासी स्फुरण जालें। मी मी ऐसें ।।९।।उत्तम उपाधि ते कोणती । कळली पाहिजे निश्चिती । म्हणुनीया सांगिजेती। पृथकाकारें।।१०।।**

---

अज्ञान म्हणजे अविद्या असतात. विद्येतील ब्रह्माचे प्रतिबिंब म्हणजेच ईश्वर होय, हे पूर्वीच सांगितले आहे.(१)अविद्या म्हणजे अज्ञान अथवा नेणीव होय. तिच्यात चैतन्य तत्त्वाचे म्हणजे ब्रह्माचे जे प्रतिबिंब पडते,त्याला जीव असे म्हणतात.ते चैतन्याचा आभास असते म्हणून त्याला चिदाभास असे म्हणतात.(२) पंचमहाभूतांपासून जी सूक्ष्म सतरा तत्त्वे(पाच प्राण,पाच कर्मेन्द्रिये,पाच ज्ञानेन्द्रिये,मन आणि बुद्धी)निर्माण झाली ती परस्परात कालवली. त्या सर्वांच्या ठायी अंतर्यामित्वाने असणारा जो सूत्ररूप आत्मा त्याला हिरण्यगर्भ असे म्हणतात.(३)त्यालाच सूत्रात्मा असेही नाव आहे. तोच जगज्ज्योती, अंतरात्मा आहे. तो समष्टिरूपाने असून चैतन्यरूप आहे.म्हणून त्याला ईश्वर म्हणतात.(थोडक्यात तो सर्व ब्रह्मांडाचा समष्टिरूप अंतरात्मा आहे.)(४) तेच चैतन्यतत्त्व वेगवेगळ्या व्यक्तींनुसार विभक्त झाले आणि अंडज,जारज,स्वेदज आणि उद्भिज्ज अशा चार खाणीत प्रविष्ट झाले तेव्हा त्याला आपल्या व्यापकपणाचा विसर पडला आणि त्याला व्यष्टितादात्म्य प्राप्त झाले.(५)त्याच्या ठिकाणी व्यष्टीचा (म्हणजे विशिष्ट पिंडाचा अथवा देहाचा)अभिमान निर्माण झाला, लिंगाध्यासाने (आपण वेगळा असा सूक्ष्म देह आहोत या आभासयुक्त ज्ञानाने) तो भिन्न भिन्न वाटू लागला,त्याला जीव असे नाव दिले जाते.(६)पंचमहाभूतांचे पंचीकरण करून ज्या खाणी निर्माण केल्या तो उत्तम, मध्यम आणि हीन अशा तीन प्रकारच्या होत.(७)लिंगाध्यासाने म्हणजे लिंगदेहाचा म्हणजेच सूक्ष्म देहाचा आत्म्यावर आरोप करून जेवढे वेगवेगळे लिंगदेह निर्माण झाले त्यात चैतन्याचा प्रवेश झाला. अशा प्रकारे जेवढ्या उपाधी तेवढे जीव निर्माण झाले.(८)मुळात ते एकच चैतन्य असले तरी उपाधिभेदाने ते भिन्न भिन्न वाटू लागले आणि त्या त्या उपाधींनुसार त्यात विकार झाले. जेवढे विकार झाले तेवढीच 'मीपणाची' भिन्न भिन्न स्फुरणे त्यात निर्माण झाली.(९)आता वर म्हटल्याप्रमाणे त्यांमध्ये उत्तम, मध्यम आणि हीन असे प्रकार निर्माण झाले. त्यांमध्ये उत्तम उपाधी कोणती ते कळले पाहिजे म्हणून तिचे स्वतंत्रपणे निरूपण केले पाहिजे.(१०)

**देव यक्ष गंधर्व गण। इंद्र चंद्रादि मरुद्गण। जेथें विशेष सत्वगुण। उत्तमदेह।।११।।त्यांतही असे मिश्रित। रजतमाचें गूढत्व। म्हणुनिया उत्तमांत। तीन विभाग।।१२।।सत्वसत्वात्मक देव। रजसत्वात्मक गंधर्व। यक्षगणादि सर्व। तमसत्वात्मक।।१३।।मर्त्यादि हे मध्यम। जाणीव नेणीव सम। हे रजात्मक अनुक्रम। तेहि त्रिविध।।१४।।सत्वरजात्मक मानव। रजरजात्मक गो अश्व। तमरजात्मक पशु पक्षि जीव। बहुत असती।।१५।।तमोगुण नेणीव लक्षण। जे कनिष्ठ सर्वाहून। त्याचेहि प्रकार तीन। पूर्वानुसार।।१६।।सत्वतमात्मक दानव। रजतमात्मक रक्ष सर्व। तमातमात्मक क्रूरभाव। तिर्यगादि।।१७।।गुणीं गुण कालवलें। बहुधा प्रकारें वेगळाले। जीव चैतन्य तैसें जालें। सौम्य क्रूर मध्यम।।१८।। आप सहज मधुर। बहु वनस्पति औषधि मात्र। तैसें तैसें कडू क्षार। गोडही जाले।।१९।। जंगमीं जालें चंचळ। स्थावरीं असे निश्चळ। दिसे न दिसे परी केवळ। जीवचैतन्य असे।।२०।। जीव स्थावरीं नाहीं। ऐसें न कल्पावें कांही। वृक्ष पाषाण सर्वही। जीवेंविन वाढतीना।।२१।।**

---

देव, यक्ष, गंधर्वसमूह, इंद्र, चंद्र, मरुद्गण या सर्वांमध्ये सत्त्वगुण विशेष असतो म्हणून त्यांना उत्तम जीव समजावे.(११) त्यांमध्येही रज-तम हे गुण गूढपणे मिश्रित असतात. त्यानुसार त्यांतही तीन विभाग होतात.(१२) सत्त्वगुणाचे प्राधान्य असलेले सात्त्विक जीव म्हणजे देव रजोगुणाचे वर्चस्व असलेले सात्त्विक जीव म्हणजे गंधर्व आणि यक्षगण इत्यादी बाकीचे सर्व जीव तमोगुणप्रधान सात्त्विक जीव समजावेत.(१३) मर्त्य मानव इत्यादी जीव मध्यमवर्गातले आहेत. त्यांच्यामध्ये ज्ञान आणि अज्ञान ही दोन्ही समसमान असतात. त्या सर्वांत रजोगुणाचे प्राबल्य असते. त्यातही सत्त्वरजादी गुणांच्या कमीअधिक प्रमाणानुसार तीन प्रकार होतात.(१४) सत्त्वगुणप्रधान रजात्मक जीव म्हणजे मानव होत. रजोगुणप्रधान राजसिक जीव म्हणजे गाय, घोडे इत्यादी पशू होत. तमोगुणप्रधान राजसिक जीव म्हणजे अन्य प्राणी आणि पक्षी होत. ते संख्येने पुष्कळ असतात.(१५) तमोगुण हा अज्ञानस्वरूप असतो. तमोगुणी सर्वांहून कनिष्ठ असून त्यांचेही पूर्वीप्रमाणेच तीन प्रकार होतात.(१६) सत्त्वगुणप्रधान तमोगुणी जीव म्हणजे दानव होत. रजोगुणप्रधान तमोगुणी जीव म्हणजे राक्षस होत आणि तमोगुणप्रधान तमोगुणी जीव म्हणजे क्रूर स्वभावाचे राक्षस, पिशाचादी जीव होत.(१७) गुणांचे परस्परात मिश्रण होऊन त्यांचे अनेक भिन्न भिन्न प्रकार निर्माण झाले. त्यांच्या कमी अधिक प्रमाणानुसार जीवचैतन्यांचे ही सौम्य, क्रूर, मध्यम इत्यादी प्रकार निर्माण झाले.(१८) पाणी स्वभावतः गोड असते. पण अनेक वनस्पती, औषधी यांच्या संपर्काने ते कडू, खारट, गोड असे होते.(१९) त्याप्रमाणे जीवचैतन्य जंगम पदार्थात चंचल, स्थावर पदार्थात निश्चल होते. ते तसे दिसो न दिसो ते केवळ जीवचैतन्यच असते.(२०) स्थावर पदार्थात जीव नाही अशी कल्पना करू नये. वृक्ष, पाषाण वगैरे सर्व पदार्थ जीव असल्याखेरीज वाढले असते का?(२१)

**एवं उत्तम मध्यम अधम । त्रिविध केला अनुक्रम । देहमात्र जितुका नाम । तो तो जीव।।२२।। तोचि विष्णू तोचि महेश । तोचि इंद्र तोचि गणेश । तोचि मानवीं चिदाभास। श्रुति म्हणें ।।२३।। देव दानव मानव । ते ते अवघे जरी जीव । तरी भज्य भजकत्व वेगळिव । काय म्हणोनी ।।२४।। इच्छा होतां देह धरिला । स्वरूपविस्मरण नसे त्याला। तेणें गुणें व्यवहार जाला । तरी नित्यमुक्तता ढळेना ।।२५।। इच्छेसारिखें सामर्थ्य मोठें। तेणें जाले देव लाटे । इतर प्राणी ते करंटे । आणि ज्ञानहीन ।।२६।। नित्यमुक्तत्व गेलें। किंचिज्ज्ञत्व ठाकून आलें । विषय वांछूं लागले । आवडी सारिखा ।।२७।। मग ब्रह्मा म्हणे प्रजेसी । आदरा वेगें कर्मासी । कर्में इच्छिल्या फळासी । पावाल सहज ।।२८।। यज्ञादि कर्में करिती । तेणें देव संतुष्ट होती । पर्जन्य वृष्टि करिती । तेणें पिकतीं सर्व धान्यें[२२] ।।२९।। प्रपंची कांही संकट पडिलें । तें देवें निवारिलें । मग सहज भजूं लागले। प्राणिमात्र ।।३०।। नाना धरुनि अवतार । दुष्टाचा करी संव्हार । घेणें भक्तांचा कैवार। कृपाळु देव ।।३१।। कोठे स्वामी कोठे सेवक । परि जिन्नस मासला एक । येथें नसे कीं कुतर्क । श्रुतिसिद्ध असे ।।३२।। स्वर्ग मृत्यु पाताल वासी । राहणें असे जिवासी । जो**

---

अशा प्रकारे उत्तम, मध्यम, अधम असे त्रिविध प्रकार स्पष्ट केले. जेवढे म्हणून देह आहेत ते ते सर्व जीवच होत.(२२) जीवच विष्णू आहे. जीवच महेश आहे. मनुष्यांमधील चिदाभासही तोच आहे, असे श्रुती सांगते.(२३) यावर शंका अशी की, देव, दानव, मानव हे सगळेच जरी जीव असले तरी त्यांच्यामध्ये हा भज्य, हा भजक असा भेद कशामुळे उत्पन्न होतो?(२४) यावर उत्तर असे की, देव हे स्वेच्छेने देह धारण करतात. देह धारण केल्यानंतरही त्यांना स्वरूपाचे विस्मरण नसते. त्यामुळे त्या देहांकरवी काही व्यापार झाले तरी त्यांची नित्यमुक्त ही स्थिती ढळत नाही.(२५) इच्छेप्रमाणेच देवांचे सामर्थ्यही मोठे आहे, त्यामुळे देव बलवंत ठरले. त्यांच्यापुढे इतर प्राणी करंटे आणि ज्ञानहीन ठरले.(२६) त्यांची नित्यमुक्तता गेली आणि केवळ अल्पज्ञान वाट्यास आले. आपल्या आवडीनुसार विषयांची इच्छा करत राहिले.(२७) मग ब्रह्मदेव या आपल्या प्रजेला म्हणाला, "तुम्ही आता वेगाने कर्मे करायला लागा. म्हणजे या कर्मांच्या साहाय्याने इच्छिली फळे सहजपणे मिळवू शकाल."(२८) मग ही माणसे यज्ञादी कर्मे करू लागली. त्यामुळे देव संतुष्ट होऊ लागले. ते मग पर्जन्यवृष्टी करू लागले, त्या योगाने सर्व पिके पिकू लागली.(२९) प्रपंचात काही संकट आले त्यांचे देवाने निवारण केले. तेव्हा साहजिकच सर्व प्राणी त्या देवाला भजू लागले.(३०) देव कृपाळू असल्यामुळे तो निरनिराळे अवतार घेऊन दुष्टांचा संहार करतो, तो भक्तांची बाजू घेऊन त्यांचे रक्षण करतो.(३१) कोठे स्वामी, कोठे सेवक अशा भिन्न भिन्न भूमिका असल्या तरी मूळ पदार्थ एकच. हा कुतर्क नाही तर वेदांनीच मान्य केलेला हा सिद्धान्त आहे.(३२) जीवांना स्वर्ग, मृत्युलोक अथवा पाताळ अशा लोकांत

**जो कर्मे करी जैसीं।फळें तैसीं भोगित।।३३।।देव भोगिती नित्य सुख।कीटकादिकां नाना दुःख।मानवांसी सुख दुःख।अवश्य भोगवी।।३४।।ईश्वर नियंता जीव न्यामक। जीव भ्राम्य ईश भ्रामक।माया गुणें काळाचें चाक। फिरवितसे[२३]।।३६।।निमिषापासून कल्पवरि।तें कालचक्र निर्धारीं।तें ईश्वराचिये करीं।जीवहारी भ्रमताति।।३७।।जीव पिंडीं राहतसे। परि ईशाचे स्थान कैसें। ये विशीं श्रुति असे। वचन ऐका।।३८।।प्रपंचाचिये वृक्षीं।बैसले असती दोन पक्षी।एक विषय फळातें भक्षी।एक साक्षी अभोक्ता[२४]।।३९।।नाना देह हे घट जाणावे। लिंग देह जळ ओळखावें। तेथें प्रतिबिंब तया नावें। जीव ऐसे।।४०।। चैतन्यासारिखा भास। तया नांव चिदाभास। येथुनी हा समास। पूर्ण जाला।।४१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । जीवनिर्धारप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - जीवेशसृष्टप्रकार

**माया अविद्या जीवेश्वर । निरोपिले हे चत्वार । याचें अधिष्ठान जें साचार । तेंहि बोलिलें।।१।। आतां हे पांचही पुढती । निरोपिजे यथामती । एकत्र यांची स्थिति गति ।**

---

वास्तव्य करावे लागते. जो जशी कर्मे करील तशी फळे त्याला भोगावी लागतात.(३३) देव नेहमी सुखे भोगतात,कीटकांना निरनिराळ्या प्रकारची दुःखे भोगावी लागतात, तर मानवांना सुख आणि दुःख दोन्ही भोगावी लागतात.(३४) ईश्वर नियंता असून जीव भोक्ता आहे. या वचनाची व्यवस्था कशी लावायची? तर ईश्वर हा जीवाच्या संचिताला अनुसरून वागतो.(३५) ईश्वर नियंता असून जीव हा त्याच्या तंत्राने फिरणारा असतो. ईश्वर हा चुंबक असून जीव त्याच्याबरोबर फिरणारा पदार्थ आहे. तो मायेच्या साहाय्याने काळाचे चाक फिरवत असतो.(३६) ते कालचक्र निमिषापासून कल्पापर्यंत कालाचे नियंत्रण करत आहे. ते कालचक्र ईश्वराच्या हातात असून जीव त्याच्याबरोबर रांगेत फिरत असतात.(३७) जीव पिंडात (शरीरात) राहतो, पण ईश्वराचे स्थान कोणते? याविषयी वेदवचन आहे ते ऐका.(३८) प्रपंचरूपी वृक्षावर दोन पक्षी बसले आहेत. त्यातील एक पक्षी विषयरूपी फळ खात आहे आणि दुसरा काही न खाता साक्षी बनून ते पाहत आहे.(३९) निरनिराळे देह हे घट जाणावेत. लिंगदेह त्यातील पाण्याप्रमाणे आहेत. त्या पाण्यात पडणारे प्रतिबिंब म्हणजे जीव होत.(४०) हा जीव चैतन्यासारखा भासतो, म्हणून त्याला चिदाभास असे म्हणतात. येथे हा समास पूर्ण झाला.(४१)

## पंचिका ३री, समास ५वा - जीवेशसृष्टप्रकार

आतापर्यंत माया, अविद्या, जीव आणि ईश्वर या चार तत्त्वांचे निरूपण केले. यांचे सत्य अधिष्ठान जे ब्रह्म आहे त्याचेही निरूपण केले.(१) आता या पाचांचेही यापुढे आणखी निरूपण करायचे आहे.

**विनियोग कैसा।।२।।माया हे प्रकृति जाण । मायावी हा ईशान । जगदादि जालें जें निर्माण। ते अवयव दोहींचे[२५]।।३।।माया अविद्या हे अरिसे । उभयीं प्रतिबिंब जें भासें। ते जाणावी आभासें। जीवेश दोन्हीं।।४।।जैसा कोणी एक पुरुष। निरंजनी निद्रिस्थ संतोष। दुजे न देखतां आणि आपणास। मी हा असें स्मरेना।।५।।तयासि जाली आठवण। कांही क्रीडावें आपण।म्हणून कल्पिली अश्विन। वरी आपण बैसला।।६।।घोडी तरी सत्य नसे। तैसाच बैसणारहि असे। खरा पुरुष नुठतां कैसें। घोडी फेरिता जाला।।७।।फेरितां फेरितां अटखळे घोडी। आपण खाली घाली उडी। एका वृक्षाचिये बुडीं। धरुन घोडी बैसला।।८।। पूर्व स्थळीं जो निजेला।तो मी हें निःशेष विसरला। हा मी जो का बैसला। घोडी हातीं।।९।। तेथें काल्पलीं उदंडें। हत्ती रथ पदाति घोडे। वरुति बैसणारही कोडे। आपणची जाला।।१०।। आपण जो का बैसला।तयासिही विसरला। आपण बहुधा जाला । स्मरणास्मरणें ।।११।।कोठें राजा कोठें रंक। कोठें स्वामी कोठें सेवक। वस्त्र शस्त्र अमोलिक। जाला कटक निजांगें।।१२।।**

---

यांची सुटी रूपे स्पष्ट केली.पण ती सर्व एकत्र आली असता त्यांची स्थिती, व्यवहार कसे होतात त्यांचा विनियोग (उपयोग) कसा होतो ते आता पहायचे आहे.(२) प्रथम माया म्हणजेच प्रकृती होय. हे समजून घ्या. ईश्वर हा मायी म्हणजे मायेचे अधिष्ठान आहे. या दोहोंपासून जे जगत् इत्यादी निर्माण झाले ते या दोहोंचेही अवयव जाणावेत.(३)माया आणि अविद्या ही दोन्ही तत्त्वे आरशासारखी समजावीत. या दोहोंच्या मध्ये जी ब्रह्माची किंवा मुख्य आत्म्याची प्रतिबिंबे पडतात त्यांना अनुक्रमे ईश्वर आणि जीव समजावे. ते दोन्हीही आभासरूप आहेत.(४)कोणी एक पुरुष आहे तो एकांतात शांतपणे झोपलेला आहे त्या अवस्थेत अतिशय संतुष्ट आहे. आपणाहून दुसऱ्या कशाचेही त्याला स्मरण नाही. इतकेच काय आपल्या मीपणाचेही त्याला स्मरण नाही.(५) अशा अवस्थेत स्वस्थपणे निजला असताना त्याला एकाएकी आपण काही क्रीडा करावी म्हणून त्याने कल्पनेने एक घोडी निर्माण केली. तो तिच्यावर स्वार झाला.(६)घोडी सत्य नव्हती. तसाच त्या घोडीवर बसणारा पुरुषही खरा नव्हता. खरा पुरुष तर निवांत झोपला होता. तो उठला नसतानाच त्याने घोडीला कसे फिरवून आणले?(७)तो घोडीला फिरवत असताना ती घोडी अडखळली. तेव्हा त्याने खाली उडी मारली. त्यानंतर त्या घोडीला धरून तो एका झाडाखाली बुंध्याजवळ बसला.(८) पूर्वीच्या ठिकाणी जो मनुष्य झोपलेला होता, तो आपणच आहोत हे तो विसरला. तो स्वत:ला घोडी हाताने पकडून वृक्षाखाली बसलेला मनुष्यच समजत होता.(९) तेथेही त्याने अनेक हत्ती, रथ, पायदळ, घोडे यांची कल्पना केली. त्यांवर बसणारा आपणच अशीही कल्पना त्याने केली.(१०) त्यावेळी झाडाखाली घोडी हातात धरून बसणाऱ्यालाही तो विसरला आणि या स्मरण आणि विस्मरणाच्या खेळात स्वत:ची त्याने अनेक रूपे कल्पिली.(११)कधी राजा, कधी रंक,कधी स्वामी,कधी सेवक,मूल्यवान वस्त्रे, शस्त्रे, सैन्य इत्यादी सर्व आपणच होऊ लागला.(१२)

जी न जाणे तयासी। स्वतां नेणे आपणासी। मग आहे हें कायिसी। चावटि करा ।।२०।।



**मग एकपणही विसरला । बहुधापणें भांबावला । तों अकस्मात् पडिला घाला । परराष्ट्राचा।।१३।। दोन्हीं दळें मिळालीं। एक मारिती एक मेलीं । कितेक घायाळें जालीं। हा हा करिती।।१४।।कोठें सुखी कोठें दुःखी । ऐसी होतां भुताटकी । मुळी निजेला तो एकाएकी। आपणा स्मरता जाला।।१५।।पाहतां आपुलें एकपण । निःशेष हरपलें बहुपण। हत्ती घोडे बसणेंपण । तेंहि नाहीं ।।१६।। या दृष्टांता पडिपाडें । दार्ष्टान्तींही बोलणें घडे। तेंचि आतां उघडें । सावध ऐका।।१७।।एक ब्रह्म निराकार । सच्चिदानंद अपार । त्रिविध भेदाचा अणुमात्र । स्पर्शचि नाहीं ।।१८।। दुसरेंचि नाहीं पाहे कोण । दुजेवीण एकलेंपण। हेहि नाहीं आठवण । ज्ञानाज्ञानातीत।।१९** तरि तो पुरुष निजेला तो आणिकांना **आपणाला। न दिसे नेणें परि निजेला । तोचि कवणू ।।२१।। तैसें दुजें जेथें नाहीं । तरी कोण कोणातें पाही । जाणता जाणण्याते कही । जाणों शकेना ।।२२।। न जाणतां परी आपण आहे। तो सर्वथा नाहीं नव्हे । पुढें आठवण जी होताहे । तेंचि कोणा ।।२३।।म्हणुन नाहीं म्हणणे अयुक्त । जें सर्वदा असे सदोदित । शून्यवादियाचा घात । सहजचि जाला।।२४।।**

---

मग आपण एकटे आहोत हेही तो विसरला आणि स्वत:च्या विविध अनेक रूपांनी तो भांबावला.तेवढ्यात तेथे अकस्मात परराष्ट्राचे आक्रमण झाले.(१३)दोन्ही सैन्ये एकमेकाला भिडली. कोणी मारत होते.कोणी मेली, कित्येकजण घायाळ होऊन हा हा असा आक्रोश करू लागले.(१४)कोठे सुखी माणसे होती,तर कोठे दु:खी माणसे होती.अशा प्रकारचा भुताटकीसारखा हा प्रकार चालू असताना एकाएकी त्याला त्या मूळच्या निजलेल्या पुरुषाचे स्मरण झाले.(१५)आपले ते एकटेपण पाहताक्षणीच,त्याचे अनेकपण पूर्णपणे हरवले.मग हत्ती,घोडे,त्यांवर बसणे इत्यादी सर्व नाहीसे झाले.(१६)या दृष्टान्ताच्या बरोबरीने त्यातील दार्ष्टन्तिकही आता स्पष्ट करून सांगितले पाहिजे.तेच आता सांगतो.सावध होऊन ऐका.(१७)मुळात ब्रह्म एकमेवाद्वितीय,निराकार,सच्चिदानंदस्वरूप,अनंत,अपार असे आहे.त्याच्या ठिकाणी सजातीय,विजातीय, स्वगत या भेदांचा अणुमात्र स्पर्श नाही असे आहे.(१८)तेथे दुसरे कोणी अजिबातच नाही तर त्याला पहाणार कोण?दुसऱ्याअभावी आपण एकटेच आहोत याचीही त्याला आठवण नसते.ते ज्ञान आणि अज्ञान यांच्या पलीकडचे असते.(१९)त्याला कोणी जाणत नाही,तो स्वत:च स्वत:ला जाणत नाही अशा परिस्थितीत तो आहे अशी निरर्थक बडबड तरी कशासाठी करायची?(२०)तर तो निजलेला पुरुष इतरांना तर सोडाच,स्वत:लाही दिसत नव्हता.स्वत:ला ओळखत नव्हता.पण मग तो झोपला होता तो कोण होता?(२१)त्याप्रमाणे जेथे दुसरे कोणीच नव्हते,तेथे कोण कोणाला पहात होते?जाणणारा माणूस जाणण्याच्या क्रियेला स्वत: जाणू शकत नाही.(२२)तो स्वत:ला जाणत नसला तरी तो स्वत: होता.तो पूर्णपणे नव्हता असे होत नाही.कारण नंतरच्या त्याला जे स्मरण झाले ते कुणाला झाले?(२३)म्हणून त्या एकलेपणामध्ये तो नव्हता असे म्हणणे योग्य नाही.तो सर्वकाळी सदोदित असतो.त्यामुळे शून्यवादी

**मी ब्रह्म हे आठवण।ऐसें जालें पुढें स्मरण।निर्विकारीं विकार पूर्ण।हाचि जाणावा।।२५।।आठवू जरी न होतां।तरी एकपणा मुकला होता।आठवणीसरिसी अनंता।सुखेच्छा जाली।।२६।। त्या स्फुरणीं दोन प्रकार । चळण आणी जाणीव थोर। चंचलते घोडी बैसणार । तोचि जाणता ।।२७।।आपण एक हें विसरला । चंचलातें जाणों लागला । विस्मरणें आपणा चुकला । ऐसें नाहीं।।२८।।निद्रस्थ ठाईंचा खरा जाता । तरिच निर्विकार विकारता । तो तैसाचिही असतां । मिथ्या विकार।।२९।।चंचलीं जो जाणता। तोचि मायेचा नियंता । तेणें निर्मिले ज्या पदार्था । ईश्वरसृष्ट म्हणे श्रुति।।३०।।ईक्षणापासून प्रवेशवरी । तें तें ईश्वरसृष्ट निर्धारी । जें जें तत्व उत्पन्न करी। स्वतां करी प्रवेश।।३१।।गुणभूतें उद्भवलीं। ते ते जाण त्या चळणें निर्मिलीं। अष्टधेची मिळणी[२६] जाली। तेव्हां प्रगटल्या खाणी।।३२।। चौखाणींचीं अनंत शरीरें। प्रगटती जालीं अपारें। जीवांशें प्रवेशतां बारे। विलंब नाहीं।।३३।। अपंचीकृत सप्तदश। पंचीकृत देखतां देहास। आपुलाल्या स्थानीं वास। करिते जाले।।३४।।**

---

लोकांचे खंडन सहजगत्या झाले.(२४) आपण ब्रह्म आहोत, असे स्मरण त्याला नंतरच्या काळात झाले. यालाच निर्विकाराच्या ठिकाणी झालेला विकार म्हणावा.(२५) हे स्मरण झाले नव्हते तोपर्यंत त्याला एकलेपणाचेही स्मरण नव्हते. पण ते स्मरण होताच त्या अनंत ब्रह्माला सुखेच्छा निर्माण झाली.(२६)ब्रह्माला आपलेपणाचे स्मरण होणे यालाच त्याच्या ठिकाणी झालेले स्फुरण म्हणतात. त्या स्फुरणाचे दोन प्रकार आहेत. चलन आणि ज्ञान. चंचलतारूप घोडीवर बसणारा तोच ज्ञाता होय.(२७)आपण एकटेच आहोत हे तो विसरला व चंचल दृश्याला जाणू लागला. पण त्या विस्मरणामुळे तो स्वत: हरवला होता असे होत नाही.(२८) झोपलेला माणूस आपल्या स्थानापासून खरेच गेला असता तर त्या निर्विकारामध्ये बदल (विकास) झाला असे म्हणता आले असते. पण तो तर जसा होता तसाच आहे. त्याअर्थी त्याच्यात झालेला विकार किंवा बदल हा मिथ्या म्हणजे खोटा ठरतो.(२९) चंचलाचा जो जाणता असतो तोच त्या मायेचा नियंताही असतो. त्याने निर्माण केलेल्या पदार्थांना श्रुती (म्हणजे वेद) ईश्वरसृष्ट असे म्हणते.(३०) ईक्षणापासून (अवलोकनापासून) प्रवेशापर्यंतचे सर्व ईश्वरसृष्ट आहे, हे लक्षात घ्या. तो जे जे तत्त्व निर्माण करतो, त्यात स्वत: प्रवेश करतो.(३१) त्यानंतर जे त्रिगुण आणि पंचमहाभूते निर्माण होतात ती सर्व त्याच्या चलनामुळे निर्माण होतात. अहंकार, मन, बुद्धी आणि पंचमहाभूते अशी अष्टधा प्रकृतीची जुळवाजुळव झाली की जीवांच्या निरनिराळ्या खाणी प्रगट होतात.(३२)मग अंडज, जारज, स्वेदज आणि उद्भिज्ज अशा चार खाणींची अनंत, अमर्याद शरीरे निर्माण होतात. त्यात लगेच जीवांश प्रवेश करतात. त्या प्रवेशाला विलंब लागत नाही.(३३)पंचमहाभूतांच्या मिश्रणाने तयार झालेल्या स्थूल देहास पहाताच त्यात अपंचीकृत अशी लिंगदेहाची सतरा तत्त्वे त्यात प्रवेश करतात आणि आपापल्या जागा धरून बसतात.(३४)

**हा गुणाभूतांचा विकार।उपक्रमीं याचा विस्तार।येथें बोलिला प्रवेश मात्र।तोचि अवधारा।।३५।। अग्नि वाचा होऊनी। प्रवेशता जाला वदनीं। वायु प्राणवेष घेऊनी। नासीकीं प्रवेशे।।३६।। आदित्य चक्षु जाला। डोळियांत प्रवेशला। श्रोत्र होणें दिशेला। प्रवेश कर्णीं ।।३७।।औषधी वनस्पति केश । होऊनि त्वचीं प्रवेश । चंद्रातें मनोरूपें वास। हृदयभुवनीं।।३८।। मृत्य होऊन अपान । प्रवेशला गुदस्थान । आप तें रेत होऊन । शिश्नीं राहिलें[२७]।।३९।।इतकें बोलिलें अरणीं।तितुकें निवेदिलें ये क्षणीं।न्यूनाधिक इंद्रिय श्रेणी। न बोलतां ते प्रवेशली।।४०।। ऐसे सर्वही प्रवेशतां । परि नये विषईं वर्ततां। मग या सर्व देवता। प्रार्थित्या जाल्या।।४१।। आपणावीण नव्हे चळण । ऐसें जाणोनि ईशान। कपालत्रय भेदुन। जीवरूपें प्रवेशला।।४२।। स्थावर जंगमें पहिलीं।निर्मून जगज्जोती प्रवेशिली।मग स्थावरें वाढू लागलीं।चळूं लागलीं जंगमें।।४३।।ईशसृष्टि इतुकी । पुरुषें कल्पिली सेना निकी । वरी बैसणार अनेका। तैसा जीवरूपी प्रवेशे।।४४।।ईशें जितुकें निर्मिलें। तितुकें जीवेसी भोग्य जाले। कन्येतें पित्यानें निर्मिलें। भोग्य जाली भर्त्यासी।।४५।ईशें पदार्थमात्र निर्मिलें तरि जीवें तेथें काय केलें ।**

---

गुण आणि भूतांच्या विकासाचा हा भाग सृष्टीची उत्पत्ती या विभागात त्यांचा विस्तार करून सांगण्यात येतो. येथे फक्त प्रवेशापुरता भाग सांगितला आहे. तो लक्ष देऊन ऐका.(३५) अग्नीने वाचेचे रूप घेऊन मुखात प्रवेश केला, वायूने प्राणांचा वेश घेऊन नासिकेत प्रवेश केला.(३६) आदित्याने चक्षुरूप घेऊन डोळ्यांत प्रवेश केला. दिशांनी श्रवणेंद्रिये बनून कर्णात प्रवेश केला.(३७) औषधी वनस्पतींनी केस होऊन त्वचेमध्ये प्रवेश केला तर चंद्राने मनोरूपाने हृदयात प्रवेश केला.(३८) मृत्यूने अपानाचे रूप घेऊन गुदद्वारात प्रवेश केला आणि जल रेतरूपाने शिश्नामध्ये राहिले.(३९) ऐतरेय उपनिषदात इतके सांगितले आहे. ते सर्व या क्षणी सांगितले. अशा प्रकारे कमीजास्त इंद्रियांनी शरीराच्या निरनिराळ्या भागात प्रवेश केला.(४०) अशा प्रकारे सर्व इंद्रियांनी शरीरात प्रवेश केला खरा, पण त्यांना विषयांपर्यंत जाता येत नव्हते. तेव्हा या सर्व देवतांनी परमेश्वराची प्रार्थना केली.(४१) तेव्हा आपल्याशिवाय देहात चलनवलन होऊ शकणार नाही, असे ओळखून ईश्वराने टाळूचा भेद करून शरीरामध्ये जीवरूपाने प्रवेश केला.(४२) स्थावर जंगम असे पदार्थ ईश्वराने अगोदर निर्माण केले त्या सर्वात ईश्वराने (जगज्जोती, अंतर्यामी) प्रवेश केला. मग त्यावर पदार्थ वाढू लागले आणि जंगम पदार्थ हालचाल करू लागले.(४३) मागे निजलेल्या पुरुषाने जसे केवळ सैन्य निर्माण केले. त्याप्रमाणे त्यातील वाहनांवर बसणारेही अनेक निर्माण केले. त्याप्रमाणे परमेश्वराने अनेक जीवांच्या रूपाने सर्व निर्माण केलेल्या पदार्थांत प्रवेश केला.(४४) ईश्वराने जेवढे पदार्थ निर्माण केले तितके सगळे जीवाला भोग्य म्हणून प्राप्त झाले. बापाने कन्येला निर्माण केले आणि ती तिच्या नवऱ्याला भोग्य झाली असा हा प्रकार झाला.(४५) ईश्वराने सर्व पदार्थ निर्माण केले. पण जीवाचे तेथे कार्य काय? असा आक्षेप कोणी केला

**ऐसिये आक्षेपीं ऐकिलें । पाहिजें उत्तर।।४६।।जागृति स्वप्न सुषुप्ति आदि । अंतिं मोक्ष प्रतिपादी । जीवसृष्टि हे वेदीं । प्रतिष्ठिली असे।।४७।।जीवें वेगळें नाहीं निर्मिलें । ईशनिर्मिता भोग्या आणिलें । तेणेंसि व्यवहारूं लागलें । आपपर कल्पुनी।।४८।।एक स्त्री निर्मिली देवें । नाना कल्पना केली जीवें । माता भगिनी स्वभावें । स्नुषा कन्या[२१]।।४९।। पुत्र बंधु श्वशुर पिता । नावें जाली प्रतियोगी होतां । मनोमयातें निर्मिता। होय जीव।।५०।। माझें तुझें हें कल्पिलें । इतुकेनेंचि बंधन पडिलें । ईशनिर्मित जें जें जालें । ते ते बाधक न होती।।५१।।जें जें दृष्टीस पाहिलें। नेत्र लावून मनीं कल्पिलें। तें प्रत्यक्ष दिसूं लागलें। सत्याचे परी।।५२।।प्रिय तरी सुख जालें। क्रूर दिसतां भय वाटलें । सामान्य तें उपेक्षिलें। दिसतां जरि।।५३।।ऐसें सुखदु:ख कल्पितां । होती जीव सृष्टि करितां । वासनेची अति दृढता । म्हणोनि बाधक।।५४।।अंतकाळीं जें जें आठवें । तें तें लागें पुढें व्हावें । म्हणून बाधक जाणावें । ते जीवसृष्ट।।५५।।ईशसृष्ट बाधक नसे । येथें कोण उपपत्ति असे । बोलिजे ती अपैसे । अनुभवसिद्ध।।५६।।कोणी पुरुष निजेला । स्त्रियेसी घेऊनी बाजुला। तो पाठिसी सर्पही आला । परि तो निद्रेत नेणें।।५७।।लीन जालें अंत:करण । स्त्रीसुखही**

---

तर त्याचे उत्तर ऐकावे.(४६) जागृती,स्वप्न, सुषुप्ती,मरणानंतर मिळणारा मोक्ष इत्यादी गोष्टी जीवाने निर्माण केल्या आहेत,असे वेदात सांगितले आहे.(४७) जीवाने वेगळे काहीच निर्माण केले नाही. फक्त ईशनिर्मित पदार्थांना भोग्य बनवले.त्यामुळे सर्व जीव 'हे माझे,हे दुसऱ्याचे'अशी आपपर भावना ठेवून व्यवहार करू लागले.(४८) देवाने एक स्त्री निर्माण केली.पण तिच्या संदर्भात जीवाने अनेक गोष्टींची कल्पना केली.ती माता,भगिनी,कन्या,सून इत्यादी विविध नावे तिला दिली.(४९)त्यानुसार वरील नात्यांशी जुळणारी पुत्र,भाऊ,पिता,सासरा अशी प्रतियोगी नावे पुरुषाला प्राप्त झाली.अशा प्रकारे जीवाने ही सगळी मनोमय सृष्टी निर्माण केली.(५०)त्यात पुन्हा'हे माझे,हे तुझे'अशा ईश्वरसृष्ट पदार्थांविषयी कल्पना केल्याने तो बंधनात सापडला.ईशाने जे जे निर्माण केले ते मुळात असे बाधक होत नाही.(५१)जे जे दृष्टीस पडले,तेच डोळे बंद करून मनाने त्याची कल्पना केली,तर ते सत्य असत्याप्रमाणे प्रत्यक्ष दिसू लागते.(५२) ते कल्पित दृश्य प्रिय असेल तर सुख होते,क्रूर किंवा भयंकर दिसले तर भय वाटते आणि जे दृश्य सामान्य दिसते त्याची उपेक्षा केली जाते.(५३)अशा प्रकारे कल्पनेने सुखदु:खांची निर्मिती करणे हीच जीवसृष्टी होय.तिच्यामुळे वासना दृढ होत जाते,म्हणून ती बाधक होय.(५४)अंतकाळी ज्याची आठवण येते ते ते मरणोत्तर व्हावे लागते.या कारणाने जे जे जीवसृष्ट ते ते बाधक जाणावे.(५५)आता ईशसृष्टी बाधक नसते,यासाठी कोणता युक्तिवाद आहे?यावर अनुभवसिद्ध असा दृष्टान्त सांगतो.(५६)एक पुरुष आपल्या स्त्रीसह निजला.तेवढ्यात पाठोपाठ एक सर्पही तेथे आला.परंतु तो पुरुष निद्रिस्त असल्यामुळे त्याला ते कळले नाही.(५७)त्याचे अंत:करण

**नेणें आपण । आणि सर्पभय दारुण । तेंही नसे ।।५८।। प्रत्यक्ष स्त्री सर्प असून। सुखदुःखा नातळे जाण । म्हणून बाधक कल्पनागुणें । येऱ्हवीं निर्बाध ।।५९।। सत्यासत्य जाणोनि ज्ञानें । जीवसृष्टातें त्यागणें। जीवन्मुक्तीचें लक्षण । बोलिलें असे।।६०।। असो प्रसंगासी जें आलें । निरूपणसमाप्ति नेलें । परि जागृतादि व्यापारले । जीव कैसे।।६१।। जैसा ऊर्णनाभि एकला । तंतू निर्मून क्रीडता जाला । तैसा जागृति स्वप्न सुषुप्तीला । एकला क्रीडे ।।६२।। अंतःकरण इंद्रिये। घेणें पडे जो जो विषय । तयासि नांवही होय। जागृती ऐसी ।।६३।। इंद्रिय विषयेविण । संस्कारें कल्पी मन । घडे सुखदुःख भोगेवीण। ते स्वप्नावस्था ।।६४।। मन जेथें लया जाय । परि सुखाचा प्रत्यय होय । अज्ञान नाश न होय । ते सुषुप्ती ।।६५।। ऐसा तिहीं अवस्थें एकला । सुखदुःखीं क्रीडूं लागला । परि एकपणा विसरला । भांबावला नानात्वीं ।।६६।। हे जाणावें सेनेचे परी । आपआपणातें मारी । मेलीं घायाळा परी । सुखदुःखें शिणती ।।६७।। क्षणा हर्ष क्षणा खेद । क्षणा क्रोध क्षणा मद । जन्ममरण भोगी द्वंद्व । कल्पवरी ।।६८।। मूळपुरुषें इच्छा टाकिली ।**

---

निद्रेत इतके लीन झाले होते की त्याला स्त्रीसुखाचीही जाणीव नव्हती, तशी सर्पाची भीतीही वाटत नव्हती.(५८) स्त्री,सर्प प्रत्यक्षात असूनही त्याला सुख,दुःख यांपैकी काहीच जाणवत नव्हते. म्हणजे कल्पनेमुळे एखादी गोष्ट बाधक ठरते. येरवी ती बाधारहित असते.(५९) म्हणून ज्ञानाच्या साधनाने सत्य असत्य जाणून जे जीवसृष्ट म्हणजे जीवाने कल्पनेने निर्माण केलेले असते त्याचा त्याग करावा. हेच जीवन्मुक्तीचे लक्षण सांगितले आहे.(६०) असो,प्रसंगाने जसे आले तसे हे निरूपण आता समाप्त केले. परंतु जीव जागृती,स्वप्न,सुषुप्ती यांमध्ये कसा व्यापार करतात, हे पाहिले पाहिजे.(६१) ज्याप्रमाणे कोळी नावाचा कीटक स्वतःच तंतू निर्माण करून क्रीडा करतो. त्याप्रमाणे जीवही जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या अवस्था निर्माण करून त्यांमध्ये एकटाच क्रीडा करत असतो.(६२) अंतःकरण आणि इंद्रिये यांच्या साहाय्याने जेव्हा विषयांचे ग्रहण होते त्या अवस्थेला जागृती असे नाव आहे.(६३) इंद्रिये आणि विषय नसताना केवळ संस्कारांमुळे मन त्यांची कल्पना करते त्यावेळी भोग नसतानाही सुखदुःख होते. त्या अवस्थेला स्वप्नावस्था म्हणतात.(६४) ज्या अवस्थेत मनाचा लय होतो, पण एक प्रकारच्या सुखाचा अनुभव येतो, पण अज्ञानाचा नाश झालेला नसतो त्या अवस्थेला सुषुप्ती असे म्हणतात.(६५) अशा प्रकारे तिन्ही अवस्थांमध्ये तो एकटा जीव क्रीडा करतो. परंतु स्वतःचे एकटेपण विसरून जातो आणि सभोवतालच्या नानात्वामध्ये भांबावून जातो.(६६) हे एखाद्या सैन्यासारखे आहे. तेथे सैनिक आपापसात लढतात,मरतात,घायाळ होतात आणि सुखदुःखांनी शिणतात.(६७) क्षणात हर्ष, क्षणात खेद, क्षणात क्रोध, क्षणात मद अशाप्रकारे द्वन्द्व असेतो कल्पान्तापर्यंत जन्म मरण भोगत राहतात.(६८) अशा प्रसंगी मूळ निजलेल्या पुरुषाने इच्छाच करायचे सोडून दिले तर सैन्य (त्याच्या लढाया,सुखदुःखे,

**सेना जैसी निमाली । ईशसृष्टीही बुडाली । नव्हतीच जैसी ।।६९।। पूर्व पुरुषापरी । एकलें ब्रह्म निर्धारी । हें काल्पनिक जाणता उरी । जीवेशां नसे ।।७०।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । जीवेशसृष्टप्रकारे । पंचमसमासः ।।५।।**

**इति पंचिका संपूर्णा ।।३।। ओवीसंख्या २८३**

---

हर्षामर्षादी भावना हे सर्व) क्षणार्धात संपून जाते आणि ईश्वरसृष्टी ही नाहीशी होते. जशी काही ती निर्माणच झाली नव्हती.(६९) निद्रिस्त मूळ पुरुषाप्रमाणे जेव्हा एकटे ब्रह्मच तेवढे आहे आणि बाकीचे सर्व काल्पनिक आहे हे त्याच्या लक्षात आले की जीव आणि ईश यांना वावच राहात नाही.(७०)



# पंचिका ४थी - समष्टिव्यष्टिनिरूपण

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - विवर्तवादप्रकार

**ब्रह्म तरी निराकार । नव्हे अणुमात्र विकार । घन निबिड अपार । अंत न लागे।।१।। तेथें मायादि विकार । कैसे जाले सचराचर । विकारलें निर्विकार । तरी निश्चळत्व बुडालें।।२।। कांही विकारलें नाहीं । तरि दिसताहे सर्वही । जैसे असेल तैसे तेही। यथार्थ निरोपा।।३।। आतां याचें उत्तर । दिधलें पाहिजे साचार । जालेंचि नाहीं म्हणावे जर । तरि हे मानितीना।।४।। बाळासि म्हणावें बागुल नाहीं । त्यासी सत्य न वाटे कांहीं । बाळदशा जातां सर्वही । त्याचे त्यास कळे ।।५।। हा आकारु जया दिसला । तो बळकट अंतरीं बैसला । त्या म्हणतां विकार नाहीं जाला । उपतिष्ठे कैसा ।।६।। हे पुढें आपेंआप । ज्याचें त्यास कळें रूप । ऐसें जाणोनि अध्यारोप । वर्णिता जाला ।।७।। अध्यारोप तो अध्यस्त । ते न दिसतां ते दिसत । त्यासि म्हणावें विवर्त । वेदांतशास्त्रीं ।।८।। कारणापासून कार्य होतां । त्याची ती प्रकारें व्यवस्था । आरंभ परिणाम विवर्ता । ओळखावें[३०]।।९।।**

---

### पंचिका ४थी, समास १ला - विवर्तवादप्रकार

ब्रह्म तर निराकार,निर्विकार म्हणजे अणूएवढासुद्धा विकार नसलेलेघन(गच्च भरलेले)दाट आणि पार नसलेले आणि अंत न लागणारे असे अथांग आहे.(१) मग त्यामध्ये मायादी सगळे विकार कसे झाले? निर्विकार अशा त्या ब्रह्मामध्ये विकार निर्माण झाले असे म्हणावे तर त्याच्या निश्चळपणाला ढळ लागतो.(२)ब्रह्माला काहीही विकार झाला नाही असे म्हणावे तर सर्व सृष्ट पदार्थ दिसत आहेत.मग वास्तवात ते जसे असेल तसे आम्हांस सांगा.(३) आता याचे उत्तर दिले पाहिजे.जर ते पदार्थ निर्माण झालेच नाहीत असे म्हणावे तर आक्षेपक ते मान्य करणार नाहीत.(४)लहान मुलास बागुलबुवा नाहीच असे सांगितले तर त्याला ते काही सत्यच वाटणार नाही.बाल्यदशा उलटल्यानंतर त्याचे त्याला सर्वच कळून येईल.(५)हा आकार ज्याला दिसला तो त्याच्या मनात बळकटपणे मूळ धरून बसतो.त्या माणसाला जर सांगितले की,तू म्हणतोस तसा विकार मुळीच झालेला नाही,तर त्याला तो सत्य कसा वाटेल?(६)पुढे आपोआप हे दृश्य मिथ्या आहे,हे त्याचे त्याला कळून येईल.असे जाणून अध्यारोप म्हणजे जे मिथ्या आहे त्याचे वर्णन वक्ता करू लागला.(७)अध्यारोप म्हणजे अध्यास.वेदान्तशास्त्रामध्ये ते दिसत नसताना ते दिसते त्याला विवर्त म्हणतात.(८)कारणापासून कार्य निर्माण होते.त्याची व्यवस्था तीन प्रकारांनी होते.ते तीन प्रकार म्हणजे आरंभवाद,परिणामवाद आणि विवर्तवाद.(अनेक कारणांपासून

**आतां तिहींचें लक्षण । निरोपिजे भिन्न भिन्न । प्रस्तुत आरंभाचें कैसें चिन्ह । अवधारावें।।१०।। मृत्तिकेचें कार्य तो घट । उपादान मृत्तिका अविट । निमित्तेंवीण नव्हे स्पष्ट । तो अन्य कुल्लाळ।।११।। दोन्हीं जरी मिळालीं । तरी घटसिद्धि नाहीं जाली । मृत्तिका आपीं कालविली । तरी चक्रादि अपेक्षा ।।१२।। मृत्तिका आणि मृत्पिंड । कुलाल आणि चक्रदंड । कारणें जया उदंड । तो आरंभवाद ।।१३।। सत्यत्वें कारणा पालट होय। अथवा कारणासम असावें कार्य । उभय लक्षणाचा अभिप्राय । परिणाम ऐसा ।।१४।। दुग्धाचें दही होतां। दुग्ध नासेचि तत्वतां । म्हणोनि द्वितीय जे अवस्था । तोचि परिणाम।।१५।। अन्यथा भाव सत्यत्वें नसे । ते नसतां परि ते भासे । अथवा कारणासमानही नसे। कार्य जे कां ।।१६।। या उभयांसी बोलिजे विवर्त । शिंपीच्या ठाईं रजत । रज्जूवरी सर्प भासत। कीं स्थाणु पुरुष ।।१७।। ऐसे तीन प्रकारचे वाद । कार्य कारणा असे भेद। मुख्य वेदांतमतीं अनुवाद । विवर्ताचा असे ।।१८।। परि उभयांतें खंडिल्याविण । विवर्त**

---

जेव्हा एक कार्य निर्माण होते त्यास आरंभवाद असे म्हणतात. कारण नष्ट झाल्यानंतर कार्याची उत्पत्ती होते त्यास परिणामवाद असे म्हणतात आणि कार्य सत्य नसताना जे दिसते त्याला विवर्तवाद असे म्हणतात.)(९) या तिन्ही व्यवस्थांचे वेगवेगळे निरूपण करणे प्राप्त आहे. प्रथम आरंभवादाचे लक्षण लक्षपूर्वक ऐका.(१०) मृत्तिकेचे कार्य घट आहे. मृत्तिका हे त्याचे उपादान कारण आहे. (उपादान कारण म्हणजे समवायिकारण, वस्तूच्या निर्मितीचे प्रत्यक्ष कारण, कार्याच्या उत्पत्तीस ज्या जड द्रव्याची आवश्यकता असते ते होय.) घटाच्या उत्पत्तीचे मृत्तिका हे अपरिहार्य कारण आहे. (अविट पण तो घट प्रकट होण्यासाठी) कोणा ना कोणा निमित्ताची गरज असते. घटाच्या संदर्भात असे निमित्त कारण म्हणजे कुंभार होय.(११) मृत्तिका आणि कुंभार ही दोन्ही कारणे जरी एकत्र आली तरी त्यायोगे घटाची सिद्धी होऊ शकत नाही. घटसिद्धीसाठी मृत्तिका पाण्यात कालवली जाणे आवश्यक आहे. तसेच चक्र इत्यादी अन्य साधनांची अपेक्षा आहेच.(१२) मृत्तिका, मातीचा गोळा, कुंभार, चाक, चक्रदंड इत्यादी अनेक कारणे ज्यासाठी लागतात त्याला आरंभवाद म्हणतात.(१३) कारणामध्ये वस्तुतः बदल होतो किंवा कारणासारखेच कार्य असते, या दोन्ही प्रकारांना परिणामवाद म्हणतात.(१४) दुधाचे दही होताना दूध स्वरूपतः नष्ट होते (नासते). म्हणून त्याला जी दुसरी अवस्था प्राप्त होते तोच परिणाम होय.(१५) दुसरी अवस्था प्राप्त होणे खरे नसते. कार्य प्रत्यक्षात नसताना भासते. तसेच ते कारणासारखेही नसते.(१६) या दोन्ही प्रकारांना विवर्तवाद असे म्हणतात. शिंपीच्या ठिकाणी चांदी किंवा दोरीच्या ठिकाणी सर्प अथवा खांबाच्या जागी पुरुष भासणे ही त्याची उदाहरणे होत.(१७) असे तीन प्रकारचे वाद सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधाने सांगितले जातात. कार्य आणि कारण यांच्यामध्ये भेद असल्यामुळे वेदान्तमताने हा विवर्ताचा प्रकार होय.(१८) परंतु आरंभ आणि परिणाम या वादांचे खंडन केल्याखेरीज

**नव्हे प्रतिपादन । आरंभ परिणाम हे दोन । दूषिले वेदान्ती।।१९।।आरंभ जरी जगत्कार्य असतें । तरि कारणें होतीं बहुतें । एक असून जाले कल्पिते । मतवादी कोणी ।।२०।।म्हणती माया उपादान। ईश्वरीं असे कर्तेपण । काल कर्म स्वभाव जाण । हें कारण समवाई[३१]।।२१।। निजरूपीं स्वभाव असतां । तरी काल कर्मा नापेक्षिता । अथवा काल कर्म होतां । स्वभाव नाहीं ।।२२।। म्हणुन मायेचा स्वभाव । तेथेंचि काल कर्मासि ठाव। मायेसी कादाचित्कत्व । असे म्हणुन संभवे।।२३।। मायेपासून ऐलीकडे । जें जें बोलिजे तितुकें थोडें । स्वरूपीं पाहतां उघडें । मायाचि विवर्त ।।२४।। मृगजळ सत्य असावें । तरि धान्यादि पिकावे । तैसे मायेचे अभावें । काल कर्म मिथ्या ।।२५।। माया स्वभावादि तीन । परि यासी सत्य अधिष्ठान । नव्हे सत्यत्वें विकारणें । यासि विवर्त बोलावे।।२६।। म्हणोनि आरंभवाद नसे । परिणामही जाणा तैसे । सत्यत्वें अन्यथा न दिसे । कार्य कारणासम नाहीं ।।२७।।**

---

विवर्ताचे प्रतिपादन करता येत नाही. कारण वेदान्तामध्ये आरंभ आणि परिणाम या दोन्ही वादांना दोष दिले आहेत.(१९) जगत हे जर आरंभवादाचे कार्य असते तर त्याच्या सिद्धीसाठी अनेक कारणांची आवश्यकता असते. वास्तविक कारण एकच असताना काही लोक अनेक कारणांची कल्पना करतात.(२०) ते असे म्हणतात की,जगत्कार्यासाठी माया हे उपादान कारण असून ईश्वराच्या ठिकाणी त्याचे कर्तेपण आहे. म्हणजे ईश्वर हा निमित्तकारण आहे. काल,कर्म,स्वभाव ही समवायी कारणे होत.(२१) ब्रह्माच्या ठिकाणी स्वभाव असता तर त्याने काल, कर्म या सामग्रीची अपेक्षाच केली नसती आणि काल, कर्म यांची जर आवश्यकता भासत असेल तर ईश्वराच्या ठिकाणी तसा स्वभावच नाही.(२२) म्हणून स्वभाव मायेचाच असून काल, कर्म यांचे स्थानही मायाच मानावी लागते. माया ही कधी असते, कधी नसते म्हणून काल, कर्म इत्यादी कारणांची सामग्री तिच्या ठिकाणी मानावी लागते.(२३) मायेपासून अलीकडे जे जे उत्पन्न होते ते ते व्याप्तीने अल्प म्हणजे थोडे असते.(याच्याउलट मायेच्या पलीकडचे ब्रह्म हे तत्त्व भूम म्हणजे व्याप्तीने तिच्यापेक्षा जास्त असते. स्वरूपाकडे पाहिले असता ते सदासर्वकाळ उघडे असे व्यापक तत्त्व आहे. म्हणून मायेलाच त्याचा विवर्त मानावे लागते.(२४) आता मृगजळ सत्य असते तर त्यावर धान्य इत्यादी पिके पिकली असती. त्या न्यायाने माया ही अभावरूप म्हणजे मिथ्या असल्याने काल, कर्म हे सुद्धा मिथ्याच ठरतात.(२५) माया आणि स्वभाव, काल, कर्म हे तीन पदार्थ सर्व मिथ्या असले तरी या सर्वांचे अधिष्ठान म्हणजे आधार असे जे ब्रह्म ते मात्र सत्य आहे. हे पदार्थ सत्य ब्रह्माचे विकार नाहीत. म्हणून त्यांना ब्रह्मावरील विवर्त असे म्हणावे.(२६) म्हणून मायादी सृष्टीच्या निर्मितीचे आरंभवादाच्या उपपत्तीने स्पष्टीकरण होत नाही. तसेच परिणामवाद स्वीकारूनही ते करता येत नाही. ब्रह्माच्या ठिकाणी सृष्टीचा आविष्कार सत्य असल्याचे दिसत नाही, हे एक आणि सृष्टिरूप कार्य ब्रह्मरूप कारणासमान नाही,हे दुसरे अशी दोन कारणे त्यामागे आहेत.(२७)

**विकार सत्यचि म्हणावा। तरी ज्ञानें मोक्ष न बोलावा। जरि सर्पाचिया अभावा। ज्ञान रज्जूचें।। २८।। रज्जु अवघी नाहीं होती। मग सर्पाकारें परिणमति। परिणाम बोलिजे त्याप्रती। ऐसे तों नाहीं।। २९।। अनंतपण न मोडतां । माया सकार्य दिसतां । त्यासि परिणाम म्हणतां। जीभ न झडे।। ३०।। अथवा कार्य हें जें जालें । जड दुःख आणि नाथिलें । अस्ति भाति प्रियत्वा मानिले । नवचे समान।। ३१।।निस्तत्व रूप जैशी माया। तेचि रूप जगत्कार्या । समानत्व कारण कार्या । परिणाम मायेचा।। ३२।।जालें दुधाचें दहीं । तैसें ब्रह्म कारण नाहीं । रज्जुवरील अही। म्हणून विवर्त।। ३३।।कारणाविशीं जे भ्रांती । ते ज्ञानेंचि लया जाती । विवर्तवाद वेदांतीं। स्वीकारिती ऐसा।। ३४।।आतां निमित्त आणि उपादान । याचें कैसें निरूपण । हेंचि ऐका सावधान । जें शास्त्रसिद्ध ।। ३५।।माया उपादान असे । तेथें निमित्त न दिसे । निमित्त ईश्वरीं असे । परि उपादान नाहीं।। ३६।।यास्तव निमित्त उपादान । जेथें कारणत्व अभिन्न। तें एकचि अधिष्ठान । ईश्वर मायेसी ।। ३७।।ऐसें बोले वेद श्रुती । लय आणि**

---

आता ब्रह्माप्रमाणे त्याचा सृष्टिरूप विकारही सत्य मानला तर ज्ञानाने मोक्ष मिळतो असे म्हणता येणार नाही. सर्पाचा अभाव झाल्यानंतरच रज्जू म्हणजे दोरीचे ज्ञान होऊ शकते.(२८) जेव्हा संपूर्ण दोरी दिसेनाशी होते, तेव्हाच ती सर्परूपाने परिणाम पावते. पण याला परिणाम म्हणता येत नाही. कारण परिणामवादात कारणाचे सत्यत्वाने कार्यात परिवर्तन होते.(२९) ब्रह्माचे अनंतपण अजिबात नष्ट न होता, त्याचे कार्य जी माया ही तिच्या कार्यासह धडधडीत दिसत असता, त्या मायेला व तिच्या कार्याला ब्रह्माचा परिणाम म्हणणाऱ्याची जीभ कशी झडत नाही?(३०)अथवा निर्माण झालेले कार्य जड, दुःखात्मक आणि नास्तिरूप (नाही या स्वरूपाचे) आहे, त्याला ब्रह्माप्रमाणे अस्ति, भाति, प्रिय असेही मानता येत नाही. त्यामुळे येथे कार्य हे कारणाशी समानही म्हणता येत नाही.(३१) माया निस्तत्व म्हणजे अभावरूप आहे. तिचे कार्य जे जगत त्याचेही स्वरूप तसेच म्हणजे अभावरूप म्हणजे मिथ्या आहे. त्यामुळे कारण आणि कार्य यांच्यात सारखेपणा आहे. म्हणून जगाला मायेचा परिणाम मानता येते.(३२) दुधाचे दही होते. त्याप्रकारचे कारण ब्रह्म नाही. दोरीच्या जागी सर्प दिसावा त्याप्रमाणे ब्रह्माच्या जागी जगत् दिसते म्हणून जगाला ब्रह्माचा विवर्त म्हणतात.(३३) कारणाविषयी जो भ्रम निर्माण होतो,तो भ्रम ज्ञानानेच नष्ट होतो. म्हणून वेदान्तामध्ये अशा प्रकारचा विवर्तवाद स्वीकारण्यात येतो.(३४) आता जगत्कारणाच्या संदर्भात निमित्तकारण कोणते, उपादान कारण कोणते यांचे निरूपण कसे केले जाते त्याचे शास्त्रसिद्ध विवेचन सावधपणे ऐका.(३५) माया हे उपादान कारण आहे. पण ती निमित्तकारण नाही. ईश्वर हा निमित्तकारण आहे पण तो उपादान कारण नाही.(३६) यासाठी जेथे निमित्त आणि उपादान कारणे अभिन्नपणे असतात ते ब्रह्म ईश्वर आणि माया या दोहोंचेही एकमेव अधिष्ठान आहे.(३७) वेदात (म्हणजे तैत्तिरीय उपनिषदात) असे म्हटले

**स्थिति उत्पत्ती। जेथें असे तया म्हणती। अभिन्न कारण।।३८।।कार्य जैथें लया जाय। जाणावें तें उपादान होय। स्थिति उत्पत्ति जेथें होय। ते समवाई निमित्त।।३९।।उपादान अन्य नसे। लयश्रुति बोलतसे। वेगळें भावितील निमित्त ऐसें। उत्पत्ति बोले या हेतू।।४०।।हे तिन्ही जेथें असती। अभिन्न कारण तया म्हणती। येथे कोणी आक्षेपिती। ऐसे दृष्ट नसे।।४१।। मृत्तिका हें उपादान। तेचि नव्हे निमित्त कारण। कुलालीं असे कर्तेपण । उपादान नसे।।४२।। घट कार्यासी भिन्न भिन्न । कारणें असती दोन । ऐसें अदृष्ट दूषण। अभिन्न कैसें ।।४३।। भिन्न कारणें घटीं दिसतीं।तें साहित्य न पडे दृष्टांती।तरि यासि उपमे येती। तेचि अवधारा।।४४।। ऊर्णनाभी एकला । तंतु निर्मून क्रीडूं लागला । तरी अदृष्ट दोष आला । कैसा पाहा।।४५।। ऊर्णनाभीचे परी । अभिन्नं ब्रह्म निर्धारी । माया आणि ईश्वरीं । अधिष्ठान एक ।।४६।। मायोपाधि अवलंबिता । ते जाण उपादानता।स्वतां होय चेष्टविता । हे निमित्त कारण।।४७।।**

---

आहे की जेथे एखाद्या पदार्थाची उत्पत्ती,स्थिती आणि लय या तिन्ही अवस्था असतात तेच त्याचे अभिन्न कारण होय.(३८) जेथे कार्य लयाला जाते ते उपादान कारण होय. (उदाहरणार्थ, घट फुटल्यानंतर मातीच उरते. म्हणून मृत्तिका हे घटाचे उपादान कारण होय.) जेथे स्थिती आणि उत्पत्ती या दोन अवस्था असतात त्या कारणांना समवायी कारण आणि निमित्तकारण म्हणतात.(घटाचे समवायी कारण म्हणजे पाणी,कुंभाराचे चाक इत्यादी सामग्री आणि उत्पत्तीचे निमित्त असणारा कुंभार हे निमित्तकारण होय.)(३९) लयश्रुती म्हणजे तैत्तिरीय उपनिषदातील लयासंबंधीचे विधान.'यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति'या विधानानुसार उपादान कारण वेगळे असत नाही. काहीजण निमित्तकारणाला वेगळे मानतील म्हणून त्यालाच उत्पत्ती म्हटले आहे.(४०) उत्पत्ती,स्थिती आणि लय तिन्ही अवस्था जेथे एकवटलेल्या असतील त्याला अभिन्न कारण म्हणतात. येथे कोणी आक्षेप घेतील की याला काही दृष्टान्त नाही.(४१) मृत्तिका हे घटाचे उपादान कारण आहे. पण तेच त्याचे निमित्तकारण नाही.याउलट कुंभार हे घटाचे निमित्तकारण आहे, पण तेथे उपादान कारण नाही.(४२) घट या कार्याला अशा प्रकारे मृत्तिका आणि कुंभार अशी दोन वेगवेगळी कारणे आहेत.तेव्हा वरील उत्पत्ती,स्थिती आणि लयविषयक विधानाला दृष्टान्तच नाही असा दोष त्यात असताना अभिन्न कारण ही कल्पना कशी स्वीकारता येईल?(४३) घटामध्ये भिन्न कारणे दिसतात.पण दृष्टान्तासाठी त्याचे उदाहरण योग्य होऊ शकत नाही. तर मग या विधानाला दृष्टान्त म्हणून शोभेल तेच आता ऐका.(४४)एकटा कोळी हा कीटक तंतूची निर्मिती करून त्याच्या साहाय्याने क्रीडा करतो.या उदाहरणात वरील दोष कसा येतो?म्हणजे अभिन्न कारणांसाठी हे उदाहरण योग्य आहे.(४५) ब्रह्म हे या कोळी कीटकाप्रमाणे अभिन्न कारण आहे. त्यामुळे माया आणि ईश्वर यांचे एकमेव अधिष्ठान आहे.(४६) तो मायोपाधीचा स्वीकार करतो तेव्हा उपादान कारण बनतो.तो या सृष्टीच्या व्यापाराला गती देतो म्हणून तो त्याचे निमित्तकारणही होतो.(४७)

**एवं निमित्त उपादान । एकचि ब्रह्म अभिन्न । येथें संशयासी कारण । नसे कांहीं ।।४८।। पूर्वी होतें आक्षेपिलें। निर्विकार कैसें विकारलें। विवर्तातें अंगिकारिलें। तरी दूषण नाहीं।।४९।। रज्जुचिये अज्ञानें। नसून सर्पा दिसणें। रज्जु ओळखितां जाणें। अपसयाची ।।५०।। सर्प जेव्हां जाला होता । तेव्हांचि नसे तत्वतां । ज्ञानें गेला मेला म्हणतां । लाजिजे कीं।।५१।। जेव्हां भासला विकार। तेव्हांचि असे निर्विकार। विकार जातां निर्विकार। बोलणें नलगे।।५२।। जें जे अज्ञानें जालें। ते तें ज्ञानें लया गेलें। येथे समाधान असे जालें। विवर्त मिथ्या।।५३।। आकाशादि जग आघवें । हे उपक्रमें सांगावें । कोणापासून कोण संभवे । हे निरोपिजे।।५४।। येथें अनुक्रम तरि कैचा । हा संकेत बोलावयाचा । जैसा संभार स्वप्नीचा । एकदाचि भासे।।५५।। तैसें मुळीं जें स्फुरण जालें । त्यासवेंचि सर्व प्रगटलें । मग कल्पून नांवातें ठेविलें। अनुक्रमेंचि ।।५६।। तथापि याचा अनुक्रम । श्रुतिसिद्ध असे परम । जालें रूप आणि नाम । तें तें सर्व बोलिजेते ।।५७।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । विवर्तवादप्रकारे । प्रथमसमासः ।।१।।**

---

अशा प्रकारे ब्रह्म अभिन्नपणे निमित्त आणि उपादान कारण होते. याबाबतीत संशयाचे कारणच नाही.(४८) पूर्वी असा आक्षेप घेण्यात आला होता की,ब्रह्म निर्विकार असताना त्यात विकार कसे निर्माण झाले? याला उत्तर असे की, विवर्ताच्या उपपत्तीचा स्वीकार केला तर असे दूषण येणार नाही.(४९) रज्जूच्या अज्ञानामुळे मुळात नसतानाही सर्प दिसू लागतो. पण रज्जूची ओळख पटताच तो सर्प आपोआप जातो.(५०) जेव्हा सर्प झाला होता तेव्हाच तो मुळात नव्हता. ज्ञानामुळे तो गेला किंवा मेला असे म्हणतानाही लाज वाटते.(५१) जेव्हा विकार निर्माण झाला आहे असे भासले, तेव्हाच ब्रह्म निर्विकारच होते. विकार गेल्यामुळे ते निर्विकार झाले असे म्हणण्याची गरजच नाही.(५२) जे जे अज्ञानामुळे निर्माण झाले ते ते सर्व ज्ञानामुळे लयाला गेले. विवर्तच मुळी मिथ्या ठरल्याने शंकेचे निरसन झाले.(५३) सृष्ट्युत्पत्तीचे निरूपण करण्याच्या ओघात आकाशादी सर्व जग कसे उत्पन्न झाले ते सांगावे. कोणापासून कोण निर्माण झाले तेही सांगावे.(५४) खरे तर याबाबतीत क्रम तरी कोठे आहे? हा फक्त बोलण्याचा संकेत झाला. स्वप्नात पाहिलेल्या वस्तूंचा समूह एकाच वेळी दिसतो. त्यात क्रम कुठे असतो?(५५) त्याप्रमाणे मुळातच जे स्फुरण झाले त्याबरोबरच सर्व सृष्टी एकदम प्रकट होत असते. मग कल्पना, तिच्यातील पदार्थांना क्रम, नावे दिली जातात.(५६)तथापि, या सृष्टिनिर्मितीचा अनुक्रम श्रुती आणि वेदान्त यांना मान्य असाच आहे. या सृष्टिरचनेच्या क्रमामध्ये जी जी रूपे आणि नावे झाली ती ती सर्व पुढे सांगण्यात येतील.(५७)

**।।श्रीराम समर्थ।। समास २रा - भूतसृष्टिप्रकार**

**निर्विकार जें निश्चळ । आकाशापरि केवळ । तेथें स्फुरण झालें चंचळ । वायु ऐसें।।१।। आकाशीं वायु होतां । तेणें न जाय निश्चळता । चंचळासी वितुळता । वेळ नाहीं ।।२।। तैसें स्वरूप सच्चिद्रूप । आनंदघन अमूप । तेथें चंचळ तें अल्प । होऊन जातें ।।३।। होतां जातां तरंग । पाणियासी नव्हे भंग । तरंगीं पाहतां अभंग । पाणीच असे ।।४।। परब्रह्म तें स्वतां चित् । ज्ञप्तिमात्र सदोदित । स्फुरणीं जें प्रतिभासत । साक्षि तत्व तें।।५।। तोचि जाणिजे अंतर्यामी । पुढें तत्वें प्रगटलीं अनुक्रमीं । अविद्यमान चंचळ उर्मी । हिरण्यगर्भ सूत्रात्मा ।।६।। भूतांचे करून पंचीकरण । उभविलें हें त्रिभुवन । विराट जयाचें अभिधान । स्थूल समष्टि ।।७।। जैशा चित्रपटीं पाहतां । उमटती चारी अवस्था । तेणे रीती व्यवस्था । चौ प्रकारें ।।८।। पट असे स्वतां श्वेत । खळ लावितां होय घट्टित। वरी अनुकार रेखाटित । रंगभरित विशिष्ट।।९।।श्वेत पटाचिये परी । स्वस्वरूप निर्धारी।**

---

**पंचिका ४थी, समास २रा - भूतसृष्टिप्रकार**

जे ब्रह्म केवळ आकाशासारखे असून निर्विकार आणि निश्चळ असे आहे, त्याच्या ठिकाणी पाण्यावर जशा चंचल लाटा उठतात किंवा आकाशात जसा चंचल वायू निर्माण होतो त्याप्रमाणे चंचल स्फुरण निर्माण होते.(१) आकाशात वायू निर्माण झाला तरी त्याची (आकाशाची) निश्चलता नष्ट होत नाही. पण त्यात निर्माण झालेल्या चंचल तत्त्वांना नष्ट होण्यास (किंवा विसकटून जाण्यास) काहीच वेळ लागत नाही.(२) त्याप्रमाणे स्वरूप सत्, चित् आणि आनंदघन (आनंदाने दाट भरून राहिलेले, आनंदाने परिपूर्ण) असून तेथे स्फुरणरूपी चंचल तत्त्व मर्यादित व्याप्ती असलेले आणि थोड्या कालावधीसाठी होऊन जाते.(३) पाण्यावर लाटा उठत असतात, ओसरून जात असतात, पण त्यांच्यामुळे पाण्यात खंड पडत नाही. तरंगांत पाहिले तरी तेथेही अखंड असे पाणीच असते.(४) परब्रह्म हे स्वत: चित्स्वरूप, ज्ञानस्वरूप आणि नित्य असे आहे स्फुरणात जे भासते ते साक्षीभूत तत्त्व आहे.(५) त्यालाच अंतर्यामी असे जाणावे. त्यानंतर अनुक्रमे अनेक तत्त्वे प्रकट झाली. अगोदर आभासात्मक स्फुरणरूपी चंचल लहर निर्माण झाली. त्यानंतर सूत्रात्मा असा हिरण्यगर्भ निर्माण झाला. (हिरण्यगर्भ म्हणजे समष्टीचा सूक्ष्म देह अथवा लिंगदेह).(६) मग पंचमहाभूते निर्माण झाली. त्या पंचमहाभूतांचे पंचीकरण करून या त्रिभुवनाची उभारणी केली. या स्थूल समष्टीला विराट असे नाव आहे.(७) ज्याप्रमाणे चित्रपट्टाच्या चार अवस्था असतात, त्याप्रमाणे परब्रह्माच्याही चार अवस्था असतात.(८) पट मुळात पांढरा असतो. त्याला खळ लावल्यानंतर तो कडक बनतो. त्यानंतर चितारी त्याच्यावर रेखा आखून घेतो आणि नंतर त्यावर चित्र रंगवतो. (म्हणजे चित्रपट्टाच्या स्वच्छ धुतलेला शुभ्र, खळ सारवलेला, आखलेला व रंगवलेला अशा चार अवस्था असतात.)(९) त्या शुभ्र चित्रपट्टाप्रमाणे

**अंतर्यामी अवस्था दुसरी। घट्टित पटासम।।१०।।रंगेंविण रेखाटिलीं । अस्पष्ट तत्वें उद्भवलीं। तृतीय अवस्था जाली। सूत्रात्मरूप।।११।।पुढे चौथा विराट। प्रगटता जाला स्पष्ट। रंगित जैसा चित्रपट[३२]। अवस्था चौथी।।१२।।आतां हेंचि प्रांजळ करूं। तत्त्व सुटीचा विस्तारु। मुळीं स्फुरणाचा विकारू। मूळ माया जे।।१३।।कार्यी कारणत्व व्यापलें। कारणीं कार्य नाथिलें। येणें रीती समजलें । पाहिजे पुढें।।१४।।ब्रह्म सदंशे स्फुरणीं। आणि निस्तत्वें माया राणी। चंचलरूपें जाणतेपणीं। हे दोन्ही प्रकृति पुरुष।।१५।।माया अविद्या जीव शिव। त्रिगुणादि भूतें सर्व। इतुक्याचें अस्पष्ट अवयव। स्फुरणीं असती।।१६।।पुढें स्पष्टतेस पावले। एकापासून एक जाले। सूक्ष्मीं तयाचे मासले। बीजीं वृक्ष जैसा।।१७।।चंचल जाणीव मूळ माया। प्रकृति पुरुष म्हणावे तया। ज्ञानाज्ञान अविद्या माया। समजावी तेथें।।१८।।जितुकें असें स्फुरण। तितुकें होय जाणतेपण। तया नांव बोलिजें ज्ञान। विक्षेपशक्ति विद्या।।१९।।तेथें चैतन्य प्रतिबिंबिले। ईशत्व ऐसें नाम आलें । तेंचि निमित्तकारण जालें । जगत्कार्यासी।।२०।। स्फुरणा इतुकें ज्ञान। येर अखंड दंडायमान। तयाचि नसे आठवण। तेंचि अज्ञान अविद्या।।२१।।**

---

परब्रह्माची, पहिली स्वरूपावस्था अंतर्यामी ही. खळ लावून घोटवलेल्या पट्टाप्रमाणे दुसरी अवस्था आहे.(१०) नंतर रंगावाचून केवळ रेखाटलेल्या अस्पष्ट चित्रांची रंगपट्टाची तिसरी अवस्था येते. ती परब्रह्माची सूत्रात्मा नावाची तिसरी अवस्था होय.(११) पुढे रंगवलेला चित्रपट्ट ही चौथी अवस्था येते. ती परब्रह्माची विराट नावाची प्रकट झालेली अवस्था होय.(१२) आता मूळ स्फुरणालाच मूळ माया म्हणतात. त्या मूळ स्फुरणाचे विकार होऊन जी तत्त्वसृष्टी निर्माण झाली तिचा विस्तार स्पष्ट करून सांगतो.(१३) कार्यामध्ये कारणाची व्याप्ती असते. पण कारणामध्ये कार्याची व्याप्ती नसते हे या रीतीने पुढेही समजून घ्यावे.(१४) स्फुरणामध्ये ब्रह्म सद्रूपाने वास्तव्य करते, मायाही नाहीपणाने (निस्तत्व) वास्तव्य करते. प्रकृती चंचलपणाने आणि पुरुष ज्ञातेपणाने वास्तव्य करतात.(१५) अशा प्रकारे माया, अविद्या, जीव, शिव, त्रिगुण, सर्व भूते इतकी सर्व तत्त्वे अव्यक्तपणे स्फुरणामध्ये असतात.(१६) ही तत्त्वे पुढे एकामागून एक अशी स्पष्ट अथवा व्यक्त होत जातात. एका सूक्ष्म बीजात जसा सर्व वृक्ष सामावतो तसे या सर्वांचे अस्फुट अवयव त्या सूक्ष्मात असतात.(१७) मूळ स्फुरणात जी चंचलता असते ती मूळ प्रकृती होय आणि तिथेच जी जाणीव असते तिला पुरुष म्हणतात. तेथेच ज्ञान आणि अज्ञान. अविद्यारूप माया असतात.(१८) स्फुरणाची व्याप्ती जेवढी असते तेवढीच जाणीव तेथे असते. त्यालाच ज्ञान असे म्हणतात. हीच विक्षेप (नवीन दृश्ये) निर्माण करणारी विद्या आहे. (विक्षेपशक्ती विद्या).(१९) तेथे चित्ततत्त्वाचे प्रतिबिंब पडते त्यास 'ईश' असे नाव प्राप्त होते. तोच ईश्वर जगत्कार्याचे निमित्तकारण होते.(२०) स्फुरणाच्या व्याप्तीएवढीच जाणीव किंवा ज्ञान असते. बाकीचा सगळा सलग पसरलेला जो भाग त्याची त्याला आठवणही होत नाही. त्यालाच अज्ञान किंवा अविद्या म्हणतात.(२१)

**तें आवरण शक्तीचे लक्षण । तेथें चैतन्य प्रतिभासमान । तोचि जीव जगत्कारण । उपादान होय।।२२।।जाणीव तो सत्वगुण । नेणिव तमाचें लक्षण । मिश्रित जाणिजे रजोगुण । स्फुरणीं तिन्ही ।।२३।। परब्रह्म जें सघन। स्फुरण नसे अवकाशेंविण। अवकाश तें आकाश पूर्ण। आणि शब्दहि असे ।।२४।। स्फुरण सहज चंचळ । तोचि वायू जाणिजेल। स्वभावें भासूं लागेल । तेंचि तेज।।२५।।सूक्ष्मत्वें असें मृदु। तेंचि आप हें विशदु । अज्ञान कठिण संवादु । पृथ्वीचा ऐसा।।२६।।हे असो तत्वें समस्त । तेथेंचि असतीं गुप्त। पुढें प्रगटतां भासूं लागत । वेगळालीं।।२७।। आतां कोणापासून कोण जालीं । तत्त्वें कैसीं उद्भवलीं। कार्य कारणें समजलीं । पाहिजे ऐका ।।२८।। साम्यअवस्था समानगुणीं । क्षोभता जाली गुणक्षोभिणी । प्रगटते झाले गुण तिन्ही । शक्तीसहित ।।२९।। ज्ञानशक्ति सत्वगुण । क्रियाशक्ति रजोगुण । द्रव्यशक्ति तमोगुण । तेचि भूतें ।।३०।। प्रथम विकार जो अवकाश। जया नांव आकाश । तेथें ब्रह्मीचा सदंश । व्यापून असे।।३१।।**

---

हे अज्ञान म्हणजे आवरणशक्तीचे लक्षण होय.त्यामध्ये जे चैतन्याचे प्रतिबिंब पडते त्यालाच जीव म्हणतात.तोच जगत्कारणही होतो.तोच जगाचे उपादान कारणही होतो.(२२)जाणीव हा सत्त्वगुण आहे. नेणीव हे तमोगुणाचे लक्षण होय.दोन्ही मिश्रित होऊन त्यापासून रजोगुण होतो.हे तीनही गुण स्फुरणात असतात.(२३)परब्रह्म हे घनदाट असून स्फुरणाला तर अवकाशाची गरज आहे.अवकाशाखेरीज स्फुरण असूच शकत नाही.अवकाश म्हणजे पोकळी.आकाश हीच ती पोकळी.त्याशिवाय आकाशाचा गुण जो शब्द तोही तेथे असतो.(२४) स्फुरण हे सहज (स्वाभाविक) असून चंचल असते. त्यातील चंचलता म्हणजेच वायू होय.अशा तऱ्हेने स्वाभाविकरीत्याच ते स्फुरण जेव्हा भासू लागेल(प्रकाशित होईल)तेव्हा त्यालाच तेज म्हणतात.(२५)स्फुरण हे सूक्ष्म असल्यामुळे स्वाभाविकच ते मृदू असते.ते आप तत्त्व होय,हे स्पष्ट आहे आणि त्यातील जड (अज्ञान) व कठीण भाग जो आहे तो पृथ्वीशी जुळतो.असा हा पंचभूतांचा मेळ स्फुरणामध्ये असतो,(२६)हे असू द्यात.अशा रीतीने सर्व तत्त्वे स्फुरणामध्येच अव्यक्त रूपाने असतात. पुढे ती प्रगट होतात व वेगवेगळी भासू लागतात.(२७)आता कोणते तत्त्व कोणत्या तत्त्वापासून झाले,ती तत्त्वे कशी निर्माण झाली,त्यांचा कार्यकारणसंबंध कशा प्रकारचा आहे,ते समजले पाहिजे,तरे ते आता ऐका.(२८)अगोदर मूळ मायेत सत्त्व,रज आणि तम हे तिन्ही गुण साम्यावस्थेत होते.ती ढळल्याबरोबर तिला गुणक्षोभिणी ही अवस्था प्राप्त झाली आणि त्यासरशी तिन्ही गुण आपापल्या शक्तिनिशी प्रगट झाले.(२९)सत्त्वगुण व त्याची ज्ञानशक्ती,रजोगुण आणि त्याची क्रियाशक्ती, तमोगुण आणि त्याची द्रव्यशक्ती असे सर्व प्रगट झाले.. त्यांनाच भूते असे म्हणतात.(३०) स्फुरणामधील पहिला विकार म्हणजे अवकाश अथवा पोकळी हा होय. त्याला आकाश असे नाव आहे,त्यामध्ये ब्रह्माचा सदंश (सत्+अंश–म्हणजे सच्चिदानंद या तीन लक्षणातील अस्तित्वाचा अंश) व्यापून आहे.(३१)

**निस्तत्व माया बोलिली। तिची कारणत्वें व्याप्ति जाली। सदंशा नामें ठेविलीं। तेचि माया।।३२।। सत्ताविण आकाश। रूपा कैंचा अवकाश। नाहींपणें तयांस। निस्तत्व बोलिजे।।३३।। मुख्य आकाशाचें लक्षण । शून्य अवकाश शब्दगुण । ते मायेच्या एकांशी जाण । न्यून असे ।।३४।। त्यापासुनी वायु जाला । पूर्व कारणें व्यापिला । वायु आहेसा दिसला । तो सदंश ।।३५।। सदंशावाचून कांहीं । वायुसी रूपच नाहीं । तेचि तेथें निस्तत्वही । मायादेवीचें ।।३६।। आकाशाचा शब्दगुण । तेथें प्रगटला आपण । वारा वाजतां सणसण। कळूं येतो ।।३७।। वायूचें रूप चंचळ । विहरणादि सकळ । स्पर्शगुण हा केवळ । जातीचा असे ।।३८।। आकाशाचिये एकदेशीं । न्यूनत्व असे वायुसी । पुढें वायूचिये कुशीं। तेज जन्मलें ।।३९।। अग्नि आहे हा सदंश । निस्तत्वही तेथें असे । शब्दगुणेंहि आकाशें । वस्ति केली ।।४०।। ध्वनी भुगभुगें उठली । उष्ण स्पर्शे वस्ति केली । ते कारणत्वें आली । व्याप्ति वायुची ।।४१।। प्रकाश उष्ण दाहक। मुख्य तेजाचें रूपक । रूपगुण अवश्यक । निजत्व स्वभाव ।।४२।।वायु दशांशें न्यून ।**

---

असद्(मिथ्या)स्वरूपी माया ती कारणरूपाने व्यापक झाली आणि सदंशाला नामे प्राप्त झाली.ती मायाच होय.(३२)सत(अस्तित्व)नसेल तर आकाशाला वाव कसा असेल?मग ते नाही (निस्तत्व)असे ठरेल.म्हणून त्याला निस्तत्व अथवा मिथ्या म्हणावे लागेल.(३३)आकाशाचे मुख्य लक्षण म्हणजे शून्यत्व,पोकळी आणि शब्दगुणयुक्त असे आहे.आकाश हे मूळ मायेपासून निर्माण झाले,त्यामुळे त्याची व्याप्ती मायेहून कमी असते.ती मायेपेक्षा एक अंशाने कमी असते.(३४)आकाशापासून वायू झाला.कारण हे कार्याला व्यापते या न्यायाने त्याचे पूर्वकारण जे आकाश त्याने त्याला व्यापून टाकले. वायू आहेसा वाटतो तो त्याचा सदंश होय.(३५)सदंशाखेरीज वायूला दुसरे रूपच नाही. त्याचे रूपहीन असणे हीच त्याच्यामध्ये असलेल्या निस्तत्व (मिथ्या) मायेची खूण आहे.(३६)आकाशाचा शब्द हा जो गुण आहे तो वायूमध्ये प्रगट होतो. वारा सणसण असा वाजू लागला की तो गुण कळून येतो.(३७)वायूचे रूप चंचल असते त्यामुळे त्याचा सगळीकडे संचार असतो.वायूचा स्पर्शगुण हा तर जातिगुण आहे.(३८)आकाश हे कारणतत्त्व असल्यामुळे वायू हे जे कार्यतत्त्व ते आकाशापेक्षा व्याप्तीने मर्यादित असते. यानंतर वायूच्या कुशीतून तेज जन्म घेते.(३९)अग्री आहे हाच त्याच्यात असलेला सदंश आहे. तो अर्थातच ब्रह्माचा अंश होय. मायेचे निस्तत्वही तेथेच आहे आणि शब्दगुणाच्या निमित्ताने आकाशानेही तेथे वस्ती केलेली आहे.(४०)अग्री प्रदीप्त झाला असता त्यातून भुगभुग असा ध्वनी निघतो........अग्रीचा स्पर्श उष्ण असतो.त्याअर्थी वायूच्या स्पर्श या गुणाने तेथे वस्ती केली आहे. अशा तऱ्हेने तेज या तत्त्वाचे कारण म्हणून वायूचीही तेथे व्याप्ती आहे.(४१)प्रकाश, उष्णता, दाहकत्व हे तेजाचे मुख्य रूप आहे. त्याचा रूपगुण हा स्वाभाविक स्वतःचा असा गुण तर तेथे आवश्यकच आहे.(४२)वायूच्या व्याप्तीच्या

तेणेंबिज असद्रूप ॥(४४ग)



**तेज असें भासमान । तया तेजापोटीं जनन । आपाचें जालें ।।४३।। आहे ऐसें वाटें आप। तेचि जाणावें सद्रूप । तेचि माया ।।४४।। बुलबुला उठे नाद । तोचि आकाशींचा शब्द। शीत स्पर्श उठे मृद । वायुतत्त्वाचा ।।४५।। दिसणें तेजाचें रूप। मृदु क्लेदन असें आप। मुख्य रस आपोआप । निजोगुण जाला ।।४६।। अग्निहून दशगुण । आप एकदेशीं न्यून। मग त्या आपापासून । पृथ्वी जन्मली ।।४७।। आहे पृथ्वी तें सत् । माया निस्तत्वे वर्तत । कडकडां शब्द उठत । आकाशतत्वाचा ।।४८।। कठिण स्पर्श वायूचा । चित्रविचित्र भास रूपाचा । प्रवेश असे तेजाचा । आप ऐका ।।४९।। कडू क्षार मधुर । रसगुणें आप साचार । निजरूपाचा विचार । कैसा भूमीचा ।।५०।। कठिण आणि धारण । गंध असे निजोगुण । आपाहून असें न्यून । दशांशें पृथ्वी ।।५१।। उणें एकाहुनी एक । परि जडत्वें अधिकाधिक । गुणहि तैसे अवश्यक । अधिकपणें ।।५२।। आकाश एक शब्दगुण। वायु शब्द स्पर्श द्विगुण। तेज जाणावें त्रिगुण । शब्दस्पर्शरूप।।५३।।**

---

दशांशाने कमी अशी तेजाची व्याप्ती दिसते.त्या तेजाच्या पोटी आप तत्त्वाचा जन्म होतो.(४३)आप म्हणजे पाणी आहे,असे वाटते.तेच त्याचे सद्रूप आहे.हे त्याच्या ठिकाणचे ब्रह्माचे लक्षण झाले.ते नसेल तर जे असद्रूप राहते तीच माया होय.(४४)बुलबुल असा जो पाण्याचा ध्वनी उठतो तोच आकाशाचा शब्दगुण होय.आपाचा शीतल आणि मृदू स्पर्श जो जाणवतो तो वायुतत्त्वाचा स्पर्शगुण तेथे आहे.आपतत्त्व जे दिसते,तो तेजाचा गुण तेथे आला आहे.आपतत्त्व हे मृदू आणि ओलसर असते.तो वायुतत्त्वाचा स्पर्श गुण होय.(४५)पाणी दिसते हे तेजाचे रूप,मऊ आणि ओलसर असते तो वायूचा गुणधर्म होय आणि ते रसमय म्हणजे द्रवरूप आहे.हा त्याचा स्वभावधर्म आहे तो तर आपोआपच तिथे आलेला आहे.(४६) अग्नीपेक्षा आपतत्त्व दशांशाने कमी व्याप्त आहे. त्यानंतर त्या आपतत्त्वापासून पृथ्वी निर्माण होते.(४७)या पृथ्वीतत्त्वातही ब्रह्माचा सत् (आहेपणा) हा अंश आहे.सत् तत्त्वाचा अभाव असेल तेथे माया निस्तत्व म्हणजे मिथ्यापणाने आहे. पृथ्वीचा जो कडकड शब्द उठतो तो आकाशतत्त्वाचा भाग आहे.(४८)कठीण स्पर्श हा वायूचा भाग आहे.पृथ्वीच्या चित्रविचित्र रूपांचा भास हा पृथ्वीच्या ठिकाणी होणाऱ्या तेजाच्या प्रवेशाचा भाग आहे.आता आपतत्त्वाचा भाग ऐका.(४९)पृथ्वीतील कडू,खारट,मधुर अशा द्रव पदार्थांच्या रूपाने पृथ्वीतील आप तत्त्वाचा बोध होतो.आता पृथ्वीचा स्वत:चा असा स्वाभाविक अंश कोणता ते ऐका.(५०)कठिणपणा,धारकत्व म्हणजे धारणा करणारा आणि गंध हा पृथ्वीचा स्वत:चा गुणधर्म आहे. पृथ्वी ही आपतत्त्वाहून दशांशाने कमी व्याप्तीची आहे.(५१)या आकाशापासून पृथ्वीपर्यंतच्या पंचमहाभूतांमध्ये प्रत्येक तत्त्व आपल्या कारणतत्त्वाहून दशांशाने कमी असते पण जडपणामध्ये मात्र ते वाढत जाते.तसेच गुणांच्या बाबतीतही प्रत्येक तत्त्व कारणतत्त्वापेक्षा अधिकाधिक वाढत जाते.(५२)आकाशाचा शब्द हा एकच गुण आहे.वायूचे शब्द आणि स्पर्श असे दुप्पट गुण होतात.तेज हे शब्द, स्पर्श आणि रूप अशा

**शब्द स्पर्श रूप रस । चारी गुण हे आपास । पांच गुण करिती वास । पृथ्वीमध्यें।।५४।।**
**शब्दगुण आकाशीं । म्हणून वेद्य श्रोत्रासी । शब्द स्पर्श हे वायूसी । श्रोत्रत्वचेसी वेद्य।।५५।।**
**शब्द स्पर्श रूप तेज। श्रोत्रत्वक्चक्षुसि समज। शब्द स्पर्श रूप रस बुझ । आप चतुर्गुण।।५६।।**
**म्हणोनि वेद्य चहुसी। श्रोत्रत्वक्चक्षुजिव्हेसी । शब्द स्पर्शरूप रस गंधासी । असणें पृथ्वी।।५७।।**
**म्हणुन पांचा इंद्रियासी । श्रोत्रत्वचाचक्षुजिव्हेसी । घ्राण ज्ञानेंद्रियपंचकासी । वेद्य पृथ्वी।।५८।।**
**ऐसीं पंच महाभूतें । पावलीं जे उत्पत्तीतें । शक्तिसहित त्रिगुण त्यातें । व्यापिते जाले।।५९।।**
**सर्वज्ञ जो का ईश्वर। धारणादि शक्तीचा आदर । व्यापूनिया भूतमात्र । सहजचि असे।।६०।।**
**आतां भूतगुणापासून।जन्मे क्रिया आणि ज्ञान।रजसत्त्वाच्या शक्ती दोन।प्रगटत्या जाल्या।।६१।।**
**ज्ञानेंद्रिय अंतःकरण । ज्ञानशक्ति सत्त्वगुण । साधारण असाधारण। कार्य भूतांचे ।।६२।।**
**आकाशींचा सत्त्वगुण । श्रोत्रेंद्रिय होय निर्माण । वायूचा सत्वांश जाण ।त्वगेंद्रिय जालें।।६३।। तेज सत्त्वांशाचा । जन्म असे चक्षूचा । सत्त्वगुण आपाचा। तें रसनेंद्रिय।।६४।।**
**पृथ्वियेचा सत्वगुण । इंद्रिय उद्भवलें घ्राण । एवं ज्ञानेंद्रिय असाधारण।कार्य जालें ।।६५।।**
**सत्वगुणाचे साधारण । भूतसमष्टीपासून । जन्मलें हें अंतःकरण । द्विधा चतुर्धा ।।६६।।**

---

तीन गुणांनी युक्त आहे, असे जाणून घ्यावे.(५३) आपतत्त्वाचे शब्द,स्पर्श,रूप आणि रस असे चार गुण आहेत,तर पृथ्वीमध्ये शब्द,स्पर्श,रूप,रस,गंध असे पाच गुण वास्तव्य करतात.(५४)आकाशाचा शब्द गुण असल्यामुळे त्याचे ज्ञान कानाने होते.वायूचे शब्द आणि स्पर्श हे गुण असल्यामुळे तो कान व त्वचा यांच्याद्वारे समजतो.(५५)तेजाचे शब्दस्पर्श आणि रूप हे गुण असल्याने त्याचे ज्ञान कान,त्वचा,डोळे यांनी होते.आपतत्त्व हे शब्द, स्पर्श, रूप आणि रस या चार गुणांनी युक्त आहे.(५६)म्हणून ते श्रोत्र,त्वचा,चक्षू,जिव्हा या चार इंद्रियांनी ज्ञात होते आणि पृथ्वीचे शब्द,स्पर्श,रूप,रस आणि गंध असे पाच गुण आहेत.(५७)म्हणून ती श्रोत्र,त्वचा,चक्षु,जिव्हा आणि घ्राण या पाच इंद्रियांनी ज्ञात होते.(५८)अशा प्रकारे पाच महाभूते उत्पन्न झाली.त्यानंतर सत्त्व,रज आणि तम ह्या त्रिगुणांनी त्यांना आपल्या शक्तींसह व्यापून टाकले.(५९)ईश्वर हा सर्वज्ञ असून तो धारणादी शक्तींचा अवलंब करून सर्व भूतांना व्यापून सहजपणे राहिला आहे.(६०)आता भूतगुणांपासून क्रियाशक्ती आणि ज्ञानशक्ती या,रजोगुण,तमोगुण यांच्या दोन शक्ती प्रगट झाल्या.(६१)आता ज्ञानेंद्रिय,अंत:करण,ज्ञानशक्ती आणि सत्त्वगुण ही भूतांचे साधारण आणि असाधारण कार्ये होत.(६२)आकाशाच्या सत्त्वगुणापासून श्रोत्रेन्द्रिय निर्माण झाले. वायूच्या सत्त्वांशापासून त्वगिंद्रिय निर्माण झाले.(६३)तेजाच्या सत्त्वांशापासून चक्षू या इंद्रियाचा जन्म झाला.आपाच्या सत्त्वगुणापासून रसनेंद्रिय निर्माण झाले.(६४)पृथ्वीच्या सत्त्वगुणापासून घ्राणेंद्रिय निर्माण झाले अशा प्रकारे ज्ञानेन्द्रियांची निर्मिती हे भूतांचे असाधारण (वेगवेगळे) कार्य निर्माण झाले.(६५) या सर्व भूतांच्या एकत्रित सत्त्वगुणापासून दोन अथवा चार प्रकारचे अंत:करण निर्माण झाले.(६६)

**मन बुद्धी चित्त अहंकार। येणें रीती हे चत्वार। अंतर्भूत करितां एकत्र। द्विधा होती।।६७।।होय नव्हे हा संशय।तें मनाचें रूप होय। चिंतनात्मक चित्तान्वय। मनाच्या पोटीं।।६८।।निश्चयात्मक बुद्धीचा। पोटीं समावेश अहंकाराचा।येणें रीती अंत:करणाचा। द्विधा विभाग।।६९।।तैसाचि भूतांचा रजांश। क्रियाशक्ति पावे जन्मास। आधि असाधारण कार्यास। उद्भव कैसा।।७०।। रजोगुण आकाशींचा। निर्माण जालीसे वाचा। तैसा वायु रजांशाचा। पाणींद्रिय।।७१।। तेजाचा जो रजोगुण।गमनक्रियात्मक चरण । आप रजांशापासून। उपस्थेंद्रिय।।७२।। रजांश पृथ्वीचा काढिला । गुदेंद्रिया जन्म जाला। असाधारण कर्मेंद्रियाला। ओळखावें।।७३।। समष्टिरूप पांचांचा। रजांश काढून भूतांचा। यया साधारण कार्याचा।प्राण जाला।।७४।। तो वृत्तिभेदें साचार।जाला पंचविध प्रकार।प्राणापानव्यान निर्धार।उदान समान।।७५।। कर्मेंद्रिय पंचप्राण। ज्ञानेंद्रियपंचक जाण। बुद्धि आणि दुजें मन। सप्तदशकलात्मक।।७६।। समष्टिरूप दैवता। विराट इंद्रिये तत्वतां। कार्यकारणत्वें पाहतां। भेद नादीं।।७७।। अपंचीकृतभूतकार्य । सूक्ष्मरूप भास होय । विषय साधन उपाय । अस्पष्टपणें ।।७८।। वर्षाकाळीं कोमळ दारुण। अथवा सस्यादिकें धान्य। अंकुरतां भासभान । अस्पष्ट होतीं।।७९।।**

---

मन, बुद्धी, चित्त आणि अंत:करणाचे चार विभाग होत. त्यातील चित्त आणि अहंकार मन आणि बुद्धी या दोन प्रकारात अंतर्भूत केल्यानंतर अंत:करणाचे दोन विभाग होतात.(६७) हा अमुक पदार्थ आहे अथवा नाही हा जो संशय अंत:करणात निर्माण होतो ते मनाचे रूप जाणावे. चिंतन करणारे ते चित्त असून त्याचा समावेश मनामध्ये करतात.(६८)निश्चय करणारी ती बुद्धी, तिच्या पोटी अहंकाराचा समावेश होतो.अशाप्रकारे अंत:करणाचे दोन प्रकारचे विभाग होतात.(६९)त्याचप्रमाणे भूतांच्या रजोगुणाच्या अंशापासून क्रियाशक्तीचा जन्म होतो. तत्पूर्वी असाधारण (वेगळाल्या) कार्याची निर्मिती कशी होते, ते पाहू.(७०)आकाशातील रजोगुणापासून वाचा निर्माण झाली.त्याचप्रमाणे वायूच्या रजोगुणापासून पाणी (हात) निर्माण झाले.(७१)तेजाच्या रजोगुणापासून गमन क्रियायुक्त पाय निर्माण झाले. आणि आपाच्या रजोगुणापासून उपस्थ (जननेन्द्रिय) निर्माण झाले.(७२)पृथ्वीच्या रजोगुणाच्या अंशापासून गुदेन्द्रियाचा जन्म झाला. अशाप्रकारे असाधारण (वेगळाल्या)कर्मेंद्रियांची निर्मिती झाली,हे जाणून घ्यावे.(७३पाची भूतांच्या समष्टीचा (अवघ्यांचा एकत्र मिळून) रजोगुण काढून त्यापासून झालेले साधारण कार्य म्हणजे प्राण होय.(७४)वृत्तिभेदाने त्याचे प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान असे पाच प्रकार झाले.(७५)पाच कर्मेंद्रिये,पाच प्राण,पाच ज्ञानेंद्रिये, बुद्धी आणि मन अशी ही सतरा तत्त्वे होत.(७६)अशा या समष्टिरूप दैवताची विराट ही इन्द्रिये होत. त्यांच्यामध्ये कार्यकारणभावाच्या दृष्टीने काही भेद नाही.(७७)अपंचीकृत भूतांचे कार्य सूक्ष्मरूपाने भासते. त्यात विषय, साधन, उपाय ही सर्व अस्पष्टरूपाने असतात.(७८) वर्षाकाळात प्रखर ऊन कोमल बनते किंवा धान्ये अंकुरताना(कोंभ फुटत असताना)अस्पष्ट होतात,(७९)

**तैसा सूत्रात्मा हिरण्यगर्भ। कोमळपणें निघती कोंभ। भासती परि स्वयंभ। स्पष्ट न होतीं।।८०।।**
**पूर्व दृष्टांती स्मरावें। चित्रपटापरि अघवें । स्वरूप चिद्रूप स्वभावें। स्वतां शुभ्रपट ।।८१।।**
**अंतर्यामी जो ईश्वर । मूळ मायेचा विचार । घोटून केला सुंदर । पटु जैसा ।।८२।।**
**हिरण्यगर्भ चंचळरूप।अस्पष्ट जें कां अरूप।अंकुरला जगद्रोप। पट रेखाटल्या परि ।।८३।।**
**पुढें भूतांचें पंचीकरण । करून केलें जग निर्माण । जीवरूपें प्रवेशे आपण । अंतर्यामी।।८४।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । भूतसृष्टिप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - विराटोत्पत्तिप्रकार[ख]

**सूक्ष्म तत्त्वें उद्भवलीं। साधनसंपत्ति प्रगटली। भोग नव्हे फिरूं लागली। वायूचे परी।।१।।मग**
**सर्वेश्वरें अवलोकिलें। भोग्य स्थान पाहिजे केलें। म्हणुनिया आरंभिलें। पंचीकरण भूतांचे।।२।।**
**एकेक भूत द्विधा केलें। अर्ध भागातें ठेविलें। अर्ध चतुर्धा विभागिलें। तें वाटिलें चहूंसी।।३।।**
**यासि भूतकर्दम म्हणावा।येणें स्पष्टत्व ये भूतां सर्वा। मग ब्रह्मांड अवयवा।आकारू होय।।४।।**
**तेचि पंचीकरण कैसें । सविस्तरें बोलिजें तैसें। तेणें रीती बुझसी अपैसे। स्थूल ब्रह्मांड।।५।।**

---

त्याप्रमाणे सूत्रात्मा हिरण्यगर्भ आहे.कोंभ दिसतात पण स्वत: हिरण्यगर्भाचे अवयव स्पष्ट दिसत नाहीत.(८०)मागे सांगितलेल्या चित्रपटाच्या दृष्टान्ताचे थोडे स्मरण करावे.स्वभावत:च चिद्रूप असलेले स्वरूप ब्रह्म हे शुभ्रपटाप्रमाणे आहे.(८१)मूळ मायेचा विकार जो अंतर्यामी परमेश्वर तो घोटून सुंदर केलेल्या पटाप्रमाणे होय.(८२)चंचलरूप जो हिरण्यगर्भ तो म्हणजे जगरूपी रोपट्याचा अस्पष्ट अरूप असा अंकुर असून वरील दृष्टान्तातील रेखांकित केलेल्या पटाप्रमाणे आहे.(८३)त्यानंतर भूतांचे पंचीकरण करून जग निर्माण केले.आणि अंतर्यामी सूत्रात्म्याने त्यात जीवरूपाने प्रवेश केला.(८४)

## पंचिका ४थी, समास ३रा - विराटोत्पतिप्रकार

सूक्ष्म अशी सतरा तत्त्वे निर्माण झाली. त्यांच्या रूपाने साधनसंपत्ती निर्माण झाली. पण ती भोगावाचून वायूप्रमाणे नुसती फिरू लागली.(१) तेव्हा सर्वेश्वराने हे पाहिले.त्यांच्यासाठी भोग्य स्थान निर्माण केले पाहिजे,असा विचार करून त्याने त्या पंचमहाभूतांचे पंचीकरण करण्यास सुरुवात केली.(२) त्या प्रक्रियेत त्याने एकेका भूताचे दोन दोन विभाग केले.अर्धा त्याच्या मूळ ठिकाणी ठेवून दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार विभाग करून ते विभाग मूळ भूतांखेरीज बाकीच्या चार भूतांमध्ये समान वाटले.(३) याला भूतकर्दम अथवा भूतांचा कालवलेला चिखल म्हणतात. त्या योगाने सर्व भूतांना स्पष्ट रूप प्राप्त होते. आणि मग ब्रह्मांडाच्या अवयवांना आकार प्राप्त होतो.(४) आता हे पंचीकरण कसे होते, हे सविस्तर सांगितले पाहिजे. त्या योगाने आपोआप स्थूल ब्रह्मांडाचे स्वरूपही आपोआप कळून येईल.(५)

**प्रथम आकाश केलें द्विधा। अंत:करण भाग अर्धा। उरला भाग तो चतुर्धा। चौ भूतां दिधला।।६।। व्यान वायूसी दिधला। श्रोत्र तेजा समर्पिला। वाचा दिधली आपाला। शब्दगुण पृथ्वीसी।।७।। वायूचे भाग केले दोन। अर्ध भाग ठेविला समान। येर तो चतुर्धा विभागून। दिघला चहूंसी।।८।। मन ठेविलें आकाशीं । त्वचा दिधली तेजासी । पाणि अर्पिला आपासी। पृथ्वीसी स्पर्श।।९।।द्विधा तेजातें केलें। चक्षु अर्धभागा ठेविलें । चतुर्धा करून विभागिलें। येर अर्ध भाग।।१०।।बुद्धि आकाशा दिधली दान । वायूस देता झाला उदान । आपा अर्पिले चरण । रूपार्पण भूमीसी ।।११।। द्विधा केले आपभूत। अर्ध भाग ठेविला उपस्थ। अर्ध चतुर्धा विभागित । तें अर्पित चौ भूतां।।१२।। चित्त दिधलें आकाशा। वायूसी दिधले प्राणांशा । अर्पिली जिव्हा हुतांशा । पृथ्वीतें रसा दिघलें।।१३।। पृथ्वी द्विधा विभागिली। भागार्ध गंधात्मक ठेविली । चत्वार भूतां दिधली । अर्धातील विभागें।।१४।। अहंकारू दे गगना । वायूस अर्पिले अपाना । तेजासि दिधलें घ्राणा । आपातें गुद।।१५।। अंत:करण मन बुद्धि चित्त।अहंकार आकाशीं राहत।तेणें आकाश महाभूत। स्पष्ट जालें।।१६।। व्यान समान उदान । प्राण आणि पांचवा अपान। वायुमध्यें राहून । तेणें वायूस रूप।।१७।।**

---

प्रथम आकाशाचे दोन भाग केले.त्यातील पहिल्या अर्ध्या भागाला अंत:करण नाव असून त्याच्या उरलेल्या अर्ध्या भागाचे चार भाग करून ते उरलेल्या चार भूतांना वाटून टाकले.(६)व्यान हा भाग वायूला दिला.श्रोत्र(कर्णेंद्रिय)हा भाग तेजाला देऊन टाकला.वाचा हा भाग आपतत्त्वाला दिला आणि शब्दगुण हा भाग पृथ्वीला दिला.(७)वायूचे दोन भाग केले.त्यातील अर्धा समान हा भाग वायूत ठेवून बाकीच्या अर्ध्या भागाचे चार भाग करून ते चार तत्त्वांना विभागून दिले.(८)मन आकाशात ठेवले.त्वचा तेजाला दिली आणि पाणींद्रिय(हात)आपतत्त्वाला दिले आणि स्पर्श पृथ्वीला दिला.(९)तेजाचे दोन भाग केले. त्याचा अर्धा चक्षू हा भाग तेजामध्ये ठेवून बाकीच्या भागाचे चार विभाग करून बाकीच्या चार तत्त्वांना वाटून दिला,(१०)बुद्धी आकाशाला दिली,वायूला उदान दिला,चरणेंद्रिय आप तत्त्वाला दिले आणि रूप भूमीला अर्पण केले.(११)आप ह्या भूताचे दोन भाग केले.अर्धा उपस्थ हा भाग आपतत्त्वात ठेवला, बाकीच्या अर्ध्या भागाचे चार भाग करून ते चार भूतांमध्ये वाटले.(१२)आकाशाला चित्त दिले,प्राणाचा अंश वायूला दिला,जिव्हा अग्नीला अथवा तेजाला दिली आणि रस पृथ्वीला दिला.(१३)पृथ्वीचे दोन भागात विभाजन केले.त्यातील गंधात्मक अर्धा भाग पृथ्वीकडेच ठेवला.उरलेल्या अर्ध्या भागाचे चार विभाग करून ते चार भूतांना वाटून दिले.(१४)आकाशाला अहंकार दिला,अपान वायूला दिला,घ्राणेंद्रिय तेजाला दिले,गुदेंद्रिय आपतत्त्वाला दिले.(१५)आकाशामध्ये अशा तऱ्हेने अंत:करण,मन, बुद्धी,चित्त आणि अहंकार हे अंत:करणपंचक राहू लागले.त्यामुळे आकाश हे महाभूत तयार झाले.(१६) व्यान, समान, उदान,प्राण आणि अपान वायूमध्ये राहिले. त्यांच्यामुळे वायूचे रूप तयार झाले.(१७)

**श्रोत्र त्वक्चक्षु जिव्हा घ्राण।ज्ञानेंद्रियपंचक मिळून।राहतां स्पष्ट जाला अग्न।पांचांच्या अंशें।।१८।। वाचा आणि पाद।शिश्न आणि गुद।राहतां आपही विशद। दिसूं लागलें।।१९।। शब्द स्पर्श रूप रस। गंधादि मिळतां पृथ्वीस। तेणें गुणें धरणीस। स्पष्टता आली ।।२०।।कर्दम परी वेगळाले। पंच भूत दिसूं लागले । मग स्वभावें रचिले। सृष्टिकर्त्यांनें ।।२१।।पृथ्वी दशगुणें न्यून । रचिलें असे त्रिभुवन। स्वर्ग मृत्यु पाताळ तीन। अवयव विराटाचें" ।।२२।।सप्त पाताळ चरण। जेथे त्रिविक्रमाचें अधिष्ठान । सप्तविध तयाचें लक्षण । विभागिलें असे।।२३।। पाताळ तें पादतळ । प्रपद तें रसातळ । गुल्फ द्वे महातळ । तळातळ जंघा ।।२४।। जानुद्वय ते सुतळ । उरू अतळ आणि वितळ । जघनदेश महितळ । विराट पुरुषाचा।।२५।। सत्यलोक तो मस्तक । हस्त जाणा इंद्रलोक। अश्विनी देव नासिक । कर्णरंध्र दिशा।।२७।। सूर्यलोक तो नयन । यमलोक दाढा कठिण । स्नेहकला दंत तीक्ष्ण । हास्य ते माया।।२८।।वडवानळ ते जठर। कुक्षि ते सप्तसमुद्र। पर्वत ते अस्थिमात्र । नाडि नद्या।।२९।।**

---

श्रोत्र (कान), त्वचा,चक्षू (डोळे), जिव्हा (जीभ) आणि घ्राण (नाक) अशी पाच ज्ञानेंद्रिये अग्नीच्या ठिकाणी मिळून राहिल्यामुळे त्या पाच ज्ञानेंद्रियांच्या अंशांनी अग्नीचे रूप स्पष्ट झाले.(१८) आपतत्त्वामध्ये वाचा, पाय,शिश्न (मूत्रोत्सर्जनमार्ग),गुद (मलोत्सर्जन मार्ग)आणि हस्त ही पाच कर्मेन्द्रिये एकत्र आल्यामुळे आप तत्त्वही स्पष्टपणे दिसू लागले.(१९)शब्द,स्पर्श,रूप,रस,गंध हे गुण पृथ्वीमध्ये एकवटल्यामुळे पृथ्वीला स्पष्टपणा आला.(२०) हे सगळे तसे पाहिले तर कालवलेले चिखलच पण ही भूते वेगवेगळी दिसू लागली. मग सृष्टिकर्त्याने त्यांचे स्वभावधर्मही वेगवेगळे निर्माण केले.(२१) पृथ्वीच्या दसपट लहान असे स्वर्ग,मृत्यू,पाताळ हे लोक असलेले त्रिभुवन निर्माण केले. हे तीन लोक समष्टीचे स्थूल शरीर असलेल्या विराटाचे तीन अवयव होत.(२२) पाताळाचे सात प्रकार हे त्या विराटाच्या पायाचे सात भाग असून त्यांचे स्वरूप सात प्रकारात विभागले आहे.(२३)पाताळ हे पायाचा तळभाग असून वरचा भाग म्हणजे रसातळ होय. दोन घोटे हे महातळ असून पोटऱ्यांच्या ठिकाणी तळातळ आहे.(२४) दोन गुढघे म्हणजे सुतळ असून दोन मांड्या म्हणजे अतळ आणि वितळ हे भाग होत. त्या विराट पुरुषाचा जघनभाग म्हणजे पृथ्वी होय.(२५) आकाश ही नाभी असून नक्षत्रगण हे त्याचे हृदयस्थान होय. मान हा मह नावाचा लोक आहे. मुखाच्या जागी जन नावाचा लोक आहे आणि तप नावाचा लोक म्हणजे त्याचे कपाळ आहे.(२६)सत्यलोक हे त्याचे मस्तक आहे. इंद्रलोक त्याचे हात होत. अश्विनीकुमार हे त्याची नासिका होत आणि सर्व दिशा या त्याच्या कानाची छिद्रे होत.(२७) सूर्यलोक हा त्याचे डोळे असून यमलोक हा त्याच्या कठिण दाढा होत. स्नेहकला त्याचे तीक्ष्ण दात होत आणि माया ही त्याचे हास्य आहे.(२८) वडवानल (समुद्रातील अग्नी) हा त्याचे जठर आहे. सात समुद्र हे त्याच्या बाजू होत. पर्वत हे त्याच्या अस्थि (हाडे) होत आणि नद्या म्हणजे त्याच्या नाड्या होत.(२९)

**केश वृक्ष वायु श्वसन। रेत ते वृष्टि संपूर्ण । धर्म तो जाणिजे स्तन । अधर्म पृष्ठी ।।३०।। वृषण मित्र वरुण। ब्रह्मदेव तो शिश्न । लज्जा लोभ हे दोन । ओंठ कोमळ ।।३१।।ऐसें त्रिभुवनींचें सर्व । हे विराटाचे अवयव । मग हिरण्यगर्भे ठाव । रहावया केला ।।३२।। इंद्रियरूप सर्व देवता । आपुलाले स्थानीं प्रवेशतां । जीव चैतन्यें व्यापितां । ईश्वर रूपें।।३३।। मग समष्टिरूप ब्रह्मांड। विस्तारलें अति उदंड । मायादेवीचें थोतांड । चळूं लागले ।।३४।। स्वरूपापासून पृथ्वीवरी । जितुकीं कारणें निर्धारीं । ब्रह्मांडकार्याभीतरीं। तितुकींहि आलीं ।।३५।। सर्व व्यापार सिद्ध जाला । इंद्रिया विषय फावला । देवतेसी आनंद जाला । प्रवर्तते जाले ।।३६।। व्यापार[४] बहुत असती । परि अवघ्या पंचवृत्ति । एकेक वृत्तीचे होती । दोन दोन भेद।।३७।। व्यापार गगनतत्वाचा । अंतःकरण अंश जातीचा । व्यान जाणावा वायूचा । आधार चळणा ।।३८।। तेजाचें श्रोत्र ज्ञानेंद्रिय । आपाची वाचा कर्मेंद्रिय । पृथ्वींतील शब्द विषय। होय ऐकणें बोलणें ।।३९।। वायुतत्त्वाचा व्यापार। मन आकाशाचें निर्धार। समान वायूचा आधार। त्वचा ज्ञानेंद्रिय तेजाची।।४०।।**

---

वृक्ष हे त्याचे केस होत,वायू हा त्याची श्वसनक्रिया होय.पाऊस हा त्याचे वीर्य होय.धर्म हे त्याचे स्तन होत आणि अधर्म हा त्याची पाठ होय.(३०)त्याचे वृषण(अंड कोश)म्हणजे मित्रावरुण हे देव होत. ब्रह्मदेव हा त्याचे शिश्न होय लज्जा आणि लोभ हे त्याचे दोन कोमल ओठ होत.(३१)अशा तऱ्हेने त्रिभुवनातील सर्व पदार्थ हे त्या विराटाचे अवयव आहेत.मग त्या विराट शरीरामध्ये हिरण्यगर्भ म्हणजे सूत्रात्म्याने आपल्या वस्तीचे स्थान बनवले.(३२)इंद्रियरूपी सर्व देवता आपापल्या ठिकाणी प्रवेश करून राहिल्यानंतर जीवचैतन्याने ईश्वराच्या रूपाने ते विराट-शरीर व्यापून टाकले.(३३)मग समष्टिरूप ब्रह्माडांचा खूप मोठ्या प्रमाणात विस्तार झाला आणि मायादेवीचा पोकळ पसाराही वाढू लागला.(३४) स्वरूपापासून पृथ्वीपर्यंत जेवढी कारणे असू शकतात,तेवढी सर्व ब्रह्मांडरूपी कार्यामध्ये समाविष्ट झाली.(३५)असा हा सृष्टिरचनेचा उद्योग सिद्ध झाला. इंद्रियांना त्यांचे त्यांचे विषय मिळाले. त्यांच्या देवतांनाही आनंद मिळू लागला.त्यामुळे सर्व इंद्रियांना विषयसेवनाकडे प्रवृत्ती निर्माण झाली.(३६)या शरीराकडून होणारे व्यापार अनंत आहेत.पण वृत्ती मात्र फक्त पाचच आहेत.प्रत्येक वृत्तीचे दोन दोन प्रकार आहेत.(३७)यातील गगनतत्त्वाचा व्यापार पाहू. त्याच्या अंशांपैकी अंत:करण हा अंश त्याचा स्वत:चा अंश आहे.वायूपासून त्याचा व्यान हा अंश झाला आहे.तो त्याचा चलनाधार आहे.तेजापासून श्रोत्र हे ज्ञानेंद्रिय त्याने घेतले आहे.आपतत्त्वापासून वाचा हे कर्मेन्द्रिय त्याने घेतले आहे.पृथ्वीपासून शब्द हा विषय त्याने घेतला आहे.या गगनतत्त्वाचा व्यापार ऐकणे बोलणे या स्वरूपाचा आहे.(३८-३९) वायुतत्त्वाचा व्यापार घडण्यासाठी आकाशतत्त्वापासून मन हा अंश त्याने घेतला आहे. वायुतत्त्वाचा समान हा अंश त्याचा चलनाधार असून तेजतत्त्वाचा अंश जी त्वचा ती त्याचे ज्ञानेंद्रिय आहे.आपतत्त्वाचा

**कर्मेंद्रिय आपाचा पाणी। स्पर्श विषय मेदिनी। प्रगटून व्यापार दोनी। ग्रहणदान स्पर्शन।।४१।।तेज तत्त्व व्यापारलें। गगनीहूनी बुद्धीतें घेतलें। उदान वायूतें साह्य केलें । ज्ञानेंद्रिय चक्षु।।४२।।आपाचा कर्मेंद्रिय चरण। पृथ्वींतील रूप गुण। व्यापार होताती दोन। पाहणें आणि चालणें।।४३।।आप कैसें व्यापारत। घेऊन आकाशाचें चित्त। प्राणवायु साह्य करीत। जिव्हा ज्ञानेंद्रिय तेजाची।।४४।। उपस्थ कर्मेंद्रिय आपुलें। भूमींतून रसातें काढिलें। तेणें व्यापार दोन जाले। अशन आणि रती।।४५।।पृथ्वी तत्त्वाचा व्यापार। आकाशींचा अहंकार। अपानवायू साह्यकर। ज्ञानेंद्रिय घ्राण तेजाचें।।४६।।आपाचें कर्मेंद्रिय गुद। आपुला निजगुण गंध। विसर्ग आणि सुगंध। दोनची व्यापार।।४७।।तमोगुण द्रव्यशक्ति विषय । क्रियाशक्ति प्राण कर्मेंद्रिय। रजोगुणें ग्रहण होय। भोगसाधन।।४८।।सत्त्वगुण ज्ञानशक्ति । अंतःकरण ज्ञानेंद्रिय होती। चांगले वाईट निवडिती। सुखदुःख भोग जीवात्मया।।४९।।असो ब्रह्मांडाच्या पोटीं। चहूं खाणीची दाटी।**

---

पाणी (हात) हा अंश त्याचे कर्मेन्द्रिय आहे आणि पृथ्वीतत्त्वाचा स्पर्श हा अंश त्याचा विषय आहे. त्या सर्वांच्या संघातापासून घेणे-देणे आणि स्पर्श करणे हे व्यापार निर्माण होतात.(४०-४१) तेजतत्त्व जेव्हा व्यापाराला प्रवृत्त होते, तेव्हा ते गगनतत्त्वापासून बुद्धी हा अंश घेते, वायुतत्त्वातील उदान या अंशाचे ते साहाय्य घेते. चक्षू हे त्याचे ज्ञानेंद्रिय. हा त्याचा स्वतःचाच अंश आहे. आपतत्त्वाचा रूप हा अंश त्याचा गुण होतो. या सर्वांच्या मिश्रणातून पाहणे आणि चालणे हे दोन व्यापार निष्पन्न होतात.(४२-४३) आता आपतत्त्वाचा व्यापार पाहू. त्यासाठी ते आकाशतत्त्वापासून त्याचा चित्त हा अंश घेते. त्याला वायुतत्त्वाचा प्राण हा अंश साह्य करतो. तेजाचा अंश असलेली जिव्हा ही त्याचे ज्ञानेंद्रिय होते. उपस्थ हा त्याचाच अंश या व्यापारातील त्याचे कर्मेन्द्रिय होते. ते पृथ्वीचा रस हा अंश घेते. या सर्वांच्या संयोगातून अशन (खाणे) आणि रतिसुख हे व्यापार होतात.(४४-४५) पृथ्वीतत्त्व जेव्हा व्यापाराला प्रवृत्त होते. त्यावेळी ते आकाशतत्त्वापासून त्याचा अहंकार हा अंश घेते. त्याला वायुतत्त्वाचा अंश असलेल्या अपान वायूचे साहाय्य होते. तेजाचा अंश घ्राण हे त्याचे ज्ञानेंद्रिय होते. आपतत्त्वाचा गुद हा अंश त्याचे कर्मेन्द्रिय होते. पृथ्वीतत्त्वाचा स्वतःचा गंध हा गुण असा एकत्र समवाय होतो, तेव्हा विसर्ग आणि सुगंध हे दोन व्यापार सिद्ध होतात.(४६-४७) या व्यापारक्रियेत सत्त्व,रज आणि तम या तीन गुणांचाही सहयोग आहे. तसेच त्या व्यापाराला द्रव्यशक्ती, क्रियाशक्ती आणि ज्ञानशक्ती या तिहींची आवश्यकता असते. विराटाच्या व्यापारातील द्रव्यशक्ती म्हणजे तमोगुण होय. तोच त्या व्यापाराचा विषयही आहे. त्यातील क्रियाशक्ती, प्राण आणि कर्मेन्द्रिये ही भोगसाधने रजोगुणाची होत.(४८) ज्ञानशक्ती, अंतःकरण आणि ज्ञानेंद्रिये ही सत्त्वगुणाची होत. यांच्या साहाय्याने जीवात्म्याचे चांगले वाईट भोग, सुख आणि दुःख निवडण्याचे कार्य होते.(४९)असो. ब्रह्मांडाच्या पोटात चारी खाणींची दाटी झाली. सर्व व्यष्टीसहित समष्टी, स्थावर,

**सर्व व्यष्टिसहित समष्टि। स्थावर जंगमें ।।५०।। चित्रपट रंगविला। तेणें सर्व दिसूं लागला । तैसा ब्रह्मगोळ स्पष्ट जाला। चराचररूप ।।५१।। सस्यादि धान्यें फळलीं । नाना जिन्नसीं कळों आलीं । स्थावर जंगमें कळूं लागलीं । स्पष्टरूप।।५२।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । विराटोत्पत्तिप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - पिंडोत्पत्तिप्रकार

**आतां पिंडोत्पत्तिप्रकार । बोलिजे तो सविस्तर । ते होऊनिया सादर । श्रवण करावें।।१।।एक सागरीचें जीवन। सरिता तळीं भरती तेणें । तेणेंचि गाडगीं रांजणें। कितेक भरती।।२।।तरि सागर नव्हे न्यून।जैसा तैसा परिपूर्ण। तैसा सूत्रात्मा हिरण्य। सागरापरी।।३।।तया हिरण्यगर्भाचे अंश । विभागले जीवमात्रास । लिंगदेह वासनात्मकास। ओळखावें।।४।। पाणी मेघद्वारा आलें।हिरण्यगर्भ कैसें विभागलें। अविद्या मायेनें उभविलें । नाना पिंड।।५।।जैसे विहिरी आड खणिती। जळें लागता पूर्ण होती । जे जे पिंड निर्माण होती । तेथे व्याप्ति लिंगाची।।६।।**

---

जंगमे यांची गजबज झाली.(५०)अशा तऱ्हेने सर्व चित्रपट रंगवून तयार झाला. त्यामुळे सर्व गोष्टी स्पष्ट दिसू लागल्या आणि त्यायोगे चर आणि अचर पदार्थांनी युक्त असे सर्व ब्रह्मांड स्पष्ट झाले.(५१) सस्यादी धान्ये सुफलित झाली, ब्रह्मांडातील विविध पदार्थांच्या योगाने त्यातील स्थावर पदार्थ, जंगम पदार्थ स्पष्ट होऊन कळू लागले.(५२)

## पंचिका ४थी, समास ४था - पिंडोत्पत्तिप्रकार

आता पिंडाच्या उत्पत्तीचा प्रकार सविस्तर सांगितला जाईल तो आदरयुक्त होऊन श्रवण करावा.(१) एकाच सागराच्या पाण्याने नद्या,तळी भरतात.त्याच पाण्याने कित्येक गाडगी,रांजणे भरतात.(२)तरी सागर त्यामुळे काही क्षीण होत नाही.तो नेहमीसारखाच परिपूर्ण असतो. हिरण्यगर्भ हा जो ब्रह्मांडाचा सूत्रात्मा तो या सागराप्रमाणे असतो.(३)त्या हिरण्यगर्भाचे अंश सर्व प्राणिमात्रात विभागले गेलेले असतात.वासनात्मक अशा त्या लिंगदेहास ओळखावे.(ब्रह्मांडाच्या लिंगदेहाचे नाव हिरण्यगर्भ असे आहे.तो सर्व प्राणिमात्रांमध्ये वासनांच्या रूपाने विभागला गेला आहे. त्याला ओळखावे असा अभिप्राय.)(४) अविद्या मायेने विविध प्रकारच्या पिंडांची निर्मिती केली.त्या पिंडांमध्ये हिरण्यगर्भ कसा विभागला जातो?त्याचे उत्तर,मेघाच्या मार्गाने पाणी जमिनीवर येते.ते ज्याप्रमाणे सर्वत्र विभागले जाते त्याप्रमाणे होय.(५)आपण ज्या ज्या वेळी नवीन आड,विहिरी खोदतो त्यावेळी त्यांना पाणी लागते व ते आड व

**नित्य नवे उत्पन्न होती। कितेक घट फुटोनि जाती। कितेक जळें भरले असतीं। कोरडे कितेक।।७।। तैसेचि पिंड उद्भवती। कितेक लयातें पावती । एक जन्मतांची मरती । एक पावती वृद्धाप्य।।८।। कीटकापासून गज । मासला एकचि सहज । लिंगदेहाची समज । दुसरी नाहीं।।९।।अंगुष्ठमात्र भाविती । लिंगदेह सावयव म्हणती । तें जाणावें नेणती । वर्म कांही।।१०।।पर्वतप्राय जीव असती। आणि धाकुटेहि नेणों किती। लिंगदेहाची व्याप्ती। सारखी असे।।११।।अंगुष्ठमात्र जालें। तरि लहान थोर न वचे व्यापिलें। पुन्हा येथें आक्षेपिलें। ज्या त्या सारिखा अंगुष्ठ।।१२।। ऐसेंहि कदा न घडे। मुंगीस गजदेहा येणें पडे। गजादि होतात किडे। प्रारब्धानुसार।।१३।। जितुकी उपाधी तितुके जळ । प्रमाण करणें ते बाष्कळ। जालें आशंकेचे निर्मूळ। येणें रीती सहजची।।१४।।तेचि लिंग प्रारब्धवशें। वृष्टिद्वारा औषधि होतसे। तयाचें वीर्य होतसें। पुरुषें अन्न भक्षितां।।१५।।स्त्रीपुरुषाचे संयोगी। रक्तरेत मिळतां कमळभागीं । गर्भाधान**

---

त्या विहिरी लगेच पाण्याने भरून जातात. त्याप्रमाणे नवीन पिंड निर्माण झाला रे झाला की तेथे हा सूक्ष्मदेह अथवा लिंगदेह व्यापून टाकतो.(६) घट नित्य नवे निर्माण होतात.त्यांतील कित्येक घट फुटून जातात. कित्येकांमध्ये पाणी भरले जाते. कित्येक तसेच कोरडे राहातात.(७) त्याचप्रमाणे पिंड शरीरे निर्माण होतात. त्यातील कित्येक पिंड शरीरांचा विनाश होतो. कित्येक जन्मल्याबरोबर मरण पावतात,तर काहींना वार्धक्य प्राप्त होते.(८) हे देह कीटकांचे असोत,की हत्तींचे असोत, सर्वत्र लिंगदेहांचे स्वरूप एकच असते. त्यात वेगळेपणा नसतो.(९) कोणी लिंगदेह आंगठ्याच्या आकाराचा मानतात. कोणी तो अवयवयुक्त आहे असे मानतात. त्यांची ही समज अज्ञानपणाची आहे,असे समजावे.त्यांना लिंगदेहाचे खरे स्वरूप कळलेले नाही.(१०) या जगात काही जीव पर्वताच्या आकाराचे असतात आणि लहान जीव तर असंख्य आहेत.पण या सर्वांमध्ये लिंगदेह सारख्याच प्रकारे व्यापून असतो.(११)देह अंगुष्ठमात्र असला तरी त्यात लिंगदेह सामावू शकत नाही किंवा मोठ्या देहाला तो पुरेसा होत नाही,असा प्रकार नसतो.यावर काही जण म्हणतील की अंगुष्ठमात्र लिंगदेह याचा अर्थ त्या त्या देहाच्या अंगठ्याएवढा त्याचा आकार असतो.(१२) तर असेही कधी नसते. मागील जन्मातील मुंगीला पुढील जन्मी हत्तीचा देह प्राप्त होतो आणि हत्ती वगैरे मोठ्या प्राण्यांना त्यांच्या प्रारब्धानुसार कीटकांचा जन्म प्राप्त होतो.(१३) तेव्हा जेवढी उपाधी असेल तेवढेच जल तिच्यात सामावेल. तेव्हा लिंगदेहाचा आकार उपाधीच्या आकारानुसार बदलतो. याबाबतीत अनुमानादी प्रमाणे पुढे करणे बाष्कळपणाचे ठरेल. अशा प्रकारे वरील बाराव्या ओवीत उपस्थित केलेल्या आशंकेचे सहज निर्मूलन झाले. (जितकी उपाधी तितके त्यात पाणी सामावेल या न्यायाने पिंडाची व्याप्ती समजून घ्यावी.)(१४) हाच लिंगदेह प्रारब्धानुसार पावसाची वृष्टी झाल्याबरोबर औषधी म्हणजे वनस्पतिरूप पावतो. मग पुरुषाने ती वनस्पती अन्न म्हणून भक्षण करताच तिचे वीर्यात रूपांतर होते.(१५) मग स्त्री आणि पुरुष यांचे मीलन होताच स्त्रीच्या ओटीपोटात

**लागवेगीं।स्त्रियासी होय।।१६।।गारुडी एकाचे एक दाविती।तैसे रक्तरेताचे देह होती।हे रेताची म्हणावी शक्ति।तरि सर्वदा नव्हे।।१७।।इंद्रजाल याहून कोणतें।रेतरक्त कठिण होतें।आणि जन्मतां वाढूं लागतें।चैतन्य होतें तैसेची।।१८।।अरे ही मायादेवी कौटाली।अघटण घडवी एकली।असो कोण पडे इच्या ख्याली।जे नाथिली स्वभावें।।१९।।अधिक होता रेत।तेथें जन्म पावे सुत।रक्ताधिक्यें कन्या होत।नपूंसक समानत्वें।।२०।।गर्भी नवमासादि पूर्ण होता।बाळका प्रसवे माता।अस्थिमांसादि समस्ता।सप्त धातु।।२१।।साडेतीन श्वेत रेताच्या।साडेतीन रक्त रेताच्या।उभय माता पित्याच्या।धातु सांत।।२२।।परि हे पंचभूतांचे अंश।तेणेंचि होय पिंडाचा भास।तेचि ऐका पंचवीस।पांच पांच एकेकाचे॥।।२३।। अस्थि मांस त्वचा नाडी रोम।कठिण पृथ्वीचा अनुक्रम।रक्त रेत लाळ मूत्र घाम।द्रव्यत्वें आपाचें।।२४।।क्षुधा तृषा आळस निद्रा मैथुन।हे आभास तेजाचें लक्षण।चंचळ तितुके वायूचे गूण।तेचि अवधारा।।२५।।चलण वळण प्रसरण।निरोधन अकोचन।काम क्रोध**

---

स्त्रीचे रक्त व पुरुषाचे वीर्य एकत्र मिसळतात आणि त्यायोगे स्त्रियांना लगेच गर्भधारणा होते.(१६)गारुडी लोक एका पदार्थाच्या जागी दुसरा पदार्थ दाखवतात त्याप्रमाणे रक्त आणि वीर्याचे देह तयार होतात.ही शक्ती त्या वीर्याची म्हणावी तर तसे मुळीच नाही.(१७)ते वीर्य आणि रक्त आळून कठीण होते आणि त्यातून बालकाचा जन्म झाल्यानंतर ते वाढूही लागते.पण या सर्व प्रक्रियेचा चैतन्यावर काही परिणाम होत नाही.ते जसे होते तसेच निर्विकार राहते.हा सर्व प्रकार इंद्रजालाप्रमाणे (जादूसारखा)नव्हे काय?(१८)या चमत्काराचे खरे कारण म्हणजे ही मायादेवीच चेटूक करणारी आहे.ती एकटीच अशक्य कोटीतील घटना घडवण्यास समर्थ आहे.अशी ती माया स्वभावत:च अस्तित्वहीन म्हणजे असत् खोटी आहे.असो हिच्या नादी कोण ज्ञानी मनुष्य लागेल?(१९)वीर्याचा भाग जास्त असेल तर पुत्र निपजतो,रक्ताचा भाग जास्त असेल तर कन्या निपजते.दोन्ही समान असतील तर नपुंसक प्रजा निपजते.(२०)गर्भामध्ये बालकाचे नऊ महिने पूर्ण झाले की माता अपत्याला जन्म देते.त्याचा देह अस्थि,मांस,सप्तधातू इत्यादी घटकांनी पूर्ण असतो.(२१)त्यातील साडेतीन धातू श्वेत(पांढऱ्या)रंगाच्या रेताच्या असून साडेतीन धातू तांबड्या रंगाच्या रक्ताच्या असतात.दोघाही मात्यापित्यांच्या मिळून सात धातू होतात.(२२)परंतु शरीराचे हे सर्व घटक पाच भूतांचे अंश आहेत.त्यांच्यामुळे ही पिंडाची भासमान आकृती तयार होते. प्रत्येक भूताचे पाच-पाच अंश असे एकूण पंचवीस अंश या पिंडामध्ये असतात.(२३)त्यातील कठीण अशा पृथ्वीचे पाच अंश म्हणजे अस्थि(हाडे),मांस,त्वचा,नाड्या आणि केस हे होत.तसेच द्रवरूप असणाऱ्या आप(जल)तत्त्वाचे अंश रक्त,वीर्य(रेत),लाळ,मूत्र,घाम हे होत.(२४) क्षुधा (भूक), तृषा (तहान),आळस,निद्रा,मैथुन हे आभास तेजाचे घटक(लक्षणे)आहेत.आता या पिंडाच्या ठिकाणी जेवढे चंचलपणाचे अंश आहेत ते सर्व वायूचे गुण आहेत.ते कोणते ते ऐका.(२५)चलन,वलन,प्रसरण,निरोधन

**शोक व्यापकपण । मोह भय आकाशाचे।।२६।।जायते जन्म अस्ति आहे।विवर्धते वाढताहे। विपरिणमते तारुण्य पाहें। विकार चौथा।।२७।।अपक्षीयते वृद्धत्व येतें। शरीर इंद्रिय क्षीण होतें । नश्यति तें नासतें। प्राणवियोगें।।२८।सांगीतले सहा विकार। इतुक्याचें घर हें शरीर।शरीर म्हणजे नाहीं उशीर।क्षणमात्र नासावया।।२९।।जारज अंडज स्वेदज । आणि चौथी उद्भिज । खाणीचा विस्तार समज। चौऱ्यांशी लक्ष योनी।।३०।हिरण्यगर्भ इतुकें ठाई। सूक्ष्म रूपें असें पाहिं। प्रगट कोठें दिसत नाहीं । सुषुप्तीपरी।।३१।।त्यांत चैतन्य प्रतिबिंबिलें । त्यासि जीव नाम ठेविलें । भूमंडळी संपूर्ण दाटलें । प्राणिमात्र।।३२। ब्रह्मांडीचें इंद्रिय । अंशे पिंडीं प्रवेश होय । जितुका बोलिला समुदाय । देवतारूप।।३३।।इंद्रिय व्यापार देवता । गोलकीं राहिल्या तत्वतां । तया त्रिपुटीची[७] व्यवस्था। पिंडी कैसी।।३४।। अध्यात्म अंतःकरण। अधिभूत निर्विकल्प स्फुरण।अधिदैवत तया जाण। विष्णु असे।।३५।।**

---

आकुंचन हे वायूचे गुण आहेत,तर काम,क्रोध,शोक,व्यापकता,मोह,भय हे आकाशाचे गुण आहेत.(२६)आता उत्पन्न झालेल्या सर्व पदार्थांचे पुढीलप्रमाणे सहा विकार आहेत.पहिला विकार जायते म्हणजे जन्म घेणे हा होय,दुसरा विकार अस्ति म्हणजे असणे.तिसरा विकार विवर्धते म्हणजे वाढणे हा होय.विपरिणमते म्हणजे वाढण्याची शीग गाठणे अथवा तारुण्याची अंतिम मर्यादा गाठणे हा चौथा विकार होय.(२७)अपक्षीयते म्हणजे वार्धक्य येणे हा पाचवा विकार असून वृद्धावस्थेमध्ये शरीर आणि इंद्रिये क्षीण होतात आणि शेवटचा सहावा विकार म्हणजे नश्यति म्हणजे नष्ट होणे.प्राण शरीराला सोडून सोडून जातात आणि ते शरीर नासते म्हणजे त्याचे अस्तित्व संपते.(२८) अशा प्रकारे शरीराचे सहा विकार सांगितले.आता वर सांगितलेल्या सर्व घटकांचे मिळून हे शरीर बनते.ते कधी ना कधी नष्ट होतेच.शरीर म्हणजे नष्ट व्हायला जेथे उशीर लागत नाही ते(अशी त्याची व्युत्पत्तीच आहे मुळात.)(२९)या शरीरांच्या जारज(आवरणपिशवीतून बाहेर पडणारे),अंडज (अंड्यातून बाहेर येणारे),स्वेदज म्हणजे घामापासून निर्माण होणारे आणि उद्भिज्ज म्हणजे जमिनीतून वर येणारे अशा चार प्रकारच्या खाणीत विस्तार होतो.त्यांमध्ये चौऱ्याऐंशी लक्ष जीव योनींचा समावेश होतो.(३०)या इतक्या सर्व ठिकाणी हिरण्यगर्भ सूक्ष्म रूपाने असतो हे लक्षात घ्यावे.तो प्रकट रूपाने कोठेच दिसत नाही.आपण सर्वच झोप घेतो.पण ही झोप मात्र आपल्याला दिसत नाही.हिरण्यगर्भाचे तसेच आहे.(३१)त्यात चैतन्याचे प्रतिबिंब पडते त्यास जीव असे नाव दिले आहे.संपूर्ण पृथ्वीत सगळीकडे प्राणिमात्रांचीच दाटी झाली आहे.(३२)ब्रह्मांडाची इंद्रियतत्त्वे अंशरूपाने पिंडात प्रवेश करतात.त्या पिंडात प्रवेश करून राहिलेल्या इंद्रियतत्त्वांना देवता म्हणतात.(३३)इंद्रिय व्यापार देवता आपापल्या ठिकाणी राहतात.पिंडातर्गत इंद्रिये.त्यांच्या देवता आणि त्यांचे व्यापार यांची जी त्रिपुटी सिद्ध होते ती पुढीलप्रमाणे आहे.(३४)पिंडातर्गत इंद्रियांना अध्यात्म असे म्हणतात.त्यांच्या व्यापारांना स्वामींनी अधिभूत म्हटले आहे व अधिदैवत म्हणजे त्या इंद्रियांच्या

**अध्यात्म तेंचि मन। संकल्प अधिभूत लक्षण । अधिदैवत संपूर्ण। चंद्रमा होय ।।३६।। बुद्धि अध्यात्म होय । बौद्धव्य अधिभूत निश्चय । अधिदैवताचा उपाय । ब्रह्मदेव ।।३७।। अध्यात्म असे चित्त। चेतव्य तें अधिभूत । तेथें असे अधिदैवत। नारायण ।।३८।।अध्यात्म अहंकार। अहंकर्तव्य व्यापार । अधिभूत आणि रुद्र ।अधिदैवत असे ।।३९।।अध्यात्म हे श्रोत्र । अधिभूत श्रोतव्य व्यापार । अधिदैवताचा विचार । दिशा असे।।४०।।त्वचा अध्यात्म जाण। स्पृष्टव्य अधिभूत लक्षण । अधिदैविकाची खूण । जाणावी वायू।।४१।। चक्षु अध्यात्म जेथें । द्रष्टव्य अधिभूत । सूर्य अधिदैवत । प्रसिद्ध जाणावें ।।४२।।अध्यात्म हे रसन।अधिभूत रससेवन।अधिदैवत वरुण।ओळखावें।।४३।।घ्राण अध्यात्म जेथें। घ्रातव्य अधिभूत।अधि दैवत पहा तेथें। अश्विनौ देव।।४४।।वाचा अध्यात्म अग्नि दैवत।वक्तव्य हेंचि अधिभूत। पाणि अध्यात्म इंद्र दैवत। अधिभूत ग्रहण दान।।४५।।अध्यात्म पादाधिभूत गमन।अधि दैवत तो वामन।अध्यात्म उपस्थाधिभूत भोगण।अधिदैव प्रजापती।।४६।।गुद अध्यात्म जेथें।विसर्ग अधिभूत । मृत्यु अधिदैवत । नैऋत्य नाम।।४७।।प्राणपंचक विषय। यासी जडत्व कारण होय। अध्यात्म त्रिपुटी न होय। म्हणोनिया।।४८।।ऐसे सूक्ष्म समुदाय। प्रवर्तती स्वस्वविषय।कीटक अथवा पर्वतप्राय।शरीर तेथें वासना।।४९।वासनाध्यासें मरती। तैसाचि जन्म पावती।अंते मतिः सा गतिः।यातायाती चुकेना।।५०।।पुण्य होतां स्वर्गी चढती।पापास्तव कीटकादि होती।समानत्वे पावती।मनुष्य जन्म।।५१।।मनुष्यजन्मीं जे जे केलें।तें तें तत्काळ सिद्धि गेलें।जीवन्मुक्त ज्ञानें झालें।नरदेहास्तव।।५२।।जयासी नरदेह लाधला।तयासी महान लाभ जाला।ब्राह्मणत्वही पावला।तयावरी।।५३।।ज्ञान होय प्रमाणजन्य।**

---

अधिष्ठात्री देवता.शरीरातील अंत:करणपंचक, ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेन्द्रियपंचक अशा एकूण १५ इंद्रियांची त्रिपुटे **३५ ते ४७** या ओव्यांत सांगितली आहेत.त्यांचे स्वरूप तळटीपेतील कोष्टकावरून कळेल.(३५) शरीरामध्ये आणखी एक प्राणपंचक आहे.ते जड असल्यामुळे त्याचे अज्ञान हे कारण आहे.त्यामुळे वरील तीन पंचकांच्या बाबतीतली अध्यात्म त्रिपुटीही संभवत नाही.(४८)अशा तऱ्हेने सूक्ष्म समुदाय स्वत:च्या विषयात प्रवृत्त होतात. ते कीटक असोत वा पर्वत असोत, शरीर तेथे वासना हा मात्र नियम सर्वत्र आहे.(४९)वासनेच्या अध्यासामुळे (प्रभावामुळे)ते जीव मरतात व पुन्हा जन्महो घेतात. अंतकाळी त्यांची जी बुद्धी असते तीच गती त्यांना प्राप्त होते. त्यामुळे त्यांच्या येरझारा काही चुकत नाहीत.(५०)पुण्य घडले तर ते स्वर्गात जातात,पाप घडले तर त्यामुळे कीटकादी योनीत जातात. दोन्ही समान असतील तर त्यांना मनुष्यजन्म प्राप्त होतो.(५१)मनुष्यजन्मात जे जे केले जाते ते ते तत्काळ सिद्धीस जाते.म्हणून नरदेहामुळे ज्ञान प्राप्त होते आणि ज्ञानामुळे माणूस जीवन्मुक्त होतो.(५२)ज्याला नरदेह प्राप्त होतो त्याला फार मोठा लाभ होतो. त्यातभर म्हणून त्याला ब्राह्मणाचा जन्म मिळाला.(५३)त्यातही त्याला

**तोचि ब्राह्मण तोचि धन्य । ज्ञानेवीण कृपण अन्य । श्रुति म्हणताहे ।।५४।। जो नरदेहासि आला । ज्ञानेंवीण व्यर्थ गेला । ब्रह्म न जाणतां झाला । आत्महत्यारा ।।५५।। मी देह ऐसी वासना । कोटि ब्रह्महत्या क्षणक्षणा । कोण करील त्यास गणना । अंत न लगे।।५६।। मायाप्रवाहीं पडिले । जन्मुनीया पुन्हा मेले । मरतांचि पुन्हा आले । देह धरुनी ।।५७।। वर्तणुकी क्रियमाण घडे। तिळतीळ संचित जोडे । प्रारब्ध होऊन येणें पडे । पुन्हा देहा।।५८।। कीटक नदीचा प्रवाहीं । पडतां त्या विसावा नाहीं । तैसा जीवास अवकाश कांही। क्षण एक नसे।।५९।। नदीतीरीं कोणी भला । तेणें कीटक प्रवाहीचा काढिला । मग सुखें विश्रांति पावला । वृक्षछायेसी ।।६०।। तैसा कृपानिधि जैं भेटे । अनंत सुकृताचे नेटें । तरि भवसागर ओहटें । क्षणामाजीं[११] ।।६१।। पावावया ज्ञानयोग । तो एकचि सत्संग। सत्संगेवीण रोग । नाना साधनें ।।६२।। सत्संग ज्ञानासी आधार । सर्व विश्रांतीचें माहेर। सर्व सुखाचा सागर । संतचरणीं असे ।।६३।। सत्संगापरते नाहीं सार । जीवमात्रासी आधार । कृपादृष्टी भवसागर । कोरडा करिती ।।६४।। सिंहावलोकनें तत्त्वतां ।चित्रपटीच्या**

---

आत्मप्रचीती,शास्त्रप्रचीती,गुरुप्रचीती या तिन्ही प्रमाणांनी सिद्ध असे ज्ञान प्राप्त झाले तर तोच खरा ब्राह्मण होय.तोच खरा धन्यही होय.इतर सर्वही ज्ञानावाचून(ज्ञानाच्या अभावी)कृपण होत असे श्रुतीचे म्हणणे आहे.(५४)नरदेहास येऊनही ज्ञान प्राप्त झाले तर तो वाया गेला,ब्रह्मासंबंधी अज्ञानीच राहिला तर तो आत्महत्याराच होय.(५५)'मी देह आहे' अशी वासना म्हणजे क्षणाक्षणाला एक कोटी ब्रह्महत्या केल्याप्रमाणेच होय.त्या पापाची गणना कोण करत बसेल?त्याला अंतच लागत नाही.(५६) मायाप्रवाहात पडलेले जीव तेथेच जन्मतात,तेथेच मरतात,मेल्यानंतर पुन्हा देह धारण करून तेथेच पुन्हा येतात.(५७) नित्याच्या वर्तणुकीतून क्रियमाण कर्म घडत जाते. त्या योगानेच कणाकणाने संचित कर्मामध्ये भर पडत जाते आणि त्यातीलच काही प्रारब्ध होऊन पुन्हा देहाला येणे भाग पडते.(५८)कीटक नदीच्या प्रवाहात पडताच त्यास विसावा मिळत नाही. त्याप्रमाणे जीवाला एका क्षणाचीही उसंत मिळत नाही.(फुरसत मिळत नाही.)(५९)ज्याप्रमाणे नदीच्या काठावरील कोणी भला मनुष्य कीटकाला बाहेर काढतो आणि तो कीटक एखाद्या वृक्षाच्या सावलीत सुखी होऊन विश्रांती घेतो,(६०)त्याप्रमाणे मायाप्रवाहातील त्या जीवाला त्याच्या पूर्वी केलेल्या अनंत पुण्यांच्या प्रभावाने दयासागर असे सद्गुरू जेव्हा भेटतात तेव्हा तो संसारसागर एका क्षणात ओसरतो आणि नष्ट होतो.(६१)ज्ञानप्राप्ती होण्यासाठी सत्संग अथवा संतसंगती हाच एक उपाय आहे.संतसंगतीवाचून इतर साधने म्हणजे रोग होत.(६२)संतांची संगती हाच ज्ञानाचा आधार होय.संतसंगती हेच सर्व सुखांचे माहेर आहे.संतांच्या चरणांपाशीच सर्व सुखांचा सागर आहे.(६३)संतसंगासारखी दुसरी सारभूत गोष्ट नाही.संतसंग हाच सर्व प्राणिमात्रांचा आधार आहे. ते संत आपल्या कृपादृष्टीने हा संसारसागर कोरडा करून टाकतात.(६४) आतापर्यंत झालेल्या विचारमंथनाचे

**दृष्टांता । चराचरादि समस्ता । ब्रह्मांडांतरवर्ति ।।६५।। ब्रह्मादिस्थावरापर्यंत। जड चंचल जें दिसत । तीं तीं चित्रें समस्त । उत्तमाधममध्यम ।।६६।। जंगमें चळती सकळ । स्थावरें तैसीचि निश्चळ । भिन्न उपाधि केवळ । परी तीं चित्रें सर्वहि ।।६७।।पाहतां का पटावरी। नाना वनें नाना गोपुरीं । तिन्हीं लोकींचीं परी । तैसी आहे ।।६८।। स्थावरीं चंचलत्व दिसेना । तेथें चिदाभास असेना । मायादेवीनें कल्पना। आभासाची न केली ।।६९।चित्रपटीं मनुष्य केलें। त्या वस्त्राचें आभास काढिले । पर्वत वृक्ष रेखाटिले । त्या वस्त्राभास नाहीं।।७१।। दर्पणीं प्रतिबिंबलें । मुखचि ऐसें गमलें । परि तें निःशेष नाथिलें । आभासहि तैसा।।७२।। पट जैसा पसरिती । तेव्हां सर्व चित्रें दिसतीं । या मायेस्तव जगदुत्पत्ति । दिसूं लागती सर्वही ।।७३।। पट जैसा गुंडाळितां । चित्रें हरपतीं तत्त्वतां। मायादेवी वितुळतां । जग लया जाय ।।७४।। ऐसा उत्पत्ति आणि लय । क्षणक्षणां होत जाय । याची गणना न होय। चित्रपटापरी ।।७५।(सस्य)ादिकें सर्व फळतीं । ग्रीष्मकालीं करपतीं । बीजरूपें असतीं । भूमीमध्यें ।।७६।। नेत्र उघडितां सर्व दिसे । नेत्र झांकितां**

---

सिंहावलोकन करायचे झाल्यास या ब्रह्मांडामधील सर्व चराचर(६५) ब्रह्मापासून स्थावरापर्यंत जे जे जड अथवा चंचल दिसते ते ते सर्व मागील चित्रपटाच्या दृष्टांतातील उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ चित्राप्रमाणे होत.(६६)त्यातील जंगम पदार्थ चलनवलन करतात, तर स्थावर पदार्थ निश्चल असतात. त्यांच्या उपाधी भिन्न भिन्न असल्या तरी ही सर्व चित्रेच आहेत.(६७) एकाच पटावर विविध वने, विविध गोपुरे असतात तद्वत तिन्ही लोकांची स्थिती आहे.(६८)स्थावर पदार्थांच्या मध्ये चलनवलन (चंचलपणा) दिसत नाही तेथे चैतन्याचा आभास नाही, कारण मायेने तेथे चैतन्याची कल्पना केली नाही.(६९) चित्रपटावरील माणसांच्या अंगावर वस्त्रांचे आभास दाखवले.त्याप्रमाणे पर्वत,वृक्ष इत्यादी स्थावर पदार्थ त्या चित्रपटावर रेखाटले पण त्यांच्या ठिकाणी वस्त्रांचे आभास काढले नाहीत.(७०)वस्त्राभास वस्त्रासारखा दिसतो, चैतन्याभास चैतन्यासारखा दिसतो. पण त्याला वास्तवता नसते.(७१) आरशात मुखाचे प्रतिबिंब आपण पाहातो तेव्हा ते मुख खऱ्या मुखासारखेच वाटते.पण संपूर्णपणे खोटे (अस्तित्व नसलेले) असते. तसेच चिदाभासाचे जाणावे.(७२)पट पसरल्यानंतर सर्व चित्रे दिसू लागतात. त्याप्रमाणे या मायेमुळेच सर्व जगाची उत्पत्ती दिसू लागते आणि सर्व पदार्थ दिसू लागतात.(७३)पट गुंडाळून ठेवताच त्यावरील सर्व चित्रे हरवून जातात. त्याप्रमाणे मायादेवी विरून जाताच जगही लय पावते.(७४) अशा तऱ्हेने प्रत्येक क्षणाला उत्पत्ती आणि लय होत असतो आणि चित्रपटांप्रमाणेच त्यांची गणना करता येत नाही.(७५) (वर्षाऋतूत) सर्व धान्यादी सर्व वनस्पती सुफलित होतात. पण ग्रीष्म काळात ती सर्व करपून जातात. पण भूमीमध्ये बीजरूपाने राहतात.(७६) डोळे उघडल्याबरोबर सर्व काही दिसू लागते. पण तेच डोळे मिटल्यानंतर काहीही दिसत नाही.श्वास चालू असेल तर कल्पना उद्भवतात,पण

**कांही नसे । श्वास उठतां कल्पना उमसे । श्वासाभावीं लय होय ।।७७।। येणें रीती मायादेवी । उद्भवतां जगातें दावी । जगासगट लयातें जावी । हा स्वभावचि तिचा।।७८।। उत्पत्तिक्रम दाविला। जैसा वादीचा सर्प जाला । लय अनुक्रमें बोलिला । पुढिले समासीं।।७९।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । पिंडोत्पत्तिप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

**।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - पंचप्रलयप्रकार**

**ऐका प्रलयाचें लक्षण । तें पंचप्रकारें जाण । तेचि कैसे भिन्न भिन्न । बोलिजेते ।।१।। पिंडी प्रलय दोन । एक निद्रा एक मरण । सुषुप्तिकालीं कल्पना लीन । प्रलयापरी ।।२।। दुसरा प्राणाचा वियोग । सरतां प्रारब्धभोग । लिंगाध्यासें पुन्हा मग । जन्मासि येती।।३।। तैसे ब्रह्मांडीं दोन प्रलय । भौतिका संहार होय । दुजा भूतांचा होय क्षय । मूळमायेसह।।४।। त्रेचाळीस लक्ष वीस सहस्त्र। इतुके जातां संवत्सर। कृतादि युगें होतीं चार। पर्याय एक।।५।। पर्याय होतां हजार । ब्रह्मयाचे प्रहर चार । शिणें करितां व्यापार । करी निद्रा इतुकीची।।६।। स्थावर जंगमें लया जाती । जलमय होय जगती । देवताचक्रें वावरती। वायुरूपें ।।७।।**

---

श्वास नसेल तेव्हा त्या कल्पनांचा लय होतो.(७७) त्याप्रमाणे मायादेवीची उत्पत्ती होताच ती जगाचे दर्शन घडविते आणि जगाबरोबर ती लयाला जाते, हा तिचा स्वभावच आहे.(७८) दोरीच्या ठिकाणी मुळात नसणारा साप दिसू लागतो. त्याप्रमाणे या विश्वाच्या उत्पत्तीचा प्रकार सांगितला.आता पुढल्या समासात ओघानेच लयाची माहिती द्यावयाची आहे.(७९)

**पंचिका ४थी, समास ५वा - पंचप्रलयप्रकार**

आता प्रलयाचे स्वरूप ऐका.तो पाच प्रकारचा आहे.ते पाच प्रकार एकमेकांहून कसे भिन्न आहेत ते आता सांगण्यात येईल.(१)पिंडामध्ये दोन प्रकारचे प्रलय असतात.त्यापैकी निद्रा हा एक प्रकार असून दुसरा प्रकार मरण हा आहे. झोपेच्या काळात कल्पना प्रलयकाळातल्याप्रमाणेच लय पावत असते.(२)दुसरा प्रकार म्हणजे प्रारब्धाचा भोग संपताच प्राणांचा वियोग होऊन मरण येते तो होय. मग नंतर लिंगदेहाच्या आरोपामुळे नवीन जन्म प्राप्त होतो.(३)त्याप्रमाणेच ब्रह्मांडातही दोन प्रलय असतात.पहिला प्रलय पंचभूतांपासून निर्माण झालेल्या जगाचा संहार होतो तेव्हा होतो आणि पंचभूतांचा मूळ मायेसह जेव्हा संहार होतो तेव्हा दुसरा प्रलय होतो.(४)त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षे उलटताच कृतादी चार युगांची समाप्ती होते.त्याला एक पर्याय म्हणतात.(५)असे एक हजार पर्याय होताच ब्रह्मदेवाचे चार प्रहर होतात.हे चार प्रहर व्यापार (नित्याचे उद्योग) करून तो थकतो. आणि मग तेवढाच काळ तो निद्रा घेतो.(६) त्यावेळी स्थावर, जंगम सर्व पदार्थ लयाला जातात.मग सर्व पृथ्वी जलमय होऊन जाते आणि

**स्वर्ग मृत्यु पाताळ । इतुकें उचंबळें जळ । सरतां निद्रेचा काळ । ब्रह्मा जागा होय ।।८।। सकळ जळमय पाहतां । ब्रह्मदेव होय प्राशिता । देव प्रगटती तत्त्वतां। सूर्यादिक ।।९।। जीव सृष्टि उद्भवली । पूर्वकर्मे पुन्हां जालीं । मग व्यापारूं लागली । पूर्वील स्थिती।।१०।। हा प्रलय दैनंदिन । जीवमात्राचें हनन । महाप्रलयाचें लक्षण तेंचि कैसें ।।११।। शतवर्षे अनावृष्टि । तेणें संहारे जीवसृष्टि । सूर्यासी खडतरता पुष्टी । तेणें आटी जलाची ।।१२।। सप्त सागर कोरडे होती । वडवानळा चढे दीप्ति । तेणें जळूं लागली क्षिती । मस्तक पोळे शेषाचें।।१३।।मग विषज्वाळा वमितां । नुरेचि पृथ्वी जळतां । शिवनेत्रींचा अग्नि धडकतां। राखोंडी होय।।१४।।मेरु अवघा जळाला। देवतामेळ ओसरला। सप्त लोकांचाही जाला। येकसरा अंत।।१५।।पुढें शतवर्षे वृष्टि होत। अखंड पाणी संधिरहित । जळ मातलें अद्भुत। सीमेपरतें।।१६।।राखोंडी भूमीची विराली। नवतीच जैसी जन्मली। लवणा परी जाली। एकरूप जळीं।।१७।।मग महातेज प्रगटलें। इतुकें जळ शोषिलें। तप्तलोहीं शिंपडिलें।**

---

देवतांचे समुदाय वायुरूप धारण करून वावरू लागतात.(७)तेव्हा ते जल, स्वर्ग, मृत्यू, पाताळ या तिन्ही लोकांना व्यापून टाकण्याइतके उसळते.मग निद्रेचा काळ संपताच ब्रह्मदेव जागा होतो.(८)सर्व ब्रह्मांड जलमय झालेले पाहिल्यावर ब्रह्मदेव ते सर्व जल पिऊन टाकतो आणि मग सूर्य इत्यादी देव प्रगट होऊ लागतात.(९)त्यानंतर जीवसृष्टीची पुन्हा उत्पत्ती होते. पूर्वकर्मांची पुन्हा उत्पत्ती होते. मग ते जीव पूर्वीप्रमाणेच व्यापार करू लागतात.(१०)या प्रलयाला दैनंदिन प्रलय म्हणतात. (कारण तो ब्रह्मदेवाच्या एका दिवसात होतो.)या प्रलयामध्ये सर्व जीवांचा नाश होतो. आता महाप्रलयाचे स्वरूप कसे असते. ते पाहू.(११)या महाप्रलयात शंभर वर्षेपर्यंत पाऊस पडत नाही. त्यामुळे सर्व जीवसृष्टीचा संहार होतो. सूर्याचा रखरखीतपणा वाढतो. त्यामुळे सर्व पाणी आटून जाते.(१२) सातही समुद्र कोरडे होतात. वडवानलाचे(सागरातील अग्नीचे)तेज वाढते.त्यायोगाने पृथ्वी जळू लागते. त्या अग्नीमुळे शेषाचे मस्तकही होरपळून निघते.(१३)त्यामुळे तो विषारी ज्वाळा ओकू लागतो. त्यामुळे पृथ्वी जळून खाक होते आणि तिचा लवलेशही शिल्लक राहात नाही. त्याचवेळी शंकराच्या तिसऱ्या डोळ्यातील अग्नी भडकतो. त्याने पृथ्वीची राख होऊन जाते.(१४) संपूर्ण मेरू पर्वत जळून जातो. देवतांचे सर्व समूह ओसरून जातात. त्याबरोबरच सातही लोकांचा एकदमच अंत होतो.(१५) पुढे शंभर वर्षे वृष्टी होऊ लागते. सगळीकडे पाणीच पाणी होऊन जाते. त्या पाण्याला कोठेही कड नसते. पाणी आणि जमीन यांचा जोड म्हणून कुठे दिसत नाही. सगळीकडे सीमा नसलेले पाणी भरून जाते.(१६) पृथ्वीची राख पाण्यात विरघळून जाते. ती जणू काही पूर्वी जन्मलीच नव्हती, असे होऊन जाते. मीठ जसे पाण्यात विरघळून एकरूप होऊन जाते तशी पृथ्वी पाण्याशी एकरूप होते.(१७) मग महातेज प्रकट झाले. त्याने हे सर्व पाणी त्याने शोषून घेतले. तापलेल्या लोखंडावर पाणी शिंपडल्यावर त्याची जशी अवस्था

**जळ जैसें।।१८।।दीपासी पालव घातिला। तेवि अग्नि वायूनें विझविला। वायुही वितळून गेला। आकाशा पोटीं ।।१९।।शून्य आणि शब्दगुण। आणि सर्व देवतागण। अहंकारी जाती विरून। तमोगुणीं।।२०।।तम रज सत्व गुण।मूळस्फुरणीं होती लीन। विद्या अविद्या शक्ति दोन। निःशेष हरपती।।२१।।जळ आटतां प्रतिबिंबासी। राहणें न घडे अपैसी। शक्तीवीण जीवेशासी। तैसें जालें।।२२।।चंचळ स्फुरण राहिलें। अहं ब्रह्म लया गेलें। उपरि जें कोंदाटलें। तें बोलतां नये।।२३।।द्वैतेवीण अद्वैत । शब्देवीण संकेत । उपमेवीण हेत । कैसा करावा।।२४।।वादीचा सर्प जाला । तो वादींत लया गेला । तैसा प्रसंग हाही जाला। विवर्तवाद।।२५।।येथें श्रोतीं आक्षेपिलें। कीं सर्व ब्रह्मीं लया गेलें। तरि कैसें जन्मा आलें। पुन्हां जीव।।२६।।जन्मा न येतां मुक्त जालें। ऐशा आशंकेशी बळावलें। याचें उत्तर दिधलें। पाहिजे आतां।।२७।।सुषुप्तिकालीं मनादि लीन। निःशेष हरपती जाण। तरि जागृति घडे येणें। कासयासी।।२८।।जागृतीस प्रारब्धें आणिलें। तैसेंचि जीव जन्मा आले। स्वरूपीं प्रारब्ध कैसें राहिलें । सुषुप्तीपरी।।२९।।ज्ञानें बीज नाहीं जळालें । तेंचि जन्मा**

---

होते तसा हा प्रकार होतो.(१८) नंतर दिव्याला पदराने निरोप द्यावा तसा वायू अग्नीला विझवून टाकतो. पुढे तो वायूही आकाशाच्या पोटात वितळून जातो.(१९) आकाशाचे शून्यत्व, शब्दगुण व सर्व देवता अहंकारात आणि तमोगुणात विरून जातात.(२०) तमोगुण, रजोगुण आणि सत्त्वगुण हे मूलस्फुरणात लीन होतात. त्यावेळी विद्या आणि अविद्या या दोन्ही शक्ती संपूर्णपणे हरवून जातात.(२१) पाणी आटल्यानंतर त्यात पडणारे प्रतिबिंबही आपोआपच राहात नाही. त्याप्रमाणे विद्या आणि अविद्या या शक्ती नाहीशा होताच जीव आणि ईश्वर या प्रतिबिंबिस्वरूप तत्त्वांची अवस्था होते.(ते दोन्ही नष्ट होतात.)(२२) नंतर चंचल स्फुरणही थांबते. 'अहं ब्रह्म' हा अहंकारही लय पावतो. त्यानंतर जे सर्वत्र व्यापून उरते त्याचे वर्णनच करता येत नाही.(२३) अद्वैताचे निरूपण द्वैताचा आश्रय केल्याशिवाय कसे करावे? शब्दाचा आधार न घेता संकेत कसा करता येईल? उपमेचा आश्रय केल्याखेरीज इष्ट अर्थ कसा सांगावा?(२४) दोरीचा सर्प झाला तो यथार्थ ज्ञानानंतर दोरीतच लयाला जातो. तसाच हा विवर्तवादाचा प्रकार होय. (ब्रह्मावर मिथ्याभूत विश्वाचा आरोप होतो. ते विश्व आता ब्रह्मातच विलीन होते.)(२५) येथे श्रोत्याने आक्षेप घेतला आहे. सर्वच जर ब्रह्मामध्ये लय पावते तर जीव पुन्हा कसे जन्माला येतात? किंवा(२६) जीव जन्माला न येताच मुक्त होतात काय? अशी शंका मनात जोर धरू लागते. त्या शंकेचे आता उत्तर दिले पाहिजे.(२७) झोपेमध्ये मनादी इंद्रिये संपूर्णपणे नाहीशी होतात. तरीसुद्धा जागृतीत ती परत कशी येतात?(२८) तर जीवांच्या प्रारब्धाने त्यांना परत आणले जाते. त्याच न्यायाने प्रलयानंतर जीवसृष्टीचा पुन्हा जन्म होतो. स्वरूपाच्या ठिकाणी प्रारब्ध कसे राहते. झोपेत मनादी जसे राहतात तसेच हे प्रारब्ध प्रलयानंतरही राहते.(२९) ज्ञानाने ते बीज जळून गेलेले नसते. तेच अज्ञान

**घेउनी आलें । अज्ञान म्हणसी नाथिलें । तरि तेंचि ज्ञान ।।३०।। अज्ञान मिथ्या कळलें । तयासीच ज्ञान बोलिलें । परि ब्रह्म न जाणतां जालें । कैसें समाधान ।।३१।। तुज मिथ्या ज्ञान कळलें । ब्रह्म नाहीं जाणीतलें । तरि मग अज्ञान गेलें । काशावरूनी ।।३२।। सर्प अज्ञानें भासला । रज्जु नाहीं ओळखिला । म्हणतां मिथ्या सर्प वाटला । हाचि असंभव।।३३।। जरि यथार्थ रज्जू कळे । तेव्हांचिअज्ञान मावळें । तरि सर्पभान वितुळें । आपेआप।।३४।। तैसें अज्ञाननिवृत्ति होतां । ब्रह्म जाणिलें तत्त्वतां । ब्रह्म स्वानुभवें जाणतां। अज्ञान हरपे।।३५।। म्हणून ज्ञानें जो पावन जाला। तोचि एक मुक्त जाला।अज्ञानें प्रलय जरी जाला । तरी जन्म न चुके।।३६।। म्हणून प्रलय पांचवा। तो आत्यंतिक जाणावा। देह असतां ओळखावा। ज्ञानविवेकें।।३७।। मी देहसें भाविलें । चेतना जडत्व कल्पिलें । बळकट तादात्म्य जालें। चिदचिदैक्यरूप।।३८।। वेगळा असून तेचि जाला । तादात्म्य ऐसें म्हणावें त्याला । तेणें एकदेशत्व पावला । जीवत्व रूपें ।।३९।। अहंकारे ग्रंथि पाडिली । देहबुद्धीनें बळकट केली। नाना यातना पावली । जन्ममरणाच्या ।।४०।। जरी सद्‌गुरु सत्‌शास्त्र । सत्संग**

---

होऊन ते जन्माला आलेले असते. आता अज्ञान मिथ्या आहे असे कळणे हेच खरे ज्ञान होय.(३०)अज्ञान मिथ्या आहे असे कळणे यासच ज्ञान म्हटले जाते हे जरी कळले तरी जोपर्यंत ब्रह्मज्ञान होत नाही तोपर्यंत समाधान कसे होईल?(३१)तुला मिथ्यात्वाचे ज्ञान झाले आणि ब्रह्मज्ञान झाले नाही असे म्हणत असशील तर तुझे अज्ञान नष्ट झाले हे कशावरून म्हणतोस?(३२)दोरीच्या ठिकाणी अज्ञानामुळे सर्प दिसत होता हे तुला कळले पण दोरीचे ज्ञान झाले नाही असे कसे म्हणतोस?त्याचा अर्थ सर्प खोटा आहे हे तुला कळलेच नाही.सर्पाचे खोटेपण कळणे हेच दोरीचे ज्ञान होय.(३३)दोरी खऱ्या अर्थाने कळते तेव्हाच अज्ञानही नष्ट झालेले असते.त्यामुळे दोरीच्या ठिकाणचा सर्पाचा आभासही आपोआप वितळतो(म्हणजे नाहीसा होतो.)(३४) त्याप्रमाणे अज्ञानाचे निरसन होताच ब्रह्माचे स्वरूप कळते. ते ब्रह्म स्वत:च्या अनुभवाने कळते तेव्हाच त्याच्या विषयीचे अज्ञानही हरपते.(३५)म्हणूनच ज्ञानाने जो पवित्र झाला तोच खरा मुक्त होतो.अज्ञान जर शिल्लक राहिले तर त्या अज्ञानाने प्रलयकाळ जरी झाला तरी जन्म टळत नाही.(३६)तेव्हा पाचवा आत्यंतिक प्रलय समजून घेतला पाहिजे.हा प्रलय देह अस्तित्वात असतानाच ज्ञान आणि विवेक यांच्या साहाय्याने जाणता येतो.(३७)मी देह आहे अशी कल्पना केली.चैतन्याच्या ठिकाणी जडत्वाची कल्पना केली आणि चित् आणि अचित्(किंवा चैतन्य आणि जड) यांचे ऐक्य मानले.(३८)वेगळा असून दुसऱ्या पदार्थाशी एकरूप होणे याला तादात्म्य असे म्हणतात.त्यामुळे स्वत: आत्मा असून तो जीव म्हणून वेगळा होतो आणि त्यामुळे एकदेशी म्हणजे मर्यादित होतो.(३९)अहंकारामुळे ही गाठ(ग्रंथी)पडते.देह हाच आत्मा अशा दृढबुद्धीने ती गाठ पक्की होते आणि त्यामुळे जन्ममरणाच्या अनेक यातना तो जीव भोगत राहतो.(४०)अशा वेळी सद्‌गुरू,

**सद्विचार । पूर्वपुण्ये अधिकार । सकळ मिळे ।।४१।।तरीच हा ग्रंथिभेद । उडे देहबुद्धीचा खेद । आपुला आपण स्वानंद । ब्रह्मरूप ।।४२।। दृश्य अवघें ओसरलें । मायेचें महत्त्व उडालें । दुजेपणाचें जालें । निसंतान ।।४३।। आतां मरण कोणा यावें। जन्महि तैसा न संभवें । जेथें कल्पनेच्या नावें । शून्याकार ।।४४।। मृगजळ डोळा दिसतें। तैसें देह प्रारब्धीं वर्ततें । निचेष्टीत कीं चेष्टतें । कोण जाणें ।।४५।। तेचि आपण असावें । तरि त्यासवें यावें जावें । आपण वस्तु स्वभावें । देहादि मिथ्या ।।४६।।मरणा ऐलीकडे मेला। निजसुखें सुखावला । आत्यंतिक प्रलय याला । बोलिजे ऐसे ।।४७।।माया हे जलधर । वर्षताहे जगनीर । चिद्गगन तें अपार । कोरडें असे ।।४८।। मायामेघ लया जातां । नाथिलेंपणें उद्भवतां । ब्रह्माकाशासी तत्वतां । लाभ ना हानी ।।४९।।**

**इति श्रीमदागमसारे।उपनिषत्तात्पर्यानुसारे।पंचप्रलयप्रकारे।पंचमसमासः।।५।।**

**इति पंचिका संपूर्णा।।४।।ओवीसंख्या ३२१**

---

सच्छास्त्र, सत्संग, सद्विचार, पूर्वपुण्य इत्यादीमुळे अधिकार (पात्रता) प्राप्त झाला.(४१) तरच हा ग्रंथी (गाठ) सुटतो. त्यावेळी आत्म्याला देह मानण्याची बुद्धी नष्ट होते आणि ब्रह्मरूपाची प्राप्ती होऊन स्वानंद भोगणे शक्य होते.(४२) दृश्य सगळे नाहीसे झाले, मायेचे महत्त्व संपले,दुजेपणाची भावना पूर्णपणे नष्ट झाली.(४३) अशा अवस्थेत मरण कोणाला येईल? आणि मरणाबरोबर जन्मही तसा शक्य नाही. त्या अवस्थेत कल्पनाही शून्य होते.(४४) डोळ्यांना मृगजळ दिसावे त्याप्रमाणे देह प्रारब्धानुसार व्यापार करत असतो. तो देह निचेष्टित आहे की हालचाल करणारा आहे, याचे भान तरी कोणाला असते? (अद्वैतानुभवात असे भान असणेच शक्य नाही.)(४५) आता देह म्हणजे आपणचअशी भावना असेल तर त्या देहाबरोबर आपण आलो, गेलो अशी भाषा वापरणे शक्य होईल. पण आपण म्हणजे साक्षात ब्रह्म आहोत असा जर अनुभव असेल तर स्वाभाविकपणे देह इत्यादी मिथ्या ठरतात.(४६) असा माणूस मरण येण्याअगोदरच मेला (म्हणजे त्याची देहात्मभावना नष्ट झालेली असते.) तो स्वरूपाच्या प्राप्तीच्या सुखाने सुखी झालेला असतो. या अवस्थेला आत्यंतिक प्रलय असे म्हणतात.(४७) मायारूपी मेघ जगरूपी जलाचा वर्षाव करत असतात.(मायेमुळे जगाची निर्मिती होते.) पण चैतन्यरूपी अपार आकाशाचा मात्र त्या जलाशी मुळीच संबंध नसतो. ते अगदी कोरडे असते.(४८) मायारूपी मेघ लय पावला काय किंवा मिथ्यात्वाने उत्पन्न झाला काय, ब्रह्मरूप आकाशाला खरे पाहता काही लाभ नाही अथवा हानीही नाही.(४९)



# पंचिका ५वी - त्वंपदशोधन

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - तनुत्रितयनिरसन

**नरदेहासी आलिया । विचारें जाणावें आत्मया । तरी करणें तें महत्कार्या । संपादिलें।।१।।**
**साळीचें भूस सांडुनी । तांदळू घेईजे निवडुनी । तैसें देहत्रय ओलांडुनी । आत्मा ओळखावा।।२।।**
**आत्मा म्हणिजे आपण। स्वत:सिद्ध.प्रकाशमान। मी नाहीं हा अनुमान । कोणासि नसे।।३।।**
**तरी जाणणें तें काय। कासया विचार उपाय। आत्मा देह हा निश्चय। सदृढ असे।।४।।देहचि आत्मा भाविला।दोहीपरी दूषण या बोला।कर्मेवीण देह जन्मला। नाश जाला केलें त्या।।५।।**
**हे देह आतां जाले। तरि पूर्वकर्म कोणें केलें। येणें न करितां जन्मलें। हा एक दोष।।६।।**
**प्रस्तुत कर्म करिताहे।देह तरि येथें नासताहे।भोगेंवीण केलें क्षया जाताहे। हा दुजा दोष।।७।।**
**पाहतां कर्मी जे असती। तेहि आत्मा वेगळा भाविती। देहनाशें स्वर्गप्राप्ति। यागें आत्मयासी।।८।।**
**अस्थिमांसानें भरिलें।नाडीत्वचेनें गुंडाळिलें। त्या आत्मा म्हणतां जालें। दुजें अज्ञान कोणतें।।९।।**

---

### पंचिका ५वी, समास १ला - तनुत्रितयनिरसन

नरदेहाला आल्यानंतर विचाराच्या साहाय्याने आत्म्याला ओळखावे.असे करण्याने फारच मोठे कार्य पार पाडल्यासारखे होते.(१)साळीच्या भुसाचा त्याग करून आतला तांदूळ निवडून घ्यावा त्याप्रमाणे देहत्रयाला ओलांडून मुख्य आत्मा निवडावा.(२)आत्मा म्हणजे आपण स्वत:च स्वत: सिद्ध आणिप्रकाशमान असा.मी नाही असा तर्कच कोणी करू शकत नाही.(म्हणून आपण म्हणजेच आत्मा स्वत:सिद्ध आहे आणि आपण स्वत:पणाची जाणीव हीच प्रकाशाची खूण)(३)तर मग आत्मा जाणावयाचा म्हणजे काय करायचे? आत्मा म्हणजे देहच असा निश्चय ठरल्यानंतर अन्य विचार कशासाठी करायचा?(४)आत्मा म्हणजे देहच अशी कल्पना केल्यावर तिच्यात दोन दोष उत्पन्न होतात.हा देह कोणत्याही कर्माशिवाय जन्माला आला आणि जे पूर्वी केले असेल त्या कर्माचा नाश झाला असे मानावे लागते.(५)हा देह आताच जन्माला आला असे मानले तर त्या देहाच्या निर्मितीचे कारण अशी कर्मे कोणी केली?या देहाने ती केली नाहीत तर ती न करताच तो देह जन्माला आला काय?हा एक दोष होय.(६)दुसरा दोष म्हणजे या जन्मात हा देह जी कर्मे करतो त्या कर्माचा भोग घेण्यापूर्वीच तो नष्ट होतो,हा दुसरा दोष होय.(७)कर्ममार्गी जे लोक आहेत,त्यांचा विचार पाहता,तेही देह आणि आत्मा वेगळे आहेत असे मानतात.यज्ञाच्या योगाने देहनाशानंतर आत्म्याला स्वर्गप्राप्ती होते,असे ते मानतात.(८)तेव्हा अस्थिमांसाने भरलेल्या नाडी,त्वचा यांनी गुंडाळलेल्या शरीराला आत्मा म्हणणे याहून दुसरे अज्ञान कोणते?(म्हणजे

**सुषुप्ति अथवा मरणकाळी । देहासि निचेष्टता आली। त्यासि आत्मा कल्पना केली । जडें कीं चैतन्यें ।।१०।। देह जड कांहींच नेणें । मी देह भाविला चैतन्यें । म्हणोनि जाणतां ओळखणें । देह आत्मा नव्हे ।।११।। तरि हे देह काशाचे । म्हणसी तरि पंचभूतांचे। पंचीकरण पांचपांचाचे । पूर्वी निरोपिलें ।।१२।। तूं देहावेगळा अससी । म्हणुन देहातें जाणसी । माझा देहही म्हणसी । सहज होसी विलक्षण ।।१३।। होतां देहासी व्यापार । विषय सेवितां अपारे । प्रमाणचैतन्य इंद्रियद्वारें । परिणमे ते जागृती ।।१४।। हे अवस्था स्थूलाची । मानूं नये आत्मयाची । जाणें व्यवस्था व्यवहाराची । ते अवस्था केवी।।१५।। तया अवस्थेचे स्थान । तें जाणावें नयन । अवस्थेवीण स्थान । आत्म्यासि केवी ।।१६।। देह अवस्था स्थान । तिहींसी अकार अभिधान । प्रणवाचा प्रथम चरण । आत्मा नव्हे।।१७।। इतुक्याचा अभिमान वाहतो । विश्वाभिमानी या हेतो । अवस्था सरतां जातो । अभिमान त्यासवें ।।१८।। पुरुषासि कोणताही अधिकार । येतां पावे नाम मात्र । सांडिता तेथील व्यवहार । नामहि जाय त्यासवें ।।१९।। तैसा जीवात्मा हा विश्व । जागृति अभावीं कैचें**

---

शरीरालाआत्मा मानणे हेच सर्वात मोठे अज्ञान आहे.)(९)निद्रेमध्ये अथवा मरणकाळी देहाला निश्चेष्टता येते.(त्याची हालचाल बंद होते)त्याला आत्मा असे कोण मानतो?जडतत्त्व की चैतन्यतत्त्व?(१०)देह तर जड असल्यामुळे त्याला काहीच कळत नाही.देहान्तर्गत चैतन्यच'मी देह आहे'अशी कल्पना करत असते.म्हणून जाणत्याने ओळखावे की देह हा आत्मा नाही.(११)तर मग हा देह कशाचा बनला आहे, असे म्हणशील तर मागे आपण निरूपण केलेच आहे की,'पंचमहाभूतांच्या पाच पाचांच्या पंचीकरणाने देह झाला आहे.'(पहा-आगम.पं.४.स.४ओ.२४ ते २६)(१२)तू देहाहून वेगळा आहेस म्हणूनच तू देहाला जाणू शकतोस.'माझा देह'असेही म्हणतोस तेव्हाच तू त्याहून वेगळा आहेस असे कबूल करतोस.(१३)देहाचे व्यापार चालू असताना इंद्रियांच्या मार्गाने विषयांचे अपार सेवन चाललेले असते. प्रमाणचैतन्य म्हणजेअंत:करणवृत्तियुक्त जीव इंद्रियांद्वारे परिणाम पावतो तिला जागृती अवस्था म्हणतात.(१४) ही स्थूल देहाची अवस्था आहे.तिला आत्म्याची अवस्था मानू नये.आता या अवस्थेत जो व्यवहार घडतो म्हणजे इंद्रियांद्वारे विषयांचे जे सेवन चालते तिला जागृती असे म्हणतात. या अवस्थेचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.(१५)त्या अवस्थेचे मूल स्थान नेत्र हे आहे.अवस्था नसेल तर आत्म्याला स्थान कसे असेल?(१६)देह, अवस्था, स्थान या तिहींना 'अ'कार असे नाव आहे. 'अ'कार हा प्रणवाचा पहिला चरण आहे. पण तो आत्मा नाही.(१७) या इतक्यांचाही अभिमान बाळगतो या कारणास्तव त्याला(जीवाला) विश्वाभिमानी असे म्हणतात.ही अवस्था संपताच तिचा अभिमानीही तिच्याबरोबर जातो.(१८) ज्याप्रमाणे पुरुषाला एखादा अधिकार प्राप्त होतो तेव्हा त्याला ते अधिकारवाचक नाव प्राप्त होते व तो अधिकार नष्ट होताच त्यामुळे प्राप्त झालेले नावही त्याबरोबर लयाला जाते.(१९) त्याप्रमाणे या जीवात्म्याला

**नांव । हा सत्त्वगुणाचा समुदाव । आत्मा गुणसाक्षी ।।२०।। स्थूल भोग स्थूलासी । आत्मा जाणता तयासी । सुखदु:ख हें साक्षीसी । बोलोंचि नये ।।२१।। स्थूल देह आपण नसतां । कोणा स्त्रीपुत्रादिममता । हें असो वर्णआश्रमता । आत्म्यासी नाहीं ।।२२।। देह जेथें जन्मले । त्या कुळाचे धर्म लागले । देहसंबंधी गेले । देहासवें ।।२३।। तीर्थ व्रत जप ध्यान । आणीकही नाना साधन । तें तें देहास्तव होणें । आत्मा साक्षी ।।२४।। एवं स्थूलाचें निरसन । जे मी नव्हे आपण। आत्मा साक्षी चैतन्यघन । जडातें जाणता ।।२५।। शिष्यें येथें प्रार्थिलें । देह नि:शेष नाथिलें । मरतां फिरून जन्मा आलें । यासि काय निमित्त।।२६।। तरी हे जाणावी वासना । लिंगदेहाची कल्पना । देहबुद्धीची कामना । जन्मासि मूळ ।।२७।। तया लिंगदेहाचे हनन । जरी होय आत्मज्ञान । ज्ञानेंवीण नाना साधन । तेणें लिंगभंग नव्हे ।।२८।। हे अग्नीनें जळेना । उदकींही बुडेना । योगादि शीणती नाना । परि हे अनावर ।।२९।। समुद्रपानहि बरवें । मेरू उन्मुळी सुखें नावें । अग्निही प्राशन करवें । परी चित्तनिग्रह कठिण।।३०।। याचें व्हावया खंडण । तें एकचि**

---

विश्व नाव तात्पुरते प्राप्त झालेले असते. ती जागृती अवस्था नष्ट होताच ते नाव कसे राहील? विश्वाभिमानी हा सत्त्वगुणाचा समुदाय असून आत्मा त्या गुणाचा केवळ साक्षीदार आहे.(२०) स्थूल देहाला स्थूल भोगच प्राप्त होतात. आत्मा फक्त त्यांना जाणतो. म्हणजे तो साक्षी आहे. साक्षीला सुखदु:ख असते असे म्हणताच येत नाही.(२१) स्थूल देह जर आत्मा नसेल तर स्त्री, पुत्र इत्यादीची ममता कोणाला असेल? म्हणजे आत्म्याच्या ठिकाणी ही ममत्वाची भावना नसते. एवढेच नव्हे तर वर्ण, आश्रम इत्यादी भेदही आत्म्याला नाहीत.(२२) देह ज्या ठिकाणी जन्म पावतो, त्या कुळाचे धर्म त्या देहाला लागतात. ते धर्म ते देहसंबंध आहेत तोवरच असतात त्यामुळे ते देहाबरोबरच नाहीसेही होतात.(२३) तीर्थ, व्रत, जप, ध्यान इत्यादी आणिकही काही साधने ही सर्व देहामुळेच शक्य होतात. आत्मा हा फक्त त्यांचा साक्षी असतो.(२४) अशा प्रकारे स्थूल देह म्हणजे आत्मा या मताचे निरसन झाले. आत्मा म्हणजे मी नव्हे. आत्मा चैतन्यघन (चैतन्यरूप) असून, तो जड अशा स्थूल देहाचा फक्त जाणता आहे.(२५)या प्रसंगी शिष्याने प्रार्थना करून विचारले, "देह तर नि:शेष नष्ट होतो. मग मेल्यानंतर फिरून जन्माला येणे ही गोष्ट कशामुळे घडते?"(२६) जर आत्मज्ञान झाले तरच त्या लिंगदेहाचा नाश होतो. ज्ञानाखेरीज इतर अनेक साधने केलीत तरी लिंगदेहाचा नाश होत नाही.(२८) तो लिंगदेह अग्नीने जळत नाही, पाण्यातही बुडत नाही, योगादी अनेक उपाय करून लोक कष्टी होतात, पण लिंगदेहाचा प्रभाव मात्र अनावर असतो.(२९)एक वेळ समुद्राचे प्राशन करणे सोपे म्हणावे लागेल, मेरु पर्वतसुद्धा सुखाने कदाचित उखडून टाकता येईल, एक वेळ अग्नीही पिऊन टाकणे शक्य होईल, पण चित्ताचा निग्रह करणे मात्र कठीण आहे.(३०) या देहाचे खंडन करावयाचे एकमेव साधन

**आत्मज्ञान । गुरुमुखें श्रवण मनन । तरीच ज्ञान विश्वासें ।।३१।। मी मी देह म्हणतोसी। वासना बळाविली ऐसी । छेदावया तयासी । विवेकशस्त्र पाहिजे ।।३२।। जरि विश्वासें आवडि असे । निशिदिनीं धरिसी मानसें । तरि घेइ पा तुज देतसें । विवेकशस्त्र ।।३३।। मी प्रत्यगात्मा निश्चय । देहाध्यासें मज काय । येणें ध्यासें खंडण होय । देहबुद्धीचें।।३४।। देहबुद्धि देई मजला । जतन करी आत्मबुद्धीला । विसरसी जन्ममृत्यूला । हे भाक घेई।।३५।। मुळी सर्पाकारें जाली । नोळखितां कितेक मेली। विचारें समजतां भुली। कांहीच नाहीं ।।३६।। मी देह धरिला ध्यास । ओळखावें त्या वासनेस । तेथें प्रकार सप्तदश । असती वेगळाले ।।३७।।लिंगदेह सतरा कळांचा । पृथकाकारें बोलिजे वाचा। निश्चय कळतां येथिचा । साकडें निरसे ।।३८।। होय नव्हेसें वाटलें । निश्चयें नवचे अनुमानलें । तें अंत:करण विभागलें । संशयरूप मन ।।३९।। हें अमुक निश्चय जाला। बुद्धि नाम आलें त्याला । दुसरा परिणाम जाला । अंत:करणाचा ।।४०।।चित्ताचें असें जें चिंतन । मी अमुक हा अभिमान । या दो वृत्तीचें समावेशन । मनबुद्धीच्या ठाई।।४१।।**

---

म्हणजे आत्मज्ञान हेच होय.गुरुमुखाने श्रवण करून त्यावर मनन केले असेल तरच हे ज्ञान खात्रीपूर्वक प्राप्त होते.(३१)तू'मी देह आहे'असे म्हणतोस,अशी वासना दृढ झाली असेल तर ती तोडून काढण्यासाठी विवेकरूपी शस्त्राचीच गरज आहे.(३२)जर तुझा विश्वास असेल आणि जर तुझ्या मनात आवड निर्माण झाली असेल आणि रात्रंदिवस मनात त्याचा निदिध्यास बाळगणार असशील तर मी तुला विवेकशस्त्र देतो.(३३)मी निश्चितपणे प्रत्यगात्मा असून माझ्यावर देहाचा आरोप केला तरी माझ्यावर त्याचा काय परिणाम होणार आहे?असा निदिध्यास घेतल्यानंतर देहबुद्धीचे खंडन होते.(३४) (गुरू शिष्याला म्हणतात)ती देहबुद्धी मला देऊन टाक आणि आत्मबुद्धीचे(मी आत्मा आहे या बुद्धीचे)जतन कर.त्यायोगे तुला जन्ममृत्यूची आठवणसुद्धा येणार नाही,हे माझे तुला वचन घे.(३५)मुळी सर्पाच्या आकाराची झाली.ती न ओळखताच(सर्पाच्या भीतीने)कित्येक लोक मरण पावले.पण विचाराने तो सर्प नसून मुळी आहे हे लक्षात घेतले तर वरीलप्रमाणे भ्रमच निर्माण होणार नाही.(३६)मी देह आहे असा ध्यास धरला असेल तर ती वासना आहे,हे ओळखावे. त्या वासनेचे वेगवेगळे सतरा प्रकार आहेत.(३७) लिंगदेह हा सतरा घटकांचा आहे.ते आता स्वतंत्रपणे पाहू.त्याचे स्वरूप निश्चितपणे कळताच निर्माण झालेले संकट निरसून जाईल.(३८)एखादी वस्तू आहे अथवा नाही अशी वाटते,अनुमानाने निश्चयपूर्वक सांगता येत नाही,अशा तऱ्हेने अंत:करण विभागले जाते.त्या अंत:करणाच्या संशयरूप अंशाला मन असे म्हणतात.(३९)अमुक पदार्थ ही अमुक वस्तु आहे असा निश्चय जेव्हा होतो,तेव्हा त्याला बुद्धी असे नाव प्राप्त होते.हा अंत:करणाचा दुसरा परिणाम किंवा भाग होय.(४०)चित्ताच्या द्वारा चिंतन चालते. अहंकार म्हणजे मी अमुक तमुक असा अभिमान होय.चित्त आणि अहंकार या दोन वृत्तींचा मन

**करी शब्दाचें श्रवण । ते श्रोत्रेंद्रिय जाण । स्पर्श जाणे शीतोष्ण । तें त्वगेंद्रिय ।।४२।।**
**चक्षु रूपातें पाहे । जिव्हा रस जाणताहे । घ्राण गंधातें लाहे । हे ज्ञानेंद्रियें पंच ।।४३।।**
**एक वाणी चतुर्धा जाली। ते समजावी वेगळाली। उगीच आठवण जाली। ते परा वाचा।।४४।।**
**स्फुरण दिसे न दिसे। तया नांव पश्यंती असे। मननीं जितुकें येतसे । ते मध्यमा वाणी।।४५।।**
**वैखरी ते बोलणे । पाणींद्रिया घेणें देणें। पादेंद्रिया चालणें । रतिसुख उपस्थीं ।।४६।।**
**गुदे विसर्ग करी । हे पंचकर्मेंद्रियाची परी। तैसें प्राणही प्रकारी । पांचची असती ।।४७।।**
**हृदयी करी प्रीणन। तोचि जाणावा प्राण । अधो वाहतां अपान । बोलिजे तो ।।४८।।**
**हलवी सर्व संधीसी समान नामें राहे नाभीसी। कंठि राहणें उदानासी । क्षुत्पान करी।।४९।।व्यान सर्वांगी वावरे। अन्नरस पाववी नाडीद्वारें। हें पंचप्राण निर्धारें। जाणिजेती।।५०।।मन बुद्धि इंद्रिय प्राण। सप्तदश हे मिळोन। लिंगशरीर हें अभिधान। आणि सूक्ष्मदेह।।५१।।मनबुद्ध्यादि आत्मा जाणे। आपुलेंनिं सर्वज्ञपणें। आत्मत्वीं बुद्ध्यादिकां राहणे। परी आत्म्यासी नेणती।।५२।।**

---

आणि बुद्धी यांच्यामध्येच समावेश होतो.(४१) शब्द ऐकते ते श्रोत्रेंद्रिय(कान)जाणावे. थंड, उष्ण स्पर्श जाणते ते त्वगिंद्रिय (त्वचा) होय.(४२) डोळा रूप पाहतो. जिव्हेने रस जाणता येतो आणि घ्राणेंद्रिय म्हणजे नाक गंधाचा अनुभव घेते. अशी ही पाच ज्ञानेंद्रिये होत.(४३) एकाच वाणीचे चार प्रकार होतात. त्यांचे वेगळे वेगळे स्वरूप जाणून घ्यावे. उगीच काहीतरी आठवते तिला परा वाचा म्हणतात.(४४) चित्तात जे स्फुरते, ते स्पष्टपणे दिसे ना दिसे अशा स्वरूपात जाणवते ती पश्यन्ती वाचा होय.त्यानंतर मननात जेवढे म्हणून येते, त्याला मध्यमा वाणी म्हणतात.(४५)वैखरी म्हणजे प्रत्यक्ष बोलणे होय. (परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी असे वाणीचे चार प्रकार होत) पाणींद्रिय म्हणजे हाताने घेणे आणि देणे असे दोन व्यवहार घडतात. पादेंद्रिय म्हणजे पायांनी चालण्याचा व्यापार होतो, तर उपस्थ म्हणजे शिश्नाचा रतिसुख घेण्याचा व्यापार होतो,(४६)गुदद्वाराने मलविसर्जन होते. अशा तऱ्हेने पंच कर्मेन्द्रियांच्या व्यापारांचे स्वरूप होय. त्याचप्रमाणे प्राणाचेही पाच प्रकार असतात.(४७) हृदयात वाहताना जो सुख देतो तो प्राण म्हणून समजावा. गुदद्वाराच्या वाटेने खालच्या दिशेने जो वाहतो त्याला अपान असे म्हणतात.(४८) जो वायू शरीरातील सर्व सांध्यांच्या हालचाली करतो त्याला समान असे नाव असून तो नाभीच्या ठिकाणी राहतो तर उदान हा कंठाच्या ठिकाणी राहतो आणि क्षुधाशमन (भूक भागवणे) आणि तहान भागवणे या क्रिया करतो.(४९) व्यान सर्व शरीरात वावरतो. तो नाडीद्वारा सर्व शरीराला अन्नरसाचा पुरवठा करतो. अशा प्रकारे हे पंचप्राण निश्चयपूर्वक समजून घ्यावेत.(५०) मनबुद्धी, इंद्रिये आणि पंचप्राण हे सतरा मिळून लिंगदेह अथवा सूक्ष्मदेह होतो.(५१) आत्मा या सर्व मन, बुद्धी इत्यादी इंद्रियांना आपल्या सर्वज्ञपणाच्या गुणधर्मांमुळे जाणतो. शुद्ध आत्मस्वरूपात बुद्धी इत्यादी तत्त्वे राहतात, पण ती तत्त्वे आत्म्याला जाणत नाहीत.(५२)

**सर्व लिंगातें व्यापुन। आत्मा असे चैतन्यघन । आत्मत्वीं नसे भासकपण । लिंगदेहाचें।।५३।। जागृतीं विषय भोगिले । त्या संस्कारा मन सोकले । अंतरीच आठवलें । ते स्वप्नावस्था।।५४।। लिंगदेहास्तव । स्वप्नावस्थेचा भाव । लिंगाभावीं स्वप्न वाव । आत्मत्वीं नाहीं ।।५५।। अवस्थेचें स्थान कंठी। देहअवस्थादि त्रिपुटी। यासि बोलिजेते होटीं। उकार मात्रा।।५६।। अकारेवीण उकार । वर्णेवीण उच्चार। दृश्येवीण भासमात्र । आत्मा नव्हे ।।५७।।जैसा कापुसासी पीळ पडतां । दिसणें असे सुता । आत्मप्रकाशें तत्वतां । भासतीं लिंगें ।।५८।। पीळ असतां कापूस दिसे। भास व्यापून आत्मा असे। सूत कापुसीं न दिसे। आत्मत्वीं भास मिथ्या।।५९।।जाणीव नेणीव रजोगुण। प्रविविक्त भोग त्या लागुन। सुखदुःखाचे प्रत्यय होणें। लिंगाध्यासें तैजसा।।६०।।तो ध्यास मी मी हा टाकिला। तरि तो अभिमान कोणाला। भ्रांतीनें होता अवलंबिला।कळतां भ्रांति कैची।।६१।।एवं सूक्ष्माचा भास। मिथ्या हे जाणिजेस। साक्षित्वें जाणता आत्मयास। मृगजळापरी ।।६२।।आपुलें आत्मत्व दृढ करणें । मृगजळवत्**

---

चैतन्यघन असा आत्मा संपूर्ण लिंगदेहाला व्यापून असतो. पण त्या आत्मस्वरूपात लिंगदेहाचा भास नसतो.(५३) जागृतीच्या अवस्थेत विषयांचे भोग घेतले. त्या भोगांच्या संस्कारांस मन चटावते आणि ते मनात त्या भोगांचे स्मरण करते. हीच स्वप्नावस्था होय.(५४)लिंगदेहामुळेच ही स्वप्नावस्था शक्य होते. लिंगदेह नसेल तर स्वप्नही नष्ट होते. आत्मस्वरूपात तर ते नसतेच.(५५)या अवस्थेचे स्थान कंठ हे आहे. लिंगदेह हा देह, स्वप्नावस्था ही अवस्था आणि कंठ हे स्थान अशी ही त्रिपुटी आहे. त्या सर्वांची उकार ही मात्रा आहे असे म्हणतात. (या त्रिपुटीची मात्रा ओठांनी सांगायची झाल्यास 'उ'कार' मात्रा होय.)(५६)अकारावाचून उकार नसतो, वर्णावाचून उच्चार नसतो, दृश्यावाचून भास नसतो, तसा आत्मा नाही. (या सर्व गोष्टी अन्य घटकाची अपेक्षा करतात. त्या सापेक्ष असतात. तसा आत्मा सापेक्ष नसतो.(५७)कापसाला पीळ पडताच जसे सूत दिसायला लागते त्याप्रमाणे आत्मप्रकाशाने ही सर्व चिन्हे स्पष्ट होतात.(५८)पीळ असतानाच कापूसही दिसत असतो, तसा भास असताना त्या भासाला आत्मा व्यापून असतोच. पण केवळ कापसामध्ये सूत दिसत नाही त्याप्रमाणे आत्म्याच्या ठिकाणी भास मिथ्या ठरतात.(५९)जाणीव आणि नेणीव यांच्या मिश्रणास रजोगुण म्हणतात. तो लिंगदेहाचा गुण होय. लिंगदेहाला जे भोग घडतात त्यांना प्रविविक्त भोग म्हणतात. लिंगदेहाच्या आरोपाने सुखदुःखाचे अनुभव जो घेतो त्या जीवाला तैजस म्हणतात.(६०)या जीवाला जो 'मी मी' असा ध्यास लागलेला असतो, तो ध्यास जर टाकून दिला तर तो अभिमान कोणाला होईल? कोणालाच नाही. केवळ भ्रमामुळेच तो झाला होता, हे कळल्यावर तो भ्रम कसा शिल्लक राहील?(६१)अशा तऱ्हेने सूक्ष्म देहाचा (लिंग देहाचा) भास हा खोटा आहे, हे जाणून घे. आत्मा हा फक्त साक्षी आहे आणि हा लिंगदेह मृगजळाप्रमाणे भासमान आहे.(६२)मुख्य आपले आत्मत्व दृढ करावे. तो लिंगदेह हा मृगजळाप्रमाणे

**भासतां काय तेणें । दिसणें आणि न दिसणें । सारिखेंची।।६३।।शोक मोह काम क्रोध। लिंगकार्य नानाविध। तुटतां लिंगाचा संबंध। कार्य जाय त्या सवें।।६४।।असो स्थुळ सूक्ष्म हे दोन।यासि कारण अज्ञान।याचें न होतां खंडण। आत्मज्ञान कैचें।।६५।।ते कैसे म्हणसी अज्ञान।तरी सांग पा मी जें पुसेन।देहद्वया तूं विलक्षण।तो तूं कोण दाखवीं।।६६।।शिष्य विचारी अंतरीं।देहद्वयसाक्षी मी निर्धारीं।सर्वजाणता असे परी।मी अमुक न कळें।।६७।।तरी आतां तोचि कैसा। नेणे नेणें मी सहसा। गुरू म्हणती गा पाडसा। हेंचि अज्ञान।।६८।।तूं निरावलंब साक्षी।देहद्वयातें परीक्षी।तो कोण पा निरीक्षीं।ज्ञप्तिमात्र।।६९।।दृश्यातें डोळां देखिलें।भासातें मनें ओळखिलें।आपआपणा नवचे कळलें।म्हणुनि भांबावलासी ।।७०।। दृश्यभासातीत जाणता । जाणोनि होसी नेणता । मी नेणें हे तुज कळतां। अज्ञान मिथ्या।।७१।। कारणदेह हे अज्ञान।सत् म्हणतां ज्ञानें हनन।असत् नव्हे कार्यानुमान। अनिर्वचनीय।।७२।।मनादि अंतःकरण।जेथे अत्यंत होती लीन।ती सुषुप्ति अवस्था जाण।हृदयस्थानीं।।७३।। आपुलेनि जाणतेपणें। तुवां सुषुप्ति अनुभविणें। अन्यथा नव्हे आठवणें। जागरिं सुषुप्तिसुखा ।।७४।।**

---

आहे,असे निष्पन्न झाल्यावर त्याचे दिसणे आणि न दिसणे सारखेच समजावे लागेल.(६३) शोक,मोह, काम,क्रोध हे सगळे विविध प्रकारचे लिंगदेहाचे कार्य आहे.पण लिंगदेहाचा संबंध सुटताच त्याबरोबरच त्याचे कार्यही नष्ट होते.(६४)अशा तऱ्हेने स्थूल आणि सूक्ष्म देह हे अज्ञानामुळे उत्पन्न होतात.त्यांचे खंडन झाल्याखेरीज आत्मज्ञान कसे होईल?(६५)त्या अज्ञानाचे स्वरूप काय असा प्रश्न विचारशील तर मी जे प्रश्न विचारीन त्यांची उत्तरे तू दे.आता तू जो हा दोन देहांवेगळा आहेस,तो तू कोण आहेस हे दाखव.(६६)यावर शिष्य मनात विचार करतो,मी दोन्ही देहांचा साक्षी आहे.हे खरे,मी सर्व जाणतो हेही खरे आहे,पण मी कोण आहे,हे मात्र मला कळत नाही.(६७)तरी आता तोच मी 'काही जाणत नाही'असे म्हणतो,ते कसे?तेव्हा सद्गुरू म्हणतात,की अरे बाळा,यालाच अज्ञान म्हणतात.(६८)तू कोणावरही अवलंबून नसणारा केवळ साक्षी आहेस,तू स्थूल आणि सूक्ष्म या दोन्ही देहांची नीट पारख कर आणि त्या दोहींवेगळा केवळ ज्ञानस्वरूप असा जो कोणी आहे त्याला जाणून घे.(६९)जे दृश्य होते,ते डोळ्यांनी पाहिलेस,जे आभासमय होते ते तू मनाने समजून घेतलेस,पण आपणच आपल्याला कळले नाही म्हणून भांबावून गेला आहेस.(७०)तू दृश्य व भास यांच्या पलीकडचा आहेस हे तुला कळते,पण आपल्याला कळत नाही,असेच तुला वाटते.आपल्याला कळत नाही असे तुला कळते याचाच अर्थ अज्ञान हे मिथ्या आहे.(७१)अज्ञान म्हणजेच कारण देह होय.त्याला सत् म्हटले तर ज्ञानाने तो नष्ट होतो.त्याला असत् म्हणावे तर कार्यावरून त्याचे अनुमान होते.त्यामुळे अज्ञान हे अनिर्वचनीय ठरते.(७२)मन, बुद्धी इत्यादी अंतःकरणाचे घटक जेथे अत्यंत विलीन होतात,ती सुषुप्ती कारणशरीराची अवस्था होय.तिचे स्थान हृदय आहे.(७३) तू स्वतः ज्ञाता असल्यामुळे सुषुप्ती तुला

**तया नेणण्यातें जाणसी । जाणोनि मी नेणें म्हणसी । तेचि मकार मात्रा ऐसी। ओळखावी।।७५।।आनंदसुखाचा भोग। जाणसी तमोगुणाचा योग । तुज जाणतयासी सांग । नेणीव कोठें।।७६।।बळें म्हणसी मी नेणता । होसी अभिमान धरिता । तोचि प्राज्ञ हे व्यवस्था । कारणशरीराची।।७७।।हें अज्ञान तुज कळतें। किंवा नाहीं सांग पां तें। न कळे ऐसें वाटतें । जाण तयासी।।७८।।अंधार दृष्टीसी दिसे। म्हणसी डोळा देखणा नसे। अज्ञान जेणें प्रकाशे। तो तूं स्वप्रभ।।७९।।आतां सांडिं गा नेणपण । जाणता अससी परिपूर्ण । येणे रीती अज्ञान खंडण । सहजची जालें।।८०।।एवं स्थूळ सूक्ष्म कारण । जागृति स्वप्न सुषुप्ति जाण । विश्वतैजसप्राज्ञ। मात्रागुणत्रिपुटी ।।८१।।या इतुकीयांचा जाणता । तुझा तूंचि आयिता । तिही प्रतीति आतां । अनुभव घेई।।८२।।ऐसें बोलतां श्रीसद्गुरू।निज सुखाचा लोटला पुरू।वृक्ष उन्मळून पडे थोरू।तैसा गुरुचरणीं पडियेला।।८३।। कंठ जाला सद्गद। रोमीं उमटले स्वेदबिंद । फुंजें दाटला आनंद । नेत्रीं पाझर प्रेमाचे।।८४।।**

---

अनुभविता येते. नाहीतर जागृतीमध्ये सुषुप्तीचे सुख आठवत नाही.(७४) त्या अज्ञानाला तू जाणू शकतोस, पण त्याला जाणूनसुद्धा 'मला काही समजत नाही' असे तू म्हणतोस. त्यालाच 'म'कार मात्रा म्हणून समजावे.(७५)तेथे जो भोग घडतो, तो आनंदस्वरूपाचा असतो आणि तेथे तमोगुणाचा संबंध असतो. वास्तविक पाहता तू जाणता असताना तुला अज्ञान कसे असेल?(७६)(आत्म्याला अज्ञान असत नाही.) पण बळेच 'मी अज्ञानी आहे' असे म्हणत असशील तर अभिमान बाळगतोस. तोच प्राज्ञ नावाचा अभिमानी जीव होय आणि ती कारणशरीराची सामग्री होय.(७७)हे अज्ञान तुला कळते किंवा नाही हे सांग. आपल्याला कळत नाही असे तुला वाटते म्हणजे नेमके काय होते, ते नीट समजून घे.(७८)अंधार दृष्टीला दिसतो आणि तू त्यावेळी म्हणत असतोस की डोळ्याला दिसत नाही. वास्तविक पाहता अंधारही डोळाच पहात असतो. त्याप्रमाणे अज्ञान ज्या योगाने प्रकाशते म्हणजे जाणवते, तो तू स्वप्रभ आत्मा तूच आहेस.(७९)तेव्हा अज्ञान सोडून दे. तू पूर्णपणे ज्ञाता आहेस. अशा रीतीने अज्ञानाचे आपोआप खंडन झाले.(८०)अशा प्रकारे स्थूल, सूक्ष्म, कारण ही शरीरत्रिपुटी,जागृती, स्वप्न, सुषुप्ती ही अवस्थात्रिपुटी; विश्व, तैजस, प्राज्ञ ही अभिमानी जीवत्रिपुटी; अउम ही मात्रात्रिपुटी; सत्त्व, रज, तम ही गुणत्रिपुटी; दृश्य, भास, अज्ञान ही भोग्यत्रिपुटी अशा या आठ प्रकारच्या त्रिपुटी सांगितल्या.(८१)या इतक्या त्रिपुटींचा तू सहजच जाणता आहेस. त्यांचा शास्त्रप्रतीती, गुरुप्रतीती आणि आत्मप्रतीती या तीन प्रतीतींच्या मार्गाने अनुभव घे.(८२)श्रीगुरूंनी असे म्हणताच शिष्याच्या ठिकाणी आत्मसुखाचा पूर दाटला आणि एखादा मोठा वृक्ष जसा उन्मळून पडतो, तसा तो सद्गुरूंच्या चरणांवर पडला.(८३)त्याचा कंठ सद्गदित झाला, त्याच्या शरीरावरील रोमारोमात घामाचे बिंदू दिसू लागले, अभिमानाने आनंद शरीरभर दाटून आला आणि डोळ्यांतून प्रेमाश्रू पाझरू लागले.(८४)

**अंत:करणाची वृत्ति । नि:शेष होय हरपती। अखंड दाटली ज्ञप्ति । निवांत जाला ।।८५।। मग सद्‌गुरू थापटिती । सावध सावध गा पुढती। तुजला तुझी झाली प्राप्ति । ते निरोपीं मज पुढें।।८६।।मग तया आनंदातें ग्रासुनी । उठोनि मस्तक ठेवी चरणीं । मंदमंद तये क्षणीं । बोलता जाला।।८७।।जय जय आजि सद्‌गुरू । मज भवा उतरिलें पारू । माझा मी चित्सागरू। न दिसें परू एकला ।।८८।।कैचें अज्ञान दृश्य भास। माझा मीचि निराभास । ज्ञानघन स्वयंकाश । दृश्याभास पुरे आतां ।।८९।।ऐसें ऐकतां वचन । गुरू म्हणती सावधान । तुझें अत्यंत समाधान । जालें नाहीं ।।९०।।तुज वाटे मज लाधलें । आत्मस्वरूप प्राप्त जालें । हे वृत्ति आनंदे गोविलें । तुजला मध्यें ।।९१।।तरि या वृत्तीसी जाणावें । स्वरूपीं स्वरूपचि व्हावें । जेथे दुजेपणाच्या नावें । शून्याकार।।९२।।स्थूळ सूक्ष्म हें कार्य । या हेतु अज्ञान कारण होय । त्यासि अधिष्ठान जें होय । तें महाकारण।।९३।। तुर्यावस्था तिहीतें जाणें। मी स्वरूप आठवि मनें। या वृत्यात्मकें तुज होणें। सहज वेगळें।।९४।।**

---

त्यानंतर त्याच्या अंत:करणाची वृत्ती संपूर्णपणे लोप पावली आणि निखळ शुद्ध ज्ञानदशेने त्याला व्यापून टाकले आणि तो एकदम शांत झाला.(८५) मग सद्‌गुरूंनी त्याला 'सावध हो, सावध हो' असे म्हणून त्याला थापटले आणि पुढे म्हटले,"तुला तुझा अनुभव आला, तो माझ्यापुढे सांग बरे"(८६) मग त्याने ते आनंदाचे भरते गिळून टाकले आणि तो जागेवरून उठला आणि पुन्हा सद्‌गुरूंच्या चरणांवर त्याने मस्तक टेकवले. मग तो मंद मंद स्वरात बोलू लागला.(८७) "सद्‌गुरूमहाराज,आपला जयजयकार असो.तुम्ही मला भवसागरातून बाहेर काढून पलीकडे पोचवले आहे. आता मीच चैतन्यमय सागर झालो असून माझ्या व्यतिरिक्त दुसरे कोणीही मला दिसत नाही. मी एकमेव उरलो आहे.(८८) आता अज्ञान कुठे राहिले? दृश्य आणि भासमान पदार्थ तरी कुठे राहिले? आता मीच भासविरहित झालो, केवळ ज्ञानरूप आणि स्वयंप्रकाश झालो. आता दृश्य आणि त्याचे आभास मला नकोत"(८९) त्याचे हे बोलणे ऐकून सद्‌गुरू त्याला म्हणाले, सावधान, तुझे आत्यंतिक समाधान अजून झाले नाही.(९०) तुला वाटते आहे की, आपल्याला साध्य प्राप्त झाले. आपल्याला आत्मस्वरूपाचे ज्ञान झाले आहे पण ते ज्ञान नसून वृत्तीच्या द्वारे प्राप्त झालेला आनंद आहे. या वृत्त्यानंदाने तुला मधेच अडकवले आहे.(९१) तरी ती वृत्ती म्हणजे काय हे तू जाणून घे. मग तिचा त्याग करून आपण निवांत स्वरूप होऊन स्वरूपातच राहावे. त्या अवस्थेत दुजेपणाच्या नावाने शून्यच असेल.(९२) स्थूल देह, सूक्ष्म देह हे कार्यरूप असून त्यांचे अज्ञान हेच कारण होय. त्या अज्ञानाचे जे मूळ अधिष्ठान ते महाकारण होय.(९३) चौथी तुर्यावस्था या स्थूल,सूक्ष्म आणि कारण या तिन्ही शरीरांना व त्यांच्या अवस्थांना जाणते. मी स्वरूप झालो आहे,असे जे तुला वाटत आहे ते वृत्तीच्या योगाने जाणवते आहे. या वृत्तीच्या अडथळ्याने तू स्वरूपसुखापासून वेगळा पडतोस.(९४)

**निज स्वानुभवें जाणावें। वृत्यात्मकासि त्यागावें । द्रष्टा साक्षी स्वभावें । आत्मत्वीं नाहीं।।९५।। दृश्य जेथें मिथ्या जालें। तरी द्रष्टृत्व कोणा आलें। साक्ष्य होतांची नाथिलें। साक्षी कवणु।।९६।। द्रष्टासाक्षीविन। आपुला आपण सघन । मोडे वृत्तीचें मीपण । येणे रीती।।९७।। आपणाहून वेगळा कवण। कीं अनुभवी आत्म्यालागुन। येथें ज्ञान आणि अज्ञान। एक पांतीं।।९८।।आतां बोलणें खुंटलें। मौनही नसे कल्पिलें। अनुभवेंवीण ज्याचें त्या जालें। अत्यंत समाधान।।९९।।**

इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । तनुत्रितयनिरसनप्रकारे । प्रथमसमासः ।।१।।

## ।।श्रीराम समर्थ।। समास २रा - पंचकोशविवेक[३४]

**विद्या भार्गवी वारुणी । अध्यात्मविद्येची खाणी । पंचकोशाचें निरसनीं । आत्मत्व लाभे।।१।। परी आत्मशब्दाची प्रवृत्तीं । बहुधा असे अतिव्याप्ति । ते निवारावया निगुती । वेदांतग्रंथ।।२।। येथें मतें वेवादती। श्रुती आश्रय आणि युक्ति। बहुधा अनुभवही बोलती । आत्मविषईक।।३।।**

---

स्वरूपास प्रत्यक्ष अनुभवाने जाणून घे.जे जे वृत्तिस्वरूप आहे (वृत्यात्मक) त्याचा त्याग कर. आत्मस्वरूपाच्या संदर्भात कोणी द्रष्टा नसतो, कोणी साक्षी नसतो.(९५)दृश्यच जर मिथ्या ठरले तर त्याला पाहाणारा द्रष्टा कसा सत्य असेल? जे साक्ष्य आहे ते निर्माण होताच नष्ट झाले तर साक्षी कोण राहील?(९६)द्रष्टा आणि साक्षी यांच्या अभावी आत्मा आपल्या ठिकाणी संपूर्ण व्यापून असतो.अशा प्रकारे वृत्तीतील मीपणा तेथे संपूर्णपणे नष्ट होतो.(९७)आपल्यापेक्षा वेगळा असा दुसरा कोण आहे?आत्म्याचा अनुभव घेणारा तरी कोण आहे?या ठिकाणी ज्ञान आणि अज्ञान या दोहोंची योग्यता सारखीच.(९८)खरे म्हणजे येथे बोलणेच संपते. येथे मौनाची सुद्धा कल्पना करता येत नाही. (कारण ते सापेक्ष आहे. बोलण्याचा अभाव म्हणजे मौन. पण बोलणेच नसेल तर मौन धारण केले असे म्हणण्यात काय अर्थ?)अनुभवही येथे शक्य नसतो.(कारण अनुभव,अनुभव घेणारा आणि अनुभवकार्य या तिहींचाही येथे अभाव असतो.)या अनुभवावाचूनच येथे आत्यंतिक समाधान प्राप्त होते. ते ज्याचे त्यानेच घ्यावयाचे असते.(९९)

### पंचिका ५वी, समास २रा - पंचकोशविवेक

तैत्तिरीय उपनिषदातील भार्गवी वारुणी विद्या ही अध्यात्मविद्येची खाण आहे. तिच्यामध्ये पंचकोशांचे विवेचन आहे. या पंचकोशांच्या निरसनानंतर आत्मत्त्वाची प्राप्ती होते.(१) परंतु आत्मशब्दाच्या व्यवहारातील वापरामध्ये त्या शब्दाच्या अर्थाच्या संदर्भात पुष्कळ अतिव्याप्ती आढळते. त्या अतिव्याप्तीचे (नेमक्या अर्थाखेरीज इतर गैरलागू अर्थाचा समावेश) निरसन करण्यासाठीच वेदांतग्रंथांची निर्मिती झाली आहे.(२) या संदर्भात अनेक मतामतांचे विवाद चालू आहेत. ते श्रुतींचे आधार देतात, युक्तिवाद करतात बरेचसे पक्षवादी आत्म्याविषयीचा आपला अनुभवही सांगतात.(३)

**परी ते मतें कैसीं समजावीं। तरीच उगवे गथागोवी। भिडेनें स्वानुभवपदवी। सिद्धि न वचें।।४।। एक चार्वाक बोलती। पुत्र आत्मा हे श्रुती। अर्धविभागी स्त्री म्हणती। स्त्री पुत्र आत्मा।।५।। स्त्रीपुत्रही प्रिय असे। युक्ति भाविती अपैसे। वाढतां मरतां तोषे त्रासे। हा अनुभव।।६।।अन्न ब्रह्म हे श्रुती। आत्मार्थ प्रिय हे युक्ति। मी कृश स्थूल अनुभविती। देहात्मा म्हणती अन्य।।७।।इंद्रिय चालक हे युक्ती। कलह ऐकिला श्रुती। मी अंध मुका भाविती। अनुभव ऐसा।।८।।म्हणोनि आत्मा इंद्रिय। देह आत्मा म्हणणें काय। आत्मत्वाचा सिद्धांत होय। अन्य चार्वाकाचा।।९।।प्राण ब्रह्म हे श्रुती। प्राणें चळण हे युक्ति। मी क्षुधातृषावान् अनुभूती। प्राणात्मा म्हणती हैरण्यगर्भ।।१०।।मन ब्रह्म हे श्रुती। मनेंचि कळे हे युक्ति। मज शोकादिअनुभूती । उपासक म्हणती मन ब्रह्म ।।११।। विज्ञान ब्रह्म श्रुतीचे वचन। युक्ति बुद्धीसी कर्तेपण। अनुभवें निश्चय करी जाण। विज्ञानात्मा बौद्धमती ।।१२।।**

---

पण मते कशी समजून घ्यावीत?ती योग्य तऱ्हेने समजून घेतली तरच त्यांचा गुंता उलगडेल.केवळ भीड धरून विवेचन केल्यास स्वानुभवपदवी सिद्ध होणार नाही. (स्वानुभव प्राप्त होणार नाही.)(४)चार्वाक मताचे काहीजण असे सांगतात की,वेदांनी पुत्राला आत्मा म्हटले आहे. काहीजण म्हणतात स्त्री पतीच्या अर्ध्या पुण्याची वाटेकरी असते म्हणून स्त्री आणि पुत्र या दोघांनाही आत्मा म्हणावे.(५) स्त्री आणि पुत्र दोघेही प्रिय आहेत. त्यासाठी ते पुढील युक्तिवाद करतात. दोघांची भरभराट झाली की, संतोष होतो आणि ती मरण पावली की दु:ख होते हा अनुभवच आहे.(६)श्रुती म्हणते की,अन्न हे ब्रह्म आहे. ते अन्न आत्म्यासाठी प्रिय आहे. अन्नाच्या अभावी आपण कृश झालो अथवा अन्नाच्या अधिक सेवनाने आपण स्थूल झालो असा ते अनुभवही घेतात. म्हणून हे काहीजण देह हाच आत्मा असे म्हणतात.(७) दुसरे काहीजण असा युक्तिवाद करतात की, इंद्रिये चालक आहेत. इंद्रियांच्या श्रेष्ठत्वासाठीच्या कलहाबद्दल श्रुतीमध्ये ऐकायला मिळते. त्या त्या इंद्रियांच्या अभावी मी आंधळा झालो आहे, मी मुका झालो आहे असे काही लोक आपले अनुभव सांगतात.(८)म्हणून इंद्रिये हीच आत्मा होत. देहाला आत्मा कशाला मानता? काही चार्वाकांनी इंद्रिये हीच आत्मा होत असा सिद्धान्त केला आहे.(९)दुसरे एक वेदवचन सांगते की, प्राण हेच ब्रह्म होत. कारण प्राणांमुळेच शरीराचे चलनवलन होते. मला भूक लागते, तहान लागते असा प्रत्येकाचा अनुभवही आहे.म्हणून हिरण्यगर्भाचे उपासक प्राण हाच आत्मा मानतात.(१०) 'मन हे ब्रह्म आहे' असे श्रुती सांगते. मनामुळेच सर्व पदार्थ कळतात असा युक्तिवाद काहीजण करतात. आपल्याला शोकादी बऱ्या वाईट अनुभूती मनामुळेच होतात, म्हणून काही उपासक मन हेच ब्रह्म म्हणतात.(११) 'विज्ञान हे ब्रह्म आहे' असे श्रुतीचे वचन आहे.विज्ञान म्हणजे बुद्धी. तिच्याकडेच सर्व गोष्टींचे कर्तेपण आहे. ती अनुभवाने म्हणजे संस्काराने निश्चय करते. म्हणून बौद्धांच्या मताने विज्ञान अथवा बुद्धी हाच आत्मा म्हणता येईल. (वास्तविक पाहता बौद्ध आत्मा मानतच नाहीत.)(१२)

**अपरबौद्ध क्षणिकवादी । विज्ञानात्मा प्रतिपादी । क्षणिकत्व असे बुद्धी । म्हणोनिया।।१३।। आनंद ब्रह्म श्रुतीचें वचनीं । नाना युक्ति प्रतिपादुनी । येथे मताची वेवादनी । बहुधा असे।।१४।।सुषुप्तिकाळीं आत्मा नसे । उपाधीस्तव दिसणें असें । म्हणोनि शून्य ऐसें । शून्यवादी म्हणे।।१५।।आत्मा अणुत्वें निर्धारी । संचार असे नाडिद्वारीं । प्रवर्ते इंद्रियव्यापारीं। अणुवादी बोले।।१६।।माध्यमिक बोले वचन। अणु आत्मा अप्रमाण । एक समई देहचलण। आपादमस्तक होय।।१७।।आत्मा देहा येवढा जरी । तरिच सर्व प्रवर्ते व्यापारीं। येथेंहि आक्षेप कोणी करी। नाना देह धरी कैसा।।१८।।जेव्हडी देहाची उपाधी । तैसा आत्मा हे प्रतिपादी। सर्व शरीरीं विशुद्धि। कंचुकप्राय आत्मा।।१९।।कंचुक म्हणतां आत्मा खोल। नाडीद्वारा संचार नव्हेल। सूक्ष्मावयवीं नाडी सकळ। व्यापून असे।।२०।।माध्यमिक म्हणतां ऐसें । तार्किक म्हणे हें काइसें । आत्मा विभुत्वें असे । आकाशापरी।।२१।। आकाशीं शब्दादि गुण। तैसे आत्मत्वीं सुखादि गुण। आकाशापरी द्रव्य हा जाण। आत्मा असे।।२२।।**

---

दुसरे बौद्ध क्षणिकवादी आहेत.तेही विज्ञान हाच आत्मा असे प्रतिपादन करतात.बुद्धी देखील क्षणिक आहे.(पण ती संस्कारसातत्यामुळे हे निश्चयाचे काम करते.) असे ते मानतात.(१३)'आनंद ब्रह्म आहे' असे प्रतिपादन करणाऱ्या उपनिषदात (तैत्तिरीय२.८)अनेक प्रकारचे युक्तिवाद सांगून अशी निरनिराळ्या मतांची मांडणी केली आहे.(निरनिराळ्या मतांचे विवाद(म्ह.मतभिन्नता)सांगितले आहेत.)(१४)झोपेत आत्मा नसतो.तो उपाधींमुळेच दिसतो(जाणवतो)असे वाटते.म्हणून सर्व शून्यच आहे.तेच जगत्कारण आहे.असे शून्यवादी(बौद्ध)मानतात.(१५)आता आत्मा अणूएवढा असा निर्धार करून अणुवादी (वैशेषिक) असे सांगतात की हा अणूएवढा आत्मा नाड्यांच्या मार्गाने सर्वत्र संचार करतो.इंद्रियांच्या मार्गाने तो व्यवहार करण्यास प्रवृत्त होतो.म्हणून अणू हाच आत्मा होय.(१६)माध्यमिक(बौद्ध)असे सांगतात की, 'आत्मा अणुरूप आहे'असे म्हणणे प्रमाणरहित आहे.कारण ज्या ठिकाणी अणुरूप आत्मा असेल तेवढ्याच भागाची हालचाल शक्य होईल.पण आपल्या शरीरात तर सर्वच अवयवांची हालचाल एकाच वेळी चाललेली दिसते.(पायापासून ते मस्तकापर्यंत सर्व अवयवात ती हालचाल चालू असते.)(१७)आत्मा देहाएवढा असेल तरच सर्व अवयव व्यापार करण्यास प्रवृत्त होऊ शकतील.आता यावरही कोणी आक्षेप घेऊ शकतील.एकच आत्मा निरनिराळे देह कसे काय धारण करू शकेल?(१८)देह उपाधी जेवढी असेल तेवढा आत्मा असला पाहिजे,असे प्रतिपादन ते करू शकतील.सर्व शरीरांमध्ये आत्मा हा आवरक वस्त्रांप्रमाणे(कंचुकाप्रमाणे)व्यापून असतो.(१९)आता आत्मा कंचुकाप्रमाणे आहे असे म्हणता तर मग शरीरातील खोलवर नाड्यांच्या द्वारे तो संचार कसा करू शकेल?कारण सर्व नाड्या या सूक्ष्मावयांमध्ये व्यापून आहेत.(२०)माध्यमिकांनी अशी शंका काढताच तर्कशास्त्री म्हणतात की,त्यात काय आहे?आत्मा आकाशाप्रमाणे व्यापक(विभु)आहे.(२१)आकाशाचे जसे शब्द इत्यादी गुण आहेत,तसे

**ऐसेचि चिद्रूपत्वीं वाद। आत्मत्वीं असती विवाद । तेचि आतां विशद । करूनि दाऊं।।२३।। तार्किकांतरगत प्रभाकर। आत्मा जडरूप निर्धार। चैतन्य बुद्धीचा विकार । आत्मा चिद्रूप नव्हे।।२४।।न्यायांतरभूत भट्टमतीं। आत्मा चिदचिद्रूप म्हणती । जागृत्स्वप्नीं असे चिती। सुषुप्तीं जडत्व।।२५।।ऐका सांख्यशास्त्राचें मत। आत्मा चिद्रूप सदोदित। नाना कुतर्कांचे सिद्धांत। बोलोचि नये।।२६।।असो ऐसे परस्परें। कलह करिताती पामरें। येथें आक्षेपिलें आदरें। श्रोतेजनीं।।२७।।श्रुति युक्ति अनुभव। बोलताती हे सर्व। त्यासि दूषिता हे अपूर्व। काय म्हणोनी।।२८।।हे ऊहापोह नेणती। श्रुतीचे आभास घेती। कुतर्काच्या नाना युक्ति। मतें स्थापिती अनान।।२९।।न होतां वेदांत सिंव्हाची हांक। विवादती दर्शने जंबूक। ऐकतां पोटीं शिरे धाक। अधोवदनें लपती[३५]।।३०।।असो आत्मत्वाचें ज्ञान । पंचकोशाचें विवेचन। तेचि ऐका पूर्वानुसंधान। भृगुवल्लीचें।।३१।।भृगुप्रति वरुणें । विद्या दिधली सकरुणें ।**

---

आत्म्याचे सुख इत्यादी गुण आहेत. आकाश ज्याप्रमाणे पदार्थ आहे त्याप्रमाणेच आत्माही पदार्थच आहे.(२२)अशा प्रकारे चिद्रूपाच्या संबंधात अनेक वाद आहेत तसेच आत्म्याच्या संबंधातही अनेक विवाद आहेत. तेच आता स्पष्ट करून दाखवू या.(२३)तार्किकांमध्ये प्रभाकरभट्टांच्या मताचे अनुसरण करणारे नैयायिक असे मानतात की, आत्मा निश्चितपणे जडरूप आहे. चैतन्य हा बुद्धीचा विकार आहे. आत्मा काही चिद्रूप नाही.(२४) नैयायिकांमध्येच जे भट्टमताचे अनुयायी आहेत, ते असे मानतात की, आत्मा चिद्रूप आहे आणि तसाच तो अचिद्रूप (जड)ही आहे.जागृती आणि स्वप्न या अवस्थांमध्ये तो चैतन्ययुक्त असतो तर सुषुप्तीमध्ये तो जड असतो.(२५)आता सांख्यशास्त्राचे मत ऐका. त्यांच्या मताने आत्मा हा नेहमीच चैतन्यरूप असतो. तेव्हा याबाबतीत इतर कुतर्कांचे सिद्धान्त बोलूच नयेत.(२६) असो, अशा प्रकारे ते बिचारे मतवादी आपापसात कलह करत आहेत. यावर श्रोते पुढीलप्रमाणे आक्षेप घेतात.(२७) हे सर्व मतवादी वेदाधार,युक्तिवाद आणि अनुभव यांच्या आधाराने बोलत आहेत. पण त्यांना तुम्ही दोष देत आहात,ते कशासाठी?हे सर्व अपूर्वच वाटते आहे.(२८)त्यावर उत्तर असे की,हे सर्व मतवादी ऊहापोहाविषयी (आदिअंतीच्या सिद्ध अर्थाविषयी) अज्ञानी आहेत. ते श्रुतीच्या वरवर भाषणाच्या आधारांचा आश्रय घेतात. निरनिराळे कुतर्कयुक्त युक्तिवाद पुढे करतात आणि वेगवेगळ्या भिन्न भिन्न मतांचे प्रतिपादन करतात.(२९) जोपर्यंत वेदान्तरूपी सिंहाची गर्जना कानांवर पडत नाही,तोपर्यंत अन्य दर्शने (तत्त्वज्ञानाचे संप्रदाय)कोल्ह्यांप्रमाणे वादविवाद करत बसतात.(कोल्हेकुईच्या रूपातील चर्चा करत असतात); पण एकदा का वेदान्तरूपी सिंहाची गर्जना ऐकली की, त्यांच्या पोटात भीतीचा गोळा उठतो आणि ते भीतीने माना खाली घालून लपून बसतात.(३०) आता ही आत्म्याच्या स्वरूपाच्या ज्ञानाची चर्चा बाजूस ठेवू. तैत्तिरीय उपनिषदातील भृगुवल्लीमध्ये जे पंचकोशाचे विवेचन केले आहे तेच त्याच्या पार्श्वभूमीसह आता ऐका.(३१)वरुण नावाच्या सद्गुरूंनी आपला पुत्र भृगूला

**विविदिषा होतां भृगूनें । वरुणपित्या प्रार्थिले।।३२।।हे तात ! हे सद्‌गुरू । मज सांगावा जी विचारू। ब्रह्मस्वरूपाचा निर्धारू । कृपा करुनी दयाळा ।।३३।।ऐकून वरुण संतोषला। विचारस्थळ दाविता जाला। तेणें विचारें पावला । समाधान भृगु।।३४।।विचाराचें कोणतें स्थळ । तेंचि करूं प्रांजळ । श्रोतींहि येथें निवळ । क्षण एक असावें।।३५।।ज्यापासून हें सर्व होतें । आणि जया स्वरूपीं वर्ततें । शेवटीं जेथें लया जातें । तें अधिष्ठान ब्रह्म।।३६।। भृगु विचारी मनीं । संकेतें न पवें अर्थालागुनी । अमुक म्हणोनि सांगा कर्णी । पुन्हां ऐसें प्रार्थिलें।।३७।।अधिकार पहावा भृगूचा । अन्न ब्रह्म बोले वाचा । उद्भव स्थिति लय सर्वांचा । अन्नाचा ठाई।।३८।।तरि अन्न ब्रह्म जाणावें । या विचारीं प्रवर्तावें । ऐसें ऐकतां स्वभावें । विचारिता जाला।।३९।।अन्न म्हणिजे जडें । तो हा स्थूल देह वाढे । शेवटीं अन्नींच वावडें । परि या सत्यत्व असेना।।४०।।म्हणोनि न घडे ब्रह्मत्व यासी । पुन्हां येऊनी पित्यापासी । हे गुरो अन्नब्रह्मासी। नाश आहे।।४१।।तरी अन्य आत्मा प्राणमय ।**

---

कृपाळू अंत:करणाने विद्या दिली. परंतु आणखी जिज्ञासा (विवदिषा) निर्माण झाल्यामुळे भृगूने आपला पिता जो वरुण त्याला विनंती केली.(३२) ''हे तात, अहो सद्‌गुरूमहाराज, मला एक विचार समजावून सांगा. हे दयाळू गुरुवर्या, माझ्यावर कृपा करून मला ब्रह्मस्वरूपाचे निश्चित ज्ञान सांगावे.''(३३) त्याचे ते बोलणे ऐकून वरुण प्रसन्न झाला. त्याने भृगूला विचाराची दिशा सांगितली.त्या विचाराने भृगूचे समाधान झाले.(३४) त्या विचाराचे नेमके क्षेत्र आता स्पष्ट करून सांगतो. श्रोत्यांनीही ते क्षणभर लक्ष देऊन ते ऐकावे.(३५) ज्याच्यापासून हे सर्व उत्पन्न होते, उत्पन्न झाल्यानंतर ज्या स्वरूपात राहते आणि शेवटी ते जेथे विलीन होते, त्या अधिष्ठानभूत तत्त्वाला ब्रह्म म्हणतात.(३६) भृगूने मनात विचार केला, अशा सांकेतिक बोलण्याने (अशा खुणेच्या बोलण्याने) काहीच अर्थज्ञान प्राप्त होत नाही. म्हणून पुन्हा एकदा स्पष्ट निर्देश करून 'हे अमुक म्हणजे ब्रह्म होय' असे माझ्या कानात सांगा अशी त्याने त्यांना प्रार्थना केली.(३७)यावर वरुण पित्याने भृगूचा अधिकार पहावा म्हणून ''अन्न म्हणजे ब्रह्म होय''असे शब्दांनी सांगितले. त्यांनी पुढेही असे सांगितले की,''सर्वच पदार्थांची उत्पत्ती,स्थिती आणि लय अन्नामध्येच होतो(३८)म्हणून तू 'अन्न म्हणजे ब्रह्म आहे' या विचारावर लक्ष केंद्रित कर.'' हे पित्याचे शब्द ऐकताच त्याने स्वाभाविकपणेच विचार करायला सुरुवात केली.(३९)'अन्न म्हणजे जड पदार्थ होय.त्या जड पदार्थाच्या योगाने हा स्थूल देह वाढतो. तो स्थूल देह शेवटी अन्नातच फिरत राहतो.पण त्याला सत्यत्व नाही.('वावडे'याऐवजी 'वावटे' असा पाठ येथे जास्त योग्य वाटतो.'वावटे' म्हणजे 'विश्रांती पावतो')(४०)म्हणून अन्नाला ब्रह्मपण देता येत नाही'असा विचार करून तो पुन्हा पित्याकडे आला आणि म्हणाला,'हे गुरुवर्या अन्न ब्रह्म म्हणून मानले तर त्याला शेवटी नाश आहे.'(४१)तेव्हा त्याचा पिता त्याला म्हणाला,'तर मग आत्मा हा प्राणमय आहे.त्या प्राणाच्या योगाने

**तेणें अन्नाची पूर्णता होय। प्राण ब्रह्म हा निश्चय । विचारीं बापा ।।४२।।मग प्राणाची विवंचना । पांच कर्मेंद्रिय पंचप्राणा । यासि जडत्व दुःख प्रयाणा । अंतीं नाश आहे।।४३।। तरि यांसी ब्रह्मत्व कैसें। उभयकोश अविद्यात्मक ऐसें । यासि कोशत्वनाम आलेसें । आच्छादक हेतु।।४४।।अविद्यक हे जडे। यासि ब्रह्मत्व कैसें घडे । पाहतां जैसे मडें । या उपदेशही नसे।।४५।।पुन्हा आला पित्यासमीप । प्राणब्रह्म असद्रूप । तरि कैसें तें ब्रह्मरूप। मज निरूपावें।।४६।।विद्याअविद्यात्मक मनोकोश। येथेंच श्रुतीचा उपदेश। आत्मा म्हणतां हे आदेश। चतुर्थावयवीं।।४७।।विद्याविद्या दोनी कैसें। तेचि अवधारा मानसें । पंचज्ञानेंद्रियासहित असे । मनोमयाचा ठाई ।।४८।।ब्रह्मरूपीं खेळताती । तेथेंचि विषयीं व्यापारतीं । परि तयातें नेणती । हेचि अविद्या।।४९।।वाक्ये जीं स्वतःप्रमाण । तेणें मनासी होय ज्ञान । हेंचि विद्येचे लक्षण । मनोमयकोशीं उपदेश ।।५०।।उपदेश विज्ञानीं कां न होय। तरि विद्यात्मक कोश उभय। विज्ञान आणि आनंदमय । तेथें उपदेश कैंचा।।५१।।**

---

अन्नतत्त्वाला पूर्णता येते.तर मग प्राणतत्त्व हेच ब्रह्म आहे असा निश्चय करून त्यावर विचार कर.'(४२)त्यावर त्याने प्राणासंबंधी विचार करायला सुरुवात केली.पाच प्राण आणि पाच कर्मेन्द्रिये ही जड तत्त्वे आहेत.ती दुःखमय आहेत आणि शरीर सोडून जाताच त्यांचा अंतही होतो.(४३)तर त्यांना ब्रह्मपण कसे तेता येईल?तेव्हा अन्नमय कोश आणि प्राणमय कोश दोन्हीही जड असल्यामुयळे अज्ञानाने युक्त आहेत.त्यांना ते केवळ शरीरातील सूक्ष्म तत्त्वांचे आच्छादक असल्याने कोश पदवी देण्यात येते.(४४)ही दोन्ही तत्त्वे अज्ञानयुक्त असून जड आहेत.त्यांना ब्रह्मपण कसे प्राप्त होईल?तसे पाहिले तर ही दोन्ही तत्त्वे निर्जीव शरीराप्रमाणे असून त्यांना उपदेशही देता येत नाही.(४५)तेव्हा तो पुन्हा आपल्या पित्याकडे आला आणि म्हणाला,'प्राणब्रह्म असत्य आहे. मग खरे ब्रह्मपण कसे आहे ते मला समजावून सांगा.'(४६)तेव्हा पिता त्याला म्हणाला,'त्याहून सूक्ष्म कोश म्हणजे मनोमय कोश होय.तो ज्ञान आणि अज्ञान या दोहोंनी युक्त असतो.त्याच्या संदर्भात श्रुती(तैत्तिरीय उपनिषद-ब्रह्मानंदवल्ली३.१७मध्ये) सांगते की,मनोमय कोशाचा चवथा अवयव म्हणजे आदेश(विधायक ग्रंथ)हा आहे.(४७)पण या कोशामध्ये विद्या आणि अविद्या(ज्ञान व अज्ञान)या दोन्ही एकत्र कशा असतात,असा प्रश्न मनात येतो.त्याचे समाधान मन एकाग्र करून ऐका.या मनोमय कोशामध्ये पंच ज्ञानेंद्रिये(४८)ही पंचज्ञानेंद्रिये ब्रह्मरूपावर खेळतात.तेथेच त्याच वेळी आपल्या विषयांमध्ये व्यापार करतात.पण त्या ब्रह्मरूपाला ओळखत नाहीत हीच अविद्या अथवा अज्ञान होय.(४९)वेदातील स्वतःप्रमाण,स्वतःसिद्ध अशी जी वचने आहेत,त्या योगाने मनाला ज्ञान प्राप्त होते.हेच विद्येचे लक्षण होय.मनोमय कोशामध्येच आदेश म्हणजे उपदेश शक्य आहे.(५०)उपदेश विज्ञानमय कोशात का होत नाही?याचे कारण यापुढील विज्ञानमय आणि आनंदमय हे दोन्ही कोश मुळातच विद्यामय आहेत.तेथे उपदेश कसा काय होईल?(५१)

**विज्ञान कैसा विद्यात्मक । तरि निश्चय करणें हें रूपक । कोणतेही संशयात्मक । बुद्धीसी नाही ।।५२।। मनकोशीं उपदेश मात्र । विज्ञानीं मनन निश्चय विचार । या हेतु श्रद्धैव शिर । विज्ञानमयी श्रुति बोले ।।५३।। असो प्राणाहून अन्य मनोमय । तेणें पूर्ण प्राणमय। मनोमय हा ब्रह्म होय । विचारीं गा अंतरी ।।५४।। मन आणि ज्ञानेंद्रिय । हे विषयसाधन होय । बंधमोक्षाचा उपाय । येणेंयोगें आत्म्यासी ।।५५।। काम क्रोध मोह शोक । लज्जा धारणा धाक । सर्व हें मनाचें रूपक । बंध मोक्ष या हेतू ।।५६।। क्षणा सुखी क्षणा दुःखी । क्षणा लया जाय शेखीं । म्हणोनि ब्रह्मत्व हे उखी। मनासि न घडे ।।५७।। ब्रह्म अविनाशी उघडें । वाजती श्रुतीचे चौघडे । म्हणोनि आला पित्यापुढें । मना ब्रह्मत्व मायिक।।५८।। संतोषोनि वरुण म्हणे । भला विचारी पावसी खुणें । आतां मना पूर्णत्व होय जेणें । अन्य आत्मा विज्ञानमय ।।५९।। सर्व कर्तेपण तेथें असे । तेंचि विचारि मानसें। येथें आक्षेपिलें कैसें । तेंचि अवधारा ।।६०।। हे दोन्ही मिळोनि अंतःकरण ।**

---

विज्ञानमय कोश विद्यात्मक कसा? तर निश्चय करणे हेच बुद्धीचे रूप आहे. बुद्धीमध्ये कोणत्याही संशययुक्त विचाराला स्थान नाही.(५२) मन:कोशामध्ये फक्त उपदेशाला वाव आहे. विज्ञानमय कोशात मनन, निश्चय, विचार हेच व्यापार असतात. म्हणूनच विज्ञानमय कोशासंबंधाची श्रुती सांगते की श्रद्धा हेच या विज्ञानमय आत्म्याचे शिर आहे. (तैत्तिरीय उपनिषद ब्रह्मानंद वल्ली ४.९) म्हणजे विज्ञानमय कोशाचे पहिले अंग श्रद्धा हेच आहे.(५३) म्हणून मनोमय कोश हा प्राणाहून वेगळा आहे. प्राणमय कोश मनोमयामुळे पूर्ण होतो. म्हणून मनोमय कोश हा ब्रह्मपणाला योग्य आहे की नाही याचा मनात विचार कर.(५४) मन आणि ज्ञानेंद्रिये ही विषयांची साधने होत. त्यांच्या योगानेच आत्म्याला (जीवाला) बंध अथवा मोक्ष प्राप्त होतात.(५५) काम, क्रोध, मोह, शोक, लज्जा, स्मरणशक्ती (धारणा), धाक (भीती) ही सर्व मनाचीच रूपे होत. यांच्यामुळेच बंध अथवा मोक्ष दोन्ही शक्य होतात.(५६) मनाचे असे आहे की, ते एका क्षणाला सुखी होते, तर लगेच दुसऱ्या क्षणाला दुःखी होते. आणखी एका क्षणाला ते शेवटी लयालाही जाते या कारणाने मनाला ब्रह्मत्वाची (ब्रह्मपणाची) भाषा लागू पडत नाही.(५७) ब्रह्म तर अविनाश आणि उघडे आहे. श्रुतींचे (वेदांचे) चौघडे हेच वाजवून सांगत आहेत. असा विचार करून भृगू परत पित्यापुढे आला आणि म्हणाला, 'मनाच्या ठिकाणी ब्रह्मपण मायिक म्हणजे खोटे आहे.'(५८) यावर वरुणाला संतोष झाला व तो म्हणाला, "शाबास! विचाराच्या साहाय्याने तू बरोबर इप्सित ठिकाणी पोचू शकतोस. आता या मनाला ज्यायोगाने पूर्णत्व येते असा दुसरा एक आत्मा तुला सांगतो. हा आत्मा विज्ञानमय असा आहे.(५९) सर्व कर्तेपण विज्ञानमयाचेच आहे. त्याचाच मनामध्ये विचार कर. परंतु त्यावर त्याने (भृगूने) जे आक्षेप घेतले. ते कशा प्रकारचे आहेत तेच लक्षपूर्वक ऐका.(६०) मन आणि बुद्धी हे दोन्ही मिळून अंत:करण बनते.

**कोश कल्पना कासया दोन । तरि अहंवृत्ति कर्तेपण । आणि मन ते इदंवृत्ति ।।६१।। जरी बुद्धीसी मी मी स्फुरे । तरी मन विषयीं वावरें । ऐसे बाह्य आणि अंतरें । प्रवर्तती दोन्ही।।६२।। अथवा दोन्हीही अंतरी । केव्हां प्रवर्तती बाहेरी । उभयावीण विषयव्यापारीं। सिद्धता नव्हे।।६३।। मनासि बुद्धीचा आधार । म्हणोनि दोन कोश साचार । असो करिता जाला विचार । भृगु विज्ञानाचा ।।६४।। बुद्धीस्तव जग होतें । बुद्धि असतां जग राहतें । बुद्धि जातां लया जातें । तरी कर्तृत्व खरें ।।६५।। परि यासी लय होता । म्हणोनि नसे शाश्वतता । ब्रह्मत्व नव्हे या करितां । पुन्हां पित्याजवळि ये ।।६६।।म्हणे बुद्धि ज्ञानसंपन्न। परि सर्वदा नसे जाण । अनुभवी सुखातें कोण । बुद्ध्याभावी सुषुप्तीं ।।६७।। तरी माझें समाधान । होय ऐसें करा कथन । वरुण म्हणे सावधान । वास्तव सांगूं आतां ।।६८।। पूर्वी बोलिला अन्नमय । प्राणमयीं त्याचा निरास होय। पुढें विचारतां मनोमय । उपसंहार प्राणाचा ।।६९।। बुद्धीसी जेव्हां ओळखिलें । तेव्हांचि मनोमय राहिलें । विज्ञान जेथें लया गेलें । तें अवधारी पां ।।७०।। आनंदमय सुषुप्ती । तेथें बुद्धीची समाप्ती । मग निखळ**

---

मग त्यांच्या दोन वेगवेगळ्या कोशांची कल्पना कशासाठी करता?याचे उत्तर असे की, मीपणाचे स्फुरण बुद्धीने होते आणि अमुक पदार्थ अमुक आहे हे स्फुरण मनाने होते.(इदंवृत्ती=मन, अहंवृत्ती=बुद्धी)(६१)जेव्हा बुद्धीला मी मी असे स्फुरण होते तेव्हा मन विषयांच्या संदर्भात आपला व्यापार करते.अशा प्रकारे ही दोन्ही इंद्रिये मिळून अनुक्रमे आंतरव्यापार आणि बाह्यव्यापार यांमध्ये मग्न असतात.(६२)किंवा दोन्हीही मिळून केव्हा अंतर्व्यापारात निमग्न असतात केव्हा बाह्यव्यापारात निमग्न असतात.मात्र दोहोंवाचून विषयांसंबंधीचा व्यापार अशक्य आहे.(६३)मनाला बुद्धीचा आधार असतो. म्हणून दोन्ही कोश असणे योग्य आहे.अशा प्रकारे निर्णय करून भृगूने विज्ञानमय कोशाचा विचार केला.(६४)बुद्धीमुळे जग उत्पन्न होते,बुद्धी असेल तर जग राहते,बुद्धी नाहीशी होताच जग लयाला जाते.अशी परिस्थिती असेल तर बुद्धीचे कर्तृत्व खरे मानावे लागेल.(६५)पण या कोशाचाही लय होतो,म्हणजे या कोशाला शाश्वतता नाही म्हणून त्याला ब्रह्मपणही नाही.असा विचार झाल्यावर तो पुन्हा पित्याजवळ आला.(६६) त्याला तो म्हणाला,बुद्धी ज्ञानयुक्त असते.पण ती सर्वकाळ तशी नसते.सुषुप्ती अवस्थेमध्ये बुद्धीचा अभाव असताना झोपेच्या सुखाचा अनुभव कोण घेतो?(६७)तेव्हा माझे समाधान होईल असे मला सांगा.तेव्हा वरुण पिता त्याला म्हणाला,'सावधान होऊन ऐक.तुला खरे ज्ञान सांगतो.'(६८)या अगोदर तुला अन्नमय कोश सांगितला.त्या अन्नमय कोशाचा प्राणमय कोशात निरास होतो.नंतर मनोमय कोशाचा विचार करताच लक्षात येते की,प्राणमय कोशाचा मनोमय कोशात लय होतो.(६९) त्यानंतर विज्ञानमय कोशाची जेव्हा ओळख होते.तेव्हा मनोमय कोशाचा विचार थांबतो.या न्यायाने विज्ञानमय कोश जेथे लयाला जातो ते आता लक्ष देऊन ऐक.(७०) सुषुप्तीची अवस्था आनंदमय असते. त्या

**स्वयंज्योती । आनंदरूप आत्मा।।७१।।आनंदापासूनि जालें । आनंदी वर्तू लागलें । शेवटी हें लया गेलें । आनंदामाजीं।।७२।।आतां विचारीं अंतरीं । नसेचि कल्पना दुसरी। मस्तक ठेवून चरणावरी । परतता जाला।।७३।।ब्रह्म हेंचि आनंदमय । याचा विचार करिता होय । पाहतां श्रुतीचा निश्चय। पांच अवयव।।७४।।पक्षापरि वर्णिले । प्रिया शिर कल्पिलें। मोदासि नांव ठेविलें । दक्षिण पक्ष।।७५।।उत्तरपक्ष तो प्रमोद । आत्मा वर्णिला आनंद। पांचवें अंग जें शुद्ध। पुच्छत्वें प्रतिष्ठा।।७६।।वर्णिले कार्य कारण । शिरापासून आत्मत्व जाण । पुच्छासि कार्य कारण। दोन्ही नसे ।।७७।।तेंचि प्रतिष्ठा तेंचि सार। ऐसा मानिला निर्धार। या निरूपणाचा उच्चार। पुन्हां केला पाहिजे।।७८।।कोश नाम हे कासया। वृत्तिभेदाच्या उपाया । वृत्ति निरसतां अपसया । कोशनिवृत्ति।।७९।। भोग्यत्व आलें या कोशीं। म्हणोनि नाम प्रियत्व यासी। पाहतां भोक्त्याचे सुखासी। आवडती विषय।।८०।। भोक्त्यातें जाणतां । उडे विषयममता । म्हणोनि भोक्ता आवडता। मोदत्व श्रुति म्हणे।।८१।।**

---

अवस्थेत बुद्धीचा अंत झालेला असतो.त्यामुळे.केवळ आनंदरूप स्वयंप्रकाश असा आत्माच राहिलेला असतो.(७१)आनंदापासूनच हे जग उदयास येते.आनंदातच ते व्यापार करू लागले,शेवटी ते आनंदातच लय पावते.(७२)आता यावर तू मनात विचार कर.तेथे दुसरी कोणतीही कल्पना नसते.हे ऐकून भृगूने आपल्या वरुणपित्याच्या चरणांवर मस्तक टेकवले व त्यानंतर तो परत गेला.(७३)मग आनंदमय कोश हेच ब्रह्म असा विचार तो करू लागला.याबद्दल श्रुतीचा निश्चय (वेदाचे मत) काय आहे,हे पाहू लागता त्याला त्या कोशाचे ५अवयव सांगितलेले दिसले.(७४)श्रुतीने पक्ष्याचे रूपक करून ह्या ५अवयवांचे वर्णन केले आहे.त्या पक्ष्याचे प्रिय हे शरीर आहे.मोद असे दक्षिण(उजव्या)पंखाचे नाव ठेवले.(७५)प्रमोद हा त्याच्या उत्तर(इथे उत्तर-डावा)पंख आहे.आनंद हा त्याचा आत्मा म्हणून सांगितले आहे.त्या पक्ष्याचे पाचवे अंग शुद्ध ब्रह्म असून ते त्याच्या पुच्छाच्या ठिकाणी आहे. ते ब्रह्म हेच त्याची प्रतिष्ठा आहे.(७६)आता शिरपासून ते आत्म्यापर्यंत कार्यकारणभाव सांगितले आहेत. पण पुच्छाला मात्र कार्य आणि कारण हे दोन्हीही नाहीत.(७७) ब्रह्म हेच त्याची प्रतिष्ठा आहे. तेच त्याच्या अस्तित्वाचे सार आहे.असा निश्चय त्याने केला.या निरूपणाचा पुन:पुन्हा उच्चार केला पाहिजे.(७८)या अवयवांना कोश असे नाव का दिले आहे?तर हे सर्व वृत्तिभेद आहेत.ते वृत्तिभेद दाखवण्यासाठी त्यांच्या ठिकाणी कोशकल्पना केली आहे.वृत्तीचा निरास झाल्याबरोबर कोशकल्पनेचाही आपोआप निरास होईल.(७९)ज्याला ज्याला कोश हे नाव दिले आहे ते ते सर्व भोग्य या सदरात येतात.कोश भोग्य आहेत म्हणून त्यांना प्रियत्वही चिकटते.भोक्त्याच्या सुखाच्या दृष्टीने विचार करता त्याला आवडणाऱ्या गोष्टींमध्ये विषय येतात.भोक्त्याला सुख देतात म्हणून विषयांनाही प्रियत्व येते.(८०)भोक्त्याचे ज्ञान होताच विषयांबद्दलची ममत्वाची भावना उडून जाते. त्यामुळे भोक्ता आवडू लागतो.याचेच श्रुती मोद म्हणून वर्णन करते.(८१)

**विषयभान नि:शेष जाय । आत्मलाभें सुखी होय । वासनावृत्तिं फुंज न समाय । त्यासी प्रमोद नाम ।।८२।। तेचि वासनावृत्ति मुरे । सुख सुखींच थारे । अनुभवें त्रिपुटी उरे । तो आनंद आत्मा ।।८३।। ऐसीं कार्यकारणें चारीं । निरोपिलीं अंगें निर्धारी । पुच्छत्वें प्रतिष्ठा करी । श्रुति तें ऐका ।।८४।। आनंद ना निरानंद।अनुभवेंवीण स्वानंद । अनुभाव्य शुद्ध बुद्ध। निखळ ब्रह्म ।।८५।। यारीती पूर्ण समाधान । जाला भृगु ब्रह्मसंपन्न । करणें तें येथें संपूर्ण । समाप्त जालें ।।८६।। निरतिशयानंद या नांव । जेथें नसे सातिशयत्व। नित्य ज्ञानियासी उत्साव । ज्याचा लव सर्वानंदी ।।८७।। पृथ्वीवरील जितुके जन । आनंदीच असे वर्तन । तयाचाही शतगुण । आनंद चक्रवर्तीसी ।।८८।। राजियाहि शतगुणित । मनुष्यगंधर्व आनंदभरित । त्याचे शतगुणें वर्तत । आनंद देवगंधर्वा।।८९।। देवगंधर्वा शताधिक । आनंदे वर्ते पितृलोक । शतानंद होतां एक । अजानदेवाचा।।९०।। अजानदेव शतगुण । देव आनंदती संपूर्ण । देवा शतगुणित पूर्ण । इंद्रानंद ।।९१।। शत**

---

विषयाचे भान संपूर्णपणे नाहीसे होते आणि आत्म्याच्या लाभाने मनुष्य सुखी होतो. वासनावृत्तीमध्ये गर्व (अभिमान) मावेनासा होतो. या अवस्थेला प्रमोद असे नाव आहे.(८२) तीच वासनावृत्ती मुरल्यानंतर (ओसरल्यानंतर)सुख सुखाच्या ठायी स्थिरावते आणि त्या अवस्थेचा अनुभव घेत असल्यामुळे अनुभावक, अनुभाव्य आणि अनुभव अशी त्रिपुटी उरते. त्या अवस्थेला आनंद असे म्हणतात. तो कोशरूपी पक्ष्याचा आत्मा होय.(८३) अशा प्रकारे या पक्षिशरीराची चार अंगे कार्यकारणाच्या समवेत वर्णन करून सांगितली. आता त्या शरीराच्या पुच्छाच्या रूपाने श्रुती ज्या ब्रह्माची प्रतिष्ठापना करते. ते ऐका.(८४) ब्रह्माच्या ठिकाणी आनंद नाही, आनंदाचा अभावही नाही, हा अनुभवविरहित असा तो केवळ स्वानंदच आहे. त्यातील ज्याचा अनुभव येतो ते अनुभाव्य म्हणजे शुद्ध, बुद्ध (ज्ञानस्वरूप) असे निखळ ब्रह्मच होय.(८५) अशा रीतीने पूर्ण समाधान होऊन भृगु ज्ञानसंपन्न झाला आणि या ठिकाणी सर्व क्रिया येथे समाप्त झाली.(८६) या अवस्थेला निरतिशयानंद असे नाव आहे. म्हणजे त्याहून अधिक असे दुसरे सुख नाही. तेथे उणे अधिक काही नाही. हा निरतिशयानंद म्हणजे ज्ञानी लोकांचा उत्सवाचा क्षण होय. सर्वानंद म्हणजे सर्व आनंदमय पाहणे ही अवस्था त्या निरतिशायनंदाचा एक अंशमात्र आहे.(८७) पृथ्वीवरील सर्व लोक आनंदाच्याच अपेक्षेने राहत असतात.(जीवन जगत असतात) त्यांच्या आनंदापेक्षा शंभरपट आनंद चक्रवर्ती राजाला मिळत असतो.(८८)राजाच्या आनंदापेक्षा शंभर पटीने जास्त असा मनुष्यगंधर्वांचा आनंद असतो. त्यांच्या शंभर पटीने अधिक देवगंधर्वांचा आनंद असतो.(८९)देवगंधर्वांच्या आनंदापेक्षा पितृलोकीचा आनंद शतपटीने अधिक असतो.पितृलोकीचे शंभर आनंद एकत्र केल्यानंतर अजानदेवांचा एक आनंद होतो.(९०)अजानदेवांच्या आनंदाच्या शंभर पटीने अधिक असा देवांचा आनंद असतो.देवांच्या आनंदापेक्षा शंभर पटीने इंद्राचा आनंद अधिक असतो.(९१)

**आनंद इंद्राचे। सुख असें बृहस्पतीचें। शत आनंद तयाचे। ब्रह्मयाचें ठाई ।।९२।। एकाहून एक अधिके। सातिशय असतीं सुखें। अनंत सुखाचें वास्तव्य एके। श्रोत्रियाचा ठाई।।९३।।या सुखाची मर्यादा। न वर्णवेचि वेदा । पुरे वाणीच्या वेवादा । मनासि अगम्य[३६] ।।९४।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । पंचकोशविवेकप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ।। - समास ३रा - प्रत्यगात्मानिरूपण

**अहो कल्पना उपाधि ऐसी। अब्रह्मत्व आणिलें आत्मयासी। निरसावया तयासी। निरूपण ऐका।।१।।ब्रह्म सच्चिदानंद असे। तें लक्षण आत्मत्वीं कैसें । श्रुति युक्ति अनुभवें होतसे। समाधान।।२।।चित् म्हणजे ज्ञानघन।आत्मा असे स्वप्रकाशमान। स्वानुभवें जाणावी खूण। ब्रह्मलक्षणाची।।३।।शब्दज्ञान स्पर्शज्ञान।रूप-रस-गंध-ज्ञान।हे विषय मात्र भिन्न भिन्न।परी ज्ञान अभेद।।४।।शब्दज्ञान जया जालें।तेणें स्पर्शा अनुभविलें। रूपरसा ओळखिलें। एकाचि ज्ञानें।।५।।विषयास्तव ज्ञान एकले। भिन्न भिन्न असें गमलें। परि तें ज्ञान विभागलें। नवचे कदां।।६।।जळ एकचि मधुर।उपाधीनें तीक्ष्ण क्षार। तैसें ज्ञान तें साचार। एकलेंचि असे।।७।।**

---

इंद्राचे शंभर आनंद म्हणजे बृहस्पतीचे सुख होय. त्याचे शंभर आनंद ब्रह्मदेवाच्या एका आनंदाबरोबर होतात.(९२) अशा तऱ्हेने सुखे एकाहून अधिक दुसरे अशी वरचढ (सातिशय) असतात. अशा अनंत सुखांचे वास्तव्य एका श्रोत्रियाच्या ठिकाणी असते.(९३) त्या सुखाची मर्यादा वेदालाही सांगता येत नाही. वाणीचे विवाद तेथे थांबतात. ते सुख मनालाही न कळणारे (अगम्य) असते.(९४)

## पंचिका ५वी, समास ३रा - प्रत्यगात्मनिरूपण

कल्पना ही एक अशी उपाधी आहे की, तिने आत्म्याला अब्रह्मत्व आणले. तिचे निरसन होण्यासाठी पुढील निरूपण ऐका.(१) ब्रह्म सच्चिदानंदस्वरूप आहे. ते लक्षण आत्म्याला कसे लागू होते? या शंकेचे श्रुती, युक्ती आणि अनुभवाने समाधान आता करण्यात येत आहे.(२) चित् म्हणजे ज्ञानाने ओतप्रोत असे अथवा अखंड दाटून असलेले ज्ञान (चिद्घन). आत्मा स्वयंप्रकाशी आहे. त्याच्या ठिकाणच्या ब्रह्माच्या चिद्घन या लक्षणाची ओळख स्वानुभवाने जाणून घ्यावी.(३) शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे विषय भिन्न भिन्न असले तरी त्यांचे ज्ञान मात्र एकाच प्रकारचे आहे.(४) ज्याला शब्दज्ञान होते त्यालाच स्पर्शाचेही ज्ञान होते. रूप, रस यांची ओळखही एकाच ज्ञानाने होते.(५) ज्ञान हे एकाच प्रकारचे असून विषयभेदांमुळे ते भिन्न भिन्न असे वाटते. पण ज्ञानाची विषयभेदानुरूप विभागणी होऊ शकत नाही.(६) पाणी एकच असते. ते मुळात मधुर असते. पण उपाधींमुळे ते तीक्ष्ण, खारट असे वाटते. त्याप्रमाणे ज्ञान वस्तुतः एकच आहे.(७)

**शब्दस्पर्शादि सांडावें । त्यांतील कळणें निवडावें । मग पाहतां स्वभावें एकरूप ज्ञान।।८।। जितुके जागृतीचे व्यापार। बहुधा परि पांच प्रकार। तितुकेहि ज्ञान अणुमात्र । दुजें नाहीं।।९।। संपूर्ण जागृतीचें ज्ञान । एकचि असे जाण । स्वप्नींहि प्रकाशमान । तेंचि ज्ञान असे।।१०।। शब्दस्पर्शादि पंच विषय । स्वप्नीं होतसे प्रत्यय । परि ज्ञान एकचि होय । जागृतिपरी।।११।। जागरिं विषय अनुभविलें । तेंचि स्वप्नीं प्रतीती आलें । तरी दोन कासया कल्पिले । स्वप्न जागृती।।१२।। जागृतीचे विषय होती । बहुकालें तैसेचि दिसती । स्वप्नीं दिसून हरपती। तेचि क्षणीं ।।१३।। कांही स्थिरत्व जागृतीं असे । स्वप्नीं स्थिरत्व न दिसे । म्हणोनिया भिन्नत्व असे । उभय अवस्थेसी ।।१४।। अवस्था दिसे वेगळाली । परि ते मुख्य चिती असे एकली । अवस्था जिणें जाणितली । स्वप्रभ ती ।।१५।। त्याचि ज्ञानें सुषुप्तीं । अज्ञानसुखाची अनुभूती । जाणिलें नसतां पुढती। आठव जागरिं न घडे ।।१६।। मनेंवीण सुखातें जाणें । आपुलेनि सर्वज्ञपणें । नेणतपणासी आठवणें । तेंचि ज्ञान।।१७।।**

---

शब्द, स्पर्श इत्यादी उपाधिभेदांचा त्याग करून त्यांच्यातील कळण्याचा फक्त स्वीकार करावा म्हणजे ज्ञान स्वभावत: एकरूपच कसे आहे याची ओळख पटते.(८)जागृतीचे जेवढे म्हणून व्यापार आहेत ते अनंत असले तरी या पाचच प्रकारात त्यांची गणना करता येते. ते पाच प्रकार म्हणजे एकरूप असे ज्ञानच होत. त्यांखेरीज दुसरे काही नाही.(९)संपूर्ण जागृतीचे ज्ञान एकरूपच आहे हे जाणून घे. मग तेच ज्ञान स्वप्न अवस्थेमध्ये सुद्धा कसे प्रकाशमान असते (जाणवते) हे समजून घे.(१०)स्वप्नावस्थेमध्येही शब्द, स्पर्श इत्यादीचाच जागृतीप्रमाणे अनुभव येतो. पण जागृतीप्रमाणे ज्ञान तेच असते.(११) जागृतीच्या अवस्थेमध्ये ज्या विषयांचा अनुभव घेतला त्यांच्याच अनुभव स्वप्नावस्थेमध्येही येतो असे असताना स्वप्न, जागृती असे भेद का बरे केले?(१२) जागृतीत जे विषय असतात ते पुष्कळ काळपर्यंत तशाच दिसतात. (त्यांना स्थैर्य आहे.) स्वप्नातील विषय मात्र दिसतात आणि त्याच क्षणाला हरपून जातात. (त्यांना स्थैर्य नसते.).(१३) जागृतीत विषयांना थोडेफार स्थैर्य असते. स्वप्नावस्थेत मात्र ते स्थैर्य दिसत नाही. म्हणून या दोन अवस्थांमध्ये भेद आहे.(१४) या दोन्ही अवस्था भिन्न भिन्न दिसल्या तरी दोन्ही अवस्थांमध्ये चितती म्हणजे जाणीव एकच आहे. या दोन्ही अवस्था जाणण्याचे काम ही चितीच करते. ती स्वयंप्रभ आहे. (म्हणजे ती अवस्थांना प्रकाशित करते मात्र तिला कोणी प्रकाशित करत नाही.)(१५)याच जाणिवेच्या रूपातील ज्ञानाने सुषुप्तीच्या अवस्थेतील अज्ञान आणि सुख यांचा अनुभव घेता येतो. सुषुप्तीत ती काही जाणत नाही, असे म्हणाल तर सुषुप्तीनंतर जागृती आल्यानंतर त्या सुखाची आठवण झाली नसती. म्हणजे सुषुप्तिकाळीही त्या सामान्य चितीच्या (जाणिवेच्या) द्वारे जाणणे असतेच.(१६) सुषुप्तीच्या अवस्थेत हे ज्ञान मनाच्या माध्यमाशिवाय स्वत:च्या सर्वज्ञपणाच्या बळाने सुखाला जाणते. जागृतिकाळी आपल्या अज्ञानाचे स्मरण होणे हेच ज्ञान होय.(१७)

**स्वप्न जागृति जया कळली । तेणें सुषुप्ति जाणितली । तिहीं अवस्थेची जाली । जाणीव एकरूप।।१८।। तैसें कालीचें जाणणें । आजि नव्हे शिळें जुनें । जेणें दिवस अनुभवणें। रात्रि जाणें ज्ञान तें[३७] ।।१९।। रविवाराचें ज्ञान गेलें । सोमवारीं नवें जालें । ऐसें नवचे कल्पिलें । ज्ञान तें एकचि ।।२०।। शुक्ल कृष्ण पक्ष दोनी । जाणितलें एके ज्ञानीं । मास ऋतु अयनीं । एकलें ज्ञान ।।२१।। संवत्सर कपिलाषष्ठी । युग महायुगाची गोष्टी । कल्प महाकल्प शेवटीं । एका ज्ञानें जाणितलें ।।२२।। एक पिंडीं जे जाणीव । दुजे देहीं उमटे अपूर्व । अनंत देहाचा समुदाव। ज्ञानचि जाणें ।।२३।। देहावीण संधीसी । सुषुप्तिपरी अनुभवी तिसी । म्हणोनि नाश ज्ञानासी । बोलोंचि नये ।।२४।। तिहीं कालीं ज्ञान असतें । याहून सत् तें कोणते । सच्चित् उभय लक्षणातें । आत्मत्वीं साधिलें।।२५।। आतां तिसरा आनंद । आत्मा परमप्रेमास्पद । ऐसा श्रुतीचा संवाद । बहुधा असे ।।२६।। आत्मा आनंदरूप असे। सर्व जनां न कळे कैसें। जाणतांहि विषयस्पृहा दिसे । ज्ञातयासी।।२७।। जरी प्रियतम असता। सर्व लोकीं प्रगटता । विषई न प्रवर्ते ज्ञाता । तरी प्रिय कैसा।।२८।।**

---

ज्याला स्वप्न,जागृती या अवस्था कळल्या त्यालाच सुषुप्ती अवस्थेचेही ज्ञान होते.अशा तऱ्हेने जागृती,स्वप्न आणि सुषुप्ती या तिन्ही अवस्थांमध्ये होणारे ज्ञान एकरूपच असते.(१८)कालचे ज्ञान क्षज शिळे झाले असा प्रकार नसतो.ज्याने दिवसाचा अनुभव घेता येतो,त्यानेच रात्रीचेही ज्ञान होते.(तिन्ही अवस्थांना जाणणारे हे ज्ञान एकरूपच असते.)(१९)रविवारचे ज्ञान गेले.आता सोमवारचे नवे ज्ञान आले आहे,अशी कल्पना करता येत नाही.सगळे इथून तिथे एकच ज्ञान असते.(२०)शुक्लकृष्ण पक्ष दोन्हीही एकाच ज्ञानाने कळतात.महिना,ऋतू,दक्षिणायन,उत्तरायण हे सर्व जाणणारे ज्ञान एकच असते.(२१)संवत्सर कोणते आहे,कपिलाषष्ठी योग केव्हा आहे,कोणते युग चालू आहे,कोणते महायुग चालू आहे; कल्पान्त,महाकल्पान्त म्हणजे काय हे सर्व एकाच ज्ञानाने जाणले जाते.(२२)एका पिंडात(शरीरात)जी जाणीव असते तीच अपूर्व जाणीव दुसऱ्या देहातसुद्धा उमटते.विश्वातील अनंत देहांचा समुदाय या सर्वांना एकच ज्ञान जाणते.(२३)एका पिंडाची(देहाची)जाणीव तीच दुसऱ्या देहाच्या ठिकाणीही प्रगट होते.अनंत देहांच्या समुदायांना ज्ञानच जाणते.देह नसल्या अवस्थेचा म्हणजे संधीचा सुषुप्तीच्या अवस्थेप्रमाणे अनुभव ज्ञानच घेते.यामुळे ज्ञानाला नाश म्हणता येत नाही.(२४)ज्याअर्थी ज्ञान तिन्ही काळी असते त्याअर्थी दुसरे कोणते सत्तत्त्व असेल?तेव्हा सत्,चित् ही दोन्ही लक्षणे आत्म्याच्या ठिकाणी सिद्ध झाली.(२५)आता तिसरे लक्षण आनंद हे होय.आत्मा हे उत्कृष्ट आनंदाचे स्थान आहे असे बहुतेक सर्व श्रुतींचे सांगणे आहे.(२६)आत्मा आनंदरूप आहे,हे सर्व लोकांना कसे बरे कळत नसेल?कारण ज्ञानी माणूस सर्व जाणत असूनही त्याच्या ठिकाणी विषयाची आवड दिसून येते.(२७)आत्मा जर प्रियतम असता तर सर्व लोकांना ते कळले असते ना आणि ज्ञाता मनुष्य विषयांकडे वळलाचनसता,

**ऐसा आक्षेपु जाला । संशयो पाहिजे फेडिला । प्रियत्व न वाटे जनाला । समुदायास्तव।।२९।। आपण असे प्रियतर । स्पष्ट न कळे विचार । समुदाय मिळाला फार । अहंममतेचा।।३०।। आत्मत्व जेणें जाणितलें । त्यासि विषयसुख नाथिलें । विषय भोगी ऐसें वाटलें । प्रारब्धास्तव ।।३१।। हें निरूपण पुढें असे । प्रस्तुत येथें काज नसे । आत्मा प्रेमरूप अपैसे । आदिअंतीं ।।३२।। आणीक एक उपपत्ति । कळणें न कळणें वृत्ति । वृत्तिवीण स्वयंज्योति । आनंदरूप आत्मा ।।३३।। विषयाकार वृत्ति जाली । सुखरूप आत्मयातें विसरली। अज्ञानजनीं पैसावली । अहंममता ।।३४।। यासि अज्ञान मूळ । ज्ञानें होय जरी निर्मूळ । तरि वृत्तीसी निवळ । आनंद प्रगटे ।।३५।। जया वृत्तीसी अज्ञान । तया वृत्तीसी होय ज्ञान । दोवृत्तीसी अधिष्ठान । एक आत्मा ।।३६।। आत्मा आनंदरूप न होता । तरी जगासी नसे सुखाची वार्ता । आणि ज्ञात्यासी अनुभव केउता । आनंदाभावीं ।।३७।। ऐसें उभयपक्षीं दूषण । बोलों नये आनंदहीन । आत्मा नित्यानंदपूर्ण । सदोदित ।।३८।।एवं सच्चिदानंद परिपूर्ण । आत्मा असे सघन । तिही प्रतीति प्रमाण । आत्मा ब्रह्म ।।३९।।**

---

तर मग आत्मा प्रिय कसा म्हणावा?(२८)असा आक्षेप आला असता संशयनिरसन केलेच पाहिजे.समुदायामुळे लोकांना आत्मा प्रिय आहे असे जाणवत नाही.(२९)आत्मा प्रियतर आहे.पण लोकांना हा विचार स्पष्टपणे कळत नाही.कारण मीपणा,माझेपणा यांच्या प्रबळ समुदायामुळे आत्म्याचे प्रियतरत्व त्यांना कळत नाही.(३०)ज्याला आत्मतत्त्व खरे कळले आहे,त्याच्या दृष्टीने विषयसुख नाहीसे होते.परंतु तरीसुद्धा तो मनुष्य विषय भोगते असे वाटते.ते त्याचे विषय भोगणे प्रारब्धामुळे होत असते.(३१)याचे निरूपण पुढे करायचेच आहे.सध्या तो विषय प्रस्तुत नाही.आत्मा सहजपणेच जन्मापासून ते अंतकाळपर्यंत नेहमी प्रेमरूपच असतो.(३२)आणखी एक उपपत्ती सांगता येईल.कळणे न कळणे हा वृत्तीचा भाग आहे.पण आत्मा हा स्वयंप्रकाशी असून निखळ आनंदरूप असतो.तो फक्त वृत्तीरहित अवस्थेतच कळू शकतो.(३३)वृत्ती जेव्हा विषयाकार होते तेव्हा निखळ सुखाच्या रूपात असलेल्या आत्म्याचे तिला विस्मरण होते.अज्ञानी लोकांमध्ये मीपणा आणि माझेपणा या वृत्तीचा प्रसारझालेला असतो.(३४)याला अज्ञान हे मूळ कारण आहे.ज्ञानाने जर ते अज्ञान समूळ नष्ट झाले तर वृत्तीमध्ये निखळ आनंद प्रगट होईल.(३५)ज्या अंत:करणवृत्तीला अज्ञान झाले होते त्याच वृत्तीला ज्ञानही होते.या दोन्ही अज्ञानरूप आणि ज्ञानरूप वृत्तींचे आत्मा हेच एक अधिष्ठान असते.(३६)आत्मा जर आनंदरूप नसता तर जगाला सुखाची कल्पनाही आली नसती आणि आनंदाच्या अभावी ज्ञात्याला अनुभव तरी कसा आला असता?(३७)अशा तऱ्हेने दोन्ही बाजूंनी दोष येत असल्याने आत्मा आनंदहीन आहे,असे म्हणू नये.तो सदोदित आनंदपूर्ण आहे.(३८)अशा प्रकारे आत्मा सच्चिदानंद आणि परिपूर्ण ओतप्रोत आहे.(दाट भरून राहिला आहे)तेव्हा श्रुती,युक्ती,अनुभव या तिही प्रमाणांनी आत्मा ब्रह्म आहे हे ठरते.(ब्रह्माची

**स्त्रीपुत्रही प्रिय वाटले। परि प्रियतम नवचे बोलिले। तेथे व्यभिचार दिसून आले। तेव्हां प्रियत्वही माइक।।४०।।जेथें व्यभिचार दिसे। तें माईक जाणावें ऐसें । व्यभिचार जेथें नसे। तेंचि मुख्य।।४१।।हेंचि दृढ करावें । म्हणून आत्मत्व तीन नांवे । गौणात्मा मिथ्यात्मा स्वभावें । मुख्यात्मा तिजा।।४२।।स्त्रीपुत्रादि हे गौण। मिथ्यात्मा देहादि जाण। मुख्यात्मा चिद्‌घन । प्रत्यगात्मा साक्षी।।४३।।पुत्र गौणात्मा कैसा । विभागी असे पितृशेषा। पशुधन कर्मा अशेषा । पुत्र अधिकारी।।४४।।बैसतां पुण्याहवाचनीं। तेथें अधिकारी असे पत्नी । सुखदुःखभोगालागुनी। अधिकारी मिथ्यात्मा ।।४५।।आपणा स्वर्गी सुख व्हावें। पुत्रें कर्म संपादावें । या हेतु आत्मत्व संभवें । पुत्ररूपें आपण।।४६।।आपण यज्ञादिक केलें। वय जराग्रस्त जालें। म्हणोनि पुत्रासी ठेविलें । प्रतिनिधि करूनी।।४७।।शरीरासी रोग जाले। स्त्रीपुत्रां औषध दिधलें।तेणें रोगा निवर्तन जालें।हें तो घडेना।।४८।।सर्व कर्मासि अधिकार।स्त्रीपुत्र नसती साचार। म्हणोनि गौणात्मा निर्धार। स्त्रीपुत्र निश्चयें।।४९।।तैसाचि देह नासतो ।**

---

सच्चिदानंद, परिपूर्ण, सघन ही लक्षणे आत्म्याच्याही ठिकाणी आढळतात.)(३९) आता स्त्री, पुत्र हे प्रिय वाटले तरी त्यांना प्रियतम असे म्हणता येत नाही. त्यांच्या ठिकाणी प्रियत्वाचे पूर्व लक्षण नष्ट होऊन त्याविरुद्ध द्वेष्यत्वही येण्याचा संभव असतो. म्हणजे प्रियत्व या लक्षणाशी व्यभिचार दिसून येतो.त्यामुळे त्यांच्या संबंधातले प्रियत्वही खोटे असते.(४०) जेथे जेथे अशा प्रकारचा व्यभिचार दिसून येतो ते ते मायिक म्हणजे खोटे आहे असे ओळखावे. जेथे व्यभिचार होत नाही तेच मुख्य प्रियत्व जाणावे.(४१) हेच मनाशी पक्के समजावे.म्हणून या संदर्भात आत्म्याचे तीन प्रकार संभवतात आणि त्यानुसार त्याला तीन वेगवेगळी नावे देता येतील. गौणात्मा, मिथ्यात्मा आणि तिसरा मिथ्यात्मा अशी ती तीन नावे होत.(४२)स्त्री पुत्र इत्यादींना गौणात्मा म्हणावे. देह इत्यादींना मिथ्यात्मा म्हणावे आणि प्रत्यगात्मा, चिद्‌घनस्वरूप साक्षिरूप हा मुख्यात्मा होय.(४३) स्त्री पुत्र हे गौणात्मा कसे? कारण पुत्र हा वडिलांच्या संपत्तीचा उत्तराधिकारी असतो. पशू, धन, सगळी कर्तव्यकर्मे यांचा पुत्र हाच उत्तराधिकारी असतो.(४४) पुण्याहवाचनासाठी अधिकारी पत्नीच असते. म्हणून स्त्री पुत्र यांना गौणात्मा ठरवले आहे. सुखदुःख इत्यादी भोग घेणाऱ्या देहादिकांना (सुखदुःखांच्या भोगासाठी देहादी अधिकारी आहेत म्हणून त्यांना) मिथ्यात्मा असे म्हटले आहे.(४५)आपल्याला स्वर्गात सुख व्हावे यासाठी पुत्राने कर्मे करायची असतात. यासाठी पुत्रामध्ये आत्मत्व संभवते. आपणच पुत्ररूपाने असतो.(४६) आपण यज्ञादी कर्मे केली आता वार्धक्य आहे, त्यामुळे ती कर्मे करण्यासाठी पुत्रास आपले प्रतिनिधी करता येते.(४७) पण शरीराला रोग निर्माण झाला, म्हणून स्त्री पुत्र यांना औषध पाजले आहे आणि त्यामुळे रोगाचे निर्मूलन झाले असे कधी घडत नाही.(४८) तेव्हा सर्वच कर्मांना स्त्रीपुत्र अधिकारी नसतात. म्हणून स्त्रीपुत्र ह्यांना गौणात्मा म्हणावे.(४९) त्याचप्रमाणे देह नासतो आणि

**सुखदु:ख जीवात्मा भोगितो । देह मिथ्या या हेतो। मुख्यत्व नसे ।।५०।। जाले गौणादि प्रकार तीन। परि व्यभिचार कैसा प्रियत्वालागुन। म्हणसी तरी सावधान। निवेदिजे तीतें।।५१।। ईशसृष्ट जालें निर्माण । तयाचेहि प्रकार तीन । प्रिय द्वेष्य उपेक्षण । चौथें नाहीं ।।५२।। स्त्रीपुत्र प्रिय असतीं । व्याघ्र सर्प द्वेष्य होतीं। तृण पाषाण उपेक्षिती । सहजची स्वभावें।।५३।। उपेक्षा तृणपाषाणीं।तेथें व्यभिचार असती दोनी। गृहकार्या पाहिजे म्हणोनि। प्रियत्व वाटे।।५४।। घर अंगावरी पडतां। मार्गी ठेंचा लागतां। उपेक्ष्य परि तत्त्वतां। द्वेष्यहि होय ।।५५।। व्याघ्रादि द्वेष्य स्वभावें। तेथेंहि व्यभिचार संभवे । क्रीडेस्तव व्याघ्रादि पाळावें । लालितां प्रियत्व ।।५६।। मार्गीं जातां कोणे काळीं । न देखतां ते उपेक्षिली । द्वेष्य परि तेहि जालीं। व्यभिचाररूप।।५७।। तैसेंचि स्त्रीपुत्र आवडते । निजस्वभावा अनुकूल जे ते । सर्व कार्या तत्पर असतें । तेंचि होती प्रिय ऐसें।।५८।।स्त्री जार पुत्र कुकर्मी। न शिके नायके अधर्मी। तरी द्वेष्य हे अनुक्रमीं । पित्यासी होय ।।५९।। बहुत नायके सांगता। तया उपेक्षी पिता ।**

---

त्यातून निर्माण सुखदु:खे जीवात्मा भोगतो. यामुळे देहाला मिथ्या म्हणावे त्याला मुख्य म्हणता येणार नाही.(५०)गौणात्मा, मिथ्यात्मा आणि मुख्यात्मा हे आत्म्याचे तीन प्रकार पाहिले. परंतु प्रियत्वाच्या बाबतीत व्यभिचार होतो म्हणजे काय?असे म्हणशील तर त्याचेही विवरण केले जाईल.सावधान होऊन ऐक.(५१)परमेश्वराने निर्माण केलेल्या सृष्टीला ईशसृष्ट म्हणतात. त्याचेही तीन प्रकार होतात. प्रिय, द्वेष्य आणि उपेक्ष्य असे ते तीन प्रकार होत. यांखेरीज चौथा प्रकार नाही.(५२)स्त्री पुत्र इत्यादी हे प्रिय होत.व्याघ्र, सर्प हे द्वेष्य होत आणि स्वाभाविकपणेच गवत पाषाण हे उपेक्ष्य होत.(५३) तृण, पाषाण यांना आपण उपेक्ष्य मानतो. पण त्यांच्याही बाबतीत प्रियत्व आणि द्वेष्यत्व असे दोन प्रकारचे व्यभिचार संभवतात. गृहकार्याला ते उपयोगी पडतात,म्हणून ते पाहिजे असतात.त्यामुळे त्यांच्याबद्दल प्रियत्व वाटते.(५४) घर अंगावर पडले म्हणजे अथवा रस्त्याने जात असता ठेच लागल्यावर मुळात उपेक्ष्य असलेले हे प्रकार द्वेष्य ठरतात.(५५) व्याघ्र इत्यादी स्वभावत: द्वेष्य होत. पण त्यांच्याही बाबतीत व्यभिचार संभवतो. क्रीडा करण्यासाठी म्हणून व्याघ्रादी पाळले जातात. त्यांचे लाड करताना त्यांच्याबद्दल प्रियत्व वाटू लागते.(५६)कधीतरी रस्त्याने जात असता वाघ सर्पादी समोर आले असताना आपण त्यांना न पाहिल्यामुळे त्यांची उपेक्षा केल्यासारखे होते. ते द्वेष्य असतानाही उपेक्षा ठरले, असा त्यांच्या बाबतीत व्यभिचार घडतो.(५७) त्याचप्रमाणे स्त्री,पुत्र हे आवडते असतात.पण ते केव्हा?आपल्या स्वभावाला ते जेव्हा अनुकूल असतात,आपली सर्व कामे करण्यामध्ये ते तत्पर असतात. तेव्हाच ते आपल्याला प्रिय असतात.(५८)पण स्त्री जारिणी आहे.पुत्र वाईट कर्मे करत आहे.तो काही केल्या शिकत नाही,आपले ऐकत नाही,धर्मविरुद्ध वागतो अशा परिस्थितीत स्त्रीपुत्र ही उभयता आपोआप मनुष्याला द्वेष्य वाटू लागतात.(५९)आता पुत्राला खूप सांगून पाहिले. तरी तो काही ऐकत नाही असे

**म्हणोनि व्यभिचार तत्त्वतां । प्रियत्वासि असे ।।६०।। म्हणोनि जेथें व्यभिचार । ते प्रिय न होती साचार । मग प्रियतमाचा विचार । केविं बोलावा ।।६१।। येथें आक्षेपिलें थोर। कीं आत्मवीं असे व्यभिचार । न कळतां आत्मा साचार । जनीं उपेक्षिजे ।।६२।। क्रोधें प्राणा करितां हनन । तरि आपुला शत्रु आपण । यापरता द्वेष्य कोण । दुजा असे।।६३।। ऐसा दिसतो व्यभिचार । आत्मा कैसा प्रियतर । याविशीचें उत्तर । दिधलें पाहिजे।।६४।। आत्मा नेणतां नाहीं कळलें । म्हणुन आपणासी उपेक्षिलें । तरि सुखी असावें वाटलें। तेंचि कोणा।।६५।।उपेक्षा करी आपुली ऐसा । न देखोंचि कोणी सहसा । पशुपक्षादिकीं मानसा । आपुली प्रीति ।।६६।। आपुला द्वेष करिती । मिथ्यात्वावरी कोपती । नाना व्यवहारीं दुःख पावती । म्हणोनियां ।।६७।। हें प्रीतीचें तारतम्य होतें । एक आवडे एका द्वेषितें । तेंचि ऐका समस्तें । प्रिय द्वेष्य कैसें ।।६८।। जोवरी देह सुखी असे । तोंवरी स्त्रीपुत्र प्रिय दिसे । अग्नीत जळतां अपैसें । स्त्रीपुत्र टाकून पळे ।।६९।। आपुला डोळा चालिला । वैद्याकरी पाय तोडविला । परि डोळा संरक्षिला । प्रियत्वामुळें ।।७०।।**

---

असेल तेव्हा पिता त्याची उपेक्षा करतो.म्हणजे स्त्रीपुत्रांच्या बाबतीत प्रियत्व या गुणाच्या संदर्भात व्यभिचार आढळतो.(६०)म्हणून जेथे व्यभिचार आढळतो ते वास्तविक पाहता प्रिय नव्हतेच.मग प्रियतम(सर्वात अधिक प्रिय)कोठून असणार?तो विचारच बोलता येणार नाही.(६१)येथे एक मोठा आक्षेप येऊ शकतो असा व्यभिचार आत्म्याच्या संदर्भातही होऊ शकतो.आत्मा म्हणजे काय ते कळतच नसेल तर लोक स्वाभाविकपणेच त्याची उपेक्षा करणार.(६२)क्रोधाच्या भरात एखाद्याने स्वत:चा प्राण दिला म्हणजे आत्महत्या केली म्हणजे आपणच आपला शत्रू झाला.साहजिकच तो मनुष्य स्वत:लाच द्वेष्य झाला.त्याला दुसरे कोण द्वेष्य असणार?(६३)असा व्यभिचार आत्म्याच्या बाबतीत दिसून येतो. तेव्हा आत्मा प्रियतर कसा?(प्रिय < प्रियतर<प्रियतम असा विशेषणांच्या बाबतीत तरतमभाव असतो.)या शंकेचे उत्तर आता दिले पाहिजे.(६४)आत्मा म्हणजे काय हे नेणतेपणाने कळले नाही,म्हणून आत्म्याची उपेक्षा होते,असे म्हणता,पण ते खरे नाही तर मग आपण सुखी असावे असे कोणाला वाटत असते? (६५) आपली आपणच उपेक्षा करील असा मनुष्य सहसा पहायला मिळत नाही.पशु,पक्षी यांना सुद्धा मनामध्ये आपल्या स्वत:बद्दल प्रेमच असते.(६६)आता आपला आपण द्वेष करतो,खोट्याचा राग येतो म्हणून नाना प्रकारच्या व्यवहारात दु:ख होते.(६७)या ठिकाणी प्रीतीचा तरतमभाव होतो.एकाबद्दल प्रेम वाटते,एकाबद्दल द्वेष वाटतो.आता सर्व पदार्थांचे प्रियत्व अथवा द्वेष्यत्व कसे ठरते ते ऐका.(६८)जोपर्यंत देहाला सुख मिळते तोपर्यंत स्त्रीपुत्र प्रिय आहेत असे दिसते.परंतु ते मरण पावले,त्यांचे अग्नीत दहन झाले म्हणजे त्या स्त्रीपुत्रांना टाकून मनुष्य पळ काढतोच ना!(६९)आपला एखादा डोळा जाणार आहे, पाय कापला तर डोळा वाचेल,असे जेव्हा वैद्य सांगतो तेव्हा डोळ्यांसाठी पाय कापून टाकायला तयार

गळलेला मजकूर
पुत्रादि प्रिय कोटिगुणे । ऐसी श्रुतीचीही वचनें । निर्धार असे ।।७६।।
मग बोले सिद्धान्ती । तुज (पुत्रादि प्रिय वाटती ।) - - - - - ।।७७।।



**अन्यायें राजा शिरच्छेद करी । म्हणे मज वांचवा निर्धारीं । कर्ण नासिक छेदिलें जरी । प्राण राहतां सुखी होय ।।७१।। कांही निंद्य कर्म केलें । तेणें लोक निंदू लागले । अपकीर्तीसी मन विटलें । प्राण दिधलें कितेकीं ।।७२।। आपुला प्राण जरी देती । परि निज सुखातें इच्छिती । द्वेष्य उपेक्ष्य दिसती । अहाच बुद्धि ।।७३।। सर्वांहून मन प्रिय । समाधिकालीं द्वेष्य होय । मिथ्यात्व दृष्टीं उपेक्षतां ये । ज्ञानोत्तर काळीं ।।७४।। सर्वत्रि असे व्यभिचार । आत्मा प्रियतम साचार । येर प्रियता अविचार । हें सत्य जाणावें।।७५।।हें ऐकून वादी म्हणे ।⊕पुत्रादि प्रिय वाटती । परिणामीं तुजला रडविती । हें सत्य जाणावें।।७७।। एक वचना बोलिलें । तें दोरीतीं विभागलें । शिष्याप्रति उपदेशिलें । आणि शापिलें वादिया।।७८।। वादियासी शाप कैसा । तुज पुत्रचि प्रिय ऐसा । आत्मा न कळे सहसा। तरी अंध तम न सोडी।।७९।। तेंचि वचन शिष्याप्रति । प्रिय पुत्रादि वाटती । परिणामीं**

---

होतो आणि वैद्याकडून पाय कापून घेतो याचा अर्थ डोळा प्रिय असल्यामुळे आपण तो वाचवला.(७०) अन्यायाने राजाने शिरच्छेद करण्याची आज्ञा केली. त्यावेळी तो मनुष्य म्हणतो, 'मला वाचवा' तेव्हा राजा त्याचे कान, नाक कापून त्याला सोडून देतो. तेव्हा कान, नाक कापून टाकले तरी आपले प्राण त्याने वाचवले, त्यामुळे तो सुखी झाला.(७१)एखादे निंद्य कर्म हातून घडले. त्यामुळे लोक निंदा करू लागले अशा अपकीर्तीला मन विटून जाते. मग कित्येक लोक प्राणत्याग करतात.(७२)तेथे आपला प्राण देऊनसुद्धा लोक काय मिळवतात? तर स्वत:चे सुखच जपतात. आपल्याला व्यवहारात जे द्वेष्य वाटते, उपेक्ष्य वाटते ते बुद्धीच ठरवत असते. ती बुद्धीच खोटी (अहाच) असते.(७३)मन सर्वांहून प्रिय असते. पण समाधीचा अनुभव घेताना तेच द्वेष्य वाटू लागते. ज्ञान प्राप्त झाल्यानंतर ज्ञानोत्तर काळी सर्वच मिथ्या वाटू लागते. त्यावेळी भोवतालच्या सर्वच गोष्टींविषयी उपेक्षा वाटू लागते.(७४) तेव्हा या सर्वांच्या बाबतीत प्रियत्वाच्या दृष्टीने व्यभिचार आढळतो. खरा प्रियतम आत्मा हाच आहे. इतर वस्तूंना प्रियत्व देणे हा अविचार आहे, हे खरे सत्य समजून घ्यावे. (७५) हे ऐकल्यावर वादी (आक्षेपक) म्हणतो की, 'पुत्रादी, कोटिएणांनी (कोटि पटीनी) प्रिय आहेत' अशा अर्थाची वेदाची वचने आहेत. त्यांचा (वेदांचा) तसा निर्णय आहे.(७६) मग सिद्धान्ती (मूळ सिद्धान्त मांडणारा) म्हणतो, "तुला पुत्रादी प्रिय वाटतात. पण शेवटी ते तुला रडवतील, हे खरे समजून घे."(७७) श्रुतीने असे एकच वाक्य म्हटले तरी त्याचे अर्थ दोन वेगवेगळ्या प्रकारचे आहेत. एका अर्थाने शिष्याला उपदेश केला आहे तर दुसऱ्या अर्थाने आक्षेपकाला शाप दिला आहे.(७८) वाद्याला शाप कसा तर श्रुतीचा अभिप्राय असा की, तुला पुत्रच प्रिय वाटणार. कारण तुला आत्मा कळतच नाही. त्यामुळे परिणामी 'अंधतम' नावाचा नरक तुझ्या नशिबातून सुटणार नाही. (अज्ञानामुळे तू अंधतम नरकाला जाशील)(७९) तेच वचन शिष्याला असे सांगते की,"तुला पुत्रादी प्रिय वाटतील पण परिणामी ते तुला दु:खच देतील.

**दुःख देती । म्हणोनि प्रीति सांडावी।।८०।।आत्मत्वीं उपजे प्रीति । सर्वविषईं विरक्ति। आत्मलाभें सायोज्यमुक्ति । तत्काळ होय।।८१।।आत्मरूप जाणितलें। तया जाणणें नाहीं उरलें। आत्मलाभे संतुष्ट जाले। दुसरा लाभ अन्य नसे।।८२।।आत्मत्वाचा लाभ जाला। हा प्रत्यय कोठे आला। म्हणसी तरी अवलोकिला। समाधिकाळीं।।८३।।सर्व दृश्यातें सांडिले। मिथ्या भासा ओलांडिलें। मग ज्ञप्तिरूप उरलें। आत्मस्वरूप।।८४।।तेथें जें सुख जालें। वाणीनें नवचे बोलिलें। तें मौनेंची अनुभविलें। अंतःकरणें।।८५।।येथें असे हो आक्षेप। अनुभविले जें स्वरूप। तें सविकल्प निर्विकल्प। अंगिकारावें।।८६।।सविकल्प जरी अनुभविलें। तरी काय सार्थक जालें। निर्विकल्प तें अनुभविलें। नवचे कदा।।८७।।ऐसा आक्षेपु जैं जाला। तो प्रश्नचि त्या अडवा केला। हा प्रश्न पाहिजे खंडिला। असदुत्तर म्हणोनियां।।८८।।सिद्धांती पुसे वादियासि। तुवां कल्पना केली ऐसी। ते सविकल्पासी कीं निर्विकल्पासी। जाली हे सांग।।८९।।निर्विकल्पा कल्पना जाली।तरि व्याघात होय येणें बोली। म्हणसी सविकल्पा वाटली। तरि दोष अवधारीं।।९०।।सविकल्पाचा विकल्प**

---

म्हणून तू त्यांच्यावरील प्रीतीचा त्याग कर.''(८०) ''आत्म्याच्या ठिकाणी प्रीती उत्पन्न झाली तर सर्व विषयांबद्दल विरक्ती निर्माण होईल आणि आत्मलाभाने तत्काळ सायुज्यमुक्तीची प्राप्ती होईल.''(८१) ज्याने आत्मरूप जाणून घेतले त्याला दुसरे काही जाणण्याजोगे उरतच नाही. जे आत्मलाभाने संतुष्ट होतात, त्यांना त्याहून श्रेष्ठ असा दुसरा लाभ राहातच नाही.(८२)आत्मलाभ झाला आहे असा अनुभव केव्हा येतो? असे विचारशील तर हा अनुभव समाधिकाळी प्रत्ययाला येतो.(८३) सर्व दृश्याचा त्याग केला, मिथ्या भासाला ओलांडले, की मग केवळ ज्ञानस्वरूप असे आत्मरूपच उरते.(८४)आत्मस्वरूपाची ओळख पटताच जे सुख होते, ते भाषेने सांगता येणार नाही. ते अंतःकरणाने मौनाच्या भाषेनेच अनुभवता येते.(८५)येथे आक्षेपक म्हणतो, 'माझा येथे आक्षेप आहे. ज्या स्वरूपाचा आपण अनुभव घेतो तो सविकल्प किंवा निर्विकल्प त्या दोहोंपैकीच एक काहीतरी असेल, हे तरी तुम्ही मान्य कराल.(८६)त्यापैकी सविकल्पाचा जर अनुभव घेतला तर त्याचा काही फायदा नाही आणि निर्विकल्पाचा अनुभव तर कधीच घेता येत नाही?(८७)असा आक्षेप समोर येताच सिद्धान्ती पक्षाने त्या आक्षेपाला प्रतिप्रश्न केला. कारण आक्षेपकाचा प्रश्न असत्य म्हणून त्याचे खंडन करणे आवश्यक होते.(८८)सिद्धान्त्याने वाद्याला (आक्षेपकाला) विचारले,''तू जी कल्पना केलीस ती सविकल्पाला झाली होती की, निर्विकल्पाला झाली होती? हे सांग.''(८९) तू म्हणशील की, 'ती कल्पना निर्विकल्पाच्या ठिकाणी निर्माण झाली' तर ते व्याघात ठरेल (वाणीची हानी ठरेल. कारण निर्विकल्प कधीही विकारत नाही. त्याच्या ठिकाणी कल्पना झाली हे म्हणणे व्यर्थ ठरेल.) आता ती कल्पना सविकल्पाला झाली असे म्हणशील तरी त्या पक्षीही दोष आहेच.(९०) सविकल्पाला विकल्प झाला

**जाला। हा चक्रिकापत्ती दोष आला। सविकल्पची विकल्पिला। तरी अनवस्था होय।।९१।।**
**ऐसे दोषयुक्त बोलणें। असदुत्तराचीं लक्षणें। वादी घाबरून म्हणे। सदुत्तर कोणतें।।९२।।**
**तरी अवधारीं मानसें। जलतरंगा भेद नसे। सविकल्प निर्विकल्प तैसें। ओळखावें।।९३।।**
**आत्मा नसे सविकल्प। ना नव्हे निर्विकल्प। जो जो करी संकल्प। तो तो पडे वेगळा।।९४।।**
**जों जों जाणूं जावें। तों तों कांहींचि नेणवे। न जाणतां तरी व्हावें। कासाविस।।९५।।**
**न जाणतां तेंचि आपण। या नांव बोलिजे ज्ञान। जाणिलें म्हणतां अज्ञान। सहजची जालें।।९६।।**
**जाणीवनेणिवेंविन। अनुभवें पावावी खूण। येथून हा संपूर्ण समास जाला।।९७।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । प्रत्यगात्मनिरूपणप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ - समास ४था - कूटस्थविवेवचन

**आतां कूटस्थ चिदाभास । एकचि भासति मनास । निरसतां अन्यान्योध्यास । परम पुरुषार्थ साधकां।।१।।निर्विकारत्वें वसे देहीं। प्रत्यगात्मा कूटस्थ तोही। आभासे परि सत्य नाहीं ।**

---

असे म्हणशील तर चक्रिकापत्तीचा दोष येईल. (याचा तो आणि त्याचा हा असे बोलणे. तू अगोदरच सविकल्पाची कल्पना केल्याने काही लाभ नाही असे म्हटले आहेस आणि आता तीच कल्पना पुढे मांडतो आहेस?)आणि सविकल्पाने विकल्पाचे रूप घेतले असे म्हणशील तर 'अनवस्था' दोष येतो. (मुळातच संकल्पाचाच विकल्प झाला असे म्हणणे म्हणजे अनवस्था म्हणजे बिनबुडाचे बोलणे ठरते.)(९१) तेव्हा तुझे बोलणे दोषयुक्त आहे. ते उत्तर कुतर्कपूर्ण आहे.' यावरून वादी घाबरून विचारतो की, 'मग योग्य उत्तर कोणते?'(९२)सिद्धान्ती सांगतो, 'तर लक्ष देऊन ऐक. पाणी आणि त्यावरील तरंग यात काही भेद नाही.सविकल्प-निर्विकल्प हा भेद त्याप्रमाणेच जाणावा.(९३) आत्मा सविकल्प नाही किंवा निर्विकल्पही नाही.जो संकल्प करतो तो आपोआपच वेगळा पडतो.(९४) जो जो जाणावयाचा प्रयत्न करावा तो तो काहीच कळेनासे होते. जाणायचा प्रयत्नच सोडून दिला तर कासावीस व्हायला होते.(९५)जाणण्याचा प्रयत्न न करता आपण तेच होणे याला ज्ञान म्हणतात. मला हे कळले असे म्हणताच सहजच आपल्या पदरी अज्ञान पडते.(९६)जाणीव नेणीव यांचे भान न ठेवता केवळ अनुभवानेच आत्मत्वाची प्राप्ती करावी.अशा प्रकारे या विचारापाशी हा समास संपूर्ण झाला.(९७)

### पंचिका ५वी, समास ४था - कूटस्थविवेचन

कूटस्थ आणि चिदाभास हे दोन्ही एकच आहेत असे मनास वाटते.परंतु दोहोंमधील अन्योन्याध्यास(याचे गुण त्याला आणि त्याचे गुण याला असा खोटा व्यवहार)जर काढून टाकता आला तर साधकाला श्रेष्ठ पुरुषार्थाचा लाभ होईल.(१)देहामध्ये निर्विकारपणे जो वास्तव्य करतो तोच प्रत्यगात्मा व तोच कूटस्थ

**तो चिदाभास।।२।।मिथ्या परि उपाधिवशें। सता सारिखाची दिसे । तोचि षड्विध विभागलासे। प्रकार ऐका।।३।।साक्षित्व जया आलें।ते ईशचैतन्य बोलिलें।अविद्याउपाधीनें जालें। जीवचैतन्य।।४।।अंतःकरणीं बिंबतां। आली प्रमाणचैतन्यता। जडा चेष्टवी प्रमाता। प्रमातृचैतन्य।।५।।जेणें विषयासी व्यापिलें।प्रमेयचैतन्य बोलिलें। प्रमाण प्रमेय दोन्हीं जाले। एकरूप।।६।।तें फळचैतन्य साहवें।उपाधीस्तव दिसावें।आदि अंती सातवें। शुद्धचैतन्य[३८]।।७।। देहा आंत बाहेरी । आभासचि प्रवर्ते व्यापारीं । भोक्ता भोग्य सामुग्री। त्रिपुटी सहित।।८।।जैसें तळें जळें भरलें। त्यासी छिद्रें करून पाट केले। पाणी खळखळा चालिलें। केदाराप्रति।।९।। त्रिकोण चतुष्कोण । वाफे केले भिन्नभिन्न। तैसें तैसें जीवन। परिणाम पावले।।१०।।तैसे हृदयभुवनीं। प्रमाणचैतन्य पाणी । इंद्रियद्वारा निघोनी । विषयावरी जाते।।११।।जैसा जैसा विषय । प्रमाणचैतन्य तैसें होय। प्रमाण प्रमेय उभय । फलचैतन्य तें।।१२।।असो ऐसे सप्तविध । भासलें परि द्विविध । आभास आणि शुद्ध । तेंचि ओळखावें ।।१३।।**

---

होय. ज्याचा नुसता आभास होतो, पण जो सत्य नाही त्यास चिदाभास असे म्हणतात.(२) तो वास्तविक पाहता मिथ्या आहे, पण उपाधींच्यामुळे तो सतासारखाच दिसतो. तो सहा प्रकारात विभागला गेला आहे. ते प्रकार ऐका.(३)ज्याच्याकडे केवळ साक्षित्व आले आहे त्यास ईशचैतन्य-१ असे म्हटले आहे. जो अविद्या उपाधीने ग्रस्त आहे त्यास जीवचैतन्य-२ म्हणतात.(४) अंत:करणात बिंबल्याबरोबर त्यास प्रमाणचैतन्य-३ म्हटले जाते. जडांना हालचाल करायला लावतो त्यास प्रमातृचैतन्य अथवा प्रमाता-४ म्हणतात.(५) विषयाला व्यापणारे ते प्रमेयचैतन्य (विषयचैतन्य-५) म्हटले जाते. प्रमाण (अंत:करण) आणि प्रमेय (विषय) जेव्हा एकरूप होतात,(६) तेव्हा त्यास फळचैतन्य-६ म्हणतात. अशी ही सहा चिदाभासांची (आभास चैतन्यांची) नावे. ही आभासचैतन्ये वर सांगितलेल्या उपाधींमुळे वेगळी वेगळी जाणवतात. या सर्व सहा प्रकारांच्या चिदाभासांच्या आदी व अंतीही असणारे ते शुद्धचैतन्य होय. वरील सहा आणि हे सातवे अशी ही सात चैतन्ये होत.(७) देहाच्या आत बाहेर सर्वत्र व्यापारास प्रवृत्त करणारा आभासच होय. भोक्ता, भोग्य, भोग ही त्रिपुटीसहित सामग्री म्हणजे आभासच होय.(८) पाण्याने भरलेल्या तळ्याला छिद्र पाडून पाट केले म्हणजे मग ते पाणी शेताकडे खळखळा वाहू लागते.(९) शेताचे त्रिकोणी, चौकोनी आकाराचे भिन्न भिन्न वाफे केले तर त्यानुसार त्या पाण्यालाही भिन्न भिन्न आकार प्राप्त होतात.(१०) त्याप्रमाणे हृदयाच्या भुवनात अंत:करणचैतन्य (प्रमाणचैतन्य) हे पाण्यासारखे असून ते इंद्रियांच्या मार्गांनी निघून विषयांपर्यंत जाते.(११) जसाजसा विषय असेल तसतसे प्रमाणचैतन्य बदलते प्रमाण आणि प्रमेय यांच्या संयोगातून फलचैतन्य बनते.(१२) असो. चैतन्य अशा रीतीने सात प्रकारचे भासले तरी त्याचे मुख्यत्वे करून दोनच प्रकार आहेत. आभासचैतन्य अथवा चिदाभास आणि शुद्धचैतन्य असे ते ओळखावेत.(१३)

**आकाशींचा सूर्य। तेणे भिंती प्रकाशमय। तेवि कूटस्थ देह समुदाय। सामान्य प्रकाशी।।१४।। सूर्य दर्पणी प्रतिबिंबिला। प्रकाश सामान्यावरी पडिला। वर्तुळत्वें दिसूं लागला। भिंतीवरी विशेष।।१५।।तैसे बुद्धींत प्रतिबिंबिले। तेणें विषय स्फुरूं लागले। विशेषत्वें विभागलें। अंतर्बाह्य।।१६।।दर्पणस्थ जो प्रकाश। आच्छादिलें सामान्यास। विशेष भासे चिदाभास। मुख्य प्रकाश आच्छादिला[३१]।।१७।।सूर्य नसतां आकाशीं। प्रतिबिंब कैसें प्रकाशी। कूटस्थेवीण जीवासी। चेतनत्व नाहीं ।।१८।।अरिसे जरि काढिले। प्रकाशासहित प्रतिबिंब लोपलें। विषयासहित लया गेलें। बुद्धीवीण प्रतिभास।।१९।।सूर्यें जितुकें प्रकाशिलें। दर्पण जातांही संचलें । बुद्धि नसतां कोंदाटलें। सामान्य ज्ञान।।२०।। जो जो विषय स्फुरे। घटपटादिआकारें। तेथें चैतन्य आविष्करे। विशेष सामान्य दोन्ही।।२१।। एकदाचि विषय प्रकाशी। अमुकें न कळे मनासी। ओळखावें सामान्यासी । कूटस्थाचे।।२२।। हा घटपट ओळखण । विशेषत्वें होय ज्ञान। तें जाणावें लक्षण । आभासाचें ।।२३।।ज्ञान होतांचि लया गेलें। पुढें सामान्यचि**

---

आकाशातील सूर्यामुळे सर्व भिंती प्रकाशमान होतात.त्याप्रमाणे कूटस्थ (प्रत्यगात्मा,देहाला व्यापून असलेला आत्मा) हा देह समुदायाला निर्विकारत्वे (सामान्यत्वे) प्रकाशित करतो. हा सामान्य प्रकाश होय.(१४) सूर्याचे आरशात प्रतिबिंब पडते. त्याचा कवडसा सामान्यत्वाने प्रकाशित झालेल्या भिंतीवर पडतो आणि भिंतीवर तो वर्तुळाकाराने विशेष रूपात दिसू लागतो. हा विशेष प्रकाश होय.(१५)त्याप्रमाणे कूटस्थाचे बुद्धीत प्रतिबिंबि पडते. त्यामुळे निरनिराळ्या विषयांचे विशेष रूपात ज्ञान होऊ लागते.अशा प्रकारे त्या विषयांची अंतर्बाह्य विभागणी होऊ लागते.(म्हणजे ते विषय भिन्न भिन्न रूपात जाणवू लागतात.)(१६) दर्पणातील कवडशाने सामान्य प्रकाशाला आच्छादून टाकले जाते,त्याप्रमाणे चिदाभास हा विशेष प्रकाश असून त्यायोगे मुख्य सामान्य प्रकाश आच्छादिला जातो.(१७)आकाशात सूर्य नसेल तेव्हा त्याच्या प्रतिबिंबाचा कवडसा कसा पडणार व तो विशेष प्रकाश कसा देणार?त्याचप्रमाणे कूटस्थ नसेल तर जीवाच्या ठिकाणी चैतन्य असणार नाही.(१८)आरसे काढून टाकले तर त्यांच्या कवडशांच्या प्रकाशासह सूर्याचे प्रतिबिंबही लोप पावते. तसे बुद्धी नसेल तर तिच्या अभावी भास विषयांसह लयाला जातात.(१९)पण सूर्याने जेवढे म्हणून प्रकाशित केले होते ते सर्व आरसे काढून टाकल्यानंतरही तसेच कायम राहते. त्याप्रमाणे बुद्धी नसतानादेखील सामान्य ज्ञान सर्वत्र भरून राहिलेले असते.(२०)घट,पट इत्यादींच्या रूपाने जो जो विषय स्फुरतो तेथे तेथे चैतन्याचा विशेष आणि सामान्य या दोन्ही रूपात आविष्कार होतो.(२१)विषय एकदाच प्रकाशित झाल्यानंतर मनाला तो अमुक आहे अशी ओळख पटत नाही. त्यावेळी तो कूटस्थाचा सामान्य प्रकाश म्हणून ओळखावा.(२२)पण हा घट, हा पट अशी जेव्हा ओळख पटते तेव्हा विशेष रूपाने त्याचे ज्ञान होते.ते ज्ञान म्हणजे चिदाभासाचे लक्षण समजावे.(२३)हे विशेष ज्ञान झाल्याबरोबर लयाला जाते. त्यानंतर सामान्य ज्ञानच उरते. या विशेष ज्ञान आणि विशेष

**उरलें । अज्ञान ज्ञाना व्यापलें । मुख्य चैतन्य ।।२४।। प्रकाश एक आदि अंतीं । मध्यें आभासाची दीप्ति। प्रकाशून लया जाती । खद्योतापरी।।२५।। विशेषत्व दिसुनि आलें । परि सामान्य नाहीं कळलें । अनेक दर्पणीचे वेगळाले । प्रकाश भासती भिंती ।।२६।।मध्ये संधि दिसती । प्रतिबिंबाची नसे दीप्ति। तया प्रकाशाची स्थिति । मुख्य सूर्याची ।।२७।। घट नव्हता जाणिला । पुढें पाहतां ओळखिला। त्याचि क्षणीं लय जाला । आभासाचा।।२८।। सांडून भासाची अवधी । मागें पुढें जे संधी । तो प्रकाश अनादि। कूटस्थाचा ।।२९।। सांडून आकार घटाचा । पट देखे दृष्टी साचा । तोहि टाकून काष्ठाचा आकार पाहे।।३०।। घट तरी सांडितां । पट नाहीं ओळखिला । मध्यें जो प्रतीति आला । कूटस्थप्रकाश।।३१।। तैसाचि पटहि सांडिता । काष्ठाकार न होतां । संधिप्रकाश आईता। अनुभवा येतो।।३२।। बाह्य विषयाचे परी । प्रवर्तती अंतरीं । तें ओळखावें निर्धारीं। सामान्य विशेष ।।३३।। निश्चळ जैसें आकाश । होय वायूचा भास । तेवि चंचळपणें उमस । कल्पनेचा दिसे।।३४।। मन बुद्धि आणि चित्त । अहंकारासमवेत । व्यापारून चहूंत । त्याक्षणीं हरपे ।।३५।। जैसी का विद्युल्लता । प्रकाशून चौ भूतां । वेळ नाहीं लया जातां । चंचळपणें ।।३६।।**

---

न ओळखल्यामुळे उरणारे अज्ञान(सामान्य ज्ञान)या दोहोंना मुख्य चैतन्यच व्यापून टाकते.(२४) आदी-अंती एकच प्रकाश असून स्फुरणकाळी मात्र आभासाचे तेज असते.ते काजव्याप्रमाणे काही काळ चमकून लयाला जाते.(२५)विशेषत्व दिसून येते पण सामान्य मात्र कळत नाही.अनेक आरशांचे प्रकाश (कवडसे)भिंतीवर चटकन दिसतात.(२६)दोन कवडशांच्या मध्ये संधी दिसतात.पण त्या संधींमध्ये (सांध्यांमध्ये)प्रतिबिंबाचे तेज नसते.पण त्या संधीमधील प्रकाश मात्र मुख्य सूर्याचा प्रकाश असतो.(२७)अगोदर घट ओळखलेला नसतो.पुढे बारकाईने पाहिल्यानंतर तो ओळखू येतो.त्याच क्षणी आभासाचा लय होतो.(२८)आभासाचा प्रांत सोडून त्याच्या मागेपुढे जो संधीचा भाग असतो तेथे जो प्रकाश असतो तो अनादी कूटस्थाचा प्रकाश असतो.(२९)घट पाहात असताना घटाची आकृती सोडून आपण दृष्टीने पट पाहू लागतो.नंतर तोही आकार टाकून आपण काष्ठाचा आकार पाहू लागतो.(३०)अशा या दृश्यमालिकेत घट पाहाण्याचे थांबवले आहे आणि अजून पटाची ओळख पटलेली नाही.अशा मधल्या काळात ज्याचा अनुभव येतो तो कूटस्थप्रकाश होय.(३१)त्याचप्रमाणे पट पाहण्याचे थांबवले आहे,पण अजून वृत्ती काष्ठाकार झालेली नाही,अशा मधल्या काळात संधिप्रकाश आपोआप अनुभवास येतो.तो कूटस्थप्रकाश होय.(३२)बाह्य विषयांप्रमाणेच अंत:करणातही सामान्य विषय संचार करतात.ते निर्धारपूर्वक ओळखावेत.(३३) निश्चळ आकाशात ज्याप्रमाणे वायूचा भास होतो,त्याप्रमाणे अंत:करणात कल्पनेचा तिच्या चंचलपणामुळे प्रादुर्भाव जाणवतो.(३४)मन,बुद्धी,चित आणि अहंकार या चारीतही ती व्यापार करून लगेच लोप पावते.(३५)वीज ज्याप्रमाणे चार भूतांना प्रकाशित करून चंचलत्वामुळे त्याक्षणीच लोप पावते.(३६)

**तैसा चतुर्था व्यापार । करून निमे साचार । पुढें दुसरा उद्गार । तैसाचि उठे निमे ।।३७।। वृत्ति अखंड असती । कारंज्यापरी वाहती । तरी उठोन लया जाती । तेंचि कैसें ।।३८।। पाणी वाहे कारंज्याचें । तेथेंहि अखंडत्व कैचें । उडतांचि पडे साचें । पुढें दुसरें येतें।।३९।। अखंड उगेंचि दिसलें । परि एक आलें एक गेलें । तैसेचि वृत्तीचे मासले । बरे पाहा।।४०।। तरंगी जळ व्यापलें । वृत्तींत चैतन्य कोंदाटलें । तेंचि दो रीतीं विभागलें । सामान्य विशेष।।४१।। विशेषत्व उमटें । सामान्याचेनि नेटें । विशेष तेव्हांचि वोहटे । सामान्य सदोदित।।४२।। परी सामान्य आच्छादिलें । विशेषत्व दिसूं लागलें । संधीसी जरी अनुभविलें । सामान्य कळे ।।४३।। एक कल्पना उठोन गेली । दुसरी नाहीं उमटलीं । ते संधि जरी साधिली । सूक्ष्मदृष्टी ।।४४।। तो प्रकाश आत्म्याचा । हाचि निष्कर्ष समाधीचा। मग अवसर कल्पनेच । मंद मंद चाले।।४५।।विरल होतां कल्पना । संधि येती अनुमाना। जों जों मुरे कल्पना । तों तों सामान्य दुणावे ।।४६।। विशेषत्व जरी गेलें। सामान्यची कोंदाटलें । तरी संपूर्ण योगाचें जालें । साफल्य चरम।।४७।।अथवा अपरोक्ष अनुभविल। विशेषत्वीं तेंचि देखिलें। मग उद्भवे अथवा निमालें । तेणेंसि काज नाहीं।।४८।।**

---

त्याप्रमाणे चारी अंत:करणवृत्तीत व्यापार करून ती कल्पना त्याचप्रकारे लगेच मावळते.त्यानंतर दुसरी कल्पना उगम पावते व त्याच पद्धतीने मावळते.(३७)यावर अशी शंका उपस्थित होते की,वृत्ती तर अखंड असून कारंज्याप्रमाणे सतत वाहत असतात,तर मग त्या उत्पन्न होतात व मावळतात हे म्हणणे कितपत बरोबर आहे?(३८)कारंज्याचे पाणी वाहत असते.तेथेही ते अखंड कुठे आहे?ते वर उसळते व लगेच खाली पडते.त्या जागी लगेच दुसरे पाणी येते.(३९)ते अखंड आहे असे उगीचच भासते.वास्तविक पाहता एक पाणी येते त्यावेळी दुसरे जात असते.त्याचप्रमाणे वृत्तींचा मासला(वृत्तींचे उदाहरण)आहे,हे ओळखा.(४०)तरंगांमध्ये ज्याप्रमाणे पाणी व्यापून असते त्याप्रमाणे वृत्तींमध्ये चैतन्य दाटून भरलेले असते.ते चैतन्य सामान्य व विशेष अशा प्रकारात विभागले जाते.(४१)सामान्याच्या आधारावर विशेषत्व प्रकट होते.विशेषचैतन्य लागलीच ओसरून नाहीसे होते.सामान्यचैतन्य मात्र नित्य प्रकाशमान असते.(४२)पण सामान्य आच्छादिले जाताच विशेषत्व दिसू लागते.दोन विशेषांच्या संधीचा अनुभव घेतला तर सामान्य कळेल.(४३)एक कल्पना नाहीशी झाली व दुसरी उत्पन्न झाली नाही,तो संधिकाल सूक्ष्मदृष्टीने पहायला मिळाला,(४४)तर तोच आत्म्याचा प्रकाश होय.समाधीचा तोच निष्कर्ष (निष्कर्ष-साध्य)होय.मग हळूहळू कल्पना ओसरू लागते.(४५)कल्पना विरल होत असताना संधीचाअनुभव येऊ लागतो.जो जो कल्पना विरत जाते तो तो सामान्य दुणावू लागते.(४६)विशेषत्व नि:शेषपणे गेले तर सामान्य सर्वत्र कोंदाटलेले असतेच,ती अवस्था म्हणजे संपूर्ण योगाचे अंतिम साफल्यच होय.(४७)अथवा प्रत्यक्षपणे त्या सामान्याचा अगोदर अनुभव घेतला आणि विशेष चैतन्याच्या अनुभवातही त्याच सामान्यचैतन्याचा अनुभव घेतला

**पाणियासी ओळखितां। तरंगाची काय चिंता। उद्भव आणि लय होतां । हानी ना लाभ।।४९।। आभास कूटस्थ निवडिले। जैसे करतळी आंवळे। हें सर्वांसि कां न कळे। आक्षेपु ऐसा।।५०।। न कळे आपुलें सामान्यत्व। बळावलें विशेषत्व। हें अज्ञानाचें महत्त्व । भोक्तृत्व जीवासी।।५१।। कूटस्थाचें स्वरूपलक्षण। सच्चिदानंद परिपूर्ण । असज्जड दुःखकारण । चिदाभास हा।।५२।। असंगत्व पूर्णत्व टाकिलें । सत्यत्व तितुकें घेतलें। जडत्व दुःख अवलंबिलें । मी मी जालें स्फुरण।।५३।।शुक्तिकाशकल पाहे पुढें । त्रिकोण नीलपृष्ठत्व उडे । हे हे चमकितें रोकडें । रजत भावी।।५४।।पाहतां रजताचा अभाव। शुक्तिकेसी रजत नांव । तैसा आभासाचा अभाव । सत्यवस्तूवरी।।५५।।कूटस्थ नाहीं न दिसे म्हणे । नसून सत्य मी मिरवणें । सुखी दुःखी होणें जाणें । मजला आहे।।५६।।अन्योन्याध्यास ऐसा । मिथ्याच भाविला अपैसा। तया अज्ञानाचे निरासा। ज्ञान पाहिजे।।५७।।कळतां त्रिकोण पृष्ठ निळी।**

---

तर विशेषत्व निर्माण झाले काय अथवा निमाले काय त्याच्याशी साधकाचे काही काम राहात नाही.(४८) एकदा मुख्य पाण्याची ओळख पटली की, मग त्यावरील तरंगाची चिंता करण्याचे कारणच काय? ते तरंग निर्माण झाले अथवा लय पावले तरी त्याला (साधकाला) ना हानी ना लाभ!(४९) यावर आक्षेप असा येतो की, चिदाभास किंवा भासचैतन्य आणि कूटस्थ यांच्यातील भेद अगदी तळहातावरील आवळ्याप्रमाणे स्पष्ट करून सांगितला तरी तो सर्वांच्याच लक्षात का येत नाही?(५०) आपले सामान्यत्व कळत नाही आणि विशेषत्व मात्र बळावते, हे अज्ञानाचे सामर्थ्य आहे. त्यामुळेच जीवाला भोक्तृत्व येते.(५१) सत्, चित्, आनंद आणि परिपूर्ण हे कूटस्थाचे स्वरूप लक्षण आहे आणि याच्या अगदी उलट म्हणजे असत्, जड, दुःखाचे कारण असा चिदाभास आहे.(५२) तर कूटस्थाच्या असंगत्व आणि पूर्णत्वाचा त्याग करून फक्त सत्यत्व घेतले आणि चिदाभासाच्या जडत्व आणि दुःखाचा स्वीकार केला म्हणजे मी मी असे स्फुरण होते.(५३) शिंपला पाहिल्यावर त्रिकोणाकृती, निळा पृष्ठभाग हे गुण लयाला जाऊन हे जे चमकत आहे ते चांदीच आहे अशी कल्पना होते, तसाच हा प्रकार आहे.(५४) तसे पाहिले तर तेथे चांदीचा अभाव असतो आणि शिंपल्यालाच चांदी असे नाव दिलेले असते. त्याप्रमाणे सत्य वस्तू जी कूटस्थ अथवा परब्रह्म त्यावर आभासाचा म्हणजेच चिदाभासाचा अभावच असतो.(५५) कूटस्थ दिसत नाही त्याअर्थी तो नाहीच असे तो म्हणतो आणि म्हणून 'मी' असत्य असूनही त्याला सत्य मानून तो मिरवतो. त्यामुळे सुखी होणे अथवा दुःखी होणे हे या 'मी'चेच भोग त्याला भोगावे लागतात.(५६) अशा प्रकारे मूळ वस्तूच्या लक्षणांचा आरोप असत् अशा चिदाभासावर आणि असत् वस्तूच्या लक्षणांचा आरोप सत् अशा मूळ वस्तूवर केला जातो. यालाच अन्योन्याध्यास असे म्हणतात. तो स्वभावतःच खोटा आहे, अज्ञानजन्य आहे. त्या अज्ञानाचा निरास करण्यासाठी ज्ञानाचीच गरज आहे.(५७) समोरचा पदार्थ त्रिकोणाकृती असून त्याचा पृष्ठभाग निळा

**तेव्हां रजताची उडे भुली । सतादि लक्षणें आपुलीं। कळतां जीवत्व उडे।।५८।।मी आहें हें वाटतें। अज्ञानें धरिलें जडातें। जड सांडून मी मी कोण तें।सत्व धुंडावें ।।५९।। मी मी पाहत मुळास गेला। मुळीं न देखे मीपणाला। मग स्वतां आपणचि उरला। मीपणेंविण।।६०।। स्वयें असंग सद्रूप । चिदानंद अमुप । मी मी हे असद्रूप । जड दुःख गेलें ।।६१।। स्वयें आत्मा आपण । मी मी असत् अवलक्षण। एवं स्वकीयत्व अहंपण । आत्मा आणि आभास।।६२।।स्वयं अहं शब्द दोनी । एकार्थता यालागुनी । म्हणसी तरी भिन्नपणीं। सामान्य विशेष होती ।।६३।तूं मी हा हे शब्द तीन। तिहींसि वर्ते सामान्य । एकदेशी जे लक्षण। तें तें विशेष ।।६४।।मी मी हे सर्व शब्दासी। न प्रवर्ते एकदेशी । म्हणोनि मी मी या शब्दासी। विशेषत्व आलें ।।६५।।तैसा स्वयं शब्द नाहीं । प्रवर्ते शब्दीं तिहीं । म्हणोनि सामान्यत्व पाहीं । स्वतां यासी।।६६।।हा स्वतां जात आहे । तूं स्वतां तया पाहे । मी स्वयें**

---

आहे असे कळताच त्यावर चांदीचा भ्रम झाला होता तो नाहीसा होतो आणि आपल्या ठिकाणी मुळात असलेली सत्, चित्, आनंद, परिपूर्ण ही लक्षणे कळून येताच मीपणाने वेगळे पडलेले जीवत्व उडून जाते. (जीवत्वाची भ्रान्ती नष्ट होते.)(५८) 'मी आहे' असे वाटते. त्यामुळे अज्ञानामुळे जडत्वासच कवटाळले जाते. त्या जडाचा त्याग करून त्यातील मीरूप सत्त्व शोधून काढावे. (मी कोण हे सत्य शोधून काढावे.)(५९) 'मी'चा शोध करत अगदी अगदी मुळाशी जाऊन पोहोचला तरी 'मी' त्याच्या दृष्टीस पडत नाही. शेवटी 'मी'पणा विरहित 'आपण'च (आत्माच) उरतो.(६०) स्वतः आत्मा असंग, सद्रूप, चिदानंद व अमूप (अपरिमेय, मोजता न येण्यासारखा) आहे आणि 'मी मी' असे ज्याच्याबद्दल वाटते ते सगळे असत्, जड, दुःखरूप आहे, ते सर्व त्या ज्ञानासरशी नाहीसे होते.(६१) स्वतः आपणच आत्मा आहोत, 'मी मी' हे असत् आणि अवलक्षणी (दोषरूप) आहे. अशा प्रकारे आत्मा हा स्वतःच असून आणि अहंकार हा चिदाभास आहे.(६२) यावर आक्षेपक असा आक्षेप घेतो की, स्वयं आणि अहम् हे दोन्ही शब्द एकाच अर्थाचे आहेत. मग असा भेद का करता? परंतु सामान्य चैतन्य आणि विशेष चैतन्य असा भेद वरील दोन्हींच्या भेदातून स्पष्ट होतो. (म्हणजे 'अहम्' हा विशेष भेद असून आत्मत्व हा सामान्य प्रकार आहे.)(६३) तू, मी, हा हे तीन वेगवेगळे शब्द असून 'सामान्य' प्रकाश या तिहींना व्यापून असतो. जे लक्षण एकाच भागापुरते मर्यादित असते ते ते विशेष प्रकाश या स्वरूपाचे असते.(६४) 'मी मी' हा शब्द वरील सर्व शब्दांना लागू होत नाही. त्यामुळे तो एकदेशी म्हणजे मर्यादित आहे. म्हणून 'मी मी' या शब्दांना विशेषत्व आले आहे.(६५)तसे 'स्वयं' शब्दाचे नाही. तो वरील तिन्ही शब्दांना लागू होतो. म्हणून 'स्वयं' अथवा 'स्वतः' या शब्दांना सामान्यत्व येते.(६६) उदाहरणार्थ, हा स्वतः जातो आहे, तू स्थः त्याला पहा, मी स्वतः समर्थ नाही. अशा प्रकारे 'स्वयं अथवा स्वतः' हे शब्द वरील तिन्ही शब्दांबरोबर सामान्यत्वाने वापरता येतात. (स्वयं शब्द हा

**शक्त नव्हे। तिहींसी सामान्य ।।६७।। सांडूनियां अहंपण। स्वयें आत्मा हें आपण। ज्ञानें निवतें अज्ञान। स्वयें चिद्‌घन निजांग[४०] ।।६८।।श्रोता म्हणे हो ऐका। मज आठवली आशंका। सकार्य अज्ञान एका। अधिष्ठानीं असे।।६९।।आभास कार्य अज्ञानाचें। कूटस्थ अधिष्ठान त्याचें। तरी अज्ञानत्व कूटस्थाचें। कीं जीवाचें सांगा।।७०।।वक्ता म्हणे जी भलें भलें। प्रसंगानुसार आक्षेपिलें। याचें समाधान अवधारिलें। पाहिजे तुम्ही।।७१।।कूटस्थ अज्ञानआश्रय। परि जीवासि आच्छादक होय।हें दृष्टांतें समजे काय। बहु बोलोनी।।७२।।सूर्यकिरणाचे मेघ होती।वाटे सूर्यासी आच्छादिती।सूर्या आवरक तरी दिसती।मेघ काशानें।।७३।।नव्हे सूर्यआच्छादक। त्याचे अंश नेत्रगोलक। तया होतीं आवरक। मेघ हे पाहा।।७४।।अधिष्ठान ब्रह्म कूटस्थ। अज्ञान तेथें मृषा भासत । तदंश जीवा आवरित । जे कूटस्थ न कळे।।७५।। आणिक एक उपपत्ति। जे अनुभव आणि युक्ति। जेणें संदेहनिवृत्ति। तत्काळ होय।।७६।। असंभाव्य समुद्र भरला। मध्यें भोंवरा उद्भवला। तेणें समुद्र आच्छादिला। हें तो न घडे।।७७।। निजरूपीं जालें स्फुरण।निवर्तापरि एकदेशी जाण।तेथेंचि असती ज्ञानाज्ञान। जाउळे जैसे।।७८।।**

---

तिन्ही पुरुषांबरोबर वापरतात,तर 'अहम्'हा शब्द फक्त प्रथम पुरुषांतच वापरला जातो.म्हणून 'अहम्'शब्द विशेष अथवा मर्यादित स्वरूपाचा असून'स्वयम्'शब्द सामान्य अथवा व्यापक स्वरूपाचा आहे.(६७) अहंपणाचा त्याग करून स्वत: आपणच आत्मा आहोत या ज्ञानाने अज्ञानाचा निरास झाल्यावर स्वत: चैतन्यघन आत्मस्वरूप उरते.(६८)यावर श्रोता आशंका उपस्थित करतो."अज्ञानाचे आभास हे कार्य आहे.कूटस्थ हे त्याचे अधिष्ठान आहे.(म्हणजे कार्यासहित अज्ञान एका अधिष्ठानावर राहते.)(६९) आभास हे अज्ञानाचे कार्य आहे.त्या आभासाचे कूटस्थ हे अधिष्ठान आहे तर मग अज्ञान कूटस्थाचे की जीवाचे ते सांगा."(७०)यावर वक्ता म्हणतो,"वा!छान!तुम्ही प्रसंगानुरूप आक्षेप घेतलात.आता त्याचे समाधान करतो.नीट लक्षपूर्वक ऐका."(७१)कूटस्थ अज्ञानाचा आश्रय असला तरी जीवाचा आच्छादक आहे.अधिक काही न बोलता हेच दृष्टान्ताने समजावून सांगतो.(७२)सूर्यकिरणांमुळे मेघ निर्माण होतात. ते सूर्याला आच्छादितात असे वाटते.मेघ सूर्याला झाकून टाकतात असे दिसते,असे कशाने होते?(७३)मेघ हे खरे सूर्याचे आवरक नसतातच.सूर्याचे अंश असलेले जे नेत्रगोलक त्यांना मेघ आच्छादितात.त्यामुळे सूर्य आच्छादल्यासारखा दिसतो.(७४)कूटस्थ ब्रह्म अधिष्ठान आहे.तेथे खोटे असे(मुळात खोटे असलेले)अज्ञान असल्याचे भासते.त्या अज्ञानाचा अंश जीवाला आच्छादून टाकतो.त्यामुळे कूटस्थ कळत नाही.(७५)आणखी एक दुसरा दृष्टान्त सांगतो.तो अनुभव व युक्ती यांना पटणारा आहे. त्याने संशयाचे निरसन ताबडतोब होईल.(७६)अथांग असा समुद्र भरला आहे त्यात मध्येच भोवरा निर्माण झाला तर त्याने समुद्र आच्छादिला जाणे शक्य नाही.(७७)तसे स्वरूपामध्ये स्फुरण निर्माण होते ते त्या त्या भोवऱ्याप्रमाणे एकदेशी असते.त्या ठिकाणी ज्ञान-अज्ञान हे जुळ्या भावंडांप्रमाणे असतात.(७८)

**ज्ञानाज्ञाना तरी विरोध। एक स्थळीं कैसा संबंध। म्हणसी तरी सावध। एक समई दोन्हीं।।७९।।**
**घटाचें ज्ञान होतां । पटीं होय अज्ञानता । अथवा पटही जाणतां । अज्ञान घटाचें ।।८०।।**
**दोन्ही एकत्र राहतीं । कार्यानुरूप होती जाती । असो ज्ञानाज्ञाना वस्ती । एका स्फुरणा।।८१।।**
**त्या स्फुरणीं चैतन्य बिंबलें। चिदाभास त्या नांव आलें। तेथेंचि दोन्ही प्रगटलें। ज्ञानाज्ञान।।८२।।**
**होता कूटस्थाचें अज्ञान। मी जीव मज बंधन। होतां कूटस्थ परी ज्ञान। अज्ञानबंधन निरसे।।८३।।**
**विशेषत्व हें अज्ञान। निरसे सामान्य होतां ज्ञान। वेद शास्त्र गुरु प्रमाण । इतुक्या हेतू।।८४।।**
**हाचि परम पुरुषार्थ। हेंचि ज्ञान हाचि स्वार्थ। न जाणतां तें जिणे व्यर्थ। पशुप्राय नराचें।।८५।।**
इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । कूटस्थविवेचनप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।

## ।।श्रीराम समर्थ - समास ५वा - सप्तावस्थावर्णन

**आत्मा अपरोक्ष जाणितला । हा आपणसा कळला। न वचे इच्छा काम कोणाला । शरीरतापही नाहीं।।१।।जयासी होय ज्ञान। तोचि अधिकारी कोण । कूटस्थ कीं आभासलक्षण। कीं उभयात्मक ।।२।। कूटस्थ तरी असंग। तया न घडे ज्ञानयोग। आभास तो मिथ्याचि**

---

ज्ञान-अज्ञान यांच्यामध्ये विरोध आहे.मग ती एके ठिकाणी कशी राहतात असे म्हणशील तर सावधहोऊन ऐक.एकाच ठिकाणी,एकाच काळी दोन्ही परस्परविरोधी गोष्टी राहू शकतात.(७९)घटाचे ज्ञान होताच पटाचे अज्ञान होते अथवा पटाचे ज्ञान झाले की त्याच वेळी घटाचे अज्ञान निर्माण होत असते.(८०)दोन्ही विरोधी गोष्टी एकाच वेळी राहतात.कार्य जसे असेल त्याप्रमाणे त्या निर्माण होतात, नाहीशा होतात.तात्पर्य हे की,ज्ञान-अज्ञान या दोघांचे एकाच स्फुरणामध्ये वास्तव्य असते.(८१) त्या स्फुरणामध्ये चैतन्याचे जे प्रतिबिंब पडते,त्याला चिदाभास असे नाव प्राप्त झाले. त्याच ठिकाणी ज्ञान-अज्ञान दोन्ही प्रकट होतात.(८२) कूटस्थाचे अज्ञान होताच मी जीव आहे,मला बंधन आहे असे वाटू लागते. पण कूटस्थाचे ज्ञान झाल्याबरोबर मात्र अज्ञानामुळे आलेले बंधनही सुटते.(८३) विशेषत्व म्हणजेच अज्ञान होय आणि सामान्य म्हणजे ज्ञान होय. ते ज्ञान होताच विशेषत्वाचा परिहार होतो. हे वेदप्रतीती,शास्त्रप्रतीती,गुरुप्रतीती इत्यादी प्रमाणांनी सिद्ध आहे.(८४) हे जाणणे हाच खरा श्रेष्ठ पुरुषार्थ होय. हेच खरे ज्ञान आणि हाच खरा स्वार्थ होय.हे ज्ञान न जाणणे म्हणजे माणसाचे जिणे पशुप्राय व्यर्थ ठरेल.(८५)

### पंचिका ५वी, समास ५वा - सप्तावस्थावर्णन

आत्म्याचे प्रत्यक्ष ज्ञान झाले. आत्मा म्हणजे आपणच हेही कळले. तो इच्छा, काम इत्यादींपासून अलिप्त आहे. त्याला शरीराचाही ताप नाही.(१)मग ज्याला ज्ञान होते तो अधिकारी कोण? कूटस्थ की चिदाभास जीव? की दोघेही?(२)कूटस्थ तर निःसंग असतो म्हणून त्याला ज्ञान होते असे म्हणता येत

**मग । ज्ञान तरी कैंचें।।३।।कूटस्थ सत्यत्व घेऊन । मी मी मिरवे म्हणऊन । उभयात्मका विशेषण । अधिकाराचें।।४।।हा जागृतीतें जाणे । स्वप्नानुभवी सर्वज्ञपणें । सुषुप्ति ओळखिली जेणें । तो हा आत्मा।।५।।मन जयावरी खेळे । परि मनासी न कळे । बुद्धीतें निश्चयाचे सोहळे । जयाचेनि।।६।।तो हा आत्मा आपण । आहे ऐसी बाणे खूण। आत्म शास्त्र गुरु प्रमाण । त्रिविधा प्रतीति।।७।।हा मी अपरोक्ष ज्ञान । हें कूटस्था नसे जाण। असंगासी अहंपण । बोलोंचि नये।।८।।आभासें कूटस्थ जाणतां । तत्क्षणीं हरपें तत्त्वतां। तरि मी आत्मा हे वार्ता। कैसी संभवे।।९।।तरी त्रिविध अहंकार । एक तो मुख्य साचार। दोन अमुख्य निर्धार । ओळखावे हे।।१०।।असंग सत्य कूटस्थ न कळे । मिथ्या आभास हें न निवळे । उगाचि मी मी हे खवळे । हा अभिमान मुख्य।।११।।हाचि बंधासी कारण। येणें पावे जन्ममरण । येर अमुख्य जे दोन । तेचि कैसें।।१२।।मी असंग ज्ञानघन। आत्मा कूटस्थ परिपूर्ण। मिथ्या आभास मृगजळीं मीन। विवेचनें कळलें।।१३।। ज्ञानोत्तरीं मी मी स्फुरतें। परि तें मी नव्हेसें वाटतें। स्वानुभवें निवडिलें त्यातें । पुन्हा एक होउं नेदी।।१४।।**

---

नाही आणि चिदाभास तर मिथ्याच आहे. मग तेथे ज्ञान कसे शक्य आहे?(३) कूटस्थाचे सत्यत्व घेऊन चिदाभास 'मी मी' म्हणवून घेऊन मिरवतो म्हणून अधिकाराचे विशेषण उभयात्मक म्हणजे दोघांनाही लागू पडणारे आहे.(कूटस्थ आणि चिदाभास या दोघांनाही अधिकार आहे.)(४)कूटस्थ जागृतीला जाणतो,तो सर्वज्ञ असल्यामुळे स्वप्नाचाही त्याला अनुभव येतो.सुषुप्तीही त्याच्या ओळखीची आहे असा हा आत्मा आहे.(५)त्याच्यावर मन खेळते (म्हणजे त्याच्या अधिष्ठानावर मनाचे अस्तित्व आहे.)पण मनाला तो कळत नाही.बुद्धी त्याच्याच आधाराने निश्चयाचे सोहळे करते.(६)तो हा आत्मा आपणच आहोत ही खूण आत्मप्रतीती,शास्त्रप्रतीती,गुरुप्रतीती या तिन्ही प्रतीतीच्या प्रमाणांनी अंगी बाणते.(७पण कूटस्थाला हाच मी आहे असे प्रत्यक्ष ज्ञान नसते.कारण तो असंग आहे.असंगाच्या बाबतीत अहंकाराची गोष्ट बोलूच नये.(८)आता चिदाभासाला आपण कूटस्थ आत्मा आहोत असे कळताच त्याच क्षणी तो नाहीसा होतो.त्यामुळे'मी आत्मा आहे'असे म्हणणे त्याला कसे शक्य होईल?(९)अहंकार तीन प्रकारचा आहे.एक मुख्य अहंकार असून दुसरे दोन अमुख्य आहेत.हे लक्षात घ्यावे.(१०)असंग,सत्य असा कूटस्थ न जाणता,आभास मिथ्या आहे,हे समजून न घेता उगीचच'मी मी' अशी जाणीव प्रबळ होऊन उठते.तो मुख्य अहंकार होय.(११)हाच अहंकार बंधनास कारण होतो.त्याच्याच योगाने जन्म मरण प्राप्त होतात.बाकीच्या दोन अमुख्य अहंकार कसे आहेत,ते पाहू.(१२)विवेचनाच्या साहाय्याने 'मी असंग,ज्ञानघन,परिपूर्ण,कूटस्थ आत्मा आहे व आभास मात्र मृगजळातील माशाप्रमाणे मिथ्या आहे'असे कळते.(१३)पण असे ज्ञान झाल्यानंतरसुद्धा'मी मी'असे स्फुरण होते,पण तो मी नव्हेच असे वाटते.नंतर स्वानुभवाच्या बळावर साधक स्वरूपज्ञान निवडून घेतो व आभासाशी त्याचा संयोग होऊ देत नाही.

**मग समाधि आणि व्यापार। दो रीती जाणावे अहंकार। शास्त्रीय आणि लौकिक विचार। दोहीं काळीं दोन।।१५।।समाधिकाळीं मी असंग । एक परिपूर्ण अभंग । हा शास्त्रीय अभिमान उमग। ज्ञानदृष्टी ।।१६।। मी जातों मी पाहतों। मी करितों मी खातों। हें आभासकार्य जाणतों। लौकिकव्यापारीं ।।१७।। ऐसे अमुख्य अहंकार । हे दोनी ज्ञानोत्तर। मुख्य अज्ञान साचार । बंधरूप ।।१८।। कूटस्थ असंग कळला । परोक्षज्ञान म्हणावें त्याला । तेंचि आपण प्रतीति आला । हे अपरोक्ष ज्ञान ।।१९।। परोक्ष अपरोक्ष ऐसें । हे दोन्हीं एका कैसें । म्हणसी तरी अपैसें। सप्त अवस्था जीवासी ।।२०।। अज्ञान आवरण विक्षेप । परोक्ष अपरोक्ष ज्ञानदीप । शोकमोक्ष सहावे रूप । तृप्ति निरंकुश सातवी।।२१।। या सात अवस्था एकासी । दशमा परी जीवासी । दृष्टांती आणि दार्ष्टांतासी । सारिख्या असती[४१]।।२२।।कोणी एक दाहा जण । मार्गी जातां नदी उतरुन । मोजिती आपणा सोडून। म्हणती दहावा कोठें ।।२३।।दाहावा आपण विसरती । तेंचि अज्ञान निश्चिती।**

---

(या दोन अनुभूतींना वेगळे ठेवता येते.)(१४)तेव्हा समाधी आणि व्यापार असे या दोन अनुभूतींना म्हणतात. त्यानुसार अहंकाराचेही दोन प्रकार होतात. एक शास्त्रीय आणि दुसरा लौकिक. हे दोन्ही अहंकार दोन वेगवेगळ्या प्रसंगांमुळे दोन होतात.(१५)समाधिकाळी मी असंग, परिपूर्ण, अभंग आहे असे वाटणे हा ज्ञानदृष्टीचा शास्त्रीय अभिमान जाणून घे.(१६)या उलट लौकिक व्यापारामध्ये मी जातो, मी पाहतो, मी करतो, मी खातो अशा सर्व आभासकार्यांचा अभिमान बाळगणे हा व्यापारकाळीचा अभिमान (अहंकार) होय.(१७) हे दोन्ही अमुख्य अहंकार हे ज्ञानानंतरच्या काळातले अहंकार होत. अशा त्रिविध अहंकारांपैकी मुख्य अहंकार अज्ञानजन्य असून बंधनस्वरूप आहे.(१८) असंग कूटस्थाचे स्वरूप कळते, तेव्हा त्या ज्ञानाला परोक्षज्ञान म्हणावे. (परोक्ष म्हणजे दृष्टिआड, म्हणजेच अप्रत्यक्ष) तो कूटस्थ आपणच आहोत असे अनुभवाने कळते तेव्हा त्या ज्ञानाला अपरोक्ष ज्ञान (प्रत्यक्षात अनुभवलेले) म्हणावे.(१९) एकाच जीवाला परोक्षज्ञानानांतर अपरोक्षज्ञान कसे होते, असा प्रश्न विचारशील तर हे लक्षात घे की जीवाला स्वाभाविकपणे विकासाच्या सात अवस्थांतून जावे लागते.(२०)त्या अवस्था पुढीलप्रमाणे होत. अज्ञान→आवरण→विक्षेप→परोक्ष→अपरोक्ष (म्हणजे ज्ञानरूप दीप प्रज्वलित होतो)→शोक मोक्ष ही सहावी अवस्था→आणि निरंकुशा तृप्ती ही सातवी अवस्था होय.(२१) एकट्याच जीवाला या साती अवस्थांतून जावे लागते. दशमाच्या कथेतल्या दृष्टान्त आणि दार्ष्टान्तिकाशी त्या जुळणाऱ्या आहेत.(२२)काही दहा जण रस्त्याने जात असता त्यांच्या वाटेत नदी लागली. नदी ओलांडून गेल्यावर ते एकमेकाला मोजून पाहू लागले. पण मोजताना प्रत्येक जण स्वत:ला मोजायला विसरत होता. त्यामुळे संख्या फक्त नऊच भरत होती. दहावा कोठे गेला याची चिंता ते करू लागले.(२३) दहावा आपणच आहोत, हे ते विसरत होते. यालाच अज्ञान असे निश्चित जाणावे.

**दहावा नाहीं न दिसे म्हणती । हेंचि दोरीतीं आवरण ।।२४।। रडती मस्तक बडविती। दहावा नदींत मेला म्हणती । हाचि विक्षेप दुःखी होती । तिसरी अवस्था।।२५।। तेथें आला अकरावा। म्हणे आहे रे दहावा । शोक सांडुनी म्हणती दावा । हें परोक्ष ज्ञान।।२६।। मोजून दहावा दाविला । आपण ऐसा अनुभव आला। अपरोक्ष ज्ञान म्हणावें त्याला । अवस्था पांचवी ।।२७।। होय शोकाचें निवर्तन । हेंचि जाण शोकापगमन । आनंदती लाभें करून । हे तृप्ति सातवी ।।२८।।आतां दार्ष्टान्ती हे कैसी । सप्त अवस्था जीवासी। आपण कूटस्थ निश्चयेंसी । अन्यथा नव्हे।।२९।।नामरूपेंवीण एकला। अस्तिभातिरूप संचला। माईक समुदाय मीनला। नामरूपात्मक।।३०।।इतुकेनें जाला भ्रम। चुकला आपुला उगम। विस्मरण पावला परम । हे अज्ञान अवस्था।।३१।।यापासून जालें आवरण। तें दों प्रकारें होय जाण । असत् एक दुजें अभान । दुसरी अवस्था।।३२।।कूटस्थ निःशेष नाहीं । हें असदावरण पाहीं । कूटस्थ न दिसे कोठेंही। हे अभानावरण।।३३।।पुढें विक्षेप जाला पूर्ण। मी देहधारी जीव पण । मज आहे जन्ममरण । केलें पावेन पुढें मी।।३४।।**

---

दहावा नाही,दहावा दिसत नाही असे ते म्हणत होते.यालाच दोन प्रकारचे आवरण म्हणावे.(२४) ते रडू लागले.डोक्यावर हात मारून घेऊ लागले.दहावा नदीत मेला असे म्हणू लागले.शोक करू लागले.हीच विक्षेप नावाची तिसरी अवस्था होय.(२५)तेथे अकरावा आणखी एक आला.तो म्हणाला की,'गड्यांनो,दहावा सापडला'तेव्हा त्यांनी शोक आवरला व म्हणाले,'आम्हाला तो दाखवा'.याला परोक्षज्ञान असे म्हणतात.(२६) त्याने पुन्हा मोजणी करून दहावा दाखवला.प्रत्येकाला दहावा आपणच आहोत असा अनुभव आला.त्यालाच अपरोक्षज्ञान म्हणतात.ही पाचवी अवस्था होय.(२७)आता शोक दूर झाला.यालाच शोकापगमन(शोक दूर जाणे)असे म्हणतात.ही सहावी अवस्था होय.हा मोठा लाभ झाला या विचाराने ते आनंदित जाले.हिलाच तृप्ती नावाची सातवी अवस्था म्हणतात.(२८)आता या कथेचे दार्ष्टान्तिक कसे आहे ते पाहू.जीवाला या सात अवस्थांतून जावे लागते.आपण कूटस्थ आहोत हे निश्चयपूर्वक जाणून घ्यावे.आपण इतर कोणी नाही आहोत,हे समजून घ्यावे.(२९)नामरूपातीत केवळ एकटा अस्ति-भाति-प्रिय या लक्षणांनी युक्त अशा कूटस्थाभोवती नामरूपात्मक खोटा समुदाय जमा झाला.(३०)त्यामुळे त्याला भ्रम झाला.आपण कोठून आलो हे तो विसरला,हीच अज्ञान अवस्था होय.(३१)त्या अज्ञानातून आवरण अवस्था आली.ते दोन प्रकारचे आहे.एक असत्आवरण दुसरे अभानआवरण हे दोन प्रकार होत.(३२)कूटस्थ निश्चितपणे नाहीच अशी समजूत होणे यास असदावरण म्हणतात.कूटस्थ कोठे दिसत नाही,असे मानणे यास अभानावरण म्हणतात.(३३)मी देहधारी जीव असून मला जन्म मरण या अवस्था भोगाव्या लागत आहेत.मी जे कर्म करीन त्यानुसार त्याचे फळ मला भोगावे लागेल असा विश्वास ठेवणे हा विक्षेप होय.(अशा तऱ्हेने जे वस्तुत: नाही त्याचा स्वीकार करणे म्हणजे विक्षेप)(३४)

**ऐशा ध्यासें सुखदुःख । भोगिलेंचि भोगी अशेख । श्वानसूकरादि अनेक । भोगितां चुकेना ।।३५।। ऐसें अज्ञान आवरण । तिसरा विक्षेप जाण । तिन्ही जीवासी बंधकारण। निरोपिल्या अवस्था ।।३६।। शंकाकार करी प्रश्न। तिन्ही अवस्था जीवालागून । विक्षेप हेंचि जीवाचें लक्षण । अज्ञान त्यापूर्वी होतें।।३७।। तरि अवस्था अज्ञानादि । जीवासी नसे अनादि । कूटस्थातें प्रतिपादी । अन्यथा विरोध।।३८।। ऐसी शंका ऐकिली । म्हणे वक्ता अवधारा बोली । अज्ञानादि सर्वही राहिलीं । एका स्वरूपीं ।।३९।।परि अवस्था जीवाची । म्हणों नये आत्मयाची । जैसी स्थिति गर्भाची । मातापित्या नसे ।।४०।। जन्मापूर्वी जें अज्ञान । परि तें जीवासी आच्छादन । येथें नसें अनुमान । अनुभवसिद्ध।।४२।। मज कांहीचि न कळे । ऐसा जीव बरळे । सर्वानुभवें निवळे । अज्ञान अवस्था ।।४३।। यापासून जालें आवरण।दों प्रकारें त्याचें लक्षण।एक तें असदावरण।अभानावरण दुजें।।४५।। आवरणशक्तीचें मासले । येणें जीव आच्छादिले । यापासून कार्य जालें। विक्षेपरूप।।४६।।**

---

अशा ध्यासाने तो सुखदु:ख भोगतो. एकदा जे भोगले असेल तेच भोगत राहतो. श्वान, सूकर (डुक्कर) इत्यादी अनेक योनींचे भोग भोगल्यावाचून त्याची सुटका होत नाही.(३५) याप्रमाणे अज्ञान, आवरण आणि तिसरा विक्षेप अशा या तीन जीवाला बंधनकारक अवस्थांचे वर्णन केले.(३६) यावेळी आक्षेपक प्रश्न करतो की, जीवाच्या या तीन अवस्था सांगितल्यात. त्यातील विक्षेप हेच खरे जीवाचे लक्षण दिसते. अज्ञान तर जीवाच्या अगोदर होतेच.(३७) तेव्हा अज्ञानादी अवस्था जीवाला नाहीतच. कूटस्थाला या अवस्था आहेत म्हणावे तर अन्यथा विरोध निर्माण होतो म्हणजे अज्ञान. कुणाचे जीवाचे की कूटस्थाचे? या दोन्ही बाबतीत विरोध दिसतो.(३८) अशी आशंका ऐकल्यावर वक्ता म्हणतो की याचे उत्तर आता ऐका. अज्ञानादी सर्व अवस्था एका कूटस्थाच्या अधिष्ठानावर राहात असतात.(३९) पण तरी अज्ञानादी अवस्था जीवाच्याच होत. त्या आत्म्याच्या अवस्था म्हणू नयेत. गर्भाच्या अवस्था मात्यापित्याच्या मानता येत नाहीत.(४०) जन्मापूर्वी गर्भावस्था गर्भिणीची अवस्था म्हणता येत नाही. गर्भावस्था ही लेकराचीच असे म्हटल्यावर दोष येत नाही.(४१) जीव जन्माला येण्याच्या पूर्वीपासून असले तरी ते जीवाला आच्छादक होते. यात तर्काचा किंवा अनुमानाचा काही भाग नाही, कारण ते अनुभवसिद्ध आहे.(४२) जीव म्हणतो की, 'मला काहीच कळलं नाही' तेव्हा या त्याच्या उद्‌गारावरून अज्ञानावस्था स्पष्ट होते तेव्हा जीवाचे अज्ञान अनुभवसिद्धच आहे.(४३) या अज्ञानातून आवरण निर्माण होते. ते दोन प्रकारचे आहे. एक असदावरण आणि दुसरे अभानावरण.(४४) कूटस्थ कोठेच नाही असे वाटणे याला असदावरण म्हणतात. कूटस्थ दिसतच नाही, असे वाटणे यात अभानावरण म्हणतात.(४५) हे आवरणशक्तीचे नमुने झाले. या आवरणाने जीव आच्छादिले जातात. आवरणापासून विक्षेप हे कार्य निर्माण होते.(४६)

**लिंगाध्यासें आपण । सोशीतसे जन्ममरण । सुखदुःखें पावें शीण । कल्पवरी ।।४७।। कल्पांतींही सुटेना । लिंगाध्यास भंगेना । आपण आपणा कळेना । म्हणोनियां ।।४८।। अज्ञान आवरण विक्षेप।तिन्ही अवस्था बंधरूप। उत्तर अवस्था संक्षेप। मोक्षरूप बोलिजे।।४९।। मोक्षकारक जें ज्ञान। तयाचेहि प्रकार दोन । एक तें परोक्षज्ञान दुजे अपरोक्ष ।।५०।। सच्छास्त्र आणि सद्‌गुरू।होता श्रवणाचा आदरू।परोक्षज्ञान साचारू।प्राप्त अधिकारिया।।५१।। परोक्षज्ञान मोक्षरूप । येथें नसे कीं आक्षेप ।आवरण जे असद्‌रूप । येणें नष्ट होय।।५२।। परोक्ष ज्ञानाचे दोन प्रकार । स्वर्गापरी नव्हे गोचर । ऐकून कळे साचार । हे एक परोक्ष।।५३।। दुसरें आपणाहून वेगळें । दुजेपणें निवळें । सच्चिदानंद ब्रह्म कळे । ज्ञानदृष्टी ।।५४।। असंग कूटस्थ निर्विकार। सर्व कळे सारासार।परोक्षज्ञानाचा विचार।जाणिजे ऐसा।।५५।।गुरुवचन आणि विचार। येणें अपरोक्ष साक्षात्कार।येथें आक्षेपिले थोर। कीं वाक्यें अपरोक्ष नव्हे।।५६।।आप्तवचनें मीचि दशम। ऐसें कळलें जाउनी भ्रम। तैसें गुरूवचनेंचि कळे वर्म। मी ब्रह्म विचारें।।५७।। मी ब्रह्म हा निर्धार जाला। अपरोक्षज्ञान**

---

लिंगाध्यासामुळे म्हणजे वासनातादात्म्यामुळे जीव जन्म मरणाची सुखदुःखे कल्पान्तापर्यंत भोगत शीण पावतो, याला विक्षेप म्हणतात.(४७) कल्पान्तानंतरही हा लिंगाध्यास सुटत नाही, तो भंग पावत नाही. याचे एकच कारण म्हणजे आपण आत्मरूप आहोत हे कळलेले नसते.(४८) अज्ञान, आवरण, विक्षेप या अवस्था बंधनरूप असतात. याउलट बाकीच्या चार अवस्था या मोक्षरूप आहेत.(४९) मोक्षकारक असे जे ज्ञान आहे त्याचे दोन प्रकार आहेत. एक परोक्षज्ञान आणि दुसरे अपरोक्षज्ञान होय.(५०) सत्‌शास्त्र आणि सद्‌गुरू यांच्या श्रवणाने अधिकारी व्यक्तीला परोक्षज्ञान प्राप्त होते.(५१) परोक्षज्ञान मोक्षरूप असते याबद्दल आक्षेप घेण्याचे कारण नाही. त्याच्या योगाने जीवाच्या असद्रूप आवरणाचा नाश होतो.(५२) परोक्षज्ञानाचे दोन प्रकार होत. स्वर्गासारखे लोक डोळ्यांनी दिसत नसले तरी ऐकून ऐकून त्यांचे स्वरूप कळते. हे एक प्रकारचे परोक्षज्ञान होय.(५३) दुसरे परोक्षज्ञान म्हणजे ब्रह्म आपल्याहून वेगळे आहे. आपल्यापेक्षा निराळे आहे असे जे वाटत होते ते सच्चिदानंद ब्रह्म ज्ञानसृष्टीने यथार्थ कळणे हे होय.(५४) कूटस्थ असंग असून निर्विकार आहे, सार काय असार काय इत्यादी कळायला लागते, हा परोक्षज्ञानाचा विचार होय, हे समजून घ्यावे.(५५) त्यानंतर सद्‌गुरूंचे वचन आणि विचार यांच्या योगाने अपरोक्षज्ञान होते म्हणजे ब्रह्मात्मैक्याचा साक्षात्कार होतो. येथे एक आक्षेप येतो की, केवळ वाक्याने (गुरुवचनाने)अपरोक्षज्ञान होत नाही.(५६) यावर उत्तर असे की, आप्त वचनामुळे (अधिकारी व्यक्तीच्या सांगण्यावरून) आपणच तो हरवलेला दहावा आहोत, असे कळते. त्या अगोदरचा भ्रम नाहीसा होतो. त्याप्रमाणे सद्‌गुरूंच्या शब्दांनी 'मी ब्रह्म आहे' या विचाराचे वर्म कळून येते.(५७) 'मी ब्रह्म आहे' असा निश्चय झाला की त्यालाच अपरोक्षज्ञान असे म्हणतात.

**म्हणावें त्याला । येणें समूळ नाश झाला । अभानावरणासी।।५८।। अपरोक्षाचेहि प्रकार। दोन असती साचार। परप्रकाशें गोचर । इंद्रिय मन देहादि ।।५९।। हे स्वतः जड असती। परप्रकाशेंचि दिसती । अपरोक्ष परि निवृत्ति । अज्ञान नव्हे ।।६०।। स्वप्रकाश चैतन्यघन। हा कूटस्थ सर्वां विलक्षण । हेंचि अपरोक्ष निवर्तन । अज्ञानाचें ।।६१।। अपरोक्ष आत्मा आपण । हाचि मोक्ष हेंचि ज्ञान । येणें ज्ञानें पावन । बहुत जाले ।।६२।। मी कूटस्थ अपरोक्ष ऐसें । असंग कूटस्थीं न दिसे । आभास तरि अन्य असे । त्या अपरोक्ष कैचें।।६३।।म्हणसी तरी चिदाभास। कूटस्थ मी हा करी ध्यास। अज्ञानकाळीं आपणास। वेगळें होतें भाविलें ।।६४।। तेणें सुखदुःख भोगिलें । जन्म मरणें शीण जाले । म्हणोनि साक्षिया शरण आलें । सुख देखिलें अपार ।।६५।। राजपुत्रा इच्छा राज्याची । आज्ञा पाळी पितयाची । जीवासि इच्छा सुखाची । म्हणून साक्ष्यनुसार वर्ते ।।६६।।अथवा तेंचि आपण। असून होता विलक्षण। प्रायश्चित तयाचें जाण। उगमीं मज्जन करी।।६७।।करूनि आपुला घात। साक्षित्वें कैसा राहत । म्हणसी तरि घेती कर्वत । राज्यलोभासाठीं ।।६८।।**

---

त्या अपरोक्षज्ञानाने अभानावरणाचा समूळ नाश होतो.(५८)अपरोक्षज्ञानाचेही दोन प्रकार आहेत. परप्रकाश आणि स्वयंप्रकाश.इंद्रिये,मन,देहादी इत्यादी परप्रकाश अपरोक्षज्ञानाने दिसतात.(५९)हे सर्व पदार्थ स्वत: जड असतात आणि त्यामुळे ते परप्रकाशानेच दिसतात.ते अपरोक्षज्ञान असले तरी त्यामुळे अज्ञान नाहीसे होत नाही.(६०)हा कूटस्थ स्वप्रकाश, चैतन्यघन आणि सर्वांपेक्षा वेगळा आहे असे कळणे, हेच खरे अपरोक्षज्ञान असून त्यानेच अज्ञानाचे निरसन होते.(६१)आपण प्रत्यक्ष आत्मा आहोत हे कळले हाच मोक्ष आहे आणि हेच खरे ज्ञान होय, याच ज्ञानामुळे पुष्कळ लोक पावन झाले.(६२) कूटस्थ असंग असल्याने त्याच्या ठिकाणी मी कूटस्थ आहे. अपरोक्ष आहे अशी भावना असणे शक्य नाही. आभास (चिदाभास जीव) तर बोलून चालून वेगळाच आहे. त्याला अपरोक्षत्व (प्रत्यक्ष आत्मैक्याचा अनुभव) कसे येणार?(६३) असे म्हणशील तर त्याचे उत्तर असे की, जो चिदाभास अज्ञानकाळात स्वत:स वेगळे समजत होता, तोच मी कूटस्थ आहे असा ध्यास करू लागला.(६४) त्याने जन्ममरणाच्या सुखदु:खांचा अनुभव घेतलेला असतो, तो शिणून गेलेला असतो. म्हणून तो सद्गुरूला शरण जातो तेव्हा त्याला अपार सुख अनुभवायला मिळते.(६५) राजपुत्राला आपल्याला राज्य मिळावे अशी इच्छा असते. त्यामुळे तो वडलांची आज्ञा पाळतो. त्याप्रमाणे जीवाला सुखाची इच्छा असते म्हणून तो सद्गुरूंच्या आज्ञेप्रमाणे वर्तन करतो.(६६) किंवा आपण स्वत: तेच स्वरूप असताना स्वत:ला तद्विलक्षण मानत राहिलो,या गोष्टीचे प्रायश्चित म्हणून तो स्वत:च्या उगमस्थानी म्हणजे ब्रह्मरूपात बुडी घेतो.(६७) तो आपला घात करून साक्षिरूपाने कसा राहतो, असे म्हणशील तर त्याचे उत्तर असे की, लोक राज्यलोभासाठी कर्वतीने कापूनसुद्धा घेतात.(आत्महत्या करतात).(६८)

**एवं जालें जें निरूपण। बंधरूप अवस्था तीन । परोक्षापरोक्ष ज्ञान। मोक्षरूप दोन्हीं।।६९।। आतां दोनी फलरूप । अवस्थेचें स्वरूप । बोलिजेतें संक्षेप । तेंचि अवधारा ।।७०।। मी माझें हें बंधन । भोगिलें हें नेणपण । ज्ञानें तयाचें निरसन निःशेष जालें ।।७१।। देह प्रारब्धीं वर्तले । परि मी माझें हें हरपलें । अज्ञान निःशेष गेलें। सुखावले निजरूपीं।।७२।। मी माझें गेलें कैसें । येविशीं उपपत्ति असे । कोणी ब्राह्मण सापडलासे । म्लेंछसमुदाईं।।७३।। तेणें धरूनी बाटविला । त्रासे ब्राह्मणां शरण आला । प्रायश्चित घेतां पावला । पुन्हा ब्राह्मणत्व।।७४।।मग म्लेंछसमुदाय दृष्टीसी । पाहतां भय वाटे मनासी । तैसा अहंकार काम क्रोधासी । जीव हा भीतसे[४२]।।७५।। जरी प्रारब्ध व्यवहार । भोगितां शिणे थोर। कधीं सरे हा जोजार । क्लेशरूप ।।७६।। अज्ञान निःशेष गेलें। परि देहासी प्रारब्ध उरलें। दशमापरि व्रण पडिलें । तें मास पक्ष राहे ।।७७।। करितां औषध उपचार । तें व्रण मिळे साचार। तैसा प्रारब्ध विचार। भोगमात्रें नासी ।।७८।।आत्मलाभें संतुष्ट जाला। सुखदुःख नसे त्याला।मीपण त्यागून मोकळा जाला। देहदुःखा नातळे।।७९।।जैसें नासिक छेदिलें नराचें।मग टाकिले समुदाय लोकांचे।अंधारी राहणें त्याचें। काणकोंडेपणें।।८०।।**

---

अशाप्रकारे या विषयाचे निरूपण झाले.तीन बंधरूप अवस्था,मोक्षरूप असलेले परोक्ष,अपरोक्ष ज्ञान यांचे येथे स्पष्टीकरण झाले.(६९)आता शेवटच्या फलस्वरूप अवस्थांचे संक्षेपाने वर्णन करावयाचे आहे ते लक्षपूर्वक ऐका.(७०)आतपर्यंत मी माझे हे बंधन सहन केले,हे अज्ञान भोगले त्याचे ज्ञानाने संपूर्णपणे निरसन झाले.(७१)देह प्रारब्धानुसार वागत असला तरी'मी माझे'हे बंधन गळून पडलेले असते.अज्ञान संपूर्णपणे गेलेले असते,तेव्हा कूटस्थ निजरूपात सुखावतो.(७२)त्याचे'मीपण,माझेपण'कसे जाते,याविषयीचा एक दृष्टान्त आहे.कोणी एक ब्राह्मण म्लेंच्छांच्या समुदायात सापडतो.(७३)त्याला पकडून ते त्याला बाटवतात.मोठ्या कष्टाने तो ब्राह्मण सुटतो व ब्राह्मणांस शरण येतो.मग तो प्रायश्चित्त घेऊन पुन्हा ब्राह्मणपणा प्राप्त करून घेतो.(७४)मग म्लेंच्छांचा समुदाय पाहताच त्याच्या मनाला भीती वाटायला लागते.त्याप्रमाणे अपरोक्षज्ञान प्राप्त झालेला हा जीव,अहंकार,काम,क्रोध यांना घाबरतो.(७५) प्रारब्धातले सर्व व्यवहार भोगत असताना त्याला खूप कष्ट पडतात.हा क्लेशरूप संसार कधी संपेल,यातून आपली मुक्तता होईल याची तो वाट पाहत असतो.(७६)त्याचे अज्ञान संपूर्णपणे गेलेले असते.पण देहाला अद्याप प्रारब्ध उरलेले असते.दशमाच्या कथेत दहाव्याला ज्याप्रमाणे व्रण पडला होता,तो महिना पंधरा दिवस राहतो.(७७)औषधोपचार केल्यानंतर तो व्रण भरून येतो.त्याप्रमाणे प्रारब्धाचा विचार भोगण्याने नष्ट होतो.(७८)एकदा का आत्मलाभाने तो संतुष्ट झाला की मग त्याला सुखदुःख राहात नाही.तो मीपणाचा त्याग करून मुक्त होतो.मग त्याला देहाचे दुःख स्पर्श करत नाही.(७९)एखाद्या माणसाचे नाक कापल्यानंतर तो लोकांचे समुदाय वर्ज्य करता कानकोंडेपणाने अंधारातच राहू लागतो.(८०)

**तैसें जीवासी घडलें।मीपणाचें नाक छेदिलें।मग सुखें वास्तव्य केलें।निजस्वरूपीं।।८१।।तथा व्यापारासी येतां।लाजची वाटे तत्त्वतां।मी माझें न म्हणतां।प्रारब्ध भोगी।।८२।।ज्या क्षणीं मीपण गेलें।तत्क्षणीं सुखदु:ख नासलें।सहज विक्षेपाचें जालें।निसंतान।।८३।।इंद्रिय आत्मा मन।हें जरी मिळती तीन।तरी भोक्तृत्व श्रुतीचें वचन।विषयसुखाचें।।८४।।मुळीं विषयासी मिथ्यात्व।नामरूपाचा समुदाव।तरि इच्छेचा संभव।कवण अर्थीं।।८५।।मीपणेंविन भोक्ता।बोलोंचि नये तत्त्वतां।तरि विषयकामना पाहतां।कोणासि होय।।८६।।भोग्याभावि इच्छा गेली।भोक्त्याभावि कोणा भुली।इच्छा इच्छक दोनी सरली। मीपणेंविन।।८७।।तैसेंचि दु:ख देहत्रयाचें। नि:शेष हरपलें साचें । देहात्मबुद्धीनें सुखदु:खाचें। तादात्म्य होतें।।८८।। देहबुद्धीचें निसंतान।होतां पावला समाधान।देहदु:ख अवलक्षण।कोण जाणें।।८९।। शरीरतिहींसी कैसे ताप।बोलिजे तयाचें स्वरूप।वेगळालीं संक्षेप।स्थूळदेहीं नाना रोग।।९०।। कफ वात आणि पित्त।तेणें अनंत व्याधी देहा होत।नसतां जरी वात पित्त।तरि देह वाचेना।।९१।।**

---

त्याप्रमाणे जीवाच्या बाबतीत घडते. त्याच्या मीपणाचे नाक कापून टाकल्यानंतर तो सुखाने स्वत:च्या स्वरूपात मुक्काम करतो. (समाधिसुखात निमग्न होतो.)(८१) त्यानंतर त्या समाधिसुखातून व्यापाराकडे परत येताना त्याला खरोखर लाज वाटायला लागते. तो मुकाट्याने 'मी माझे'ची भाषा न वापरता प्रारब्ध भोगतो.(८२)ज्याक्षणी त्याचे मीपण नष्ट होते त्या क्षणी त्याचे सुखदु:ख नाहीसे होते आणि विक्षेपाचे अगदी सहजपणाने उच्चाटन होते.(८३)इंद्रिय, मन आणि आत्मा ही तीन तत्त्वे एकत्र जर मिळाली तर विषयसुखाचा भोग अपरिहार्यपणे घडतो, असे श्रुतीचे (वेदांचे) सांगणे आहे.(८४)मुळात विषयच मिथ्या आहेत. विषय म्हणजे नामरूपांचा समुदाय. त्यांच्याबद्दल इच्छा कशी निर्माण होईल? आणि ती कशासाठी (कोणत्या लाभासाठी) निर्माण होईल?(८५) मीपणा नष्ट झालेला असताना त्यावाचून भोक्त्याचा विचारच मुळात बोलता येत नाही. तेव्हा विषयांबद्दलची इच्छा कोणाला होईल?(८६) भोग्यच (भोग घ्यायचा ते विषय) नसल्यामुळे इच्छा गेली. भोक्ता (विषयांचा भोग घेणारा) नसल्यामुळे त्यांचा मोह कोणाला होणार? आणि मीपणा राहिलेला नसल्यामुळे इच्छा इच्छक (इच्छा करणारा) दोघेही नष्ट झाले.(८७) त्याप्रमाणे देहत्रयाचे (स्थूल, सूक्ष्म आणि कारण) दु:ख संपूर्णपणे नाहीसे झाले. देहात्मबुद्धीने (म्हणजे देहाला आत्मा मानणाऱ्या बुद्धीने) सुख आणि दु:ख यांच्याशी आपण एकरूप होतो.(८८) ती देहबुद्धी संपूर्णपणे नष्ट होताच सुखदु:खे राहात नाहीत आणि जीवाला समाधान प्राप्त होते. तेव्हा देहदु:खासारखी खोटी भावना कोणाला जाणवणार?(८९) स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन शरीरांना कोणते त्रास होतात त्यांचे स्वरूप आता संक्षेपाने सांगतो. स्थूल देहाला अनेक रोग ग्रासत असतात.(९०) कफ, वात आणि पित्त या तीन धातूंमुळे देहाला अनंत रोग होतात. ते तीन धातूच नसले तर देहच वाचणार नाही.(९१)

**देह रोगाचें जालें । तें नवचे वेगळें केलें। सूक्ष्मदेहीं ताप भरले । ते अवधारा आतां।।९२।। काम क्रोध मद मत्सर । अनेक रजोगुणविकार । प्रमादादि तमांकुर सुखविकार । सात्त्विकाचा ।।९३।। नाना आधि दुःखरूप। सूक्ष्म देहाचे संताप। कारणदेहीं सर्व ताप। बीजरूप नेणिव ।।९४।। ऐसें दुःख देहाचें । ज्ञान होतां आत्मयाचें । गेले मेले संचिताचे। कार्यवर्ग।।९५।। देहबुद्धीचा संबंध । तुटला अवघाचि खेद । जन्ममरण भवबंध । एक सरा गेला ।।९६।। ऐसा जाला शोकभंग । अवस्थेचें साहवें अंग । आतां सातवी ते अभंग । निरंकुशा तृप्ति ।।९७।। जन्मा आलियाचें सार्थक । आत्मा ओळखिला एक । शास्त्रीय अथवा लौकिक । करणें तें केलें ।।९८।। साध्य तेंचि साधिलें । साधनाचें सफळ जालें । सुखरूप कोंदाटलें । निजात्मरूप ।।९९।। धन्य धन्य सद्गुरूनाथ । मज केलेंसें सनाथ । कृपादृष्टीनें कृतार्थ । भवविष गेलें ।।१००।। काय व्हावें उतराई । ऐसें बोलणें हें काई । माथा समर्पावा पाई । तरि आधींच हरपलें ।।१।। सर्व ब्रह्मांड ग्रासिलें।**

---

त्यामुळे देह हा रोगासाठीच आहे असे दिसते. देहाला रोगापासून वेगळे काढता येत नाही. आता सूक्ष्मदेहामध्ये जे ताप भरलेले आहेत, ते ऐका.(९२) काम, क्रोध, मद, मत्सर यांसारखे अनेक रजोगुण विकार, प्रमादादी तमोगुणाचे विकार आणि सत्त्वगुणाचा सुखविकार,(९३) निरनिराळे दुःखदायक आधी (मनोविकार) हे सूक्ष्म देहाचे त्रास होत. कारण देहात त्रीत सर्व ताप बीजरूपाने असतातच. त्याबरोबर अज्ञान हा मोठा ताप असतो.(९४) आत्म्याचे ज्ञान होताच वर सांगितलेली तिन्ही देहांची दुःखे नाहीशी होतात. नाश पावतात. देहदुःखे म्हणजे संचिकर्माची निष्पत्ती आहे. आत्मज्ञानाने संचितकर्माची ही करणी नष्ट होते.(९५) देहबुद्धीचा संबंध तुटला की सगळे दुःख नष्ट होते. त्यामुळे जन्म, मरण, संसाराचे बंधन इत्यादी एकदमच नष्ट होतात.(९६) अशा प्रकारे सहावी शोकभंग नावाची अवस्था जीवाला प्राप्त होते. आता सातवी अवस्था म्हणजे निरंकुशा तृप्ती, तिचे स्वरूप पाहू.(९७) एक आत्मा ओळखिला की जन्माला येण्याचे सार्थक होते. मग शास्त्रीय अथवा लौकिक कर्मे केली तरी हरकत नाही.(९८) कारण जे साध्य करावयाचे होते ते साध्य झालेले आहे. सर्व साधने सफळ झाली आहेत आणि स्वतःचे आत्मस्वरूप सुखरूपाने सर्वत्र भरून राहिलेले आहे,असा अनुभव येऊ लागतो.(९९) सद्गुरुनाथ खरोखर धन्य होत.मला त्यांनी अनुगृहीत करून आधार दिला (सनाथ केले.) माझ्यावर कृपादृष्टी करून मला कृतार्थ केले. संसाररूपी विष त्यामुळे नष्ट झाले.(१००) आता यांचे उतराई कसे व्हावे? या बोलण्याला काही अर्थच राहात नाही. तेव्हा मौन भावाने पायावर मस्तक टेकवावे म्हटले तर ते आधीच लोप पावलेले आहे. (शरीरभावनाच मुळात नष्ट झालेली आहे.)(१०१) मी सर्व ब्रह्मांडाचाच ग्रास घेतलेला आहे. तेथे एकटे शरीर कोठे पुरवणीला पडले असते? एवढे करूनही माझे पोट भरलेले नाही. ते सदासर्वकाळ गुरुचरणांच्या सेवेला भुकेले

**पिंड तेथे नवचे पुरवलें । परि पोटची नाहिं भरलें । चरणभुकेलें सर्वदा ।।२।। मग भक्षिलें आपणासी। तेणें तणावल्या कुशी । मग सुखरूप एकपणेसीं । शयन केलें।।३।। सरली शब्दाची खटपट । अवघा आत्माची घनदाट । सर्व शेवटाचा शेवट । सहजीसहज।।४।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । सप्तावस्थावर्णनप्रकारे । पंचमसमासः ।।५।।**

---

आहे.(१०२) मग मी स्वत:च स्वत:ला खाऊन टाकले. त्यायोगाने शरीराच्या सर्व बाजू तणावून एकपणाच्या जाणिवेसह निद्रा केली.(१०३) येथे शब्दांची खटपट संपली.सर्वत्र आत्माच घनदाट भरून राहिला आहे. सर्व शेवटाचा शेवट आता सहजपणे गाठलेला आहे.(१०४)



# पंचिका ६वी - तत्पदशोधन

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - ईशतनुनिरूपण

**आतां तत्पदशोधन । कीजे संक्षेपें कथन । तरी असावें सावधान । जे श्रवणार्थी ।।१।।**
**त्वं पदाचिये परी । तनुचतुष्ट्य ईश्वरीं । तें विवेकें जो निवारीं । तया ब्रह्म निवळे ।।२।।**
**कांहीं जें जें भासे दिसे । ब्रह्म त्याहून अनारिसें । दिसे भासे तें नासे । हें श्रुतिवचन ।।३।।**
**गोंडाळ सांडून एकीकडे।नीर सेविजे रोकडें। तेवि दृश्य विवेकें बिघडे। तरी निवडे परब्रह्म।।४।।**
**पंचभूतिक ब्रह्मांड। भीतरीं सांठवलें पिंड। पाहतां दृश्य उघड। परब्रह्म नव्हे।।५।।ब्रह्मलोकादि तृणांत। आकार जो जो दिसत। तें तें जाणावें नाशवंत। शाश्वत तेंचि शोधावें।।६।।रज्जूवरी सर्प भासला। त्या म्हणावें उत्पन्न जाला। तैसी उत्पत्ति अवस्था याला। बोलोंचि नये।।७।।जे आदिअंतीं शाश्वत।तेथें अवस्थेचा संकेत। हें बोलणे प्रमाणरहित। अवस्थातीत ब्रह्म असे।।८।। जे नसतां दिसे उद्भवली । अवस्था तया लागली। ब्रह्मांड उत्पत्ति या बोलीं। अकारमात्रा।।९।।**

---

### पंचिका ६वी, समास १ला - ईशतनुनिरूपण

त्वंपदाप्रमाणेच तत्पदाचे आता संक्षेपाने निरूपण करू तरी श्रवणाची इच्छा असणाऱ्यांनी अवधान द्यावे.(१) त्वंपदाप्रमाणेच ईश्वराच्या (तत्पदाच्या) ठिकाणी पण चार शरीरे आहेत. जो विवेकपूर्वक त्यांचे निवारण करतो त्यालाच ब्रह्म सापडते.(२) जे जे काही भासते अथवा दिसते त्यापेक्षा ब्रह्म वेगळेच असते. 'जे दिसते अथवा भासते ते नष्ट होते' असे श्रुतिवचन (वेदांचे शब्द) आहे.(३) शेवाळ बाजूस सारून ज्याप्रमाणे स्वच्छ पाण्याचे सेवन करावे त्याप्रमाणे विचाराने सर्व दृश्याचा पसारा नाहीसा झाला (विघडे) तरच परब्रह्म पारखून घेता येते.(निवडे)(४) ब्रह्मांड पंचभूतांपासून निर्माण झालेले असून त्याच्या पोटात सर्व पिंडांची साठवण झाली आहे. ही दोन्हीही दृश्य प्रकारात मोडत असल्याने ती परब्रह्म नाहीत, हे उघड आहे.(५) ब्रह्मलोकापासून गवताच्या पात्यापर्यंत जो जो आकार दृष्टीस पडतो ते ते सर्व नाशवंत जाणावे. नाशवंताचा त्याग करून जे शाश्वत (कायम टिकणारे) असेल त्याचा शोध घ्यावा.(६) दोरीवर सर्प भासला,त्याला उत्पन्न झाला असे म्हणावे.त्याप्रमाणे परब्रह्माला उत्पत्तीची अवस्था असते असे म्हणता येत नाही.(७) जे आरंभी आणि अंती शाश्वतच असते (सर्व अवस्थांमध्ये शाश्वतच असते.) तेथे अवस्थांची भाषा वापरणे म्हणजे प्रमाण सोडून बोलणे होय. ब्रह्म अवस्थांच्या पलीकडचे आहे.(८) जी वस्तू अगोदर काही नसता नव्याने उत्पन्न झाल्यासारखी दिसते. तिच्याच मागे अवस्थांची उपाधी लागते. त्यादृष्टीने ब्रह्मांडाची उत्पत्ती म्हणजे अकारमात्रा होय.(९)

**ब्रह्मांड उत्पत्ति अकार। जड समुदाय समग्र । हा दृश्यात्मक केर । ब्रह्मीं नाहीं ।।१०।। उत्पत्तीचा अभिमानी । ब्रह्मा जाणिजे रजोगुणी । महाकल्पीं तयालागुनी । नाश आहे।।११।। ब्रह्मीं जालें जें स्फुरण । तेथें प्रगटती त्रिगुण । एकेक गुणापासून । तिन्हीं देव जाले।।१२।। सृष्टि स्थिति प्रलय अवस्था । तिघे करिती व्यवस्था । उत्पत्ति पालण संहारिता । ब्रह्मा विष्णु महेश ।।१३।। ब्रह्मा करितो उत्पन्न । तयासि नव्हे पालण । एकेक अवस्थेचा अभिमान। वाहत असती।।१४।। परि ते ब्रह्मसामर्थ्य शक्ति । ब्रह्मयाची काय गति । ती शक्ति जेथें लया जाती । तरि अभिमान कैंचा ।।१५।। ब्रह्मदेवापासून मुंगी । चैतन्य सारिखे असे जगीं । सामर्थ्य शक्ति वाउगी । न्यूनाधिक दिसे ।।१६।। न्यूनाधिक जरी दिसलें । दिसतां सामर्थ्य मोठें जालें । तयासि अविनाशि कल्पिलें । अज्ञान जनीं ।।१७।। म्हणोनि परमात्मा चतुरानन। बोलोंचि नये अप्रमाण । दिग्पाळादि देव संपूर्ण । ते तरी आज्ञाधर ।।१८।। ब्रह्मांड अवस्था अभिमान । मृगजळ जैसें भासमान । परब्रह्म ते निर्गुण। अभिमानातीत ।।१९।। हिरण्यगर्भ सत्रा कळांचा । चेष्टविणार ब्रह्मांडाचा । हा तरि विकार अष्टधेचा । भासमात्र होय ।।२०।। परि ते नव्हे कीं शाश्वत । कल्पांतीं लया**

---

ब्रह्मांडाची उत्पत्ती म्हणजे अकार. त्यातून निर्माण झालेला समग्र जड वस्तूंचा समुदाय हा सर्व दृश्यात्मक केर (त्याज्य) होय. ब्रह्मामध्ये त्याला वाव नाही.(१०) उत्पत्तीचा अभिमान बाळगणारा ब्रह्मदेव हा रजोगुणी असून महाकल्पाच्या शेवटी त्याचा नाश ठरलेला आहे.(११)ब्रह्मामध्ये जे स्फुरण झाले त्यामध्ये त्रिगुण प्रकट झाले. त्यातील एकेका गुणापासून तीन देव (ब्रह्मा, विष्णू आणि महेश) निर्माण झाले.(१२)ह्या तिघांनी आपापसात उत्पत्ती, स्थिती आणि लय या अवस्थांची व्यवस्था लावली. उत्पत्ती करणारा तो ब्रह्मदेव, पालन करणारा तो विष्णू आणि संहार करणारा तो महेश होय.(१३)ब्रह्माकडे फक्त उत्पत्तीचा अधिकार आहे. पालनाचा अधिकार त्याच्याकडे नाही. हे तिन्ही देव एकेका गोष्टीचा अभिमान बाळगत असतात.(१४)पण ती ब्रह्मसामर्थ्यशक्ती आहे तेथे ब्रह्मदेवाची काय मात्रा चालणार?ती मूळ शक्तीच जेथे लयाला जाते तेथे कशाचा अभिमान धरावा?(१५)ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत जगात चैतन्य सारखेच आहे. सामर्थ्यशक्ती मात्र कमीजास्त दिसते.(१६)सामर्थ्य कमीजास्त जरी दिसले तरी सामर्थ्य दिसताच लोकांना ते मोठे वाटते आणि अज्ञानी लोक त्याला अविनाशी मानतात.(१७) म्हणून ब्रह्मदेव हा सर्वात मोठा देव(परमात्मा)आहे असे निराधार बोलूच नये.दिक्पाल (दिशांच्या अधिष्ठात्री देवता) इत्यादी देव तर बोलून चालून आज्ञापालन करणारे देव आहेत.(१८)ब्रह्मांड, अवस्था,अभिमान हे सर्व मृगजळाप्रमाणे भासमान आहेत.पण परब्रह्म मात्र निर्गुण आणि अभिमानातीत (अभिमानरहित) आहे.(१९)ब्रह्मांडाला चेष्टविणारा सत्रा कळांचा हिरण्यगर्भ हा तर अष्टधा प्रकृतीचा विकार होय. त्यामुळे तो भासस्वरूप आहे.(२०)परंतु तो शाश्वत नाही.कल्पाच्या शेवटी तो लयाला जाणार असतो.

**जात । आणि नाना विकारवंत । तें परब्रह्म कैसें।।२१।।स्थिति अवस्था तयाची । म्हणूं नये परमात्म्याची।उकार मात्रा तेथीची। परमात्मा केवी।।२२।।पालणाचा अभिमान। विष्णु वाहे आपण।नाना अवतार धरून।शरणागतां संरक्षी।।२३।।तेथें असे सत्वगुण।त्या म्हणों नये निर्गुण।मायिकासी शाश्वतपण।मानोंचि नये।।२४।।मायातीत निरंजन। तेथें लावूं नये अभिमान।जग न होतां निर्माण।पाळिलें कोणें।।२५।।ऐसें विचारें पाहावें। सारासार शोधावें। लोकधाटी भरंगळावें । अविवेकि जनीं ।।२६।। हिरण्यगर्भ पालण अवस्था । उकार मात्रेची व्यवस्था । करी पालणाची संस्था । अभिमानें विष्णू ।।२७।। हें इतुकें मायागुणें। विकाराची लक्षणें । यासि निर्मिलें जया कारणें । अव्याकृतें ।।२८।।आकार नसतां विकार होत। तयास म्हणावै अव्याकृत । सत् म्हणतां नाश होत । असत् तरी जगत्कार्य।।२९।। सदसद्-निर्वचनीं । अज्ञानतमाची खाणी । हिरण्यगर्भाची उभारणी । जेथून झाली ।।३०।। यासि परमात्मा म्हणतां । लाज न वाटे तत्वतां। असज्जड दुःखरूपता । ज्ञानघन कैसा।।३१।। होय सर्वांचा संहार । अज्ञान तम साचार । अज्ञाना न धरवे धीर । ज्ञानकाळीं ।।३२।।**

---

अशाप्रकारे निरनिराळे विकार प्राप्त करणारे ते तत्त्व परब्रह्म कसे असेल?(२१) त्याची (विष्णूची)स्थिती ही अवस्था आहे.ती परमात्म्याची अवस्था असे म्हणू नये.त्याची उकार ही मात्रा आहे. पण तिला परमात्मा कसे म्हणता येईल?(२२)पालनाचा अभिमान स्वत: विष्णू बाळगत असतो.तो निरनिराळे अवतार घेऊन शरणागत भक्तांचे रक्षण करतो.(२३)त्याच्या ठिकाणी सत्त्वगुणाचे वास्तव्य असल्यामुळे त्याला निर्गुण म्हणता येणार नाही.जे मायिक आहे त्याच्या ठिकाणी शाश्वतपण मानूच नये.(२४)परब्रह्म मायेच्या पलीकडचे असते ते निरंजन म्हणजे निर्विकल्प अथवा निष्कलंक आहे.त्याच्या ठिकाणी अभिमानाचा आरोप करू नये.मुळात जग निर्माण झालेच नाही,मग त्याचे पालन कोण करणार?(२५)असा विचार करून पहावे.सार काय,असार काय याचा शोध घ्यावा.जे अविवेकी असतील त्या लोकांनी लोकरीतीप्रमाणे वाटेल तसे भरकटावे.(पण विवेकी लोकांनी तसे करू नये)(२६) हिरण्यगर्भ ही पालनअवस्था असून तेथे उकार मात्रेची व्यवस्था मानली आहे.विष्णू अभिमानाने पालनाची जबाबदारी घेतो.(२७)हे सर्व मायानिर्मित आहे.ते सर्व विकारी आहे.त्याला अव्याकृत कारणाने निर्माण केले आहे.(२८)आकाररहित असून जे विकार पावते ते अव्याकृत होय.त्यास सत् म्हटले तर ते नाश पावणारे आहे.त्यास असत् म्हणावे तर जगत्कार्य हे त्याचे कार्य आपल्याला दिसते. (२९) त्यामुळे त्याचे सदसत्(सत् असत्)असे वर्णन करावे लागते. हिरण्यगर्भाची उभारणी जेथून झाली ते अव्याकृत अज्ञान तमाची जणु खाणच आहे.(३०)त्याला परमात्मा म्हणताना लाज कशी वाटत नाही? जो असत्,जड,दु:खात्मक आहे.तो ज्ञानघन परमात्मा कसा असेल?(३१)या सर्वांचा शेवटी संहार होणारच आहे.अज्ञान म्हणजे खरोखर अंधकारच आहे. ज्ञानकाळ येताच अज्ञान तग धरू शकत नाही.(३२)

**प्रलय असे जयासी । कैसा म्हणावा अविनाशी । मकार मात्रा तयासी। नाम आलें।।३३।। रुद्र तयाचा अभिमानी। नेणीव रूप तमोगुणी । उत्पन्न झालें तयालागुनी । संहार करी।।३४।। उत्पन्नचि झालें नसतां। संहार बोलावा केउता। तेणेंविण अभिमान वार्ता । बोलोंचि नये।।३५।। हें असो सदाशिव । गुण मायेचा स्वभाव । गुणातीत देवाधिदेव । कळला पाहिजे।।३६।। अव्याकृत प्रलय मकार । चौथा अभिमानी महेश्वर । माईक कळतां हा विचार । पुढें साच तें कळें ।।३७।। कार्यकारणासी कारण । स्वरूपीं झालें जें स्फुरण । मी ब्रह्म हे आठवण। मूळमाया ती ।।३८।पाणियावरी दिसे तरंग। म्हणों नये तो अभंग । नट जैसा आणी सोंग । परी सोंग तें नट नव्हे ।।३९।। जेथें शाश्वतता न दिसे । तें जाणावें माईक ऐसें । म्हणोनि परब्रह्म अनारिसें । तया विलक्षण ।।४०।। स्फुरणेंवीण सर्वसाक्षित्व। कैसें मानावें सत्यत्व । कार्येवीण कर्तृत्व । न ये जैसें ।।४१।। तिही मात्रांसी आधार । अर्धमात्रा हा निर्धार । नसतां तिहींचा विकार । मग आधार कोणा ।।४२।। स्फुरणीं चैतन्य बिंबिलें । तें शबलब्रह्म बोलिलें । अभिमानें नांव पावलें । सर्वेश्वर ऐसें ।।४३।।**

---

ज्याला प्रलय आहे. त्याला अविनाशी कसा म्हणावा? त्याची मात्रा मकार या नावाने ओळखली जाते.(३३) त्याचा अभिमानी देव रुद्र असून अज्ञानरूप तमोगुण हा त्याचा गुण आहे. जे जे उत्पन्न झाले त्याचा तो संहार करतो.(३४) खरे पाहता वरील सर्व गोष्टी उत्पन्नच झाल्या नाहीत. मग त्यांचा संहार होतो असे तरी कसे म्हणावे? पण त्या शिवाय अभिमानाची गोष्ट तरी कशी करावी?(३५) हे असू द्या. शंकर सदाशिव हा गुणमायेचा स्वभाव असून देवाधिदेव हा गुणातीत आहे, हे कळले पाहिजे.(३६) अव्याकृत हा देह, प्रलय हा अभिमान, मकार ही त्याची मात्रा आणि अभिमानी देवता महेश्वर इत्यादी सर्व मायिक आहेत हे कळल्याबरोबर सत्य काय ते आपोआप स्पष्ट होईल.(३७) कार्यकारणांचेही कारण असणाऱ्या स्वरूपामध्ये जे स्फुरण होते, तेथे 'मी ब्रह्म आहे' असे स्मरण होते. त्याला मूळमाया म्हणतात.(३८) पाण्यावर जो तरंग दिसतो त्याला अभंग म्हणता येत नाही. नट ज्याप्रमाणे एखादे सोंग घेतो पण ते सोंग म्हणजे नट नव्हे, हे ओळखता आले पाहिजे.(३९) जेथे शाश्वतता दिसून येत नाही, ते मायिक म्हणजे खोटे आहे असे जाणून घ्यावे. म्हणून परब्रह्म हे त्याहून वेगळे आहे, विलक्षण आहे.(४०) ज्याप्रमाणे कार्यावाचून कर्तृत्व (कर्तेपणा) येत नाही, त्याप्रमाणे स्फुरणावाचून सर्वसाक्षित्वही येत नाही. त्या सर्वसाक्षित्वालाही सत्य मानता येत नाही.(४१) अकार, उकार व मकार या तिन्ही मात्रांचा अर्धमात्रा हा आधार आहे. (अर्धमात्रा म्हणजे ॐ या अक्षरातील चंद्रबिंदू होय.) पण वरील तिन्ही मात्रारूप विकारच मुळात अस्तित्वात नसेल तर ती अर्धमात्रा कुणाचा आधार होऊ शकेल? (४२) स्फुरणामध्ये मूळ चैतन्याचे जे प्रतिबिंब पडते त्याला शबलब्रह्म असे म्हणतात. सर्वसाक्षित्वाचा ते अभिमान बाळगते. त्या अभिमानी देवतेला सर्वेश्वर असे नाव आहे.(४३)

**सर्वचि जेथें नाहीं। तरी ईश्वरत्व तैसेंचि पाही। आतां हें माईक सर्वही। शाश्वत तें एक।।४४।। जेथें मायाचि स्पर्शेना। आहे परि दिसेना। न दिसे परि लोचना । माजीं भरलें।।४५।। दृश्या सबाह्यअंतरीं । व्यापून असंभाव्य बाहेरी । ते मर्यादा कोण करी । अनंत अगाध।।४६।। समुद्रामध्यें खसखस । तैसें परब्रह्मीं द्रश्य । जालेंचि नसतां तयास। उगेंचि बोलावें।।४७।। बोलिल्यावीण कळेना । सिद्धांत वचनीं सांपडेना । जें जें बोलिजे तें जाणा। तो पूर्वपक्ष।।४८।। शब्द पूर्वपक्ष सांडावा। अनुभवें लक्षांश धुंडावा । कळतां शब्दाचा गोवा। कांहींच नसें।।४९।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ईशतनुनिरूपणप्रकारे । प्रथमसमासः ।।१।।**

**।।श्रीराम समर्थ।। समास २रा - तत्पदपंचकोशप्रकार**

**ब्रह्म दृष्टी दिसेना । मनास तेंहि भासेना। परिपूर्ण कळेना। अज्ञानासी।।१।।परब्रह्म कळल्यावीण। चुके कैसें जन्म मरण । विवेकें जाणावें निर्गुण । नानायुक्ति अनुभवें।।२।। एकदां जरी न कळलें। तरी वारंवार पाहिजे विचारिलें। श्रवणमननें आभ्यासिलें। पाहिजे पुनःपुनः।।३।।**

---

जेथे सर्वच अस्तित्वात नाही, तेथे सर्वेश्वर देखील तसाच बिनबुडाचा आहे असे समजावे. आतापर्यंत वर्णन केलेले हे चारी देह मायिक असून जे शाश्वत आणि एकटेच आहे ते परब्रह्म तेवढे सत्य आहे.(४४) त्या ठिकाणी माया स्पर्श करू शकत नाही, ते आहे पण दिसत नाही, ते दिसत नाही, पण डोळ्यामध्ये ते व्यापून राहिलेले आहे.(४५) दृश्य पसाऱ्यास अंतर्बाह्य व्यापून त्याबाहेरही जे ते कल्पनेच्याही पलीकडे राहिलेले आहे त्याची मर्यादा कोणाला सांगता येईल? ते परब्रह्म अनंत असून अगाध आहे.(४६) समुद्रामध्ये जशी खसखस तसे परब्रह्मामध्ये दृश्य विश्व होय. ते दृश्य वास्तविक पहाता झालेलेच नाही. केवळ बोलायचे म्हणून त्याबद्दल बोलावे लागते इतकेच! (४७) पण बोलल्यावाचूनही गत्यंतर नाही. कारण बोलले नाही, तर ते कळणार कसे? पण सत्यरूप सिद्धान्त शब्दांच्या कवेत येणारच नाही. त्याविषयी जे जे बोलू ते ते सर्व पूर्वपक्षच ठरते.(४८) ते शब्दरूप पूर्वपक्षाचा त्याग करावा, अनुभवाने त्यातील लक्ष्यार्थ (सूचित अर्थ) शोधावा. तो एकटा लक्षात आला की शब्दांनी निर्माण केलेला गुंता काहीच राहात नाही.(४९)

**पंचिका ६वी, समास २रा - तत्पदपंचकोशप्रकार**

ब्रह्म दृष्टीस दिसत नाही, मनासही भासत नाही, अज्ञानामुळे त्याचे परिपूर्ण स्वरूप कळत नाही.(१) परंतु त्याचे स्वरूप जाणल्याखेरीज जन्ममरण चुकणार कसे?म्हणून विवेक, विविध युक्तिवाद आणि अनुभव यांच्याद्वारे ते जाणून घ्यावे.(२)एकवार प्रयत्न करून जर ते कळले नाही, तरी पुन:पुन्हा विचार केला पाहिजे. श्रवण मननाच्या द्वारे पुन:पुन्हा त्याचा अभ्यास केला पाहिजे.(३)

**वेद शास्त्र पुराण। करिती नाना निरूपण। तेंचि महानुभाव संतजन। प्रगट करिती ।।४।।परी या जीवाचें अज्ञान । न पालटे भवबंधन । ज्याचें अनंत जन्मीचें साधन । तयासि ज्ञान लाभे।।५।। परी ज्ञानाचा प्रयत्न । सांडू नये न कळे म्हणुन। बळेंचि मनास ओलांडुन । पैलाड जावें ।।६।। पिंडीं उपाधि मन । ब्रह्मांडीं मूळस्फुरण । विचारें तया ओलांडुन । जातां ब्रह्मचि कोंदले ।।७।। एकदा अनुभवें जाणितलें । मग जेथें तेथें कोंदाटलें । पाहतां न पाहतांहि आलें । प्रत्ययासी ।।८।। जरी तें प्रतीतीस आणावें । पंच कोशातें निवडावें। तरी वर्म पडे ठावें । आपेंआप वस्तु ।।९।। स्थूळ ब्रह्मांड दिसतें । ती जाणावीं पंचभूतें । अन्नमय ऐसें तयातें । स्थूळापरी जाणावें ।।१०।। निज वस्तूसी आच्छादन । म्हणोनियां कोशाभिधान । तया अंतरीं ओळखण । हिरण्यगर्भ ।।११।। तेही त्रिविध एकाहुन । एक असती आवरण । सूक्ष्मीं असती कोश तीन । आच्छादक हेतू ।।१२।। क्रिया करण कर्ता। सूत्रात्मा विविध तत्वतां । प्राण मन बुद्धी पाहतां । त्वंपदापरी ।।१३।। विहरणत्वादि धर्म वायूचे । कर्म व्यवहार जीवाचे । आणि क्रियात्व कर्मेंद्रियाचें । प्राणमय कोश।।१४।।**

---

वेद शास्त्र पुराणे जे निरनिराळ्या प्रकारांनी विवेचन करतात.तेच संतजन,महानुभाव आपल्या उपदेशातून प्रगट करतात.(४)पण या जीवाचे अज्ञान एवढे प्रबळ असते की,त्यांचे भवबंधन(संसाराचे बंधन)काही केल्या फिटत नाही.ज्याने अनंत जन्मांमध्ये साधना केली आहे,त्यालाच ज्ञान प्राप्त होते.(५)तरी ज्ञानाचा प्रयत्न मात्र काही कळत नाही म्हणून सोडून देऊ नये.बळाने मनास ओलांडून(मनावर मात करून)पलीकडे जावे.(६)पिंडाच्या ठिकाणी मनाचा मोठा अडथळा(उपाधी)आहे.ब्रह्मांडाच्या ठिकाणी मूळ स्फुरणाचा अडथळा आहे.पण विचाराच्या साहाय्याने हे अडथळे पार केल्यानंतर सर्वत्र ब्रह्मचभरून राहिले आहे.(७)एकदा अनुभवाने(प्रत्यक्ष साक्षात्काराने)ते जाणून घेतले की मग ते सर्वत्र कोंदाटलेलेच आढळते.मग ते पाहिले अथवा न पाहिले तरी प्रत्ययास येते.(८)त्याचा प्रत्यय यावा असे वाटले तर पंचकोशांचा निवाडा करावा.त्यामुळे ब्रह्माचे रहस्य आपोआप कळून येईल.(९)ब्रह्मांडाचे जे स्थूलरूप दिसते ती पंचभूते समजावीत व स्थूलदेहातल्याप्रमाणे त्याला ब्रह्मांडाचा अन्नमय कोश म्हणून ओळखावे.(तो ब्रह्मांडाचा स्थूलदेह होय)(१०) हे स्थूल रूप आत्मस्वरूपाला आच्छादित करते म्हणून त्याला कोश असे नाव प्राप्त होते.त्याच्या अंतर्भागात हिरण्यगर्भ(ब्रह्मांडाचा सूक्ष्म देह)असतो.(११)तोही एकावर एक अशा तीन आवरणांचा बनलेला असतो.सूक्ष्म देहात ज्याप्रमाणे (प्राण,मन,बुद्धी असे)तीन आच्छादणारे कोश असतात त्याप्रमाणे येथेही असतात.(१२)हा हिरण्यगर्भ क्रिया(प्राण),करण(मन),कर्ता (बुद्धी) या तीन तत्त्वांचा बनलेला असतो. त्वंपदाप्रमाणे ही तीन तत्त्वे त्याचे प्राणमय कोश, मनोमय कोश आणि बुद्धिमय कोश होत.(१३)वायूचे विहरणादी (संचार इ.) स्वभावधर्म,जीवांचे (प्राणिमात्रांचे) कर्मव्यवहार व कर्मेन्द्रियांकडून होणाऱ्या क्रिया या सर्वांनी मिळून ब्रह्मांडाचा प्राणमय कोश होतो.(१४)

**क्रियात्मकाचें कारण । भोग्यादिकांचें साधन । ज्ञानेंद्रिय आणि मन । मनोमय कोश।।१५।।**
**सर्वांचें जें कर्तेपण। जगत्कार्या निमित्तकारण । ज्ञानसूत्रें सर्वां करी भ्रमण । सूत्रधारापरी।।१६।।**
**परी भूतांचे राहे आंतरीं। चेष्टवीतसे नानापरी। जगत्कर्माचे व्यापारीं। अलिप्त असे ।।१७।।**
**तो जाणिजे विज्ञानमय। सर्वबुद्धीचा समुदाय । जेथें असे समष्टिमय। चतुर्थ कोश ।।१८।।**
**एवं क्रिया कर्म कर्तेपण। हें सूत्रात्म्याचें लक्षण । निरोपिले कोश तीन । समष्टिरूप।।१९।।**
**तया कर्तृत्वाचें अंतरीं। सूक्ष्मत्वें वास करी। तो आनंदमय निर्धारी । सर्व सुखाचा कंद।।२०।।**
**तरी तो न ये प्रतीती। म्हणसी तरी सूक्ष्म अति। गूढ असे सर्वा भूतीं। अग्र्यबुद्धीनें कळें।।२१।।**
**पटामाजीं तंतू भरला। परि अंशूनें तंतु जाला । सूक्ष्मदृष्टी पाहतां आला । जाण तयासी।।२२।।**
**सर्व बुद्धीसी अधिष्ठान । कर्तृत्वाचेंहि कारण । सूक्ष्मरूपें अवस्थान । विज्ञानाचें ।।२३।।**
**ब्रह्मा विष्णु आणि हर। करितां शिणती व्यापार। तयासी विश्रांतिमंदिर । परम जे का।।२४।।**
**जैसे पक्षी व्यापारार्थ फिरती।व्यापारतां बहु कष्टती।मग नीडाकडे धांवती।पक्ष संकोचोनी।।२५।।**
**तेणेपरी कर्ताकरण। क्रियादिकांसी घेऊन । विश्रामा येती आनंदघन। सर्वाधार जो का।।२६।।**

---

या क्रियात्मक प्राणमय कोशाचे कारण,भोग्य अशा विषयांचे साधन म्हणजे ज्ञानेंद्रिये व मन म्हणजे मनोमय कोश होय.(१५)या सर्वांचे जे कर्तृत्व अथवा कर्तेपण,जे जगद्रूप कार्याचे निमित्तकारण,जे सूत्रधाराप्रमाणे ज्ञानाच्या सूत्राने सर्वांना फिरविते,(१६)आणि सर्व भूतांच्या अंत:करणात राहून त्यांच्याकडून विविध क्रिया करविते,जगरहाटीपासून स्वत: मात्र अलिप्त असते.(१७)त्या तत्त्वाला विज्ञानमय कोश असे समजून घ्यावे.सर्व सजीवांच्या बुद्धींचा समुदाय तेथे समष्टिरूपाने असतो,तो ब्रह्मांडाचा चौथा विज्ञानमय कोश जाणावा.(१८)अशा तऱ्हेने सूत्रात्मा अथवा हिरण्यगर्भ याचे लक्षण म्हणजे क्रिया,कर्तेपण आणि कर्म होय.अशाप्रकारे सूत्रात्म्याच्या तिन्ही समष्टिरूप कोशांचे निरूपण झाले.(१९)त्या कर्तृत्वाच्या (विज्ञानमय कोशाच्या)गर्भात सूक्ष्मत्वाने वास्तव्य करणारा आनंदमय कोश आहे.तो सर्व सुखांचा कंद आहे.(२०)हा आनंदमय कोश अनुभवास येत नाही,असे म्हणू नकोस.तो अतिशय सूक्ष्म असून सर्व भूतांमध्ये गूढरूपाने असतो.तो सूक्ष्मबुद्धीनेच कळेल.(२१)पटामध्ये(वस्त्रामध्ये)तंतू भरलेला असतो.पण तंतू ज्या सूक्ष्म कणांचा बनलेला असतो.तो सूक्ष्म दृष्टीनेच (अग्र्य बुद्धीने–अग्र्य=टोकदार) पाहता येतो. त्याला समजून घे.(२२)हा आनंदमय कोश सर्व बुद्धीचे अधिष्ठान असून सर्व कर्तृत्वाचेही कारण आहे. विज्ञानमय कोशाचे ते सूक्ष्मतर असे अधिष्ठान आहे.(२३)ब्रह्मा,विष्णू,महेश हे विविध व्यापार करतात.शेवटी ते थकून जातात त्यांचे हे सर्वात श्रेष्ठ असे विश्रांति मंदिर आहे.(२४)ज्याप्रमाणे पक्षी आपापल्या उद्योगासाठी आकाशात फिरतात.त्या उद्योगांमुळे त्यांना पुष्कळ कष्ट होतात.मग आपल्या पंखांचा संकोच करून आपल्या घरट्याकडे ते धाव घेतात.(२५)त्याप्रमाणे कर्ता (बुद्धी),करण(मन) ही क्रियादिकांना (प्राणांना)घेऊन सर्वांचा आधार असलेल्या आनंदाने ओतप्रोत असलेल्या या कोशाकडे धाव घेतात.(२६)

**जें जें ज्यापासून जालें । तें तें त्या कारणीं राहिलें । तें कारणही कार्यत्वें मिळालें। निज कारणासी ।।२७।। तरी अवधारा आक्षेप । सर्वांसि आनंद बीजरूप । तरि सर्वांसि आपेआप । मोक्ष जाला ।।२८।। याचें ऐका उत्तर । सुषुप्तींत क्षीण व्यापार । विश्रामती जीव समग्र। परी मोक्ष तो नव्हे ।।२९।। जरी ज्ञानें जाय अज्ञान । तेचि होती पावन। येर जे का अज्ञान । पुन्हा जनन पावती ।।३०।। जीवाचे अज्ञान जाय । या हेतू कोश आनंदमय । ज्ञानें मूलाज्ञान नष्ट होय । तरिच ब्रह्मप्राप्ती ।।३१।। उपादान माया प्रधान । सांख्यवादियांचें लक्षण । वेदांतीं तया अभिधान । अज्ञान ऐसें ।।३२।। तरी सांख्यमत स्वीकारिलें । म्हणसी तरी अज्ञान नाथिलें । सत्यत्वेंचि प्रतिपादिलें । सांख्यापरी न वचे।।३३।। सर्व शास्त्राचा स्वीकार । वेदांतीं करिती साचार । निरसावया भेद मात्र । मतें दूषिती ।।३४।। मायाप्रधानत्वादि टाकिले । तरी सांख्य वेदांत संमत जाले । तेणें सत्यत्वें प्रतिपादिलें । म्हणुन दूषण ।।३५।। असो कोश आनंदघन। सुषुप्तीपरि अज्ञान। स्वानुभवें होतां हनन । जन्ममरण चुके।।३६।।इकडे दृश्य तिकडे स्वरूप । मध्यें शून्यत्वाचा**

---

जे जे ज्यापासून झाले ते ते त्या त्या कारणामध्ये राहतात. शेवटी ते कारणही तत्पूर्वीच्या मूळ कारणाचे कार्यच असते. म्हणून ते कारणही निज मूळ कारणात विलीन होते.(२७)आता यावर एक आक्षेप ऐका. जर आनंद अशा प्रकारे सर्वांनाच बीजरूपाने आधार असेल तर सर्वांनाच आपोआप मोक्ष मिळणार असे होत नाही काय?(२८)आता या आक्षेपाचे उत्तर ऐका. झोपेत सर्व व्यापार थांबतात. सर्व जीवांना विश्रांती मिळते. पण तो मोक्ष नव्हे.(२९)ज्ञानाने ज्यांचे अज्ञान नष्ट होते तेच मुक्त होतात. पावन होतात. बाकीच्या अज्ञानी लोकांना पुन्हा जन्म घ्यावाच लागतो. (झोपेत अज्ञान नष्ट होत नाही.)(३०) जीवाचे अज्ञान जावे म्हणूनच त्या आनंदमय कोशाची योजना आहे. ज्ञानाने मूळ अज्ञान नष्ट होईल, तरच ब्रह्मप्राप्ती शक्य आहे.(३१) सांख्यवादी ज्या माया अथवा प्रधान यांना उपादान कारण मानतात त्यालाच वेदान्तामध्ये अज्ञान असे नाव आहे.(३२)जरी सांख्यमत मान्य केले तरी सांख्य ज्याप्रमाणे मायेचे सत्यत्व स्वीकारतात त्याप्रमाणे वेदान्तात अज्ञान हे सत्य मानत नाहीत. ते अज्ञान हे खोटे मानतात. त्याला सत्यत्व देता येत नाही. (सांख्यमताप्रमाणे वेदान्तात अज्ञान सत्य मानत नाहीत.)(३३) वेदान्ती सांख्यांच्या सर्व शास्त्राचा स्वीकार करतात. फक्त जेथे भेद असेल तेथे त्या भेदाचे निरसन करण्यासाठी त्या भिन्न मतांना दूषण देतात. (त्या भिन्न मतांवर टीका करतात.)(३४) मायेला प्रधान मानणे, तिला सत्य मानणे हे जर सांख्यांनी सोडून दिले तर सांख्य आणि वेदान्तमत एकच आहेत. त्यांनी मायेला सत्य मानले म्हणून वेदान्तामध्ये त्यांना दोष लावला आहे.(३५) असो. हा आनंदमय कोश सुषुप्तीप्रमाणे आहे खरा, पण स्वानुभवाने अज्ञान नष्ट झाले तरच जन्ममरण टळणार आहे. अन्यथा नाही.(३६) एका बाजूला दृश्य पसारा आहे (जागृतीचा) दुसऱ्या बाजूला स्वरूप (ब्रह्मात्मैक्य)

**आरोप । ज्ञानें निरसतां असद्रूप । मग सद्रूप सहजची ।।३७।। म्हणून नेणीव सांडून। ज्ञानघन होतां ज्ञान । अज्ञान जातां दुसरें ज्ञान । तेंहि जाय त्यासवें ।।३८।। मग केवळ ब्रह्मचि उरे । त्रिपुटीज्ञान ओसरे । साधक साध्यत्व नुरे । साध्यरूप ।।३९।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । तत्पदपंचकोशप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - मिथ्यात्वविवेचन

**सर्वांची बाधा न होतां। सर्वब्रह्म नव्हे ऐक्यता । निःशेष हानि होय द्वैता ।अद्वैत निवळे।।१।।बाधा म्हणिजे मिथ्या ज्ञान। सत्यत्वबुद्धीचें हनन। निःशेष जावें निपटुन। तरी श्रुतिविरोध।।२।। ज्ञानें मिथ्या ओळखावें। मग दिसेना सुखें नावें । परी मिथ्यात्वाचें जाणावें । वर्म कैंचें।।३।। मुखें प्रपंच मिथ्या म्हण।अनुभव पुसतां लाजिरवाणें।ढोबळे दृष्टीचें पाहणें। उपेगा न ये।।४।। जैसी रज्जु रज्जुत्वें ओळखितां।सर्पाची नुरेचि वार्ता। तैसें स्वानुभवें ब्रह्म जाणतां। न म्हणतां मिथ्या सहजचि।।५।।जगासि जगत्व केतुले।स्वानुभवें पाहिजे कळलें।संपूर्ण जडत्व दिसूं**

---

आहे. मध्ये शून्यावस्थेचा आरोप आहे. ज्ञानाने असद्रूपाचा निरास झाला की सहजच सद्रूपाची प्राप्ती होते.(३७) म्हणून अज्ञान टाकून जेव्हा सर्व ज्ञानमय होते, अज्ञान गेल्यानंतर जी ज्ञानावस्था येते (मी ब्रह्म आहे, ही जाणीव) तीही त्या अज्ञानाबरोबरच नष्ट होते.(३८) त्यानंतर केवळ ब्रह्मच उरते. त्या ज्ञानामध्ये त्रिपुटीने युक्त असलेले (ज्ञाता,ज्ञेय,ज्ञान) ज्ञान ओसरते. साधक आणि साध्य असा भेद नष्ट होऊन सर्वच साध्यरूप होते.(३९)

## पंचिका ६वी, समास ३रा - मिथ्यात्वविवेचन

सर्वांची मिथ्या (बाधा) म्हणून प्रतीती आली नाही तर सर्व ब्रह्माशी ऐक्य पावणे कठीण आहे. द्वैताची निःशेष हानी होईल तेव्हाच अद्वैताची प्राप्ती होते.(१) बाधा म्हणजे मिथ्या ज्ञान होय. मिथ्याज्ञान म्हणजे सत्यत्वाच्या विचाराचा नाश. मिथ्याज्ञान संपूर्णपणे नाहीसे व्हावे असे म्हणावे तर श्रुतीला (वेदाला) विरोध येतो. (श्रुतीमध्ये प्रपंचाचे वर्णन आढळते. तेव्हा मिथ्याज्ञान संपूर्णपणे नष्ट व्हावे असे म्हटल्याने श्रुतिविरोध येतो.)(२) ज्ञानाने मिथ्या म्हणून ओळखले तरी पुरेसे होईल. मग त्यानंतर खुशाल दिसेना का?परंतु मिथ्यात्वाचे वर्म मात्र समजून घ्यावे.(३) तोंडाने प्रपंच मिथ्या म्हणून बोलत राहायचे,पण कोणी अनुभव विचारला तर लाजिरवाणी अवस्था व्हावी अशा ढोबळ दृष्टीने पाहणे उपयोगाचे नाही.(४)एकदा दोरीचे दोरीपण ओळखले की, सापाची गोष्टच उरत नाही. त्याप्रमाणे स्वतःच्या अनुभवाने ब्रह्माची ओळख पटली की बाकीचे सर्व मिथ्या आहे असे न म्हणतादेखील सहजच मिथ्या ठरतात.(५)जगाचे जगपण म्हणजे काय, हे स्वानुभवानेच कळले पाहिजे. संपूर्ण जगच कशामुळे

**लागलें । कासयानें ।।६।। एक दिसे एक भासे । चंचल जड दोन ऐसे । परि ते दिसती कैसे। सत्य मिथ्या ।।७।। मृत्तिकेवाचून कांहीं । घटासी वेगळें सत्यत्व नाहीं । अस्तिभातिविण पाहीं। जगा रूप कोणतें ।।८।।ज्याच्या असणेंचि असे । ज्याचें भातित्वें दिसे । सर्व हे जयास्तव भासे।[४३] हें श्रुतीचें वचन।।९।।श्रुति युक्ति अनुभव । जगा वेगळेपणें अभाव। रूप क्रिया आणि नांव । चौथें किमपि नाहीं।।१०।।स्थूल उदर कंठ लहान । हें इतुके रूप घट हें अभिधान । व्यापार हेचि क्रिया पूर्ण । त्रिविधा एक मृत्तिका।।११।।तैसा जडाचा आकार। दिसें तें रूप साचार।नामें ठेविलीं अपार । ओळखीकरितां ।।१२।।तिसरा व्यवहार होता। क्रियात्व आलें पाहतां। नाम रूप क्रिया तत्त्वतां। तिन्हीं अस्तिभाति।।१३।। नेणून जरी घट घेतां। मृतिकाच येतसे हातां। जगव्यापार होत असतां। अस्तिभातिप्रियत्व।।१४।। नाम रूप क्रिया तीन। व्यवहारती जीव संपूर्ण । सप्तान्नब्राह्मणीं वचन । एतद्विशीं असे[४४]।।१५।। समष्टिरूप जीवानें। उत्पन्न केली सप्तधान्नें । त्यामाजी तीन अन्नें । आपणासाठीं निर्मिला।।१६।। सप्तान्नें तीं कोणतीं।एक साधारण।जया म्हणती।यवव्रीह्यादि धान्यें जीं तीं। मनुष्यासाठी।।१७।।**

---

जड भासते,(६)एक दिसते,एक भासते,एक चंचल आहे,एक जड आहे,हे कळते;पण ते सत्य आहे,हे मिथ्या आहे हे कसे काय दिसते?(७)घटाला मातीवाचून वेगळे सत्यत्व नाही.त्याप्रमाणे अस्ति, भाति म्हणजे असणे,भासणे यांवाचून जगाला दुसरे रूप नाही.(८)कारण 'त्याच्या असण्यामुळे ते असते, त्याच्या प्रकाशण्याने ते दिसते, त्याच्यामुळेच हे सर्व भासते' असे श्रुतीचेच वचन आहे.(९)श्रुती,युक्ती आणि अनुभव या मार्गांनी जगाला ब्रह्मावेगळे स्वतंत्र अस्तित्व नाही.जग म्हणजे रूप, क्रिया आणि नाव हेच असून याशिवाय चौथे काही नाही.(१०)स्थूल उदर (पोट), लहान कंठ आणि विशिष्ट आकार, घट हे नाव आणि पाणी साठवणे हा व्यापार म्हणजे क्रिया या तीन गुणांनी घट बनतो. रूप,नाव आणिक्रिया या तिन्ही प्रकारात मृत्तिका हे एकच सत्य आहे.(११)त्याप्रमाणे जडाचा आकार, त्याचे जे दिसते ते रूप आणि ओळखीकरता ठेवलेली अनेक नावे,(१२) तिसरा त्याचा होणारा व्यवहार (खरेदी विक्री,पाणी इत्यादीची साठवण)घडला की त्याचे क्रियात्व स्पष्ट होते अशा प्रकारे रूप, नाम आणि क्रिया यांनी घट वेगळा वाटत असला तरी या तिहींनी त्याची अस्ति (आहे), भाति (दिसतो) आणि प्रियत्व (तो उपयोगी आहे)हीच लक्षणे स्पष्ट होतात.(१३)अगदी नकळत घट हातात घेतला तरी हातात मृत्तिकाच येते. त्याप्रमाणे जगाचे निरनिराळे व्यापार घडत असताना त्या सर्वांचे खरे स्वरूप अस्ति, भाति, प्रिय एवढेच असते.(१४) सर्व जीवांचा व्यवहार नाम, रूप आणि क्रियांनी चालतो. त्या संदर्भात बृहदारण्यकोपनिषदातील सप्तान्न खंडात (बृ.१.५.१)म्हणजेच सप्तान्न ब्राह्मणात एक वचन आहे.(१५)समष्टिरूप जीवाने सात धान्ये निर्माण केली.त्यापैकी तीन अन्ने स्वत:साठी निर्माण केली.(१६)ही सप्तान्ने कोणती?तर ज्यांना सर्वसाधारण अन्न असे म्हणतात ती जव,गहू,साळी इत्यादी जी धान्ये ती मनुष्यासाठी निर्माण केली.(१७)

**दुसरें क्षीर पशूकरितां।अन्नातें होय निर्मिता।देवार्थ अन्नें तत्त्वतां।दर्शपूर्णमास दोन्ही।।१८।। प्राण वाणी मन।आत्मार्थ केले निर्माण।तिहींचें करितां भोजन।सुखदुःख पावे।।१९।। अन्नापासून मन जालें।आपाचें प्राण निर्मिलें।छांदोग्य उपनिषदीं बोलिले।तेजोमयी वाणी।।२०।। नामरूपक्रिया जगासी।उभविले प्राणादिकांसी।हे विरोध जरी म्हणसी।तरी अवधारीं पां।।२१।। वाणी म्हणिजे नाम।मनचि रूप हा नेम।क्रिया प्राण हें वर्म।कळलें पाहिजे।।२२।।एवंनामरूप क्रिया।जीवव्यवहारे तिन्हीं यया।अज्ञानें शिणतो वायां।सत्यत्वबुध्दीनें।।२३।।तरी नामरूपक्रियेतें। वेगळें सत्यत्व कोणतें।विवंचून पाहतां तयातें।अस्तिभाति।।२४।।अस्तिभाति ओळखितां। नामरूपाची माईक वार्ता।येणें रीती या जगता।श्रुति बाध बोले।।२५।।जग हें सत्यचि म्हणतां।ब्रह्मलक्षणाची नव्हे सिध्दता।ब्रह्मलक्षणें सिध्द होतां।सहज जगा मिथ्यात्व।।२६।।सर्व ब्रह्म श्रुति बोले।या दिसती विरोध आले ।या आक्षेपा ऐकिलें।पाहिजे उत्तर।।२७।।सर्व म्हणिजे बहुत।ब्रह्म तें एक निश्चित।सर्व एका विरोध दिसत।म्हणोनि बाधित श्रुति सर्वा।।२८।।नाना हें कांही नसे।श्रुति सर्वा बाधितसे।आहे तें ब्रह्मचि असे।एकरूप ।।२९।।**

---

दुसरे दूध हे अन्न पशूंसाठी त्याने निर्माण केले आणि देवांच्यासाठी निर्माण केलेली अन्ने म्हणजे अमावास्या,पौर्णिमा या तिथींना करावयाची दर्श, पौर्णमास ही दोन श्राद्धे होत.(१८) त्याने स्वत:साठी प्राण, वाणी आणि मन ही अन्ने निर्माण केली.या तिहींचे भोजन करताच तो सुखदु:खे भोगू लागतो.(१९) अन्नापासून मन झाले,पाण्यापासून प्राण निर्माण केले आणि तेजापासून वाणी निर्माण केली असे छान्दोग्य उपनिषदात सांगितले आहे.(२०) नाम,रूप आणि क्रिया यांनी युक्त अशा जगासाठी प्राण इत्यादी निर्माण केले.यात विरोध येतो असे म्हणशील तर नीट ऐक.(२१) वाणी म्हणजेच नाम होय,मन हेच रूप होय आणि क्रिया म्हणजे प्राण होत. हे वर्म येथे कळले पाहिजे.(२२)अशा प्रकारे नाम, रूप, क्रिया यांच्याशी जीवाचा व्यवहार चालतो.त्यांना अज्ञानामुळे सत्य मानून तो विनाकारण कष्ट भोगतो.(२३) तेव्हा नाम, रूप, क्रिया यांना वेगळे सत्यत्व असे कोणते आहे? त्यांचा नीट विचार करून पाहिले तर अस्तिभाति हेच त्यांमध्ये आढळेल.(२४)एकदा त्यांमधील अस्ति, भाति ओळखले की,नाम, रूप इत्यादी असत्य म्हणजे खोटी आहेत हे लक्षात येते. अशा प्रकारे श्रुती (म्हणजे वेद) या जगाला बाधा म्हणजे मिथ्याज्ञान म्हणते,(२५)जग हे सत्यच आहे असे म्हटल्यावर ब्रह्म लक्षण सिद्ध होत नाही आणि ब्रह्मलक्षण सिद्ध करू गेले तर जगाला आपोआप मिथ्यात्व येते.(२६)श्रुती तर सर्वच ब्रह्म आहे, असे म्हणते.मग वरील मताला विरोध येत नाही काय?या आक्षेपाचे उत्तर आता ऐका.(२७)सर्व म्हणजे पुष्कळ. ब्रह्म एकच आहे,हे निश्चित आहे. सर्व आणि एक या दोन शब्दांत विरोध दिसत असल्यामुळे श्रुती 'सर्वा'ला मिथ्या ठरवते.(२८)किंवा हे काही नाहीच असे म्हणून श्रुती 'सर्वा'चा निषेध करते.जे काही आहे ते ब्रह्मच आहे आणि ते एकरूपच आहे,असे श्रुतीचे सांगणे आहे.(२९)

**साधकाचे अंतरीं । बैसली नानात्वाची परी। सर्व ब्रह्म बोध करी । श्रुतिमाउली हे ।।३०।।सर्व मिथ्या हें कळावें। तरिच ब्रह्म अनुभवावें। मिथ्या सर्पातें सांडावें। रज्जुज्ञान तरी होय।।३१।। ब्रह्म जाणतां अखंड । ब्रह्मीं बुडालें ब्रह्मांड। माया अविद्या थोतांड । वितळून गेलें ।।३२।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । मिथ्यात्वविवेचनप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। - समास ४था - ईश्वराभासप्रकार

**श्रोता वक्तयासी म्हणे । जग मिथ्याचि कोटिगुणें । परी जीव ईश सत्यपणें । वेगळे असती ।।१।। हे चेतनत्वें सदोदित । म्हणावे कैसें नाशवंत । ऐकोनी आक्षेपाचा संकेत । वक्ता बोलता जाला ।।२।। जीवेश उभयांप्रती । आभासातें निर्मिती । माया अविद्या हे श्रुति । तरी सत्य कैसे ।।३।। दर्पणीं प्रतिबिंबिलें । वाटे मुख दुसरें जालें । परी तें सर्वथा नाथिलें । आभासमात्र।।४।।जरीं जाले जीवेश सत्य । माया अविद्या कैसेनि मिथ्य । आणि जीवेशांचें कृत्य । जगहि सत्य जालें।।५।।जग जीव सत्य असतां । ब्रह्म लक्षणाची नसे वार्ता । ऐसें विरोधी बोलतां । वेदांत-हानी।।६।।माया अविद्या नाथिली। प्रतिबिंबा**

---

साधकांच्या मनातच बहुविधपणा घोळत असतो. त्यासाठी हे बहुविधत्व सर्व ब्रह्मच आहे असेही श्रुती सांगते. दोन्ही वचनांचा अभिप्राय एकच आहे.(३०)सर्व मिथ्या आहे असे कळले तरच ब्रह्माचा अनुभव येऊ शकतो. मिथ्या सर्पाचा त्याग केल्यावरच दोरीचे ज्ञान होऊ शकते.(३१)अखंड ब्रह्म जाणले की त्या ब्रह्मात सर्व ब्रह्मांड बुडून जाते आणि माया,अज्ञान इत्यादीचे थोतांड वितळून जाते.(३२)

### पंचिका ६वी, समास ४था - ईश्वराभासप्रकार

श्रोता म्हणतो,"जग कोटि पटींनी मिथ्या आहे,पण जीव व ईश्वर सत्य आहेत म्हणून ते वेगळे आहेत.(१)ते दोघेही चेतन असल्यामुळे त्यांना नाशवंत कसे म्हणता येईल?"या आक्षेपाचा रोख ऐकून घेतल्यानंतर वक्ता उत्तर देतो.(२)मायेत ब्रह्माचे जे प्रतिबिंब पडते ते ईश्वर आणि अविद्येत ब्रह्माचे जे प्रतिबिंब पडते ते जीव.असे असल्यामुळे जीव-ईश्वर या दोन्ही आभासांना म्हणजेच प्रतिबिंबांना अनुक्रमे अविद्या आणि माया निर्माण करतात असे श्रुतीच सांगते.मग त्यांना सत्य कसे म्हणावे?(३)आरशात पडलेल्या मुखाच्या प्रतिबिंबाकडे पाहिल्यावर असे वाटते की हे दुसरेच मुख आहे.पण ते सर्वप्रकारांनी खोटे व आभासरूप असते.(४)जर जीव व ईश्वर सत्य असतील तर माया आणि अविद्या खोट्या कशा असतील? आणि जीवेशांनी निर्माण केलेले जगही सत्यच मानावे लागेल.(५) जग आणि जीव यांना सत्य मानले की ब्रह्म लक्षणांची गोष्टच काढता येणार नाही; असे विरोधी मत मांडल्यामुळे वेदान्ताची हानी होते ती वेगळीच.(६) माया अविद्या या खोट्या आहेत. प्रतिबिंबाला कधी सत्य मानता आणि

**सत्यता कैसी आली । छांदोग्य श्रुति बोलिली । अल्प तें भूम नव्हे।।७।।मिथ्यात्व चिदाभासाचें । पूर्वी निरोपिलें साचें । उपाधियोगें प्रतिबिंबाचें । दिसणें असें।।८।।श्रोता बोले पुढती । मिथ्यात्व असो जीवाप्रति । परी ईश्वर स्वयंज्योति । मिथ्या न म्हणावा।।९।। ईशाचेनि सत्यपणें। जीव मिथ्या कोण म्हणें।उभय आभासाचीं लक्षणें।सारिखीं असतां।।१०।। उभयता आभास कैसे । सर्वज्ञ किंचिज्ज्ञ भेद असे । किंचिज्ज्ञ मिथ्या आभासे । सर्वज्ञ तो साच।।११।।उपाधि उंच नीच दिसतां । प्रतिबिंबा नसे भिन्नता । त्या उभय उपाधि हरपतां। प्रतिबिंब कोठें पडे।।१२।।घटीं प्रतिबिंब नाथिलें। सरोवरींच्या सत्यत्व आलें । घटोदक सरोवरहि आटले । तरी दशा समान।।१३।।म्हणोनि ईश-जीव-जगासी । सत्यत्वकल्पना कायसी । ब्रह्म-अनुभवें तयासी ।रूप कैचें ।।१४।। जग जीव मिथ्या भासले । हें बोलणें नीटचि जालें । सर्वज्ञासी मिथ्या केलें । न वचे कोणी ।।१५।। ज्याच्या भयें वायु हाले। ज्या भयें चंद्र सूर्य चाले । भूमंडळ आपें धरिलें । ज्याच्या भयें ।।१६।। आणि षड्गुण जयाप्रती । नित्य तया भगवान म्हणती । ज्ञान वैराग्य यश कीर्ति । मोक्ष संपत्ति ऐश्वर्य।।१७।।**

---

येते काय?यावर छान्दोग्य श्रुतीच असे सांगते की,'जे अल्प आहे ते कधीच महान ठरत नाही.'(७)चिदाभास मिथ्या आहे हे पूर्वीच सांगितले आहे.केवळ उपाधीमुळे तो प्रतिबिंबासारखा दिसू लागतो.(८)श्रोता यावर विचारतो की,जीवाला खोटेपण द्यायचे तर द्या,पण ईश्वर तर स्वयंप्रकाश असल्यामुळे त्याला मिथ्या म्हणू नये.(९) ईश्वराला सत्यत्व देऊन जीवाला तेवढे मिथ्या कसे म्हणता येईल?कारण दोघेही सारखेच आभासरूप आहेत,दोघांचीही लक्षणे सारखीच आहेत.(१०)यावर श्रोता म्हणतो की, तुम्ही ईश्वर व जीव या दोहोंनाही आभास कसे म्हणता?त्यांच्यात सर्वज्ञ आमि किंचिज्ज्ञ असा भेद आहे.ईश्वर हा सर्व काही जाणतो म्हणून तो सर्वज्ञ आहे.जीव हा फक्त मर्यादित गोष्टीच जाणतो,म्हणून तो किंचिज्ज्ञ आहे.म्हणून अल्पज्ञान असणाऱ्या जीवाला तुम्ही आभास माना,पण सर्वज्ञ ईश्वराला तुम्ही सत्य मानलेच पाहिजे.(११)यावर वक्त्याचे उत्तर असे की,उपाधी कमी जास्त होण्याने प्रतिबिंबत्वावर काही परिणाम पडत नाही.त्या दोन्ही उपाधी नाहीशा झाल्या तर मात्र प्रतिबिंब कोठे पडेल?(१२)घटातील सूर्याचे प्रतिबिंब खोटे आणि सरोवरातील प्रतिबिंब तेवढे खरे असे म्हणता येईल का?घटातील,सरोवरातील पाणी दोन्हीही आटले तर दोन्हीची अवस्था सारखीच असणार ना!(१३)म्हणून ईश्वर,जीव,जग या तिघांनाही सत्य कसे म्हणता येईल?ब्रह्माचा अनुभव घेतल्यानंतर त्या तिहींचे अस्तित्व तरी उरेल का?(१४)यावर आक्षेपकाचे म्हणणे असे की,जग आणि जीव हे खोटे आभासमय आहेत हे बोलणे ठीक आहे.पण सर्वज्ञ ईश्वराला मिथ्या म्हणायला कोणी धजणार नाही.(१५)ज्याच्या भीतीने वारा हालतो,ज्याच्या भीतीने चंद्र-सूर्य आपापल्या हालचाली करतात,ज्याच्या भीतीने पाण्याने पृथ्वीचा भार धारण केला आहे,(१६)आणि ज्याच्या ठिकाणी सहा गुण आहेत,(कर्तृत्व,नियंतृत्व,भोक्तृत्व,विभुत्व,साक्षित्व

**ऐसिया श्रुति अनंत । ऐश्वर्याते वर्णित । तरी ईश्वर हा नेमस्त । सत्यचि असे ।।१८।।वक्ता म्हणे सावधान।अनंत श्रुतीचें व्याख्यान।करिती ऐश्वर्यवर्णन।परी तात्पर्य वेगळें।।१९।।जरी वर्णन माईकाचें।सत्यत्व प्रतिपादिलें न वचे।तन्न तन्न निषेधाचें।सत्य तरी काज काइ।।२०।। जीवासी भोगीं प्रीति । कदां नव्हे विरक्ति । तया दाखविली भक्ति । कारुण्यास्तव।।२१।। सर्वज्ञ ईश्वरा भजावें। संसार दु:ख सांडावें । जीवा बोधीतसे बरवें। निवृत्तिसाठीं ।।२२।। ऐश्वर्यादि बोलिलीं । पुढें तन्न तन्न प्रवर्तली । निषेधितां सहजचि झाली । मिथ्यारूप।।२३।। स्वप्नीं जैसी राज्यसंपत्ति । गजाश्वरथपदाति । स्वप्नी सत्य वाटती। परी जागृतीं कोठें।।२४।। मायाचि जेथें न दिसे । तरी ऐश्वर्य धर्म काइसे । धर्मी जो त्याही न दिसे। सत्यत्वपण।।२५।। ईश्वरत्व मायेनें कल्पिलें। कल्पितांचि दिसूं लागलें। जों काल माया तों काल राहिलें। माया निमतां हारपे।।२६।ईशत्व मायेनें केलें। मायेसी सामर्थ्य कैसें आलें । म्हणसी तरी स्वप्नीं उभविलें । निद्रेनें राज्यादि।।२७।। निद्रा अंश मायेचा । येवढा बडिवार साचा ।**

---

सर्वज्ञत्व असे ईश्वराचे सहा गुण वज्रकोशाने दिले आहेत.) त्याला नेहमी भगवान म्हणतात; ज्ञान, वैभव, यश, कीर्ती, मोक्ष, संपत्ती हे त्याचे ऐश्वर्य (ईश्वरत्वाचे गुण) आहे.(१७) अशा प्रकारे अनेक वेदवाक्ये त्याच्या ऐश्वर्याचे वर्णन करतात,त्यामुळे ईश्वर हा निश्चितपणे सत्यच आहे.(१८) यावर वक्ता म्हणतो की नीट लक्ष देऊन ऐका. श्रुतींनी केलेली ईश्वराच्या ऐश्वर्याची वर्णने पाहिली. पण त्यांचे तात्पर्य वेगळेच आहे.(१९) मायिक ईश्वराचे सत्यत्व श्रुतींनी सांगितलेले आहे, हे खरे नाही. (श्रुतींनी तसे सांगणे शक्य नाही.) तसे असते तर 'तत् न तत् न' अशा प्रकारच्या निषेधाचे प्रयोजन तरी काय होते?(२०) जीवाला भोगावर प्रीती आहे. त्यापासून तो कधी विरक्तच होत नाही. त्याची दया येऊन श्रुतींनी त्याला भक्तीचा मार्ग दाखवला.(२१) 'सर्वज्ञ अशा ईश्वराची भक्ती करावी, संसारातील दु:खातून मुक्त व्हावे' असा उपदेश श्रुती जीवाच्या केवळ निवृत्तीसाठी करत आहे.(२२) श्रुतीने परमेश्वराच्या ऐश्वर्यादी गुणांबद्दल सांगितले. पण त्यानंतर लगेच 'तसे नाही, तसे नाही' असेही तिने सांगितले. या निषेधाने अगोदरची श्रुतिवचने आपोआप मिथ्या ठरली आणि ईश्वरही मिथ्या ठरला.(२३) स्वप्नातील हत्ती, घोडे, रथ, पायदळ इत्यादी राजैश्वैर्य स्वप्नदशेत खरे वाटते. मग जागृतीच्या अवस्थेत ते कोठे जाते? (मिथ्याच ठरते.)(२४) मुळात मायाच दिसत नाही तेथे ऐश्वर्यादी धर्म कसे दिसणार? आणि हे गुण धारण करणारा जो ईश्वर त्यालाही मग सत्यत्व दिसणार नाही. (२५) ईश्वरत्वाची कल्पना मायेनेच केली. तिने कल्पना करताच ते दिसू लागले. मायेचे अस्तित्व जोपर्यंत होते तेवढा काळच ते राहिले. माया नष्ट होताच ईश्वरत्वही नाहीसे होते.(२६) ईश्वराला मायेने निर्माण केले. मग मायेला हे सामर्थ्य कोठून आले? असे म्हणशील तर निद्रेने स्वप्नात राज्यादी उभे करावेत तसा हा प्रकार आहे.(२७) निद्रा हा मायेचा केवळ एक अंश असून एवढा पसारा उभा करते.

**मग स्वभाव मूळमायेचा । काय बोलावा।।२८।।न घडे तेंचि हे घडवी।न लोपे तयासी दडवी। इचे सामर्थ्याची पदवी।न भूतो न भविष्यति।।२९।।म्हणोनि बडिवार मायेचा। म्हणो नये कीं साचा। माईकें जीवेश तयाचा। मुळीं अभाव।।३०।।पुनरपि श्रोता बोले । सर्वज्ञत्व कैसें आलें । तरी हें सर्व निरोपिलें । पाहिजे आतां।।३१।।अरे धर्मी जिणें कल्पिला।मिथ्यापणें उभा केला।धर्माविशीं शीण जाला। हें तो न घडे।।३२।।धर्म धर्मित्व करणें। बोलिजे तें माया गुणें। चित्रें रेखाटितां होणें। हाव भाव सहजची।।३३।।आभास कूटस्थापरी। ईशत्व ब्रह्मत्वीं निर्धारी। अन्योन्य तादात्म्य करी । अविद्यापरी माया ।।३४।। सच्चिदानंद तीन । मुख्य ब्रह्मींचें लक्षण । सर्वज्ञ सर्व शक्तिमान । मायाजनित ।।३५।। सर्वज्ञ सर्वशक्तिमंत । ब्रह्म जालें निश्चित । आनंद आणि सच्चित्। ईश्वरीं आलें ।।३६।।ऐसा अन्योन्याध्यास। मुख्य तत्व आणि आभास। हेंचि अज्ञान जीवास । अविवेकें केलें ।।३७।। सत्य असत्य एक केलें। तें विवेकीं कैसें मानिलें । नरोटीसहित खादलें । खोबरें जेणें।।३८।।**

---

मग मूळ मायेचा स्वभाव काय करणार नाही?(२८) जे कधी घडणार नाही तेही माया घडवून आणते; जे कधी लोप पावणार नाही त्यालाही लपवून ठेवते; हिच्या सामर्थ्याची थोरवी कधी झाली नाही, कधी होणार नाही, या स्वरूपाची आहे.(२९)पण एवढ्यावर लगेच हा मायेचा पसारा खरा आहे असे म्हणू नये. जीव आणि ईश्वर हे मायिक आहेत. त्यांचाही अभावच समजावा.(३०) तेव्हा श्रोता पुन्हा म्हणतो, 'ईश्वराला सर्वज्ञत्व कसे येते?' तेव्हा त्याच्या प्रश्नाच्या उत्तरादाखल हे सर्व आता सांगितले पाहिजे.(३१)'अरे जिने गुणधर्म धारण करणारा मिथ्या ईश्वर निर्माण केला, तिला त्याचे गुणधर्म निर्माण करताना शीण होईल असे कधी होईल का?'(३२) धर्म आणि धर्मीपणा यांची निर्मिती ही मायेचीच कार्ये होत. चित्रे काढल्यानंतर त्यांवरील हावभाव आपोआपच निर्माण होणार ना! (३३) चिदाभास जसा कूटस्थाच्या अधिष्ठानावर उभा राहतो, त्याप्रमाणे ईश्वरपणादेखील ब्रह्माच्या अधिष्ठानावर उभा राहतो. माया, चिदाभास आणि कूटस्थ यांचा अन्योन्य अध्यास घडवून आणते.(म्हणजे कूटस्थाचे काही गुण चिदाभासाला आणि चिदाभासाचे काही गुण कूटस्थाला चिकटविले जातात.) त्याप्रमाणेच ईश्वर आणि ब्रह्म यांचा अन्योन्य अध्यास माया घडवून आणते.(३४) ब्रह्माच्या ठिकाणची मुख्य तीन लक्षणे म्हणजे सत्, चित् आणि आनंद ही होत. याउलट त्याचे सर्वज्ञ, सर्वशक्तिमान हे गुण मायेने निर्माण केलेले आहेत.(३५) त्यामुळे ब्रह्म सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान झाले आणि त्याचे सत्, चित् आणि आनंद हे गुण ईश्वरावर लादले गेले.(३६)अशा प्रकारे मुख्य तत्त्व (बिंब, सद्वस्तू, ब्रह्म) आणि आभास यांचा जसा अन्योन्याध्यास होतो तसाच अन्योन्याध्यास अविवेकामुळे अज्ञानी जीवाच्या ठिकाणी होतो. (३७) सत्य आणि असत्य यांचे हे एकत्र कालवले जाणे विवेकी लोकांना (विचार करणाऱ्या लोकांना) कसे वाटते? ते त्यांना नरोटीसहित खोबरे खाण्यासारखे वाटते.(३८)

**असार जाणुनी त्यागावें । सार तें शोधून घ्यावें । तरिच विवेकी म्हणवावें । सूक्ष्मदृष्टी।।३९।।**
**मायेची नुलंघितां भीड । स्वरूपीं नव्हे पवाड । म्हणुनि विवेकें घबाड । ब्रह्म तें जाणावें।।४०।।**
**सर्वज्ञत्वादि धर्म। हें मायिक जाणिजे वर्म । सच्चिदानंद परम । मायानिरासें कळे ।।४१।।**
**निरसतांचि माईक द्वैत । अनुभवा ये अद्वैत । अद्वैतीं द्वैताची मात । बोलोंचि नये ।।४२।।**
**येथेंहि श्रोतीं आक्षेपिलें।अद्वैत जरी अनुभवा आलें।तरी तें कोठें पाहिलें।द्वैतीं कीं अद्वैतीं।।४३।।**
**समाधिकालीं अनंत । जेथें संकल्पाचा घात । एकरूप अद्वैत । स्वानुभवें कळे ।।४४।।**
**कळणें म्हणसी द्वैत। तरी जाणण्यातें जाणत । तें तरी एकचि अद्वैत । ज्ञानाज्ञान प्रकाशी।।४५।।**
**सुषुप्ति जेणें प्रकाशिली। वृत्तिवीण ज्ञप्ति एकली। सदोदित कोंदाटली। दुजेनवीण ।।४६।।**
**द्वैतरहित अनुभविलें । अद्वैत प्रतीतीस आलें । द्वैत पाहतां नाथिलें । अद्वैत निवळे ।।४७।।**
**जितुकें अद्वैत ओतप्रोत।तितुकें नकळे सदोदित।एकदेशी जे अनुभवित।तेणें सर्व सिद्धि कैची।।४८।।ऐसें म्हणसी तरी द्वैत। अशेषत्वें कोणा कळत। एकदेशी जाणतां समस्त।संपूर्ण कळलें।।४९।।एकदेशीही जाणतां।सिद्धि होतसे द्वैता।तेणेपरी अद्वैता।ज्ञानसिद्धी ।।५०।।**

---

असार काय आहे ते समजून घ्यावे आणि त्याचा त्याग करावा.सार तेवढे बाजूला काढून त्याचा स्वीकार करावा असे करणाऱ्यालाच सूक्ष्म दृष्टी असलेला विचारी माणूस म्हणावे.(३९) मायेची भीड ओलांडल्याखेरीज ब्रह्मरूपामध्ये प्रवेश मिळणार नाही. म्हणून विवेकाच्या साहाय्याने महाभाग्यरूप (घबाड) ब्रह्म जाणून घ्यावे.(४०)सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमान हे ईश्वराचे गुणधर्म मायिक (मायानिर्मित) आहेत,हे रहस्य समजून घ्यावे. मायेचे निरसन केल्यानंतर सर्वश्रेष्ठ सच्चिदानंद ब्रह्म कळते.(४१)खोट्या द्वैताचे निरसन करताच अद्वैताचा अनुभव येतो. त्यानंतर अद्वैतामध्ये द्वैताची गोष्ट बोलूच नये. (अद्वैतामध्ये द्वैत नावालाही शिल्लक राहात नाही.)(४२)यावर श्रोत्याने आक्षेप घेतला आहे. अद्वैताचा अनुभव आल्यानंतरदेखील तो अनुभव द्वैतामध्ये आला की अद्वैतामध्ये आला हा प्रश्न उरतोच.(४३)यावर उत्तर असे की, समाधिकाळी अनंत संकल्पांचा नाश होतो आणि त्यावेळी अद्वैत एकरूपपणेच कळते.(४४)कळणे हेच द्वैत आहे,असे म्हणत असशील तर ते जाणण्यालाच जाणणारे आहे. त्या ठिकाणी एकच अद्वैत ज्ञान आणि अज्ञान या दोहोंना प्रकाशित करत असते.(४५)ज्याने सुषुप्तीला प्रकाशित केले ते वृत्तिरहित ज्ञान (ज्ञप्ती)एकटेच दुसऱ्याची अपेक्षा न करता अद्वैताने सर्वत्र भरून राहिले आहे.(४६)द्वैतरहितता अनुभवणे म्हणजेच अद्वैताची प्रतीती होय.द्वैत हे मिथ्या आहे हे कळताच अद्वैताची प्राप्ती होते.(४७)अद्वैताची व्याप्ती (विस्तार)जेवढी आहे तेवढे समग्र अद्वैत आपण जाणू शकत नाही.अशा एकदेशी ज्ञानाने (मर्यादित ज्ञानाने) संपूर्ण मोक्ष कसा मिळेल?(४८) असे म्हणत असशील तर द्वैत तरी संपूर्णपणे कोणाला कळते? तेव्हा एकदेशी द्वैताच्या ज्ञानानेही संपूर्ण द्वैत कळते.(४९) एकदेशी जाणण्यानेही द्वैताची सिद्धी होते. त्याप्रमाणे एकदेशी अद्वैताच्या जाणण्यानेही संपूर्ण अद्वैताची प्राप्ती होते.(५०)

**द्वैत मिथ्यापणें कळलें । तें अद्वैतें जाणितलें । अद्वैतहि अनुभविलें । स्वतां चिद्‌रूपें।।५१।। परप्रकाश तें द्वैत। स्वप्रकाश अद्वैत । द्वैतसिद्धि नसतां होत । अद्वैत असतां सिद्ध नव्हे।।५२।। असो आहे तेंचि आहे । द्वैत कालत्रयीं नव्हे । तथापि द्वैतासि जाणताहे । तेंचि अद्वैत।।५३।। जें जें ज्ञानासी गोचर। तें तें जाणिजे निःसार। न जाणतांही ज्ञप्तिमात्र। तेचि वस्तु अद्वैत।।५४।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ईश्वराभासप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

## श्रीराम समर्थ।। समास ५वा - केवलब्रह्मनिरूपण

**ब्रह्म सदोदित संचलें। निश्चल निर्वात भरलें। अंतचि नाहीं कोंदाटलें।जेथें जेथें।।१।। ऐसें तैसें म्हणतां नये। ज्ञानाज्ञान म्हणणें काय। विचारा न ठके सोय। अमुकें न ये दावितां।।२।। वर्णव्यक्ति किमपी नसे । स्थूल वाड म्हणावें कैसें । अणु दीर्घ पोकळसें। ब्रह्म नव्हे।।३।। घेऊं जातां घेतां नये । सांडु जातां सांडितां नये । कोणाचाचि न होय । विषय ब्रह्म ।।४।। पृथ्वीमध्यें भरलें।पृथ्वीस ज्याचेनि रूप आलें।जडत्वीं कठिणत्वीं दाटलें।परी कठिण नव्हे।।५।। आपीं असे परि भिजेना । अग्निमध्येंहि जळेना । वायुमध्यें परि चळेना । वायुसवें ।।६।।**

---

द्वैत मिथ्या आहे असे कळते ते अद्वैतामध्ये कळते.त्याचप्रमाणे स्वतः चिद्रूपच अद्वैताचाही अनुभव घेते.(५१)द्वैत परप्रकाश असते.अद्वैत स्वयंप्रकाश असते.द्वैताची सिद्धी ते नसतानाही होत असते,तर अद्वैताची सिद्धी ते असतानासुद्धा होत नाही काय?(५२)असो,जे आहे तेच आहे.तथापि द्वैत मात्र कालत्रयीही नाहीच.तरी द्वैताला जे जाणते तेच अद्वैत होय.(५३)ज्ञानाला जे जे दिसते ते ते सर्व निःसार (साररहित म्हणजे मिथ्या)होय,असे जाणावे.जे जाणता येत नसून केवळ ज्ञप्तिरूपानेच असते त्यालाच अद्वैत ब्रह्म म्हणतात.(५४)

## पंचिका ६वी, समास ५वा - केवलब्रह्मनिरूपण

ब्रह्म सर्वकाळ सर्वत्र भरून राहिले आहे.ते निश्चल,निर्वात(वारा नसलेले)आणि अनंत असून जेथे तेथे कोंदाटले आहे.(१)ते असे आहे,तसे आहे असे म्हणता येत नाही.त्याच्या ठिकाणी ज्ञान आहे किंवा अज्ञान आहे,असेही म्हणणे शक्य नाही.विचाराला तेथे आधारच नाही,किंवा ते अमुक म्हणूनही दाखविता येत नाही.(२)त्याला वर्ण अथवा वेगळेपणा काही नाही,ते स्थूल आहे,मोठे आहे असे त्याच्याबद्दल कसे बोलावे?ब्रह्म काही अणू,दीर्घ किंवा पोकळ नाही.(३)ते घ्यायला गेलो तर घेता येत नाही,ते टाकायला जावे तरी ते टाकता येत नाही.ब्रह्म कुणाचाच विषय होत नाही.(४)ते पृथ्वीमध्ये भरून राहिले आहे,पृथ्वीला त्याच्याचमुळे रूप आले आहे,ते जडामध्ये दाट भरून राहिले आहे,कठीण पदार्थांतही ते दाटले आहे.पण ते कठीण नाही.(५)ब्रह्म पाण्यात आहे,पण पाण्याने ते भिजत नाही;अग्नीमध्ये

**ब्रह्म आकाशीं असे। परि आकाश डोळां दिसे। आकाश त्याचेनि प्रकाशे। परि तें दिसेना।।७।। आकाशही सर्वा व्यापक। भरून उरलें तिन्हीं लोक। परी निज वस्तूचें कौतुक। तें अनारिसें।।८।। शून्य नेणीव शब्दगुण। श्रोत्रेंद्रिया होय वेदन। पोकळ अवकाश भासमान। आकाश कळे।।९।। नेणिव शब्द भासमान । हें लक्षण नसतां समान । ब्रह्म घन परिपूर्ण। म्हणों येतें ।।१०।। सूर्यप्रकाशें गगन । पिवळें होय भासमान । काळें होय सूर्याविण । रात्रिमाजीं।।११।।वेगळेंपणें कळूं आलें । म्हणुन आकाश नाम जालें । एकरसत्वें अनुभवलें । न वचे ब्रह्म ।।१२।। सूर्याचेनि दिसेना । चंद्रही तया प्रकाशीना । अग्निहि कांहीं भासविना । कष्टि होतां[४३]।।१३।। परी चंद्र सूर्य पावक । ज्याचे तेजें प्रकाशक । त्रिभुवनींची वर्तणूक । ब्रह्मा मध्यें।।१४।।अनंत ब्रह्मांडीं उतरंडी । अनंत वेळा घडामोडी । होतां जातां सांकडी । ब्रह्मीं असेना।।१५।। पाणियावरी तरंग।होतां जातां पाणी अभंग। तैसी मायेची लगबग। परि ब्रह्म जैसें तैसें।।१६।। मायेपासून तृणांत । ब्रह्म दाटलें अद्‌भुत । मायेसहित जें जें निर्मित । जडजात सर्वही।।१७।।**

---

ते गळत नाही, वायूमध्ये असूनही वायूबरोबर ते हालचाल करत नाही.(६)ब्रह्म आकाशात आहे, पण आकाश डोळ्यांनी दिसते, आकाश त्याच्यामुळेच प्रकाशित होते पण ते स्वत: मात्र दिसत नाही.(७) आकाशदेखील सर्वव्यापक आहे. ते तिन्ही लोक भरून राहिलेले आहे. पण ब्रह्माचे (निजवस्तूचे) कौतुक हे आहे की, ते या सर्वांपेक्षा वेगळे आहे.(८) आकाश हे शून्य आहे, तेथे नेणीव आहे, शब्द हा त्याचा गुण आहे, ते पोकळ आहे, भासमान आहे (ते भासते) अशा प्रकारे आकाशाची ओळख पटते.(९) नेणीव, शब्दगुण, भासणारे ही लक्षणे आकाश आणि ब्रह्म यांच्यामध्ये समान नाहीत (म्हणजे आकाशात आहेत आणि ब्रह्मात नाहीत) तरी ब्रह्म गच्च भरलेले आहे. ते परिपूर्ण आहे असे म्हणता येते.(ही लक्षणे मात्र दोहोंना समान आहेत.)(१०) सूर्यप्रकाशामुळे आकाश पिवळे भासते. रात्री सूर्य नसताना ते काळे दिसते.(११)अशा तऱ्हेने आकाश वेगळेपणाने कळून येते. म्हणून त्याला 'आकाश' असे नाव प्राप्त झाले. तसे ब्रह्म मात्र सर्वत्र एकरसच व्यापलेले असल्यामुळे त्याचा वेगळेपणाने अनुभव येत नाही.(१२) ते सूर्याच्या प्रकाशाने दिसत नाही, चंद्रही त्याला प्रकाशित करू शकत नाही, अग्नीही कितीही कष्ट केले तरी त्याच्यावर प्रकाश पाडू शकत नाही.(१३) परंतु चंद्र, सूर्य, अग्नी त्याच्या तेजामुळे इतर पदार्थांना प्रकाशित करतात, ब्रह्मामध्ये सर्व त्रिभुवनाचा व्यापार चालतो.(१४)अनंत ब्रह्मांडांच्या उतरंडीची अनंत वेळा जडणघडण ब्रह्मामध्ये होत असताना त्यांचे विनाश होत असताना ब्रह्माला त्यांचे काही संकट नाही.(१५) पाण्यावर तरंग उठतात, ते नाहीसे होतात तरी पाणी मात्र अभंगच असते.त्याप्रमाणे मायेचे सर्व व्यापार, सर्व उद्योग ब्रह्मामध्येच होत असले तरी ब्रह्म निर्विकारपणे जसेच्या तसेच राहते.(१६) मायेपासून ते गवताच्या पातीपर्यंत ब्रह्म आश्चर्यकारक तऱ्हेने दाटून राहिले आहे. मायेपासून जे जे काही निर्माण झाले ते सर्व जड विश्व ब्रह्माने व्यापून टाकले आहे.(१७)

**अणुमाजीं ब्रह्म असे । ब्रह्म नव्हे अणु ऐसें । संपूर्ण ज्याचेनि प्रकाशे । परि तें जडा न कळे।।१८।। देहादि जडचि केवळ । मनादि तत्त्वें चंचळ । चेतनासारिखें सकळ । परी परप्रकाश ।।१९।। इंद्रियें बहिर्मुखें विचरती । परप्रकाशें विषय घेती । तया न कळे स्वयंज्योती । कारण दृश्य नव्हे ।।२०।। अंतःकरण मन बुद्धि । यासी इंद्रियांची उपाधि। स्वरूपीं घालितां अवधीं । करणत्वा मुकती ।।२१।। पाणियामाजीं लवण । न निवडे जैसें भिन्न । तैसें बुद्धि आणि मन । वेगळे नुरे ।।२२।। जें जें सुखाकार वाटलें । परि त्या सुखीं मन विरालें । वेगळेपणें अनुभविलें । न वचे कदां ।।२३।। तथापि कांही कळलें। तें मनासवें लया गेलें । उपरि जें निःसंग भरलें । तें ब्रह्मस्वरूप ।।२४।। जों काल मन उपाधि । तो काल अंतर्बाह्य संधि । तेणेंविण निरुपाधि । दिग्देश कैंचा ।।२५।। सूर्याकरितां पूर्वोत्तर । दिशा कळती समग्र । उत्पन्न नसतां दिनकर । त्यासि काय म्हणावें।।२६।। प्रगटतां सूर्यमंडळ । किरणें प्रकाशे भूमंडळ । मायादि तत्त्वें सकळ । प्रकाशती एकसरां ।।२७।। आकाशापरी सूर्य होता । मग तेजतमाची नसे वार्ता । तैसें स्फुरणाभावीं अनंता । ज्ञानाज्ञान कैचें।।२८।।अपार सदोदित अमुप । निष्कलंक निजरूप।**

---

ब्रह्म अणूमध्ये आहे,पण ते अणूसारखे नाही,संपूर्ण विश्व त्याच्यामुळे प्रकाशित होते,पण त्या विश्वाला जडत्वामुळे ते कळत नाही.(१८)देहादी केवळ जड वस्तु, मनासारखी चंचल तत्त्वे इत्यादी चेतनासारखी दिसत असली तरी परप्रकाशितच आहेत.(१९)इंद्रिये बहिर्मुख होऊन संचार करतात, परप्रकाशाने विषयांचे ग्रहण करतात (त्यांचा भोग घेतात)पण त्यांना स्वयंप्रकाशी परब्रह्म कळत नाही कारण ते इंद्रियग्राह्य (इंद्रियांना दृश्य) नाही.(२०)मन, बुद्धी, अंतःकरण यांना इंद्रियांची उपाधी आहे (ही अंतरिंद्रिये बाह्य इंद्रियांच्या मागे धावतात) त्यांना ब्रह्मामध्ये केंद्रित केल्यास त्यांचे करणत्वच (इंद्रियपणच) नाहीसे होते.(२१)पाण्यामध्ये मीठ विरून जाते. ते वेगळेपणाने जसे निवडता येत नाही, त्याप्रमाणे ब्रह्मामध्ये लीन झालेली मन, बुद्धीवेगळेपणाने उरतच नाहीत.(२२)जे जे सुखकर वाटते त्या सुखात मन रमते. पण ब्रह्मसुखात मन विरघळूनच जाते. त्याचा वेगळेपणाने अनुभव येतच नाही.(२३)तरीसुद्धा काही कळले असे वाटले तरी ते मनाबरोबरच लय पावते. त्यानंतर जे काही निःसंगपणे उरते ते ब्रह्मस्वरूपच होय.(२४) जोपर्यंत मनाची उपाधी आहे, तोपर्यंतच अंतर्बाह्य संधी असतात, पण तेच नाहीसे होताच निरुपाधिक ब्रह्मच उरते, तेथे दिशा अथवा प्रदेश कसे असतील?(२५)सूर्य आहे म्हणून पूर्व, उत्तर इत्यादी सगळ्या दिशा कळतात. पण सूर्यच उगवला नाही तर त्यांना काय म्हणावे?(२६)सूर्यमंडल प्रकट होताच त्याच्या किरणांनी सर्व भूमंडळ प्रकाशित होते. त्याप्रमाणे ब्रह्मामुळे मायादी तत्त्वे एकदम प्रकाशित होतात.(२७)सूर्य जर आकाशाप्रमाणे असता तर तेज, अंधकार यांची गोष्टच करता आली नसती. त्याप्रमाणे स्फुरणच झाले नसते तर अनंताचे ज्ञान किंवा अज्ञान कसे शक्य झाले असते?(२८)

**अंतचि नाहीं स्वस्वरूप। कैसें बोलावें ।।२९।। मनबुद्धीसी ब्रह्म कळेना।ऐसेंच जाणावें अनुमाना। पुढें सांडून जाणतेपणा। अभिन्न व्हावें।।३०।। ऐसें न जाणोनि जाणावें।विवेकें भिन्नतेसी सांडावें। सर्व करणें तें स्वभावें। समाप्त जालें।।३१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । केवलब्रह्मनिर्विकारे । पंचमसमासः ।।५।।**

**इति तत्पदशोधनप्रकारपंचिका संपूर्णा ।।६।। ओवीसंख्या २०५**

---

ब्रह्म हे पार (सीमा) नसलेले,नेहमी उदय पावलेले,पुष्कळ, निष्कलंक इत्यादी आहे. त्याला अंतच नसल्यामुळे त्याचे वर्णन कसे करावे?(२९)मन, बुद्धी यांना ब्रह्म कळत नाही तेव्हा ते अनुमानानेच जाणून घ्यावे. पुढे त्या ज्ञानीपणाचाही त्याग करून त्याच्याशी अभिन्न अथवा एकरूप व्हावे.(३०)अशा प्रकारे न जाणून ते जाणावे, विचारपूर्वक त्याच्याशी जाणवणारी भिन्नता सोडून द्यावी. तेव्हाच सर्व क्रिया आपोआप समाप्त होतात.(३१)



# पंचिका ७वी - असिपदविवरण

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - ब्रह्मात्मैक्यप्रकार

**त्वंपदलक्ष्य प्रत्यगात्मा। तत्पदलक्ष्य परमात्मा। अधिकारी जो महात्मा। उभयां ऐक्य करी।।१।। ऐक्य न होतां भिन्नपणें । निर्भय नव्हेचि तेणें गुणें । द्वितीयासी भय श्रुतीनें ।[४५] प्रतिपाद्य केलें।।२।। ऐक्यासी पडतां अंतर । किंचित जरी अणुमात्र । तयासी भीति हा निर्धार । श्रुतीनें केला ।।३।। अंतर म्हणिजे ध्येय ध्याता । भिन्नपणें ध्यान करितां । उपासक होय ध्याता । उपास्य ध्येय ब्रह्म ।।४।। हा भेद जरी त्रिपुटीचा । उरे साध्य साधकाचा । तैसाचि ज्ञेय ज्ञात्याचा। साधन ज्ञानें होय[४६]।।५।। हे कर्तृतंत्र लक्षण । जों काल राहे अनुसंधान । तों काल राहे समाधान। सुस्वानुभवीं ।।६।। अनुसंधान जरी राहिलें । तरी समाधान बिघडलें । वाटे काय हरपलें । साधकासी ।।७।। जया समाधि उत्थान । तें म्हणूं नये शुद्धज्ञान । विचारें होय जो अभिन्न । तें ज्ञान वस्तुतंत्र ।।८।। आत्मतत्त्वीं होय अभिन्न ।**

---

### पंचिका ७वी, समास १ला - ब्रह्मात्मैक्यप्रकार

त्वंपदाने सूचित होणारा प्रत्यगात्मा (देहामध्ये व्यापून राहिलेले ब्रह्म, कूटस्थ) आणि तत्पदाने सूचित होणारा परमात्मा या दोहोंमध्ये अधिकारी महात्मा ऐक्य निर्माण करतो.(१) जर हे ऐक्य झाले नाही तर भिन्नपणाच्या जाणिवेने जीव निर्भय राहू शकत नाही. त्यामुळे वेदांनीच 'दुसऱ्यापासून नेहमी भय असते' असे प्रतिपादन केले आहे.(२) ऐक्याला किंचित जरी अंतर पडले तर त्याला भीती असते, असे श्रुतीने निर्धारपूर्वक सांगितले आहे.(३) अंतर पडते म्हणजे असे की,ध्येय आणि ध्याता असा भेद ठेवून ध्यान केले जाते. उपासक हा ध्याता होतो आणि त्याचे ध्येय म्हणजे ब्रह्म असते.(४) हा भेद जरी त्रिपुटीचा असला तरी तो साध्य आणि साधक,ज्ञेय आणि ज्ञाता या दोघातच खरा असतो आणि या त्रिपुटींचा तिसरा घटक जे साधन अथवा ज्ञान यांच्यामुळे तो निर्माण होतो.(५) आता या प्रकाराने 'मी ब्रह्म' आहे या अनुभवातील सुख कर्तृतंत्रच(करणारा जो कर्ता त्याला केंद्र करून)असते. या सुखानुभवात जोपर्यंत अनुसंधान असते,तेवढ्या वेळापुरतेच समाधान टिकते.(६) ते अनुसंधान सुटले की समाधानही खंडित होते आणि आपले काहीतरी हरवले॰अशी साधकाला चुटपुट लागून राहते.(७) अशा तऱ्हेने ज्या ज्ञानाला समाधी आणि व्युत्थान (समाधीतून परत व्यवहारात येण्याची अवस्था) अशा दोन अवस्था असतात त्याला शुद्ध ज्ञान म्हणू नये. विचाराने ज्या ज्ञानाचा कधी भंग होत नाही ते ज्ञान वस्तुतंत्र ज्ञान होय.(ब्रह्मसुखाला केंद्र करणारे,ध्येय परब्रह्मरूप असलेले ज्ञान.)(८) अंत:करण आणि मन यांचा लोप

**अंत:करण मनेंविण।ब्रह्मतत्व राहिलें अन्य।तरी समाधान कैंचें।।९।।आत्मतत्त्वासी सांडुनी। ब्रह्मतत्वाची शिराणी।मीब्रह्मप्रतीति लागुनी।अंचवला तो।।१०।।ब्रह्मात्मभेद निरसे।पैठा होय अखंडक्यरसें।मग त्रिपुटीरहित होतसे।अत्यंत समाधान।।११।।तरी तें ऐक्य कैसें होतें।ब्रह्म परोक्षसें वाटतें।अब्रह्मत्व आत्मयातें।सहजची आलें।।१२।।परोक्षत्व अब्रह्मत्व आलें।प्रत्यगात्मा ब्रह्म वेगळाले।मन माया उपाधीनें केलें।नाथिलेंपणें।।१३।।अब्रह्मत्व आत्मयाचें।पूर्वी निरूपण जालें त्याचें। सच्चिदानंद लक्षण ब्रह्मीचें। आत्मवीं साधिलें ।।१४।। तरी ब्रह्मचि आत्मा निश्चय।बोलिलासे यथान्वय। शास्त्रगुरुआत्मप्रत्यें अब्रह्मत्व निरसलें।।१५।। आतां परोक्षत्व ब्रह्म मायेनें।केलें ते अपरोक्ष करणें।तरी ऐका सावधानें । उपोद्घातत्वें[६७] ।।१६।। एक चैतन्य चतुर्विध।उपाधीनें जालें अनुविद्ध। ब्रह्म कूटस्थ शुद्ध। जीवेश आभास दोन्ही।।१७।। स्वतां एकचि असतां । उपाधीनें चतुर्विधता। यासि दृष्टांत पाहता। आकाशा ऐसा।।१८।।एक आकाश विभागलें। उपाधीनें चतुर्धा भासलें। महाकाश घटाकाश जालें। निरुपाधिकत्वें।।१९।।**

---

करून जेव्हा साधक स्वत:शीच अभिन्न होतो त्यावेळी ब्रह्मतत्त्व बाजूलाच राहते. मग ते नसेल तर समाधान कसे मिळेल?(९) स्वत:ला विसरल्यानंतरच ब्रह्मप्राप्तीचे खरे महत्त्व (शिराणी) असते. 'आपणच ब्रह्म आहोत' या अनुभवाला तो (वस्तुतंत्र समाधीचा अनुभव घेणारा) साधक मुकतो.(१०) ब्रह्म आणि आत्मा यांच्यामधील भेदाचे निरसन होताच साधक अखंड ऐक्यरस प्राप्त करतो. मग तोच त्रिपुटीरहित होऊन अत्यंत समाधान प्राप्त करतो.(११) आता हे ऐक्य कसे होते? ब्रह्म म्हणताक्षणीच ते दृष्टीआड असल्याचे जाणवते. त्यामुळे आत्म्याला ब्रह्मापेक्षा आपोआप निराळेपणा येतो.(१२)ब्रह्माचे परोक्षत्व (दृष्टिआडचे) आणि आत्म्याचे अब्रह्मत्व असे जाणवल्यामुळे प्रत्यगात्मा (कूटस्थ) आणि ब्रह्म यात द्वैत असल्यासारखे वाटते. पण हे दोन्ही प्रकार खोट्या अशा मन आणि माया या उपाधींमुळे होते.(१३)आत्म्याला अब्रह्मत्व कसे येते याचे निरूपण अगोदर यापूर्वी झालेले आहे.त्याचप्रमाणे ब्रह्माची सच्चिदानंद ही लक्षणे आत्म्याचीही लक्षणे असल्याचे सिद्ध केले.(१४)त्यामुळे ब्रह्म हाच आत्मा आहे असा निश्चय यापूर्वी प्रसंगानुसार गुरू,शास्त्र,आत्मा यांच्या त्रिविध प्रतीतीनुसार स्पष्ट केला व आत्म्याच्या अब्रह्मत्वाचे निरसन केले.(१५)आता मायेमुळे ब्रह्माच्या ठिकाणी परोक्षत्व आले आहे ते घालवून ब्रह्माला साक्षात अनुभव घेण्याच्या पातळीवर आणणे हे कार्य करायचे आहे.ते कसे करायचे ते उपोद्घातरूपाने सांगतो, ते सावधानपूर्वक ऐका.(१६)एकच चैतन्य उपाधींमुळे ब्रह्म,कूटस्थ ही दोन मूलतत्त्वे आणि जीव आणि ईश्वर ही दोन आभासतत्त्वे अशा चार प्रकारचे झाले.ते त्या त्या उपाधींनी लिप्त झाले.(१७)वस्तू एकच असूनदेखील उपाधींमुळे ती चार प्रकारची झाली.याला दृष्टान्त द्यायचाच झाला तर हे आकाशासारखे झाले असे म्हणता येईल.(१८)एकाच आकाशाचे उपाधींमुळे चार विभाग झाल्यासारखे दिसते. त्यातील घटाकाश आणि मठाकाश हे निरुपाधिक (उपाधिविरहित) आहेत.(१९)

**जलाकाश मेघाकाश। हे दोन्ही मिथ्या आभास । चौप्रकारें आकाश । निरोपिलें ।।२०।। जितुकें घटाचें पोकळपण । तितुकें व्यापलेंसे गगन । तें घटाकाश अभिधान । निर्विकारत्वें पावलें ।।२१।। घटीं जें जें साठविलें । उष्ण शीतळ घट्ट ओलें। त्या त्या पदार्थां राहिलें। आकाश अलिप्त।।२२।। तैसें पिंडीं कूटस्थ सामान्य । निर्विकारत्वें चैतन्य । प्रकाशून राहिलें अन्य । निर्विकारत्वें साक्षी ।।२३।। जें जें देहीं कर्म निपजलें । न्याय अन्याय वर्तले । लिंगाध्यासें आभासें केलें । कूटस्थ अलिप्त।।२४।। घटीं जल घालितां । सनक्षत्र आकाश बिंबतां । प्रतिभास दिसे अतौतां । तें जलाकाश ।।२५।। जल तोंवरी आकाश दिसे । जलाभावीं सर्वेचि नासे। घटाकाश जैसें तैसें । तेणेंवीण आहे ।।२६।। तैसें बुद्धींत प्रतिबिंबलें । चैतन्य भासा जीवत्व आलें । बुद्धि-अभावीं लया गेलें । मिथ्या म्हणोनि।।२७।।कूटस्थ तो सदोदित। अविनाशी विकाररहित। घटाकाश जैसें निवांत । व्यापकपणें।।२८।।आकाशीं मेघ उठती । त्यांत जळाची होय भरती । कैसे म्हणसी तरी पडती । पर्जन्यधारा।।२९।। जळ तेथें प्रतिबिंब पडे। घट जळाचेनि पाडें। आकाश तेथें**

---

जलाकाश(म्हणजे घटातील पाण्यामध्ये पडलेले आकाशाचे प्रतिबिंब)आणि मेघाकाश(मेघातील पाण्यामध्ये पडलेले आकाशाचे प्रतिबिंब)हे दोन्ही मिथ्या,आभासारूप आहेत.अशा प्रकारे आकाशाचे चार प्रकार सांगितले.(२०)घटाची जेवढी पोकळी असेल तेवढे तिच्यात आकाश व्यापलेले असते.त्याला घटाकाश असे नाव आहे.त्या नावामुळे मूळ आकाशाच्या स्वरूपात काही बदल होत नाही ते निर्विकारच असते.(२१) घटामध्ये उष्ण,थंड,घट्ट,ओले असे जे पदार्थ साठवले जातात,त्या पदार्थांपासून घटाकाश अलिप्त असते.(२२)त्याप्रमाणे पिंडामध्ये सामान्यत्वाने व्यापून राहणारे निर्विकार चैतन्य हे स्वत: केवळ साक्षिरूपाने राहते आणि अन्य पादार्थांना प्रकाशित करते.(२३)देहामध्ये जे जे कर्म निर्माण होते. न्यायाला धरून अथवा न्यायाला सोडून असे जे काही घडते ते सर्व लिंगाध्यासाने म्हणजे वासनातादात्म्याने जीवाने केलेले असते. कूटस्थ त्यापासून अलिप्त असते.(२४)घटामध्ये पाणी घातल्यानंतर त्यामध्ये नक्षत्रांसहित आकाशाचे प्रतिबिंब पडते. तेच जलाकाश होय.(२५)ते आकाश घटामध्ये पाणी असेल तोपर्यंतच दिसते. ते पाणी नाहीसे झाले की जलाकाशही त्याबरोबर आपोआप नाहीसे होते. पण घटाकाश मात्र पाण्यावाचून देखील जसेच्या तसेच असते.(२६)त्याप्रमाणे बुद्धीत चैतन्याचे जे प्रतिबिंब पडते त्याला जीव असे म्हणतात.बुद्धी नसेल तेव्हा ते नाहीसे होते. म्हणून त्याला मिथ्या म्हणतात.(२७)कूटस्थ मात्र सर्वकाळ उपस्थित असतो. घटाकाश जसे व्यापक आणि निर्विकार असते त्याप्रमाणे कूटस्थ अविनाशी आणि निर्विकार असतो.(२८)आकाशात मेघ निर्माण होतात. त्यात पाणी साठवले जाते.ते पावसाच्या धारांमुळे आपल्या अनुभवाचे आहे. (ते पाणी कसे साठवले असे विचारशील तर पावसाच्या धारा पडतात त्यावेळी ते प्रत्ययास येते.)(२९) जेथे पाणी असेल तेथे प्रतिबिंब पडतेच. ते प्रतिबिंब

**रोकडें। मेघीं बिंबलें।।३०।। तें जाणावें मेघाकाश । उपाधीस्तव होय भास । उपाधि नसतां नाश । बोलावा नलगे।।३१।। ब्रह्माकाशीं मायामेघ[४८]। जगनीराचा साठवला ओघ। प्रतिफळलें चैतन्य अमोघ । तें ईश चैतन्य।।३२।। यावत् उपाधि मायेची । तावत् स्थिति आभासाची। जैसी स्थिति अंतःकरणाची। चिरकाल नसे ।।३३।।बुद्धि नसतां जीव हरपे। माया-अभावीं ईश्वरत्व लोपे । हे दोन्ही जाउपे[४९]। मायाअविद्येचे ।।३४।। जीव ईश दोन्हीं समान । मिथ्यात्वें हें प्रमाण । जलाकाश मेघाकाशा दोन । मिथ्यात्वें सारिखे।।३५।। जलमेघ उपाधिरहित । महाकाश सदोदित। तैसें ब्रह्म तें शाश्वत । मायाउपाधिविण ।।३६।। ब्रह्म जें का परिपूर्ण।तेंचि पिंडीं असे व्यापकपण।कूटस्थ निर्विकार संपूर्ण।घटाकाशापरी।।३७।। जीवेश हे असत्य । म्हणसी कूटस्थ कैसा सत्य । जितुकें उपाधीचें कृत्य । तेचि नाशे येर नाहीं।।३८।।कूटस्थ उपाधिरहित । देह उपाधिकल्पित । देह नासतां मिळत । परब्रह्मीं।।३९।। घट जैसा फुटतां । आकाश आकाशीं तत्त्वतां । अविनाशत्व कूटस्था । अकृत्रिम असे।।४०।।**

---

पाण्याच्या विस्ताराएवढे असते.मेघामध्ये प्रतिबिंबित झालेले आकाश त्या घटातील पाण्याच्या प्रमाणानुसार असते.मेघामधील पाण्यात आकाशाचे प्रतिबिंब स्पष्ट दिसते.(३०)त्याला मेघाकाश म्हणून जाणून घ्यावे.केवळ पाण्याच्या उपाधीमुळे त्याचे आभासरूप खोटे प्रतिबिंब भासते.ती पाण्याची उपाधी नाहीशी होताच त्या प्रतिबिंबाचा नाश होतो,हे सांगण्याची गरज नाही.(३१)त्याप्रमाणे ब्रह्मरूप आकाशामध्ये मायारूप मेघ येतात.जगतरूपी जलाचा ओघ त्यामध्ये साठलेला असतो.त्यामध्ये चैतन्याचे जे प्रतिबिंब पडते त्याला ईशचैतन्य अथवा ईश्वर म्हणतात.(३२)जोपर्यंत मायेची उपाधी असते तोपर्यंत त्या ईश्वररूप आभासाचे अस्तित्व असते.अंत:करणाची स्थितिदेखील दीर्घकाळ नसते.(३३)बुद्धी नसेल तर जीवही हरवून जातो.मायेच्या अभावी ईश्वरत्वाचा लोप होतो.माया आणि अविद्या यांची अनुक्रमे ईश्वर व जीव ही अपत्ये होत.(३४)जीव व ईश्वर दोघेही मिथ्या असल्यामुळे त्यांच्यात साम्य आहे. जलाकाश आणि मेघाकाश ही दोन्ही मिथ्यात्वामुळेच सारखी होत.तसाच हा प्रकार होय.(३५)जल अथवा मेघ या उपाधींवाचून महाकाश मात्र नेहमी उपलब्ध असते.त्याप्रमाणे ब्रह्म हे शाश्वत असतेत्याला मायाउपाधीची अपेक्षा नसते.(३६)ब्रह्म परिपूर्ण आहे तेच पिंडामध्ये(शरीरामध्ये)व्यापून राहिलेले आहे.तोच कूटस्थ हा घटाकाशाप्रमाणे संपूर्ण आणि निर्विकारी असतो.(३७)जीव आणि ईश्वर असत्य असता कूटस्थच तेवढा सत्य आहे असे कसे म्हणता येईल?त्याचे उत्तर असे की जेवढे म्हणून उपाधीमुळे अस्तित्वात येते तेवढे सर्व नाशवंत असते.उपाधीनिरपेक्ष जे स्वतंत्रपणे असते ते नाशवंत नाही.(३८)कूटस्थ हा उपाधिरहित असतो,देह मात्र उपाधिकल्पित असतो.देह नष्ट झाल्यानंतर कूटस्थ परब्रह्मात विलीन होतो.(खरे पाहता एरवीही तो परब्रह्मच असतो.)(३९)घट फुटून गेल्यानंतर घटाकाश आकाशात मिळून जाते.(ही बोलण्याची पद्धत झाली.)कूटस्थाची अविनाशिता स्वाभाविकच आहे.ती कृत्रिम नाही.(४०)

**जीवेश मिथ्या असती । भेद ही मिथ्या तया प्रती । कूटस्थ ब्रह्म सत्य प्रतीति । तरी भेद ही सत्य।।४१।।तरी अवधारी अंतरीं। भेद सत्य म्हणसी जरी। महाकाश व्यापिलें घटांतरीं। तेथे भेद कोणता।।४२।।घटाकारत्व जया आलें । घटाकाश नाम पावलें। पिंडीं ब्रह्म जें व्यापलें । कूटस्थ नाम या हेतू।।४३।।नाममात्र असे भेद । वस्तुतां तें अभेद । प्रत्यगात्मा सच्चिदानंद । अविनाशी परब्रह्म।।४४।।अहंप्रत्ययावलंबन । साक्षी ब्रह्म चिद्‌घन । अपरोक्ष प्रतीति पावन । येणेचि ज्ञानें होइजे।।४५।।प्रत्यगात्मा सोपाधिक। अपरोक्ष घडे हा विवेक। परब्रह्म जें निरुपाधिक । अपरोक्ष केवि।।४६।।आत्मा उपाधिक बोलसी । सांग उपाधि ते कैसी । अंतःकरणाची जरी म्हणसी । तरी ब्रह्म ही सोपाधिक।।४७।।उपाधि अंतःकरणसहित। तेवीं ब्रह्मीं अंतःकरणरहित। सुवर्ण लोहो भेद दिसत। शृंखळा बंधन सारिखें ।।४८।।अंतःकरण उपाधि अवलंबिता। तरी आत्मा अपरोक्ष केउता। वृत्तियोगें जाणतां।परोक्ष होय।।४९।।**

---

यावर शंका अशी काढता येते की, जीवेश मिथ्या आहेत, तेव्हा त्यांच्यातील भेदही मिथ्याच मानला पाहिजे आणि कूटस्थ आणि ब्रह्म हे सत्य आहेत, त्यांचा भेदही सत्यच मानला पाहिजे.(४१) तर आता हे नीट समजून घे की, तू भेद सत्य मानतो आहेस. आता सर्वव्यापक आकाश सर्वच प्रकारच्या पोकळीला व्यापून असते. मग त्याने घटातील पोकळी व्यापल्यामुळे कोणता भेद निर्माण होणार आहे?(४२) घटातील पोकळीला व्यापल्यामुळे त्याला घटाकार प्राप्त होतो. त्यामुळे त्याला घटाकाश असे नाव प्राप्त होते. त्याप्रमाणे पिंडात व्यापून राहिलेल्या ब्रह्मालाही कूटस्थ हे नाव प्राप्त होते.(४३) हा भेद फक्त नावाचा आहे. वस्तुरूपाच्या बाबतीत ते दोन्ही एकच आहेत, अभिन्न आहेत. प्रत्यगात्मा म्हणजेच कूटस्थ हाच सच्चिदानंद अविनाशी परब्रह्म होय.(४४) अहं प्रत्ययाचा आधार जो घेतो तोच साक्षिरूप चिद्‌घन परब्रह्म आहे. हा अनुभव प्रत्यक्षात जेव्हा येतो, तेच खरे ज्ञान होय. त्याच ज्ञानामुळे जीव पवित्र होऊन जातो.(४५)यावर शंका अशी की, प्रत्यगात्मा किंवा कूटस्थ हा देहव्याप्त असल्यामुळे सोपाधिक(म्हणजे उपाधियुक्त) आहे. त्यामुळे त्याला अपरोक्ष प्रत्यक्ष ज्ञान होते असे म्हणणे ठीक आहे.पण निरुपाधिक (उपाधी नसलेले) असे परब्रह्म अपरोक्ष (प्रत्यक्ष अनुभवाचा विषय) झाले असे कसे म्हणता येईल?(४६)तू येथे एक चूक करत आहेस. आत्मा किंवा प्रत्यगात्मा अथवा कूटस्थ याला तू उपाधिग्रस्त ठरवतोस. ती उपाधी कोणती ते सांग बरे? ती उपाधी अंतःकरणाची आहे असे म्हणशील तर त्याच न्यायाने परब्रह्मालाही उपाधिग्रस्त ठरवता येईल.(४७) आत्मा अंतःकरणसहित आहे ही जशी आत्म्याची उपाधी मानतोस तशी अंतःकरणरहित असणे ही ब्रह्माची उपाधी मानता येईल. सोने आणि लोखंड यात भेद आहे, हे खरे पण साखळीच्या रूपाने बांधून टाकण्याच्या बाबतीत दोन्हीही सारखीच!(४८) अंतःकरणाची उपाधी स्वीकारली तर आत्मा प्रत्यक्ष कसा होईल? वृत्तीच्या साहाय्याने त्याला जाणू गेल्यास तो दृष्टीआड होईल (परोक्ष होईल.)(४९)

**वृत्तीतें जरी सांडिलें। आत्मया आत्मत्वीं अनुभविलें। तयातें अपरोक्ष बोलिलें। महानुभावीं।।५०।। तैसें ब्रह्मीं कां न घडे। अपरोक्षाचे कोण सांकडे । वृत्तिरहित दोहीकडें । ब्रह्मात्मप्रतीति।।५१।। एवं हा आत्मा ब्रह्म । श्रुतिसिद्ध जो परम । सांडितांचि भेदभ्रम । ऐक्य सहजची ।।५२।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ब्रह्मात्मैक्यलक्षणप्रकार । प्रथमसमासः ।।१।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास २रा - लक्षणावृत्तिप्रकार

**तें हें एकार्थता न घडे। विरोधची येऊन पडे। विरोधबाधें एकार्थ आतुडे। लक्षणावृत्तिन्यायें[१०] ।।१।। लक्षणावृत्तिवांचुनी । न पविजे अर्थालागुनी । साधुसंतमुनिजनीं । बोलिली लक्षणा ।।२।। श्रोता म्हणे जी अवधारा । लक्षणा वृत्ति कासया करा । संसर्ग विशिष्ट लोकव्यापारा। अर्थसिद्धि होती ।।३।। वक्ता म्हणे अखंडैकरसीं । विशिष्ट आणि संसर्गासी । प्रवृत्ति नव्हे अर्थाविशी । तेंचि ओळखावें ।।४।। जो जो पदार्थ अति सन्निध । लक्षणेंवीण होय बाध । गाय आणीं बोलतां शब्द । तत्काळ आणी।।५।।यासि म्हणावें संसर्ग ।इंद्रियसन्निकर्षाचा**

---

वृत्तीचा त्याग केला तर आत्माच आत्म्याचा आत्मरूपानेच अनुभव घेतो. अशा त्या अनुभवाला महानुभाव ज्ञाते अपरोक्ष अथवा प्रत्यक्ष अनुभव म्हणतात. (५०) तसे ब्रह्माच्या बाबतीत का घडणार नाही? तेथे प्रत्यक्ष किंवा अपरोक्ष ज्ञानाला कोणती अडचण येणार आहे? दोन्हीही प्रसंगी वृत्तिरहित होणे आवश्यकच आहे. त्यालाच ब्रह्मात्मप्रतीती (आत्मा आणि ब्रह्म एकच आहेत हा साक्षात्कार) म्हणतात.(५१) अशा प्रकारे हा आत्मा ब्रह्म आहे. तो सर्वश्रेष्ठ असून श्रुतिसिद्ध आहे. या दोहोतील भ्रमावर आधारलेला भेद काढून टाकताच त्या दोहोंचे ऐक्य आपोआपच होते.(५२)

### पंचिका ७वी, समास २रा - लक्षणावृत्तिप्रकार

'तत्त्वमसि'या वाक्यातील अभिप्रेत अर्थ 'जीव हा ब्रह्मच आहे' हा सिद्ध होत नाही. तो सिद्ध करण्यामध्ये विरोधच उपस्थित होतो. विरोधाचा निरास करताच एकार्थाची प्राप्ती होते. ती लक्षणावृत्तीमुळेच शक्य होते.(१)लक्षणावृत्तीवाचून इष्ट अर्थाची प्राप्ती होत नाही. म्हणूनच साधुसंतांनी, मुनिजनांनी लक्षणेचा अंगीकार केला आहे.(२)यावर श्रोता म्हणतो की,संसर्ग(म्हणजे सांनिध्य)आणि लोकव्यवहार यांनी अर्थसिद्धी होत असताना लक्षणावृत्ती का स्वीकारायची?(३)यावर वक्ता सांगतो की,अखंड एकरस असणाऱ्या परब्रह्माच्या संदर्भात विशिष्ट (श्वेतपीतादिकवर्ण) गुणधर्म अथवा संसर्ग (म्हणजे सांनिध्य) यांची ऐक्यबोधाच्या बाबतीत गती चालत नाही.हे लक्षात घ्या.(४)जो पदार्थ अगदी निकट असतो, त्याचा लक्षणेचा अंगीकार न करताच अर्थबोध होतो. 'गाय आण' असे म्हणताच ऐकणारा(अर्थाचा घोळ न घालता जवळची) गाय आणतो.(५)याला संसर्ग अथवा सान्निध्य म्हणतात. वरील उदाहरणात

**योग । संसर्गाची लगबग । ब्रह्मात्मबोधा न चाले ।।६।। तैसेचि रंगादिक आढळे । नीलश्वेतादि कमळें । बोलतांचि अर्थ कळे । हें विशिष्ट वाक्य ।।७।। ऐसें न घडे वस्तूसी। अलक्ष्या लक्षणें कैसीं । पूर्ण अखंडैकरसीं । विशिष्टत्व न घडे ।।८।। म्हणोनि हे लक्षणा वृत्ति । येणेंचि पाविजे अर्थाप्रती । त्या लक्षणाही असती । त्रिविधा प्रकारें[१] ।।९।। एक जाणिजे जहत् । दुसरी ते अजहत् । तिसरी जहदजहत् । लक्षणावृत्ति।।१०।। जहत् म्हणिजे त्याग । अजहत् तेचि अत्याग । तिसरी ते त्यागात्याग । जहदजहल्लक्षणा।।११।। त्यांत दोनी लक्षणांचें । काज नाहीं तयाचें । मुख्य जहदजहल्लक्षणेचें । ग्रहण असे।।१२।। दोहीं लक्षणेचें ग्रहण । का न करा म्हणसी पूर्ण । तरी तेंचि ऐका सावधान । शास्त्रसिद्ध।।१३।। गंगेमध्यें गौळवाडा । तरी हा विरोध उघडा । प्रवाहाचा अत्यंत वोढा। तरी कां न वाहवे।।१४।। येथें त्यागलक्षणेचा स्वीकार । प्रवाह सांडिजे समग्र । लक्षिलें पाहिजे गंगातीर । तरी विरोध उडे ।।१५।। तें तूं हे दोनी शब्द । परोक्ष अपरोक्ष विरोध।**

---

इंद्रियसंनिकर्षाचा भाग आहे.त्याला संसर्ग म्हणतात.पण परब्रह्माच्या बोधासाठी इंद्रिय संनिकर्षाचा योग अथवा संसर्गाची(अथवा सांनिध्याची)लगबग चालत नाही.(६)त्याप्रमाणे पदार्थामध्ये रंग इत्यादी गुण आढळतात.निळी,पांढरी कमळे इत्यादी म्हणताच त्यांचा अर्थ लगेच लक्षात येतो.अशा वाक्याला विशिष्ट वाक्य(म्हणजे विशेषणयुक्त असे)म्हणतात.(७)पण परब्रह्माच्या बाबतीत अशी विशिष्ट वाक्ये शक्य होत नाहीत.जे स्वत: अलक्ष्य आहे त्याची लक्षणे कशी संभवतील?परिपूर्ण अखंड एकरस अशा परब्रह्माच्या ठिकाणी विशिष्टत्व(विशेषणांनी ओळखले जाण्याचा प्रकार) संभवत नाही.(८)म्हणून ही लक्षणा नावाची जी वृत्ती(बोधाचा प्रकार)आहे तिच्याच योगाने अर्थाची प्राप्ती होऊ शकते.ही लक्षणादेखील तीन प्रकारची असते.(९)एक प्रकार जहत् लक्षणा म्हणून ओळखावा.दुसरा प्रकार म्हणजे अजहत् लक्षणा होय.लक्षणावृत्तीचा तिसरा प्रकार जहदजहल्लक्षणेचा होय.(१०)जहत् म्हणजे त्याग.अजहत् म्हणजे त्याग न करणे आणि तिसरी जहद् अजहत् लक्षणा म्हणजे त्यागात्यागलक्षणा होय.(११)त्यांपैकी वरील (ओ.७.२.१) महावाक्याच्या अर्थनिर्धारणेच्या संदर्भात जहत्लक्षणा आणि अजहत्लक्षणा या पहिल्या दोन लक्षणांचा काही उपयोग नाही.तिथे प्रामुख्याने जहदजहलक्षणाच घ्यावी लागते.(१२)'पहिल्या दोन लक्षणांचा महावाक्याच्या अर्थनिर्धारणाच्या बाबतीत तुम्ही विचार करू नका'असे तुम्ही का म्हणता,असे विचाराल तर मी त्याचे शास्त्रसिद्ध उत्तर देतो,ते लक्षपूर्वक ऐका.(१३)'गंगेमध्ये गवळीवाडा' असे म्हणण्यात उघडउघड विरोध आहे.गंगेचा प्रवाह अत्यंत वेगवान असल्यामुळे तो गवळीवाडा वाहून जाणार नाही का?(१४)म्हणून येथे त्यागलक्षणेचा(जहत् लक्षणेचा)स्वीकार करावा लागतो.वरील वाक्याच्या संदर्भात गंगाप्रवाह या अर्थाचा त्याग करावा लागतो.त्याऐवजी लक्षणेच्या अर्थाने गंगातीर असा अर्थ घ्यावा लागतो.तसे केल्याने विरोध नाहीसा होतो.(१५)'तत्त्वमसि' या महावाक्यातील'ते'आणि 'तू' या

**सर्वांश सांडिला जरी सिद्ध । पदांतर कोणतें।।१६।।म्हणोनि त्यागलक्षणा न घडे । विरोधें मुख्यार्थही विघडे। पदांतर अपेक्षा न पडे । म्हणोनिया।।१७।।तांबडा धांवे म्हणता। विरोध वाटे तत्त्वतां । घोडा एक स्वीकारितां । वर्णत्याग नलगे ।।१८।। ही अजहल्लक्षणा। उपेगा नये ब्रह्मज्ञाना। वाच्यांश न त्यागितां जाणा । विरोध न जाय।।१९।। तत्त्वंपदें दोन। अपेक्षा नसे पदा आन । म्हणोनि अजहल्लक्षण । सांडिले संती ।।२०।। तत्त्वं हे ऐक्यार्थ । करावया तेंचि समर्थ । प्राप्त होय गुह्यार्थ । जहदजहल्लक्षणें ।।२१।। आतां तेचि लक्षणा कैसी । बोलिजेती अपैसी । जेणें ब्रह्मात्मयासी । ऐक्यता घडे।।२२।। तोचि हा पुरुष जाणावा।काशी देशींचा बरवा।शामकेशी अति युवा।ऊष्णकाळीं पाहिला।।२३।। हा आतां शीतकाळीं।श्वेतकेश जरा आली।दक्षिण देशीं नेत्रकमळीं।पाहिला ना [illegible]।२४।। काशी आणि दक्षिण देश। ऊष्ण शीत काळास।वृद्धयुवा शामश्वेतकेश।ऐक्यता न घडे।।२५।।**

---

दोन शब्दांमध्ये 'ते' हा शब्द परोक्ष म्हणजे प्रत्यक्ष समोर नसलेल्या पदार्थाचा वाचक आहे आणि 'तू' हा शब्द अपरोक्ष म्हणजे प्रत्यक्ष समोर असलेल्या व्यक्तीचा निर्देश करतो. त्यामुळे त्यांच्यामध्ये उघडउघड विरोध आहे. यातील दोन्ही शब्दांचा त्याग केला तरी त्या वाक्याचा योग्य अर्थ देणारा तिसरा शब्द (पदांतर) कोणता आहे?(१६)म्हणून येथे त्यागलक्षणा होत नाही. त्या दोन्ही शब्दांतील विरोधामुळे मुख्यार्थालाही हानी पोहोचते आणि त्याव्यतिरिक्त अन्य शब्दाची तर येथे अपेक्षाच नाही. (कोणत्याही लक्षणाव्यापारात मुख्यार्थबाध, मुख्यार्थाशी संबंध आणि प्रयोजन किंवा रूढी असे तीन घटक असतात. यांपैकी येथे एकही घटक नाही.)(१७)केवळ 'तांबडा धावतो' या वाक्यात खरे पाहिले असता विरोध जाणवतो. परंतु 'घोडा' असा नवीन शब्द स्वीकारल्याबरोबर तांबडा या वर्णवाचक विशेषणाचा त्याग करण्याची आवश्यकता नाही.(१८)ही अजहल्लक्षणा (अत्यागलक्षणा) होय. पण महावाक्याच्या अर्थग्रहणासाठी ती उपयोगी पडत नाही. वाच्यांशाचा त्याग केला तरी विरोध नाहीसा होत नाही.(१९)'तत्' आणि 'त्वम्' अशी दोन पदे असताना येथे तिसऱ्या पदाची अपेक्षाच नाही. म्हणून संतांनी या वाक्याच्या संदर्भात अजहल्लक्षणेचा (अत्याग लक्षणेचा) त्याग केला आहे.(२०) 'तत्' आणि 'त्वम्' ही दोन पदेच त्यांच्यात ऐक्य निर्माण करण्यास समर्थ आहेत. त्यांच्यातील गूढ अर्थ जहदजहल्लक्षणेने (त्यागात्याग लक्षणेने) प्राप्त होतो.(२१)आता ओघाने आले म्हणून लक्षणेचे स्वरूप सांगतो. तिच्या योगाने ब्रह्म आणि आत्मा यांचे ऐक्य सिद्ध होते. कसे ते पहा.(२२)काशीच्या प्रदेशात सुंदर, काळ्या केसांचा, अतिशय तरुण असा जो पुरुष उन्हाळ्यात आपण पाहिला होता, तोच हा पुरुष होय.(२३)आता हिवाळा चालू आहे, याचे केस पांढरे झाले आहेत, ह्याला वार्धक्य आले आहे. तो आता दक्षिण प्रांतात असून मी माझ्या डोळ्यांनी त्याला पाहिले आहे.(२४) काशी आणि दक्षिण प्रांत, उन्हाळा आणि हिवाळा, वृद्ध आणि तरुण, काळ्या केसांचा आणि पांढऱ्या केसांचा यांमध्ये काहीच ऐक्य नाही.(२५)

□ हे म्हणिजे अपरोक्ष ।(२७)



**देश काल वय अवस्था । ह्या त्यागाव्या समस्ता । विरोध नसे पुरुष लक्षितां । तो हा देवदत्त।।२६।। तैसें तें म्हणिजे परोक्ष ।□उभयार्थी वाच्य लक्ष्य । एकार्थता न घडे।।२७।। तत्पदींचा शबलांश । त्वंपदींचा वाच्यांश। सांडून घेइजे लक्ष्यांश । तत्त्वंपदींचा ।।२८।। हे त्यागात्याग लक्षणा । ओळखावी विवंचना । प्रत्यगात्मा ब्रह्मपूर्णा । ऐक्यता घडे।।२९।। हेंचि निरोपिजे पुढती। सावधान असावें श्रोतीं। वाच्य लक्ष्य साधकांप्रती। कळलें पाहिजे।।३०।। तत्पदीं शबल शुद्ध । भेद असती प्रसिद्ध । मायातीत तें शुद्ध । शबल तें माईक ।।३१।। सर्वज्ञ आणि सर्वशक्ति। सर्वेश्वर स्वयंज्योति । हे मायेस्तव भासती । शबल वाच्य।।३२।। मनादिउपाधिरहित । अविद्या अज्ञान निरसत । केवल उरे जें चित् । तें त्वंपदलक्ष्य।।३३।। अंतःकरणाची उपाधि। अविद्येचिये संबंधी। कर्तृत्व भोक्तृत्व प्रतिपादी। किंचिज्ज्ञ जीव।।३४।। यासि शबल बोलिजे।सगट ऐक्या विरोध उपजे।सर्वज्ञ किंचिज्ज्ञां न होईजे।एकार्थ कधीं।।३५।। तत्पदींचें सर्वज्ञत्वादि।किंचिज्ज्ञत्वादि त्वंपदीं।माया अविद्येची उपाधि।मिथ्यात्वें जैं सांडिजे।।३६।।**

---

ते ऐक्य साधायचे असेल तर देश, काल, वय आणि अवस्था या सर्वांचा त्याग करावा आणि वरील उपाधी काढून टाकून त्या पुरुषाकडे पाहिले की तोच हा देवदत्त होय हे लक्षात येते.(२६) त्याप्रमाणे 'ते' म्हणजे परोक्ष आणि 'हे' म्हणजे अपरोक्ष. या दोहोंमध्ये वाच्य अथवा लक्ष्य या दोन्ही अर्थांनी एकार्थता सिद्ध होत नाही.(२७) त्यासाठी तत्पदाच्या ठिकाणचा शबलांश,त्वं पदाचा वाच्यांश यांचा त्याग करून 'तत्, त्वम्' या पदांच्या ठिकाणचा लक्ष्यांश तेवढा घ्यावा.(२८) हा विचार म्हणजे त्यागात्याग लक्षणा (म्हणजे जहदजहल्लक्षणा) होय. तिच्या योगाने प्रत्यगात्मा (कूटस्थ) आणि ब्रह्म यांच्यामध्ये ऐक्य प्रस्थापित करता येते.(२९) तेच आता पुढे सांगायचे आहे. श्रोत्यांनी सावधान होऊन ऐकावे. साधकांना वाच्य आणि लक्ष्य यांतील भेद कळला पाहिजे.(३०) तत्पदाच्या ठिकाणी शबल आणि शुद्ध असे दोन भेद आहेत. जे मायातीत आहे ते शुद्ध असून जे मायायुक्त आहे ते शबल होय.(३१) परब्रह्म हे सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वेश्वर आणि स्वयंप्रकाशी आहे. इत्यादी सर्व मायेमुळे वाटत असते. म्हणून ते शबल असून वाच्य आहे. (वरवरच्या अर्थाने आहे.)(३२) आता मनादी उपाधी नसलेले, अविद्या आणि अज्ञान यांचे निर्मूलन झालेले आहे असे केवळ चैतन्यरूप असे उरते ते त्वपदाचे लक्ष्य तत्त्व (म्हणजे लक्ष्यार्थ) होय.(३३) अंत:करणाच्या उपाधीमुळे आणि अविद्येच्या संबंधामुळे अल्पज्ञ जीव कर्तृत्व आणि भोक्तृत्व स्वत:कडे घेतो.(३४) त्याला शबल म्हणजे उपाधियुक्त असे म्हणावे. पण त्या उपाधींमुळे जीवब्रह्मैक्याला विरोध निर्माण होतो. सर्वज्ञ आणि अल्पज्ञ यांच्यात एकार्थता कधी होऊ शकते का?(३५) त्यासाठी तत्पदाच्या ठिकाणचे सर्वज्ञत्व इत्यादी विशेष गुण आणि त्वंपदाच्या ठिकाणचे किंचिज्ज्ञत्व इत्यादी विशेष गुण दोहोंच्या ठिकाणच्या अनुक्रमे माया आणि अविद्या या उपाधी या गोष्टींचा मिथ्या म्हणून जेव्हा त्याग करावा(३६)

**दोहींचा घेइजे जो लक्ष्यांश । प्रत्यगात्मा आणि परेश । उपाधि निरसतां अविनाश । एकरूप।।३७।।उपाधि मिथ्या जाणावी । तत्कृत लक्षणें त्यागावीं। मग ऐक्यतेची पदवी। तत्क्षणीं साधकां ।।३८।। मी ब्रह्म हे प्रतीति । जेथें भिन्नत्वाची गळे वृत्ति । सर्व संशयां समाप्ति । निवळे ज्ञप्ति अखंड ।।३९।। गुरुशास्त्र आणि विचार। सकळ साधनांचे सार। तो हा जाणिजे साक्षात्कार । ब्रह्मात्मज्ञान।।४०।। येथें विचारचि कारण । गुरु शास्त्र हे दोन । ज्ञानें पाविजे समाधान। मोक्ष तो हाची ।।४१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । लक्षणावृत्तिप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - सर्वाभेदानुकार

**निःशेष भेदाचें खंडण । तेंचि जाणिजें शुद्धज्ञान । ब्रह्म प्रत्यगात्मा अभिन्न । मोक्ष पुरुषार्थ हाची ।।१।। शुद्ध लक्ष्यांश हें अभेद । बोलणें नलगे हें विशद । उपाधीचाहि नसे भेद। निवळून पाहा ।।२।। वाच्यांशासीहि ऐक्य घडे । मग लक्ष्यांशीं काय सांकडें । श्रोता म्हणे हें कुडें । विरोध बोलतां ।।३।। मागां विरोध बोलिला । ऐक्य नव्हे वाच्यांशाला । आतां**

---

त्या दोन्ही ठिकाणचा फक्त लक्ष्यांश घ्यावा,तेव्हा उपाधींचा निरास झाल्यामुळे प्रत्यगात्मा आणि परब्रह्म दोन्ही अविनाशी आणि एकरूपच होत.(३७)उपाधी मिथ्या म्हणून तिचा त्याग करावा,तिच्यामुळे आलेली लक्षणे टाकावीत म्हणजे साधकाला अगदी त्याच क्षणी ऐक्याची पदवी प्राप्त होतो.(३८)'मी ब्रह्म आहे'हा अनुभव येऊन भिन्नत्वाची भावना गळून पडते.तेव्हा सर्व संशयांची समाप्ती होऊन केवळ अखंड असे ज्ञान शिल्लक राहते(३९)गुरू,शास्त्र आणि विचार या सर्व साधनांचे सार ब्रह्मज्ञान हेच असून ते ज्ञान हाच साक्षात्कार होय.(४०)वरीलपैकी तिहींमध्ये विचारच मुख्य असून तो गुरू आणि शास्त्र यांच्या योगाने साध्य होतो,त्याच्या साहाय्याने जे ज्ञान होते त्या ज्ञानामुळे समाधान प्राप्त होते,हाच मोक्ष होय.(४१)

## पंचिका ७वी, समास ३रा - सर्वभेदानुकार

निःशेष भेदाचे खंडन होणे हेच शुद्ध ज्ञान होय,हे समजून घे.ब्रह्म आणि प्रत्यगात्मा हे अभिन्न आहेत.हे ज्ञान हाच मोक्ष होय.हाच पुरुषार्थ होय.(१)लक्ष्यांश(तत्पद)हा शुद्ध असून तेथे भेदाचा अभाव असतो,हे सांगण्याची आवश्यकता नाही त्याठिकाणी उपाधींचाही भेद नाही,हे नीट शोध घेऊन पहा.(२)त्या संदर्भात वाच्यांशामध्ये सुद्धा जेथे ऐक्यच असते,तेथे लक्ष्यांशाच्या ऐक्याचे काय बरे संकट आहे? यावर श्रोता आक्षेप घेतो आणि म्हणतो,"हे तुमचे बोलणे गोंधळात टाकणारे आहे(कुडे). तुम्ही अगोदर जे बोललात त्याच्या विरुद्ध आता सांगत आहात.(३) मागे तुम्ही 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या दोन

**म्हणतां उपाधीला। ऐक्यता घडे।।४।।वक्ता म्हणे ऐका वचन। विरोध नाहीं पाहा शोधून। ज्याची भेददृष्टि अधिक न्यून। त्या ऐक्यता न घडे।।५।।त्यासि अभेदबोध व्हावा । म्हणोनि विरोध खंडावा । वास्तवीक पाहतां जीव शिवा । भेदचि नाहीं।।६।।पर्वतप्राय सुवर्ण । गुंजभरी तेंही सुवर्ण। सांडितां न्यूनाधिकपण। सुवर्णी भेद नाहीं।।७।।न्यूनाधिकपण जावें। म्हणोनि मागें बोलिलें बरवें। उपाधीसी ऐक्य न व्हावें। न्यूनाधिकपणें।।८।।न्यूनाधिक हें सांडिता। उपाधीसीहि घडे ऐक्यता । तरी विरोध कोणता । विचारें पाहा।।९।। श्रोता म्हणे उपाधि-अभेद । तेचि सांगा कैसी विशद । वक्ता म्हणे अनुवाद । कीजे ऐका।।१०।। तत्पदीं उपाधि विद्या। त्वंपदीं उपाधि अविद्या । नेहटून पाहतां अनाद्या । सारिख्या दोन्ही।।११।। जळ एक ते निर्मळ । थिल्लरींचे तें डहुळ । परी पाहतां जळ । एकरूप असे ।।१२।। विद्या अविद्या एक होतां। सहज कार्यासी ऐक्यता। तेंचि ऐका समस्ता। कार्यकारणरूपें।।१३।। विराट हा पंचभूतांचा।तदंश पिंड अस्थिमांसाचा। दोहींकडे भूतांचा। जड भाग सारिखा।।१४।।**

---

पदांमध्ये विरोध आहे असे म्हणालात.वाच्यांशामध्ये ऐक्य नाही असे सांगितलेत. आता उपाधींमध्ये ऐक्य आहे म्हणून सांगत आहात,हे कसे?(४)त्यावर वक्ता म्हणतो की,"माझे बोलणे नीट ऐका. तुम्हीच स्वत: शोध घ्या.म्हणजे त्या महावाक्यात विरोध नाही,हे तुमच्या लक्षात येईल.ज्यांची पाहण्याची दृष्टी भेदयुक्त असेल,ती कमीजास्त प्रमाणात असेल त्यांना मात्र हे ऐक्य जाणवणार नाही.(५)त्यांना त्यातील अभेदाचे ज्ञान व्हावे म्हणून अगोदर विरोध सांगून त्याचे खंडन करणे प्राप्त आहे.वास्तविक पाहता जीव (त्वंपद) आणि शिव(तत्पद)यांमध्ये भेदच नाही.(६)एका बाजूला सोन्याचा पर्वत आहे.दुसऱ्या बाजूला एक गुंजभर सोने आहे.दोन्हीही सोनेच आहे.त्यांच्यातील कमीजास्तपणाचा भेद सोडला तर सुवर्णपणात काही भेद नाही.(७)हा कमीजास्तपणाचा भेद जावा म्हणून मागे स्पष्ट सांगितले आहे.हा कमीजास्तपणाचा भेद असल्यामुळे उपाधींमध्ये ऐक्य होत नाही.(८)तो कमीजास्तपणाचा भेद टाकून द्या म्हणजे उपाधींमध्येही ऐक्य घडेल. मग विरोध कोणता राहिला हे विचार करून पहा.(९)त्यावर श्रोता म्हणतो की, 'हा उपाधि अभेद म्हणजे काय ते जरा अधिक स्पष्ट करून सांगा.'त्यावर वक्ता म्हणतो, 'तुमच्या म्हणण्याप्रमाणे मी स्पष्ट करून सांगतो, ऐका.'(१०) तत्पदाच्या ठिकाणची उपाधी म्हणजे विद्या ही होय. त्वंपदाची उपाधी अविद्या ही आहे. नीट विचार करून पाहिल्या तर दोन्ही अनादी असून सारख्याच आहेत.(११)निर्मळ पाणी आणि डबक्यातील गढूळ पाणी ही दोन्ही एकरूपच आहेत. दोन्ही पाणीच आहेत.(१२) विद्या आणि अविद्या या मायाजन्य शक्ती एकरूप झाल्या की, त्यांची कार्ये शिव आणि जीव हे दोन्हीपण एकरूपच होतात. तेच कार्य कारणरूप सांगतो, ते नीट ऐका.(१३) ब्रह्मांडाचा स्थूल देह म्हणजे विराट होय. तो पंचभूतांचा बनलेला आहे. पिंडाचा स्थूलदेह हा त्या विराटाचाच अंश असून तोही पंचभूतांचाच बनलेला आहे. दोन्ही ठिकाणी भूतात्मक जडभाग सारखाच आहे.(१४)

**पिंडीं अवस्था जागृति । तेचि ब्रह्मांडी उत्पत्ति । अकारमात्रा उभयांप्रती । एकचि असे।।१५।। जागृतीचा विश्वाभिमानी । तोचि ब्रह्मा उत्पत्तिलागुनी । ब्रह्मांडी असे देह धरुनी । पिंडी अंशरूपें ।।१६।।भूतांचें अपंचीकरण। सूक्ष्म आणि हिरण्य । सप्तदशकलात्मक[५१] जाण। दोहींकडे सारिखें ।।१७।। स्वप्नावस्था पालण । उकारमात्रा भासकपण । जागृति उत्पत्तिचे कारण । सारिखें दोन्हीं ।।१८।। विश्व ब्रह्मयाचा पिता । विष्णु तैजस तत्वतां । तेथें भेदाची वार्ता । बोलोंचि नये ।।१९।। सूत्रात्मा लिंगाचें स्थान । अव्याकृत आणि कारण। अज्ञान तमोगुण । मकारमात्रा ।।२०।। सुषुप्ति आणि प्रलय। यासि भेद तो काय । विष्णु तैजस जेथें होय । रुद्र प्राज्ञ अभिमानी।।२१।। असो विद्याप्रतिबिंब शिव । अविद्याप्रतिबिंब जीव । या दोहींचा स्वभाव । सारिखाचि।।२२।।सर्वज्ञ म्हणिजे बहु जाणें । किंचिज्ज्ञ म्हणिजे थोडे जाणें । दोहींकडे जाणणें । एकरूप ।।२३।। जीव शिव अविद्या माया । स्थूल सूक्ष्म कारण कार्या । विराट् हिरण्यगर्भ अव्याकृत या। नाममात्र भेद ।।२४।।**

---

पिंडामध्ये जशी जागृती अवस्था असते तशीच ब्रह्मांडाची उत्पत्ती ही अवस्था असते.दोन्ही अवस्थांची 'अ'कार मात्रा एकच आहे.(१५)पिंडामध्ये जागृतीचा अभिमानी म्हणजे जसा विश्व आहे तसा ब्रह्मांडातील उत्पत्तीचा अभिमानी ब्रह्मा हा आहे.ब्रह्मा ब्रह्मांडात वास्तव्य करतो तसा विश्व हा पिंडामध्ये अशंरूपाने राहतो.(१६)भूतांचे अपंचीकरण,सूक्ष्मदेह आणि हिरण्यगर्भ अथवा सूत्रात्मा,सतरा घटकांचा बनलेला असणे, हे सर्व दोन्ही ठिकाणी सारखेच आहेत.(१७)सूक्ष्म देहाची स्वप्रावस्था,पालनकार्य,उकारमात्रा, आभासरूप,जागृतीच्या उत्पत्तीचे कारण इत्यादी लक्षणे दोन्हीकडेही सारखीच असतात.(१८)स्थूलदेहांच्या विश्व,ब्रह्मा यांच्या निर्मितीचे कारण(पिता)हे सूक्ष्म देहांचे अभिमानी तैजस् आणि विष्णू हे आहेत.त्यांच्या बाबतीत भेदाची गोष्टसुद्धा काढू नये. ते सर्व घटक दोन्ही ठिकाणी सारखेच आहेत.(१९) सूत्रात्मा आणि लिंगदेह यांची निर्मितिस्थाने अनुक्रमे अव्याकृत आणि कारणदेह ही आहेत. पिंडाचा कारणदेह तोच ब्रह्मांडाचा अव्याकृत देह होय. दोन्ही ठिकाणी अज्ञान, तमोगुण, मकारमात्रा ही सारखीच आहेत.(२०)या देहांच्या अनुक्रमे प्रलय आणि सुषुप्ती या आहेत. त्यांमध्ये भेद काहीच नाही. सूक्ष्म देहांचे अभिमानी जसे विष्णू आणि तैजस हे आहेत त्याऐवजी येथे रुद्र आणि प्राज्ञ हे अभिमानी आहेत.(२१)हे आता राहू द्या. मूलमायेच्या विद्या आणि अविद्या या दोन शक्ती असून त्यांमध्ये विद्येमध्ये ब्रह्माचे जे प्रतिबिंब पडते त्याला शिव म्हणतात आणि अविद्येमध्ये त्याचे जे प्रतिबिंब पडते त्याला जीव म्हणतात. शिव आणि जीव या दोहोंचा स्वभाव सारखाच आहे.(२२) ईश्वर (शिव) हा सर्वज्ञ म्हणजे पुष्कळ जाणणारा आणि जीव हा किंचिज्ज्ञ म्हणजे अल्प अथवा थोडे जाणणारा आहे. पण दोन्हींच्या जाणण्याचे स्वरूप एकसारखेच आहे.(२३)तेव्हा जीव-शिव, अविद्या-माया, स्थूलदेह-सूक्ष्मदेह,कारण-कार्य,विराट-हिरण्यगर्भ-अव्याकृत या सगळ्या संकल्पनांमध्ये भेद फक्त नावांचा आहे.(२४)

**जागृति स्वप्न सुषुप्ति । उत्पत्ति स्थिति प्रलय म्हणती । यासि भेद नाहीं रती । नामेंवीण।।२५।। विश्व तैजसु प्राज्ञ तीन । ते ब्रह्मा विष्णु ईशान । हे जाणावे कार्याकारण । भेद नाहीं।।२६।। जैसा एक आम्रवृक्ष । तेथें नामाचे उदंड पक्ष । परी तो जाणिजे वृक्ष । एकचि असे।।२७।। मूळ खोड फाट्या शाखा। पानें डिऱ्या देठ लाखा। सुमनें फळें नाम लेखा। एक आंबा।।२८।। तैसें जें जें नाम आलें । व्यवहारार्थ ठेविलें। अस्तिभातिवीण देखिलें । सांगा कोठें।।२९।। ब्रह्मवृक्षाचिये पोटीं । नामरूपाची दाटी । शोधून पाहतां शेवटीं । अब्रह्मत्व कैचें ।।३०।। वास्तवरूप यासि असावें । तरी ब्रह्मीं भिन्न कल्पावें । आधींच नसतां स्वभावें । भेद तो कोणता ।।३१।। म्हणोनिया भेद भुली। यासि दे तिलांजुली । बंधमोक्षाची साकळी । बोलोंचि नये ।।३२।। एक पिंड ओळखिला। यथार्थ प्रतीतीस आला । तैसा अनेक पिंडाचा गलबला । भिन्नत्व कैचें ।।३३।।एकमृण्मय जाणितलें । घट गाडगें परळ जालें। रांझण डेरे एकें पाहिले । मृत्तिकेचे ।।३४।। तैसें सकळ पिंडेसी ब्रह्मांड । ब्रह्मबीजाचें झाड । तेथें भेदबुद्धि हे द्वाड । कोठोनि आली।।३५।। येणें आक्षेपिलें कांहीं। ब्रह्मप्रपंचा**

---

जागृती-स्वप्न-सुषुप्ती, उत्पत्ती-स्थिती-प्रलय, यांच्यातही नामाखेरीज अगदी कणभरसुद्धा (रतिमात्र) भेद नाही.(२५)पिंडातील विश्व, तैजस आणि प्राज्ञ तेच ब्रह्मांडाचे ब्रह्मा, विष्णू, तैजस आणि प्राज्ञ तेच ब्रह्मांडाचे ब्रह्मा,विष्णू आणि ईशान (शंकर) होतात.त्यांचे परस्परातील नाते कार्यकारणाचे आहे. त्यातही काही फरक नाही.(२६)उदाहरणार्थ, एक आंब्याचा वृक्ष आहे.तेथे अनेक नामांचे व्यवहार असतात. पण आम्रवृक्ष मात्र एकच असतो.(२७)मूळ, खोड, फाटे, फांद्या, पाने, अंकुर, देठ, लाख, फुले, फळे ही सगळी नावे पहा.पण आम्रवृक्ष मात्र एकच असतो.(२८)त्याप्रमाणे व्यवहाराच्या सोयीसाठी जी जी नावे पदार्थांना देण्यात आली. त्या पदार्थांमध्ये अस्तिभातिप्रियत्व या लक्षणांशिवाय एकही पदार्थ कधी पाहिला आहे का, सांगा.(२९)त्याप्रमाणे ब्रह्मरूपी वृक्षामध्ये अनेक नावांची व रूपांची दाटी झाली आहे. त्या सगळ्यांचा धांडोळा घेऊन पाहता त्यांमध्ये ब्रह्म नसलेला एक तरी पदार्थ दाखवता येईल काय?(३०)त्या नामरूपांना वास्तव रूप असते तर ब्रह्मामध्ये त्यांना भिन्न अस्तित्व आहे असे मानले असते. पण तसे मुळातच नसेल तर भेद कोणता असेल?(३१)म्हणून भेद, भुली (भ्रम)यांना तिलांजली देऊन बंध,मोक्षाच्या गोष्टीच बोलू नयेत.(३२)एक पिंड समजून घेतला, त्याचे यथार्थ स्वरूप कळले, त्यावरून सर्व पिंडांचे स्वरूप कळते. मग ते संख्येने कितीही असले तरी फरक पडत नाही.तेव्हा पिंड आणि ब्रह्म यांच्यात भेद कसा असेल?(३३)घट,गाडगे,परळ,रांजण,डेरे इत्यादी अनेक नामरूपांमध्ये एक पदार्थ मातीचा आहे हे लक्षात आल्यावर इतर सर्व पदार्थ मृत्तिकेचे आहेत (मातीचेच आहेत)हे एखादा ओळखतो.(३४)त्याप्रमाणे सर्व पिंडासहित ब्रह्मांड हे सर्व एका ब्रह्मबीजाचेच झाड आहे. तेथे ही खोटी भेदबुद्धी कुठून आली?(३५)यावर काही श्रोत्यांनी आक्षेप घेतला की, ब्रह्म

**भेद नाहीं। उत्पत्ति लय होतांहि । अवस्था ब्रह्मीं असेल।।३६।।येथें ऐका उपपत्ति। पाणियावरी तरंग उठती। शेवटीं तेथें लया जाती। पाणी जैसें तैसें।।३७।।पाणियावेगळें करितां । नये तरंगा समस्ता । परी तरंग-धर्माची वार्ता । पाणिया नाहीं।।३८।।तैसें नामरूप हें सर्व । निजरूपीं उमटलें भाव । लय अथवा उद्भव । नामरूपासी ।।३९।। नामरूप लया गेलें । परब्रह्म तैसेंचि संचले । नामरूप जेव्हां जालें । तरी ब्रह्म जन्मेना।।४०।। आत्मा म्हणिजे आपण। जें कां ब्रह्म परिपूर्ण। आतां भेदाची वार्ता जाण । झणी घेसी।।४१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । सर्वभेदानुकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - अभेदवर्णन

**श्रोता वक्तया समोर। पुसतां होय विचार। इशझेद होतां अणुमात्र। तरी भीति चुकेना।।१।।वस्तु ठाईंचि अभेद।मिथ्यात्वें नामरूपा नसे भेद।ऐसाचि बुद्धीसी लागे छंद।तरिच समाधान।।२।।तेंचि अनुसंधान विसरतां।भेदचि उठे मागुता।अनुसंधानही राखितां। त्रिपुटी उपजे।।३।।त्रिपुटी जरी उद्भवली। तरि ते भेदबुद्धी जाली। तरी हे स्वानुभव किल्ली । कृपा करून सांगावी।।४।।**

---

आणि प्रपंच यांच्यामध्ये जर काही भेद नाही तर मग प्रपंचातील पिंडाच्या जशा उत्पत्ती, लय इत्यादी अवस्था असतात, तशा अवस्था ब्रह्माच्या ठिकाणीही असल्या पाहिजेत.(३६) यावर उत्तरादाखल आता एक उपपत्ती ऐका. पाण्यावर तरंग उठतात आणि शेवटी तेथेच लयाला जातात. पण पाण्यावर त्यांचा काही परिणाम होत नाही. ते जसेच्या तसे राहते.(३७) त्याप्रमाणे हे सर्व नामरूपमय विश्व ब्रह्मरूपावर निर्माण होते. या सर्व नामरूपांची उत्पत्ती आणि लय ब्रह्माच्या ठिकाणी होत असतात. त्यांची उत्पत्ती आणि लय ही फक्त नामरूपांचीच असतात. ब्रह्माला त्या अवस्थांचा गंधही नसतो.(३८-३९)नामरूप लयाला गेले तरी परब्रह्म मात्र आहे तसेच राहते. पुढे नामरूपे निर्माण होतात, तरी ब्रह्माचा मात्र जन्म होत नाही.(४०)आत्मा म्हणजे आपण दुसरे तिसरे काही नसून परिपूर्ण असे ब्रह्मच आहोत(हे ओळखून) भेदाची गोष्ट मुळीच काढू नकोस (झणी घेसी)(४१)

## पंचिका ७वी, समास ४था - अभेदवर्णन

श्रोत्याने वक्त्यासमोर आपली शंका मांडली, 'किंचितशी जरी भेदभावना निर्माण झाली तरी भीती टळत नाही.'(१) वस्तू (परब्रह्म) मुळातच भेदरहित आहे. नामरूपे मिथ्या असून त्यात काही भेद नाही, असा बुद्धीला छंद लागला तरच समाधान प्राप्त होते.(२) पण ते अनुसंधान जर विसरले तर पुन्हा नंतर भेदच निर्माण होईल. जरी अनुसंधान कायम ठेवले तरी त्रिपुटी उत्पन्न होतेच.(३) त्रिपुटी उत्पन्न झाली म्हणजेभेदबुद्धी आलीच. तरी ही स्वानुभवाची किल्ली कृपा करून सांगावी.(४)

**वक्ता म्हणे सावधान। बहु उत्तम केला प्रश्न । याचें कैसें समाधान । बोलिजे तें ऐका।।५।। सर्व हें मिथ्या जालें। हें बुद्धि-निश्चया आलें। अभेद जरी प्रतिपादिलें। तरी दिसणें न राहे।।६।। नामरूप क्रिया अघवी। मिथ्या परि लागे करावी। परी सत्यत्वें भेदबुद्धि जावी। हेंचि ज्ञान।।७।। तैसेंचि धरितां अनुसंधान। होय ध्येय ध्याता ध्यान। त्रिपुटी होतां अभिन्न। भेद तो मिथ्या।।८।। भेद जरी ध्यानें केला। ती प्रकारें विभागला। सत्यत्वेंचि प्रतिपादिला । तरीच द्वैत ।।९।।त्रिपुटीसी मिथ्या अवलोकन। सहज भेदासी खंडण। एकरूप असती तीन। एका अधिष्ठानीं।।१०।। तें अधिष्ठान ओळखावें। ध्येय कोणासी म्हणावें। ध्यातां ध्यान तें स्वभावें। निवडून पाहे।।११।। जो ध्याता तोचि ध्येय । तरी ध्याना रूप काय। ध्यानेंवीण ध्यातृध्येय । नामचि मिथ्या।।१२।। सहज ध्यान तरी जालें। परी त्रिपुटीतें खंडिले। मग भेदाचे मासले। कोठें असती।।१३।।अथवा ध्याता आणि ध्यान। तें तरी नव्हे कीं आपण। अखंड जें का परिपूर्ण। गगनापरी ध्येय।।१४।।तेंचि आपण हा निश्चय। ध्याता ध्यान कल्पूं नये। तेथें भेदाचें रूप काय। निर्धारीं पा।।१५।।अंतःकरणीं चैतन्य बिंबलें । तया ध्याता हें नाम जालें । येर ओतप्रोत जें उरलें । तेंचि ध्येयरूप।।१६।।**

---

तेव्हा वक्ता म्हणाला,'आता लक्षपूर्वक ऐका. तुम्ही फार चांगला प्रश्न विचारला आहे त्याचे समाधान कसे करता येते ते ऐका.(५)हे सर्व मिथ्या आहे हे बुद्धीस पटले,सर्वत्र अभेद आहे असे जरी गुरू,शास्त्रे इत्यादी सांगत असले तरी भेद दिसल्याखेरीज राहात नाही.(६)नामरूपे मिथ्या आहेत,आपण करतो त्या सर्व क्रिया मिथ्या आहेत,असे पटले तरी त्या कराव्या लागतातच.पण त्या सत्य आहेत अशी भेदबुद्धी नाहीशी होणे यालाच ज्ञान म्हणावे.(७)तशाच स्वरूपाचे अनुसंधान ठेवले तर ध्येय,ध्याता,ध्यान अशी त्रिपुटी निर्माण होते. पण ही त्रिपुटी अभिन्न आहे. हे ध्यानात ठेवले तर सर्व भेद मिथ्या होतो.(८)ध्यानामुळे निर्माण होणारा भेद तीन पक्षात विभागला जातो.ध्याता,ध्येय,ध्यान असे ते तीन पक्ष होत.हा भेद सत्य आहे असे वाटले तरच द्वैत निर्माण होणार.(९)निर्माण होणाऱ्या त्रिपुटीचे मिथ्या म्हणून अवलोकन केले तर भेदाचे खंडन आपोआपच होते.हे तीनही पक्ष एकाच अधिष्ठानावर असल्यामुळे एकरूप आहेत.(१०)ते अधिष्ठान मुख्य ओळखावे.ध्येय,ध्याता,ध्यान हे सर्व नीट निवडून पहावे.(११)जो ध्याता आहे तोच ध्येय झाला, तर ध्यानाला वेगळे असे काय अस्तित्व उरणार? आणि ध्यान नसेल तर ध्याता आणि ध्येय ही नावेच मिथ्या होत.(१२) हे ध्यान सहजपणे घडले आणि त्रिपुटीचे खंडन केले तर मग भेदाचे अस्तित्व कोठे राहील? त्याचे उदाहरणसुद्धा दाखवायला मिळणार नाही.(१३)अथवा ध्याता आणि ध्यान हे आपण नाहीच.अखंड आकाशाप्रमाणे जे ध्येय परिपूर्ण आहे,(१४) तेच आपण आहोत असा निश्चय करावा,स्वतःला ध्याता असे समजू नये, अथवा आपण ध्यानरूप आहोत, असेही समजू नये. मग भेदाचे अस्तित्व काय राहील?(१५) अंतःकरणात जे चैतन्य बिंबलेले असते, त्यास ध्याता हे नाव प्राप्त होते. बाकीचे जे सर्व व्यापून उरते ते ध्येय होय.(१६)

**ध्यानें ध्येयीं अनुसंधान। ध्याता होय जरी आपण। तरी ब्रह्मरूपीं भिन्न। सहजची पडिला।।१७।। ध्याता तो एकदेशी । कैसा पुरवी वस्तुसी । सांडून ध्यातृध्यानासी । ध्येयचि होईजे।।१८।। ध्याता ध्यान ध्येयीं मुरे।मग एकपणें ज्ञप्ति उरे।जैसें सागरीं लवण विरे।मग अखंडैकरस।।१९।। येणें रीती ज्ञाता ज्ञान । आणि साधक साधन । साध्यज्ञेयीं समरसन' त्रिपुटीचें होय।।२०।। साधनें जया साधावें । ज्ञानें जया जाणावें । ध्यानें ज्यातें ध्यावें । तेंचि आपण ।।२१।।तेंचि आपण सर्वदा आहे । विसरून म्हणे मज मी कैं लाहे । जाणतां विस्मरण नव्हे । मग लाभ हा कोणा।।२२।।विस्मरणें होतां हरपला। तो स्मरणेंचि सांपडला। आपणा आपण भेटला। बहुता दिवसां।।२३।।आतां साधनें काय साधावें। ज्ञानें कोण जाणावें। ध्यानें कोणासी घ्यावें । आपण वस्तु।।२४।। आपण वस्तु असतां। स्मरणाची कायसी चिंता। मी ब्रह्म हें नाठवितां ।ब्रह्मचि व्हावें।।२५।।जरी आठव आणि विसर।हे दोन्हीं आपणासमोर। होती जाती ज्ञप्तिमात्र।आपण असे।।२६।।आता संशय तो कोणता।विचारीं बापा पुरता। येथें विनवीतसे श्रोता।अत्यादरें।।२७।।जरी जालिया मरण।वाटे परम समाधान।किंचित् होतां**

---

ध्यानाने ध्येयाचे ठिकाणी अनुसंधान ठेवले तर आपण स्वत: ध्याता असूनही ब्रह्मरूपात सहजच आपण वेगळे ठरतो.(१७)ध्याता तर एकदेशी (मर्यादित व्याप्तीचा) आहे, तो ब्रह्माला कसा पुरेल? म्हणून ध्यात आणि ध्यान यांचे अनुसंधान न ठेवता स्वत: ध्येयरूप ब्रह्मच व्हावे.(१८)ध्याता आणि ध्यान जेव्हा ध्येयामध्ये मुरतात त्यावेळी एकपणाने केवळ ज्ञानच तेवढे उरते. समुद्रात मीठ विरून जाते त्यावेळी जसा अखंड, एकरूप असा समुद्रच उरतो, तसा हा प्रकार होय. (१९)अशाप्रकारे ज्ञाता आणि ज्ञान, साधक आणि साधन हे अनुक्रमे ज्ञेय आणि साध्य यांमध्ये समरस होऊन एकरूपच होतात, तेव्हा दोन्ही त्रिपुटी एकरूप होतात.(२०)अनेक साधने करून जे साध्य करायचे असते, ज्ञानाने जे समजून घ्यायचे असते, ध्यानाने ज्याचे ध्यान करायचे असते; तेच आपण आहोत.(२१)आपण सर्वकाळ तेच असतो,हे आपण विसरतो आणि म्हणत असतो की,'माझा मी मला केव्हा सापडेन?'आता वरीलप्रमाणे ज्ञान होताच त्या वास्तवाचे विस्मरण कधीही होत नाही.मग हा लाभ कोणाला होईल?(२२) विस्मरणामुळे जो हरवला होता, तो या ज्ञानरूप स्मरणाने सापडला आणि मग आपणच आपल्याला पुष्कळ दिवसांनी भेटतो आहोत असे होते.(२३)आता साधनांनी काय साधावे? ज्ञानाने कोणाला जाणून घ्यावे? ध्यानाने कोणाचे ध्यान करावे?कारण आपण स्वत: वस्तू म्हणजे ब्रह्म झालेलो असतो.(२४)आपणच ब्रह्म बनल्यावर स्मरणाची काळजी कशाला?'मी ब्रह्म आहे' हे न आठवताच ब्रह्म होऊन रहावे.(२५)जरी आपल्यासमोरच हे स्मरण-विस्मरण हे होत जात राहिले तरी आपण मात्र केवळ ज्ञानरूपच असतो.(२६) 'आता यावर तुझा काही संशय असेल तर विचार करून सांग',असे वक्त्याने म्हणताच श्रोत्याने अतिशय आदरपूर्वक विनंती केली.(२७)'जरी मरण आले तरी समाधान वाटते. पण आपल्या ब्रह्मरूपत्वाचे

**विस्मरण । हरपलें वाटे ।।२८।। देखून श्रोतयाचा आदरू । वक्ता सरसावला थोरु। महासंशयाचा केरु । झाडून टाकी ।।२९।। होतांचि मेखळा बंधन । शूद्राचे होती ब्राह्मण। मग विसरतां एक क्षण । पुन्हा शूद्र नव्हे ।।३०।। आपण ब्रह्म जाणीतले । देहबुद्धीचें पाप गेलें । अखंडैकरस कोंदलें । स्मरण विस्मरणेंविण ।।३१।। आपण स्मरणें नवा जाला। तरी विस्मरणें हारपला । स्मरणाभावीं आपुला । आपण असे ।।३२।। कोण्या सदैवाची पत्नी । मी सुवासीण विसरली मनीं । तरी सौभाग्यसुखाची शिराणी । तिजला नव्हे।।३३।। तैसें ब्रह्मत्व आपुलें । विस्मरणें नवचे हरपलें । विस्मरणें दुःख जालें । कोणतें सांग ।।३४।। देहबुद्धि लागे म्हणसी । इतुका अवसर कोठें तिसी। स्मरण होय वेगेसी । काकदृष्टीसम ।।३५।। अथवा व्यापारीं मी माझें म्हणतां । देहबुद्धि वाटे तत्त्वतां। त्यासि मिथ्या अवलोकितां । विस्मरण कैसें ।।३६।। जैसा डोहो लोटला । मागें ओलावा उरला । विस्मरणीं अमुक वेळ जाला । तो आठविला स्मरणें ।।३७।। विस्मरणीं स्मरण न होतें । तरी विस्मरण आठवे कोणातें । म्हणोनिया स्मरणातें । अखंडता आयती।।३८।। अखंड स्मरणचि दाटलें । विस्मरण कोठें उरलें ।**

---

किंचित जरी विस्मरण झाले तरी काहीतरी हरपल्यासारखे वाटते.'(२८)श्रोत्याचा आदरभाव पाहून वक्ता उत्तर देण्यास तयार झाला.त्याने श्रोत्याच्या मनातील महान संशयाचा केर झटकून टाकला.(२९) मेखलाबंधन(मौंजीबंधन,मुंज)झाल्यानंतर शूद्र असलेले लगेच ब्राह्मण होतात मग क्षणभर आपल्या द्विजत्वाचा(ब्राह्मणपणाचा)विसर पडला तरी तो पुन्हा शूद्र होत नाही.(३०)आपल्याला ब्रह्माचे ज्ञान झाले,त्यायोगाने देहबुद्धीचे पाप गेले आणि सर्वत्र अखंड,एकरस असे ब्रह्मच घनदाट भरून राहिलेले असले,तर त्या अवस्थेचे स्मरणही होत नाही आणि विस्मरणही होत नाही.(३१)आपल्या ब्रह्मरूपाच्या स्मरणाने आपण नवे होतो आणि विस्मरणाने हरवतो असे आपल्याला वाटत असते खरे,पण स्मरण नाही झाले तरी आपले आपण असतो.(३२)कोणा एका दैववान माणसाचीपत्नी आपण सुवासिनी आहोत,हेच विसरून गेली तरी तिचे सौभाग्यसुख त्यामुळे नाहीसे होत नाही.(३३)त्याप्रमाणे आपले ब्रह्मरूपत्व विस्मरणाने हरवत नाही.मग विस्मरणामुळे कोणते संकट येते सांग.(३४) तू म्हणशील की विस्मरणामुळे देहबुद्धी येऊन चिकटते,तर ते खरे नाही.कारण त्या देहबुद्धीला येऊन चिकटण्याइतपत संधीचकोठे मिळते? कारण विस्मरण घडल्याबरोबर लगेचच स्मरणाची अवस्था काकदृष्टीप्रमाणे(कावळ्याच्या डोळ्याप्रमाणे)येऊन उपस्थित होते.(३५)अथवा व्यवहारात 'मी माझे' असे शब्दप्रयोग करताना देहबुद्धी जाणवते.ती मिथ्या म्हणून तिच्याकडे पाहताच विस्मरण कसे होईल?(३६)किंवा पाण्याने भरलेला डोह ओसरताच मागे ओलावा उरतो त्याप्रमाणे विस्मरण अमुक वेळ झाले म्हणताच त्याचे स्मरणाने स्मरण होते.(३७)आता विस्मरणामध्ये स्मरण होत नाही असे म्हणशील तर विस्मरण कोणाला आठवते?

**विस्मरण जें कांहीं वाटलें।तेंचि स्मरण ।।३९।। स्मरणें विस्मरण ग्रासिलें । स्मरण तरी कोठें उरलें । तेंहि वितळून गेलें।चित्सागरीं लवण ।।४०।। ओतप्रोत अखंड । सीमाचि नाहीं उदंड । तेथें कैचें आणिलें द्वाड । स्मरणास्मरण ।।४१।। स्फुरणापासून तृणांत । नामरूपें समस्त । ते चित्सागरीं भासत।लहरी जैसी ।।४२।। लहरी आली आणि गेली । उद्भवतां स्वरूपीं वृद्धि जाली । लय होतां क्षीणता आली । न वचे कदा।।४३।। होतां जातां आपण । क्षयवृद्धीविण सघन । आतां नाहीं कीं भेदभान । निःसंशय ।।४४।। येथे जालें समाधान । जितचि भेद पावला मरण । द्वैताचें जालें निःसंतान । सद्गुरुप्रसादे ।।४५।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । अभेदवर्णनप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - तृप्तिवर्णन

**जालें जन्माचें सार्थक । आत्मा ब्रह्म आपण एक । जाला ज्ञानाचा परिपाक । निष्कलंक विज्ञान[५३]।।१।। चिद्रसाचा सागरीं । घटपिंडाची सरोभरी । घटपिंडा येतां मारी । चित्सागर**

---

याचा अर्थ स्मरण हे आपोआप अखंडपणे चालू असते.(३८)स्मरण जर अखंडपणे दाटून राहिले असेल तर विस्मरण कुठे राहिले?जे विस्मरण झाल्यासारखे वाटते तेही एक प्रकारचे स्मरणच आहे की नाही?(३९)अशा तऱ्हेने स्मरणाने विस्मरण व्यापून टाकले. खरे तर स्मरण तरी शिल्लक असते का? तेही चैतन्य सागरात मिठाप्रमाणे विरघळून गेले.(४०)ब्रह्म हे अखंडपणे काठोकाठ भरून राहिले आहे. त्याला कोणत्याही दिशांनी सीमाच नाहीत इतके ते उदंड,अमाप आहे. तेथे द्वाड स्मरण,अस्मरण यांचे अस्तित्व कसे असेल?(४१)स्फुरणापासून ते अगदी गवताच्या काडीपर्यंत सर्वच नामरूपे आहेत ती चैतन्यसागरात लाटांप्रमाणे भासतात.(४२)लाट येते आणि जाते.ती येताच स्वरूपात(ब्रह्मरूपात)वाढ झाली,ती ओसरताच स्वरूपात हानी झाली असे कधी होत नाही.(४३)विकार उत्पन्न होतात आणि कालांतराने नष्टही होतात.पण त्यामुळे आत्मरूपात त्यामुळे क्षय अथवा वाढ होत नाही.आपण क्षय वृद्धी यांवाचून अभंग असतो,समृद्ध असतो.त्या आपल्या स्वरूपात कुठलेच भेदभान नसते.(४४)यावर श्रोत्याचे समाधान झाले.त्याच्यातील भेद जिवंतपणीच मृत्यू पावला.द्वैताचे सद्गुरूकृपेने निःसंतान झाले.(द्वैत समूळ संपूर्णपणे नष्ट झाले.)(४५)

### पंचिका ७वी, समास ५वा - तृप्तिवर्णन

माझ्या जन्माचे सार्थक झाले. आत्मा आणि ब्रह्म एकच आहेत हे कळले. ज्ञानाचा परिपाक होऊन निष्कलंक विज्ञान प्राप्त झाले.(१) चैतन्यरसाच्या सागरात घटपिंडांची दाटी झाली अथवा त्यांचा विनाश

**ओहटेना।।२।।आतां कल्पांत राहो।कीं आजचि विघडो देहो।एतद्विशीं संदेहो।किमपी नसे।।३।।प्रश्न अथवा प्रश्नोत्तर।द्वैतींच याचा व्यवहार।द्वैतेंवीण परिहार।अद्वैतीं नाहीं।।४।। जया जाणावें उरलें असे।तया श्रवणाची श्रद्धा असे।ब्रह्म जाणतां जाणणें नसे।तरी श्रवण कासया।।५।।जयासी बहुत संशय।मननीं प्रवर्तती तीय।मी सर्वदा निःसंशय।तरी मनन राहिलें।।६।।विपर्यास कांही असावा। तेणें निदिध्यास करावा। निर्विकल्पा मजसि गोवा[५४]। निदिध्यास केवि।।७।।आपण ब्रह्म परिपूर्ण।कदां नसे भिन्नपण। तरी साक्षात्काराचें लक्षण। तेंचि कवणा ।।८।। वाहवे जो मनासवें। तेणें चित्त निरोधावें । मज अमनस्का स्वभावें । समाधि ना उत्थान ।।९।।श्रोता म्हणे मन विकारी। सुखदु:खें शीणचि करी। यासि निरोधितां अंतरीं समाधान पावे।।१०।जयासी मन आवरावें वाटें। तेणें गुदिं टाचावें नेट। मृगजळ बांधावें मोटें। आम्हां काज नाही।।११।।मनासवें शिणतां । श्रमचि उरती तत्त्वतां। नाना सायासें कष्टी होतां । मन अनावर।।१२।। अनंत योग अभ्यासिले । सहस्त्रधा ध्यान केलें । तरी मनाचें हलवलें । नाहीं रोम।।१३।।असो मनादि टाकुन दुरी । आपुला आपण निर्धारीं ।**

---

झाला तरी चैतन्यसागर मात्र (वाढत नाही आणि) ओसरत(ही) नाही.(२) आता हा देह कल्पान्तापर्यंत राहो किंवा आजच नष्ट होवो, त्याविषयी काहीही संदेह उरला नाही.(३)प्रश्न असो की प्रश्नाचे उत्तर असो, त्यांचा व्यवहार द्वैतातच होतो. द्वैताशिवाय त्यांचा परिहार होणे अद्वैतात शक्य नाही.(४) ज्याला काही जाणावयाचे उरले असेल त्यालाच श्रवणाबद्दल श्रद्धा असते. ब्रह्माचे ज्ञान झाल्यानंतर काही जाणणे उरतच नाही. मग श्रवणाची गरजच काय?(५) ज्यांच्या मनात पुष्कळ संशय आहेत तेच मननासाठी प्रवृत्त होतात. मी तर सर्वकाळ संशयरहित झालो आहे. त्यामुळे मला मननाची अपेक्षा राहिली नाही.(६)ज्याच्या मनात काही विपर्यास (उलटेसुलटे) असेल. त्यानेच निदिध्यासाचा आश्रय करावा. मी निर्विकल्प असल्यामुळे मला निदिध्यासाच्या गुंतागुंतीत (गोवा) पडण्याची गरज काय?(७)आपण परिपूर्ण ब्रह्म असताना कोठेही कधीही भेद निर्माण होत नाही. तेव्हा साक्षात्काराचे लक्षण कोणासाठी सांगायचे?(८)जो मनाबरोबर वाहवत जातो त्याने चित्ताचा निरोध करावा. मी मनोविरहित असल्यामुळे समाधीही नाही आणि उत्थानही नाही.(९)यावर श्रोता म्हणतो की, मन हे विकारी असून सुखदु:खांबरोबर ते कष्टी होते. त्याचा निरोध केल्यानेच समाधानाची प्राप्ती होते.(१०) यावर वक्ता म्हणतो की, ज्याला मन आवरावेसे वाटते, त्यानेच गुदद्वाराच्या वरील भागात टाच लावून बंध साधावा (आणि योगाभ्यास करावा)हे मृगजळ मोटेत बांधण्यासारखे आहे.आम्हाला त्याची गरज नाही.(११) मनाबरोबर शिणू लागलो तर श्रमच होतील.निरनिराळे सायास करून साधने केली तरी मन अनावर असते.(१२) अनंत योगांचा अभ्यास केला,हजार प्रकारांनी ध्यान केले,तरीही मनाचा केसही वाकडा होणार नाही.(१३) असो,मनाला दूर टाकून आपला आपण निर्धाराने व्यवहार करावा.

**कोण पडे मृगजलपुरीं । सेतूच्या खटपटी।।१४।।सिद्धान्नपात्र टाकिलें । मधुकरींचे निर्धारी। सुडकें[५५] घेतलें। करोत जे मायेनें भुलविले । मी मायातीत।।१५।।समाधि आणि उत्थान। सविकल्प निर्विकल्प उन्मन । यासी कारण एक मन । मजसी संबंध नाहीं।।१६।। कोणी कर्मे आचरती। कोणी जप ध्यान करिती। कोणी वायूच भक्षिती । मायानिरासार्थ।।१७।। असो मज परोपदेशीं । काज नसे निश्चयेंसी । मी विधि आणि निषेधासी । तिळपात्र सोडिलें।।१८।।कांहीं करणें त्यागणें । भोग्य ना भोगणें । येणें ना जाणें । किमपि असेना।।१९।।लोकीं जरी मज भाविलें। स्नानभोजनादि कल्पिलें । तरी कार्यजात स्पर्शलें। नाहीं मज।।२०।।लोकीं गुंजापुंज देखिला । म्हणती पाहा अग्न लागला। भावितां काय राख जाला । वास्तवपणें।।२१।।तेवि मज कासया चिंता । लोकदृष्टीच्या संकेता। असो करणें तें आतां । कांही उरलें नाहीं।।२२।।अखंड अद्वैत स्वभावें । उरलें काय तें प्राप्त व्हावें। पुरलीं उपायांची धावें। विचारासहित।।२३।।दीपिका जैसी सूर्यापुढें।प्रकाशी केवि**

---

मृगजळाच्या पुरात पूल बांधण्याची कोणी खटपट करावी?(१४)तयार झालेल्या अन्नाचे ताट बाजूला सारून मधुकरीच्या जीर्ण वस्त्राचा अवलंब करण्याचे काम,ज्यांना मायेची भुरळ पडली असेल त्यांनी खुशाल करावे.मी मात्र मायातीत आहे.(१५)समाधी असो वा व्युत्थान(समाधी उतरून लौकिक व्यवहारात येणे) असो; सविकल्प असो, निर्विकल्प असो,अथवा उन्मनी अवस्था असो; या सर्वांचे एकमेव कारण मन आहे. (मी मनोनाश आधीच साधलेला असल्यामुळे) माझा वरील प्रकारांशी काही संबंध नाही.(१६) मायेचा निरास करण्यासाठी कोणी कर्मांचे आचरण करतात,कोणी जप, ध्यान इत्यादी साधने करतात, आणखी कोणी वायूचेच भक्षण करून राहतात.(१७)असो,कोणी करावे, कोणी काय करू नये, असा इतरांना उपदेश करण्यात मला स्वारस्य नाही. मी तर विधी(शास्त्राने सांगितलेल्या क्रिया)आणि निषेध (निषिद्ध क्रिया)यांच्यावर तिलांजली(तीळयुक्त पाण्याची ओंजळ)सोडलेली आहे.(म्हणजे मी दोन्हीही मानत नाही.)(१८)त्यामुळे मला काही करायचे नाही अथवा कशाचा त्याग करायचा नाही,कशाचा भोग घ्यायचा नाही अथवा अमुक भोगायचे नाही असे नाही,येणे नाही अथवा जाणे नाही; माझ्या बाबतीत यांपैकी काहीच नाही.(१९)लोकांनी माझ्याबद्दल भक्तिभाव ठेवला,मला स्नान,पूजा इत्यादी उपचार केले तरी मला कोणत्याच कार्याचा स्पर्श होत नाही.(२०)लोकांनी गुंजांचा ढीग पाहिला आणि म्हटले, 'पहा,आग लागली'त्यांनी अशी कल्पना केली म्हणून गुंजांच्या ढिगाची राख होते काय?(२१)त्याप्रमाणे लोकदृष्टीच्या संकेतांची काळजी करण्याचे मला काय कारण आहे?मला काही करायचे आहे, असे काहीच राहिले नाही.(२२)असो,सर्व अखंड अद्वैतच सहजपणे जाणवत असेल तर अमुक प्राप्त व्हावे म्हणून अमुक करावे असे माझ्यासाठी काय उरले आहे? सर्व साधनांची विचारासहित धावाधाव आता पूर्ण झाली आहे.(२३)सूर्यापुढे दिवटी काय प्रकाश देणार?त्याप्रमाणे माझ्या ठिकाणी(माझ्या बाबतीत)

**बापुडे। तैसे शब्दादिक वेडे। माझा ठाई।।२४।।मी कोणा नव्हे विषय। काय करितील उपाय। अवघा जड समुदाय। स्वप्रभ न कळे।।२५।।जैसा आहे तैसाचि। एक आपुला आपणची। जाणावया ब्रह्मादिकांची। शक्ति नसे।।२६।।बहु काय बोलावें। मज जाणणेंचि न संभवें। आतां क्रियमाणाचे नावें। बिंदुलें पडिलें।।२७।।श्रोता म्हणे हो तुम्हासी। लोकसंग्रहार्थ अपैसी। सर्व करणें लागे कर्मासी। आणि ज्ञान विचार।।२८।।आपुलेनी प्रौढपणें। स्वीकारिलें सर्व करणें। उपाधियोगें घडतां तेणें। काय उणें माझें।।२९।।शास्त्रीय अथवा लौकिक। व्यापार होतां अनेक। कायिक अथवा मानसिक। होईना सुखें।।३०।।समाधि किंवा मूर्तिध्यानीं। अथवा प्रवर्तो अर्चनीं। वेदपठणीं कीं हरिभजनीं। प्रवर्तो सुखें।।३१।।अथवा करो अग्रहोत्र। कीं प्रकार यंत्रतंत्र। अथवा असो स्वतंत्र। कीं परतंत्रत्वें करो।।३२।। ब्रह्मचर्य कीं गृहस्थाश्रम। आचरो वानप्रस्थाचें धर्म। अथवा शिखासूत्रादि सर्व कर्म। संन्यास करो।।३३।। असो देहासी प्रेतत्व आलें। अंत्यजापरी बाटलें। याचें केलें आणि न केलें। सारिखें दोन्हीं।।३४।। म्हणुन करणें आणि न करणें। दोन्हीं नसून म्या असणें। सद्गुरूकृपेचेनि गुणें। आपुला आपण।।३५।।**

---

शब्द इत्यादी वेडे ठरतात.(२४) मी कुणाचाच विषय नसल्याने माझ्यासाठी कोणते उपाय लागू होतील? सर्व साधने जड होत. त्यांना स्वयंप्रकाशी परब्रह्म कळत नाही.(२५) मी जसा आहे तसाच आहे. मी एकटाच असून आपला आपणच तेवढा आहे. ब्रह्मादी देवांनाही माझे ज्ञान होणे शक्य नाही.(२६) जास्त काय बोलावे मला जाणणेच शक्य होणार नाही. (माझे ज्ञान होणे कोणालाच शक्य नाही.) माझ्या क्रियमाण कर्माच्या नावाने शून्य पडले आहे. (माझे क्रियमाण कर्म संपले आहे.)(२७) यावर श्रोता म्हणतो की, तुम्हाला लोकसंग्रहासाठी सर्व कर्मे करणे क्रमप्राप्त आहे आणि ज्ञानविचारही करावा लागतोच की नाही?(२८) वक्ता यावर उत्तर देतो की, आपल्या प्रौढपणामुळे सर्व कार्ये जरी स्वीकारली आणि उपाधीच्या संसर्गाने ते कार्य घडत असेल तर माझे काय उणे होणार आहे?(२९) शास्त्रीय अथवा लौकिक, कायिक अथवा मानसिक असे विविध प्रकारचे व्यवहार होत असतील तर ते खुशाल होऊ देत.(३०) मी समाधीचा स्वीकार करो किंवा मूर्तीचे ध्यान करत बसो किंवा देवतेच्या पूजेसाठी तयारी करत असो; वेदपठन किंवा हरिभजन या कार्यासाठी प्रवृत्त होत असो तर खुशाल होऊ देत.(३१) किंवा अग्निहोत्र करत असो, यंत्रतंत्र इत्यादी करत असो; या क्रिया स्वतंत्रपणे करत असो अथवा परतंत्रपणे करत असो,(३२) मी ब्रह्मचर्य पाळत असो अथवा गृहस्थाश्रम स्वीकारलेला असो; मी वामप्रस्थाश्रमाचे धर्म पाळत असो अथवा शेंडी, यज्ञोपवीत इत्यादींचा त्याग करून संन्यास स्वीकारलेला असो;(३३) किंबहुना देहाला प्रेतावस्था प्राप्त होवो, त्याला अगदी अंत्यजाची अवस्था प्राप्त होवो, मला केले आणि न केले हे सर्व सारखेच.(३४)म्हणून करणे, न करणे इत्यादी भेद माझ्या ठिकाणी नसून सद्गुरूकृपेने केवळ मीच आपला आपण असणे एवढेच आहे.(३५)

**धन्य धन्य गुरुराया। तुजहून ओवाळिली माया। पिंड ब्रह्मांड अष्टकाया। पादुका चरणीं।।३६।।तुझें तुजसि समर्पिलें। काय माझे हात झिजले। माझें माझेंहि उरलें ।द्वाड कोठें।।३७।।मीचि नाहीं नाहीं नाहीं। नाहीं म्हणे तैसा तोहि तोही। मौनासगट बोलणें तेंही। समरस जालें।।३८।।तैसेंचि शास्त्रसाधन। विचारासहित अवघिया नमन। बोलणें राहिलें येथून। ज्ञाना हाव पुरली।।३९।।मुख्य ज्ञानाचा विचार। जाला पूर्वार्धी निर्धार। मागा बोलिला अधिकार। साधनचतुष्टय।।४०।।हे तयाची संपत्ती। घेऊन उभी माळ हातीं। येर जे का मंदमती। त्यांकडे न पाहे।।४१।हें विचाराचें लक्षण। न पविजे अधिकारियावीण। जे अधिकाराचा करिती यत्न। तेहि पावती निजवस्तु।।४२।। श्रोतीं कोप न मानावा। प्रसंग लागे संपादावा। हा सलगीचा शब्द जाणावा। क्षमा करावी।।४३।। क्षमाशील जे संत। अत्यंत औदार्य कृपावंत। काया वाचा जीवित। त्यांचि पादरक्षा।।४४।।असो जाला पूर्वार्ध। तुटला द्वैताचा संबंध। अद्वैत प्रगटला स्वानंद। मुमुक्षुजनाचा ।।४५।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । तृप्तिवर्णनानुकारे । पंचमसमासः ।।५।।**

**इति पंचिका संपूर्णा ।।७।। ओवीसंख्या २२४**

**।। इति श्रीमदागमसारे पूर्वार्धः समाप्तः ।। पूर्वार्ध ओवीसंख्या २०८३**

---

गुरुराया, तुम्ही धन्य आहात. आपल्यावरून माया ओवाळून टाकली आहे. पिंड-ब्रह्मांड, अष्टकाया ही सर्व तुमच्या चरणी वाहिली आहेत.(३६)तुमचेच तुम्हाला मी अर्पण केले आहे. त्यात माझे काही हात झिजले नाहीत. पण माझे म्हणण्यासाठी माझे असे काय उरले आहे?(३७)जेथे मीच नाही तेथे तोही नाही. मी आणि ते यासंबंधीचे बोलणे मौनाबरोबर एकरूप होऊन गेले.(३८)त्याचप्रमाणे शास्त्र, साधन, विचार या सर्वांना माझा नमस्कार असो. येथून पुढे सर्व बोलणेच बंद झाले आणि ज्ञानाची इच्छाही पूर्ण झाली. (३९)या ग्रंथाच्या या पूर्वार्धात मुख्य ज्ञानाचा विचार पक्का झाला. त्याच्या अगोदर वेदान्ताचा अधिकार कोणाला आहे. त्यासाठी साधनचतुष्टय इत्यादी सांगितले.(४०)ती त्याची संपत्ती हातात माळ घेऊन त्याच्या गळ्यात घालण्यासाठी उभी आहे. ती मंदमती जे असतील त्यांच्याकडे ढुंकूनही पहात नाही.(४१)ही संपत्ती केवळ विचाराच्या अधीन असून अधिकारी व्यक्तीवाचून दुसऱ्या कोणालाही प्राप्त होत नाही. पण जे असा प्राप्त करण्याचा प्रयत्न करतील त्यांनासुद्धा निजवस्तूचा (ब्रह्मात्मैक्याचा) लाभ होईल.(४२)श्रोत्यांनी राग मानू नये. ओघाने आलेला विषय मांडावाच लागतो. प्रसंगाची संपादणी करावीच लागते. हा सलगीचा शब्द जाणून क्षमा करावी.(४३) जे क्षमाशील संत आहेत. जे उदार आणि कृपाळू आहेत, त्यांच्या पायी काया, वाचा आणि मन अर्पण आहे.(४४) पूर्वार्ध येथे पूर्ण झाला. या विवेचनाने मुमुक्षू लोकांचा द्वैताचा संबंध सुटला पाहिजे आणि त्यांच्यासाठी साक्षात द्वैतविरहित आनंद प्रगट झाला पाहिजे.(४५)



# आगमसार - उत्तरार्ध

## पंचिका ८वी - समाधिअभ्यास

### ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - निदिध्यासपंचदशांगप्रकार

**श्रोता पुसे वक्तया लागून । पूर्वार्धीं जालें निरूपण । उत्तम अधिकारियाचें लक्षण । आतां एक अपेक्षा ।।१।। मंदप्रज्ञ भावार्थी । तया साधनें मोक्षप्राप्ति । तरी तयासि होय मुक्ति। तेचि निरोपा ।।२।। वक्ता बोले तदनंतर । त्यासिहि पाहिजे अधिकार । विश्वासी आणि तत्पर । साधनाविशीं ।।३।। सुषुप्ति आणि मरण । तों काल राखी अनुसंधान । तरी तोहि पावे समाधान । विचारापरी ।।४।। सांख्ययोगें होय पावन । तेंचि पाविजे योगेंकडून । ऐसें बोलिला भगवान । अर्जुनाप्रति[५६] ।।५।। येथें कोणी भाविती । मायादिकां सत्यत्वें स्थापिती । तरी ते मतवादियाची मति । आभासयुक्त सांख्यादि ।।६।। सांख्य म्हणिजे विचार । योग म्हणिजे चित्त स्थिर । विचारें पावले परपार । तें योगेंहि पावे ।।७।। व्हावें**

---

**पंचिका ८वी, समास १ला - निदिध्यासपंचदशांगप्रकार**

श्रोता वक्त्याला विचारतो,''पूर्वार्धामध्ये जे आपण निरूपण केलेत,त्यामध्ये उत्तम अधिकारी कुणाला म्हणावे,याची चिन्हे आपण सांगितलीत.आता आणखी एक अपेक्षा आहे.(१)आता मंद प्रज्ञ आणि भाविक माणसाला साधनांनी मोक्ष मिळतो म्हणता,तरी त्यालाही मोक्षप्राप्ती कशी होते ते सांगा.(२)त्यावेळी वक्ता उत्तर देतो की,त्या माणसालादेखील मुळात पात्रता ही पाहिजेच.त्याला आपल्याला सांगितलेल्या साधनांवर विश्वास पाहिजे आणि तत्परता(त्या साधनांना वाहून घेण्याची तयारी)पाहिजे.(३)झोप आणि मरण येईपर्यंत(म्हणजे आपल्या जागृतावस्थेत सर्वकाळ)सर्वकाळ वरील गोष्टींचे अनुसंधान(ध्यास)कायम ठेवील तर त्यालाही विचारमार्गाप्रमाणे समाधान मिळेल.(४)भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला गीतेत (भ.गी.५.५) सांगितले आहे की,सांख्याच्या(विचाराच्या)मार्गाने जो उद्धार होतो,तोच योगाच्या(साधनमार्गाने)मार्गानेही होतो.(५)भगवद्गीतेमध्ये श्रीकृष्णाने सांख्य आणि योग अशी दोन मोक्षाची साधने सांगितली आहेत.त्यामुळे काही लोकांची अशी कल्पना होते की,सांख्यदर्शनाप्रमाणे श्रीकृष्णदेखील प्रकृती अथवा मायातत्त्वाला सत्य म्हणून प्रस्थापित करीत आहेत.पण ते खरे नाही,असे मत मांडणाऱ्यांची बुद्धी कशीही असो ती खरी नाही.सांख्य दर्शनाचा विचार आभासिक म्हणजे खोटाच आहे.(६)सांख्य शब्दाचा खरा अर्थ येथे विचारमार्ग असा आहे. योग शब्दाचा अर्थ चित्त स्थिर करण्याचा साधनरूप अभ्यासमार्ग होय.विचाराच्या

**चित्त एकाग्र।वैराग्य विवेक समग्र।तेणें करावी आदर।निर्गुणोपासना।।८।।त्या उपासनेचें लक्षण।बहुधा असे भिन्न भिन्न। साधन पाहतां अनुसंधान। एकचि असे।।९।।श्रीमत् आचार्य उक्ति।निरोपिली अपरोक्षानुभूतीं।बोलिली साधनसंपत्ति।पंधरा अंगें।।१०।।नामें मात्र भिन्न भिन्न।जाणिजे एक अनुसंधान।ऐका तयाचीनामाभिधानें।आणि रूपें कैसीं।।११।।यम नियम त्याग मौन।देशकाल आसन।मूलबंध देहसमान।दृष्टिस्थिति।।१२।।प्राणायाम प्रत्याहार।धारणा ध्यान प्रकार।समाधि हा निर्धार।पंधरा अंगें।।१३।।हे सुलभ राजयोगिया। कठिण नव्हेति अभ्यासावया।निदिध्यासा अधिकार जया।तेणें हेंचि अनुष्ठावें।।१४।।जयासि न ठके श्रवण मनन।अनुसंधानीं जो मळिण।तेणें योगाभ्यास करणें।पतंजलियुक्त।।१५।।जयाचें शुद्ध हृदय।तेणें करणें हा उपाय।तोचि कैसा यथान्वय।बोलिजे तो।।१६।।सर्व ब्रह्म ओळखावें। बाह्येंद्रियासी आवरावें।विवेकें विषय त्यागावें।हा अभ्यास यमाचा।।१७।।ब्रह्म जें कां परिपूर्ण।तेथें मनाचें अनुसंधान।जडजात विसर्जून।हा नियम ज्ञात्याचा।।१८।।नामरूप विसर्जावें। अस्तिभातिप्रिय जाणावें।चिदात्मत्व आठवावें।हाचि त्याग मुख्य।।१९।।वाणी मना अगोचर।**

---

मार्गाने मोक्ष प्राप्त होतो.(संसाराच्या पलीकडच्या तीराला जाता येते)तसा तो योगाच्या मार्गानेही (साधनरूप अभ्यासमार्गानेही)प्राप्त होतो.(७)ज्याचे चित्त एकाग्र असून ज्याच्या ठिकाणी विरक्ती आणि सदसद्विवेक यांची सामग्री आहे त्याने निर्गुणोपासनेच्या(अभ्यासमार्गाच्या,ध्यानमार्गाच्या) साधनाचा अवलंब करावा.(८)त्या उपासनेची पद्धत जरी वेगळी असली तरी त्या सर्वांमध्ये अनुसंधान हे साधन मात्र एकच आहे.(९)श्रीमत् शंकराचार्यांनी आपल्या अपरोक्षानुभूती या प्रकरण ग्रंथात त्या साधनसंपत्तीची १५अंगे सांगितली आहेत.(१०)ही नावे भिन्न भिन्न असली तरी ते सर्व अनुसंधानच आहे,हे लक्षात घ्यावे.त्या अंगांची नावे आणि स्वरूपे कशी आहेत,ते ऐका.(११)यम-१, नियम-२, त्याग-३,मौन-४,देश-५,काल-६,आसन-७,मूलबंध-८,देहाची समतोल स्थिती-९,दृष्टी एकाग्र करणे१०,(१२)प्राणायाम ११,प्रत्याहार-१२,धारणा-१३,ध्यानाचे प्रकार-१४,समाधी-१५ अशी ती १५अंगे जाणून घ्या.(१३)ही सर्व साधने राजयोग्याला सुलभ आहेत.ज्याला निदिध्यासाचा अधिकार आहे त्याने याच साधनांचे अनुष्ठान करावे.(१४)ज्याला श्रवण,मनन जमत नसेल,ज्याचे अनुसंधान मलिन (अपूर्ण)असेल,त्याने पतंजलिप्रणीत योगाभ्यास करावा.(१५)ज्याचे हृदय शुद्ध असेल त्याने वरील साधनांचा जरूर अवलंब करावा.तो कसा करायचा तो आता क्रमश: सांगतो.(१६)हे सर्व ब्रह्मच आहे हे प्रथम ओळखावे आणि बाह्येंद्रियांना आवर घालावा,विवेकाने विषयांचा त्याग करावा ह्याला यम या साधनाचा अभ्यास म्हणावे.(१७)परिपूर्ण अशा ब्रह्माच्या ठिकाणी मनाचे अनुसंधान ठेवावे,सर्व जड विषयांचा त्याग करावा,हाच ज्ञात्याचा नियम होय.(१८)नामरूपांचे विसर्जन करून ते सर्व अस्तिभाति प्रिय स्वरूप ब्रह्मच आहे हे ओळखाव,चिदात्मतत्त्वाचे स्मरण करावे.यालाच मुख्य त्याग म्हणतात.(१९)वाणी आणि

**हाचि जयाचानिर्धार। तेथें चित्तासि करी स्थिर। हेंचि मौन उत्तम।।२०।।ब्रह्मीं वाणी मुराली। प्रपंचही नवचे बोली। सदसत्कल्पना केली। तरी ते व्यर्थ।।२१।।म्हणुन शब्दाची प्रवृत्ति। विवादें पडेना गुंती। हेंचि मौन निर्धारीं चित्तीं। न बोलणें मूर्खाचें।।२२।।आदिअंतीं जग नसे। मध्येंहि जाणावें तैसें। जयास्तव सर्व दिसे। तोचि देश सेवावा।।२३।।जयाचिया निमिष्यांत। ब्रह्मादि होती अनंत। तोचि काल सदोदित। प्रातःकाळादि नव्हे।।२४।।सर्वाचें जें अधिष्ठान। तेथें सुखें अनुसंधान। सहजसिद्ध आसन। जेथें सिद्ध बैसले।।२५।।उत्पत्तिस्थान सर्वांचें। तेथेंचि स्थापन मनाचें। हें जाणिजे मूलबंधाचे। लक्षण राजयोगिया।।२६।।मायेपासून तत्वादि जितुकें। ब्रह्मतत्वींचहे निकें। अंगें अंगींच सुशोभकें। समता राहे।।२७।।येर देहाचें समानत्व। शुष्ककाष्ठाचें रुजुत्व। तें अज्ञानियाचें महत्व। कोरडे श्रम।।२८।।नेत्रीं ज्ञानाचें अंजन। सर्व जगचि जगजीवन। करी सर्वदा अवलोकन। ज्ञानदृष्टी।।२९।।दृश्य द्रष्टा दर्शन। या तिहींसी जें अधिष्ठान। तेथेंजयाचें अनुसंधान। नासाग्र विलोकन ढोंगिया।।३०।।अंतःकरणाची वृत्ति। ब्रह्माकारें स्फुरती। निरोधल्या विषयवृत्ति। हाचि प्राणायाम।।३१।।प्राणायामाचें लक्षण। पूरक कुंभक रेचन। तें बोलिजे**

---

मन यांना अगोचर असणे हेच ज्याचे लक्षण आहे त्यावर चित्त स्थिर करावे हेच श्रेष्ठ प्रकारचे मौन होय.(२०)वाणी अगदी ब्रह्मामध्ये मुरून गेली आहे.प्रपंचाच्या गोष्टी बोलण्यात येत नाहीत,सदसत् कल्पनाही मनात आणणे व्यर्थ ठरते,(२१)शब्दांच्या प्रवृत्तीनुसार वादविवादात पडून गुंतत नाही,यालाच खरे खरे मौन समजावे.मूर्ख लोक मात्र न बोलणे म्हणजेच मौन समजतात.(२२)आरंभी जग नव्हते,अंतीही ते असणार नाही. एवढे कशाला?या दोहोंच्या मध्येही ते नसतेच.पण ज्याच्यामुळे ते सर्व आहे असे दिसते तोच खरा देश होय.त्याचाच आश्रय करावा.(२३)ज्याच्या एका निमिषात अनंत ब्रह्मदेव निर्माण होतात तोच सदा उदित असा खरा काळ होय.प्रातःकाळ इत्यादी नव्हेत.(२४)सर्व वस्तूंचे जे अधिष्ठान आहे.त्याच्या ठिकाणी अनुसंधान हेच सहजसिद्ध आसन होय.याच आसनावर पूर्वीचे अनेक सिद्ध बसलेले होते.(२५)जे सर्वांचे उत्पत्तिस्थान आहे,तेथेच मनाची प्रतिष्ठापना करणे हे राजयोग्याच्या मूलबंधाचे लक्षण होय.(२६)मायेपासून पुढची जेवढी तत्त्वे असतील ती सर्व ब्रह्मातच अंतर्भूत आहेत; अंगाचे अवयव अंगातच शोभून दिसतात.हे ओळखणे हीच समता होय.(२७)एरवी देह समतोल ठेवणे हे वाळलेल्या लाकडाच्या सरळपणासारखे आहे.अज्ञानी लोकांना त्याचे कौतुक वाटो,पण ते केवळ कोरडे श्रम होत.(२८)डोळ्यात ज्ञानाचे अंजन घातलेले असल्यानंतर सर्व जगच जगजीवन (परब्रह्म) वाटते.हीच ज्ञानदृष्टी होय.(२९)दृश्य,द्रष्टा,दर्शन या त्रिपुटीचे जे अधिष्ठान आहे त्याचे अनुसंधान हे तिचे वैशिष्ट्य होय.ढोंगी माणसाला मात्र नाकाच्या अग्रभागी स्थिर केलेली दृष्टी हीच ज्ञानदृष्टी वाटते.(३०)सर्व विषयवृत्तींचा निरोध केल्यानंतर अंतःकरणाच्या वृत्ती ब्रह्मरूपाने स्फुरण पावणे हाच खरा प्राणायाम होय.(३१) प्राणायामाचे लक्षण म्हणजे त्यातील पूरक, कुंभक, रेचक ही अंगे होत. अनुसंधानात्मक

**भिन्न भिन्न । अनुसंधानात्मक।।३२।।प्रपंच नामरूपात्मक । याचा निषेध तो रेचक। मी ब्रह्म हें धरिलें एक । पूरक तो हाचि।।३३।।तया वृत्तीचें निश्चलत्व। हें कुंभकाचें महत्त्व। ज्ञानिया असे सहजत्व । अज्ञान घ्राणा पीडिती।।३४।।विषय ब्रह्माकार पाहे । ब्रह्मीं चित्त स्थिर राहे । ज्ञात्यासि हा सुलभ आहे । प्रत्याहार।।३५।।मन धांवताहे जेथें जेथें । तो आपणासी पाहे तेथें । येणें रीती धरणें मनातें । धारणा प्रसिद्ध जगीं हेची।।३६।। आतां चवदावें ध्यान । जेथें जेथें जाय मन। तेथें ब्रह्म परिपूर्ण । कोंदाटलेंसे।।३७।।तेथें तरी विषय कैचा । चित्तीं ध्यास निरालंबाचा । हाचि अखंड ध्यानाचा ।राजयोगिया आनंद।।३८।। तो ग्रासुनी वृत्त्यानंद । सुखरूप स्वानंदकंद । हरपला द्वैताचा भेद।हा समाधि ज्ञानिया।।३९।। ऐसीं हें पंधरा अंगें । अभ्यासी जो संतसंगें।एकरूप अंतरंगे । सहजसिद्ध।।४०।। तया अभ्यासें कडून । अवलंबे अपरोक्ष ज्ञान। संशयरहित समाधान। पावे योगिराज।।४१।।जाले साधनाचें सफळ। उरलें परब्रह्म केवळ। माया अविद्येचा मळ। अभ्यासें धुतला।।४२।।मग साधनापासून सुटला। केवळ निःसंदेह जाला। बंधमोक्षवार्ता तयाला। उरली नाहीं।।४३।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । निदिध्यासपंचदशांगप्रकारे । प्रथमसमासः ।।१।।**

---

प्राणायामामध्ये त्याचे स्वरूप कसे असते हे वेगळे करून सांगतो.(३२)नामरूपात्मक प्रपंचाचा निषेध हाच रेचक होय.मी ब्रह्म आहे असा दृढ निश्चय पूरक होय.(३३)ही ब्रह्मात्मक वृत्ती निश्चल ठेवणे यालाच कुंभक म्हणतात.ती अवस्था हीच कुंभकाची थोरवी होय.ज्ञानी माणसाला ती सहज प्राप्त होते. इतर अडाणी माणसे प्राणायामाच्या नावाखाली विनाकारण नाकाला त्रास देत राहतात.(३४) सर्व विषय बह्माकार पाहणे,ब्रह्मामध्येच चित्त स्थिर ठेवणे हा खरा प्रत्याहार होय.तो ज्ञानी माणसाला अगदी सुलभ आहे.(३५)मन जेथे जेथे धावते,तेथे तेथे स्वरूप पाहणे,अशा प्रकारे मनाला धरून ठेवणे हीच खरी धारणा होय.ज्ञात्यांच्या जगात तीच प्रसिद्ध आहे.(३६)आता १४अंगांचे ध्यान कसे असते ते पाहू.जेथे जेथे मन जाईल तेथे तेथे सर्वत्र ब्रह्मच कोंदाटलेले पाहणे हेच ध्यान होय.(३७)त्या ध्यानाला विषय तरी कोणता असणार?मनामध्ये निरालंबाचा ध्यास हेच अखंड ध्यान होय.राजयोग्याचा तोच आनंद होय.(३८)तो वृत्तिरूप आनंद गिळंकृत करून आपण सुखरूप स्वानंदाचा गाभा होऊन राहणे,हीच ज्ञात्यांची समाधी होय.त्या ठिकाणी द्वैताचा भेद हरवलेला असतो.(३९) अशा रीतीने संतसंगतीने या१५अंगांचा जो अभ्यास करतो तो सहजसिद्ध होय.ही १५अंगे दिसायला भिन्न असली तरी अंतरंगात ती एकरूपच आहेत.(४०)त्या अभ्यासाने अपरोक्ष ज्ञानाची प्राप्ती करून घेऊन योगिराज संशयरहित समाधान प्राप्त करून घेतो.(४१)अशा रीतीने साधने सफल झाली.अभ्यासाने माया-अविद्या यांचा मळ धुवून टाकला.शेवटी फक्त एकमेव परब्रह्म उरले,(४२)म्हणजे मग त्या साधनांपासून तो मुक्त झाला असे म्हणता येईल; निःसंदेह म्हणजे संशयरहित झाला.आता बंध मोक्ष ही भाषाही त्याच्या बाबतीत उरत नाही.(४३)

**।।श्रीराम समर्थ।। समास २रा - निर्गुणोपासनाप्रकार**

**निर्गुण ब्रह्म उपासन । हेंचि मुमुक्षूसी साधन । भवबंधाचे निकृंतन । तात्कालचि होय।।१।। संवादि भ्रमाचे परी । सत्य वस्तूचें ध्यान करी । चिरकाल अभ्यासितां दुरी । मुक्ति नसे साधका ।।२।। वेगळाले आवरक स्थानीं[५७]। ठेविले दीप आणि मणी । उभयांची प्रभा अंगणीं । सारिखी पडिली ।।३।। कोणी एक दोघे जण । उभय प्रभा अवलोकून । मणिबुद्ध्या करिती गमन । दोघे दोहींवरी ।।४।। मणिबुद्ध्या दीपावरी । धाविला त्यासी श्रमासि उरी । मणि न लभेचि करीं । विसंवादी भ्रम ऐसा ।।५।। देखुनी मण्याचे प्रभेला। अनुमानें मणीसा वाटला । धावतां मणिलाभ झाला । तो संवादी भ्रम[५८]।।६।। तैसें निर्गुण ब्रह्म ध्यातां । निर्गुणचि होय तत्त्वतां । कीटक भ्रमरीतें आठवितां । भ्रमरीच होय ।।७।। श्रोता म्हणे जी निर्गुण। जाणतां करावें ध्यान। कीं न जाणतां अनुसंधान। किजेत आहे।।८।। श्रुतिसिद्ध कळतां प्राप्त जालें । मग ध्यान कासया लागलें । न कळतांहि ध्यान घडलें । नवचे कदा ।।९।। ऐसें उभयपक्षीं पाहतां । ध्यानें नये उपासितां । ऐसें ऐकूनियां वक्ता ।**

---

**पंचिका ८वी, समास २रा - निर्गुणोपासनप्रकार**

निर्गुण ब्रह्माची उपासना हेच मुमुक्षूला एकमेव साधन होय.त्यायोगे संसाररूप बंध तत्काळ नष्ट होतो.(१)संवादी भ्रमाप्रमाणे त्याने सत्य वस्तूचे ध्यान करावे.त्याचा दीर्घकाळ अभ्यास केल्यानंतर साधकाला मुक्ती दूर नाही.(संवादी भ्रमाचे स्वरूप पुढील ओव्यांमध्ये स्पष्ट केले आहे.)(२)एका मंदिराच्या दोन वेगवेगळ्या खिडक्यांमध्ये एक दिवा,एक रत्नमणी असे वेगवेगळे ठेवले.दोघांचाही प्रकाश अंगणात सारखाच पडला होता.(३)त्यावेळी कोणा दोन व्यक्तींनी दोन्हींचे प्रकाश पाहून हा रत्नमण्याचा प्रकाश आहे असे मानून दोघेही दोन दिशांनी त्या खिडक्यांकडे गेले.(४)तो मणी आहे असे मानून दिव्याच्या दिशेने जो धावला त्याच्या नशिबी फक्त श्रमच राहिले.त्याच्या हातात मणी काही आला नाही.याला विसंवादी भ्रम म्हणतात.(अपेक्षा धरली एक व प्रत्यक्षात अनुभव वेगळाच आला.)(५)पण मण्याचा प्रकाश पाहून दुसऱ्याला तो मणी आहे असे वाटले.त्या दिशेने तो धावला आणि त्याला रत्नमण्याचा लाभ झाला.याला संवादी भ्रम म्हणतात.(त्याने जी अपेक्षा मनात धरली होती त्याअपेक्षेप्रमाणेच घडले)(६)त्याप्रमाणे निर्गुण ब्रह्माचे ध्यान करून साधक प्रत्यक्षात निर्गुण ब्रह्मरूपच प्राप्त करतो.जसा अळीने भ्रमराचे स्मरण केल्याने ती अळीच स्वत: भ्रमर होते तसा हा प्रकार होय.(७)यावर श्रोता प्रश्न करतो की,निर्गुणाचे ध्यान जाणीवपूर्वक करावे की,जाणीव होण्यापूर्वीच करावे?(८)श्रुती सांगते की ब्रह्माचे ज्ञान होणे म्हणजेच त्याची प्राप्ती होणे होय.तेव्हा असे श्रुतिसिद्ध ज्ञान झाल्यानंतर ध्यानाची गरज काय?निर्गुणाचे ज्ञान न होताच त्याचे ध्यान कसे करता येईल?अर्थात त्याचे ध्यान करता येणार नाही.उभयपक्षीही अडचण आहेच.(९)अशा प्रकारे दोन्ही पक्षांच्या दृष्टीने पाहिल्यावर असे ध्यानमार्गाने

**म्हणे तिसरा पक्ष ।।१०।। ब्रह्म परोक्षत्वें जाणावें । सच्चिदानंद ओळखावें । अपरोक्षालागी स्वभावें । ध्यान घडे साधका ।।११।। गुरुपदीं अति विश्वास । श्रवणमनन रात्रंदिवस । तरी परोक्ष ज्ञान तयास । तात्काळ होय ।।१२।। विचारें अपरोक्ष जाणतां । समाधान पावे अवचिता । विचारा असे प्रतिबंधता । तरी ध्यान करावें ।।१३।। ब्रह्म परोक्षत्वें जाणितलें। तरी भ्रम कां नाम ठेविलें । स्वतां निजांगें नाहीं जालें । म्हणोनि भ्रम।।१४।। मनबुद्धिअगोचर। ब्रह्म असे निर्विकार । श्रवणमननें केला निर्धार । सद्गुरुवचनें ।।१५।।ब्रह्म परिपूर्ण कोंदाटलें । ऐसें अनुसंधान लागलें । परोक्षत्वें अनुभविलें । सच्चिदानंद ।।१६।। विष्णु आणि सदाशिव । शास्त्रीं कळले सावयव । तैसेचि ध्यानीं धरी आठव । मानसपूजनीं।।१७।। तेचि वासना दृढ होता।विष्णु शिव प्रगटतीं तत्त्वतां। इच्छिलें पुरविती भक्ता। कृपाळुदेव।।१८।। तैसे ब्रह्म निर्गुण ध्यातां। वेगळा नुरेचि तत्त्वतां । ब्रह्मरूप अवचिता । होउनी जातो।।१९।। हा मनाचा स्वभाव । जैसा जैसा दृढभाव । तैसाचि होय स्वयमेव । अन्यथा नव्हे ।।२०।। भूताचें ध्यान करितां। भूतें होतीं तत्त्वतां । देव ध्यानीं आठवितां । देवा पाविजे।।२१।।जे जे धरिलें मनें। तैसे लागे जीवासि होणें। म्हणून निर्गुण उपासनें। निर्गुणचि होईजे ।।२२।।**

---

निर्गुणब्रह्माची उपासनाच करता येणार नाही.हे ऐकल्यानंतर वक्ता तिसरा पक्ष सांगतो.(१०)ब्रह्म अगोदर परोक्षत्वाने जाणावे.नंतर प्रत्यक्ष अनुभवाने त्याचे सच्चिदानंद स्वरूप ओळखावे.ब्रह्माच्या अपरोक्षज्ञानासाठी साधकाला आपोआप ध्यान घडते.(११)गुरूंवर पराकाष्ठेचा विश्वास,रात्रंदिवस श्रवणमनन हे असेल तर साधकाला तत्काळ परोक्ष ज्ञान प्राप्त होते.(१२)त्यानंतर विचाराच्या साहाय्याने त्याला अपरोक्षज्ञान होते.विचाराच्या बाबतीत त्याला काही अडचण असेल तर त्याने ध्यान करावे.(१३)आता संवादिभ्रमाने ब्रह्म परोक्षत्वाने कळत असेल,तर त्याला भ्रम म्हणण्याचे कारण काय?असा प्रश्नउपस्थित केल्यास त्याचे उत्तर असे की,तो या ज्ञानाने स्वत: ब्रह्म होत नाही,म्हणून त्यास भ्रम म्हणतात.(१४)ब्रह्म निर्विकार असून मन,बुद्धी यांना न कळणारे आहे.पण सद्गुरूंच्या सांगण्यावरून श्रवण-मनन यांच्या योगाने निर्धार केला,(१५)तेव्हा सर्वत्र ब्रह्म कोंदाटले आहे असे अनुसंधान लागले म्हणजे सच्चिदानंद ब्रह्माचा परोक्ष अनुभव येतो.(१६)शास्त्रात विष्णू,शंकर इत्यादी देव सावयव(साकार,मूर्त) आहेत असे सांगितले आहे.ते ज्ञान झाल्यानंतर मानसपूजनाच्या वेळी ध्यानात तसेच स्मरण ठेवले.(१७) अशाप्रकारे ती वासना दृढ होताच विष्णू,शंकर खरोखर प्रकट होतात आणि ते कृपाळू देव भक्तांचे इच्छित पूर्ण करतात.(१८)त्याप्रमाणे निर्गुण ब्रह्माचे ध्यान केले तर साधक वेगळा राहूच शकत नाही.तो लगेच ब्रह्मरूप होऊन जातो.(१९)हा मनाचा स्वभाव आहे.जसा दृढभाव असेल त्याप्रमाणे तो साधक इतर दुसरे काही न बनता अगदी तसाच बनतो.(२०)भुताचे ध्यान केले तर ती माणसे अक्षरश: भूत होतात व ध्यानामध्ये देवाचे जर स्मरण केले तर त्यांना देवाची प्राप्ती होते.(२१)मनात जे जे धरावे तसेच

**श्रोता म्हणे जी पुढती । ध्यानीं धरवे सगुण मूर्ति । निराकार जे आदिअंती । तरी ध्यान कैसे।।२३।। वक्ता म्हणे ध्यान नव्हे । जाणणें तरी कोठे संभवे। ज्ञानेवीण पावावें । परपार कैसें ।।२४।। श्रोता म्हणे ब्रह्म स्वप्रकाश । विचारें कळे साधकास । परी ध्याना नसे अवकाश । अंत:करणीं ।।२५।। वक्ता म्हणे ज्ञानें कोणें । स्वप्रकाशातें जाणें । जड अवधी करणें/जाणतीना ।।२६।। श्रोता म्हणे न कळे कोणासी। बुद्धि निश्चया करी ऐसी। तैंचि आपण असंगासी । जाणणें घडे ।।२७।। वक्ता म्हणे जैसें जाणिले । आपण असंगसें कळले । तैसेंचि पाहिजे ध्यान केले । निदिध्यासरूप ।।२८।। श्रोता म्हणे ज्ञान ध्यान । एकरूप दिसती समान । वक्ता म्हणे सावधान । भेद आहे ।।२९।। विसर आठवातीत । अंगे ब्रह्मचि निश्चित । वस्तुतंत्र त्रिपुटीरहित । या नांव ज्ञान ।।३०।। कर्तृतंत्रें उपासन । ब्रह्म मी ऐसें करी ध्यान। त्रिपुटीचें होतसें भान । द्वैतरूपत्वें ।।३१।।जो काल राहे ध्यान । तो काल वाटे समाधान । ध्यान भंगतां आपण । तळमळी जीवीं।।३२।। ध्यानें जें संपादिलें । तेणेंविण लया गेलें । वस्तुरूप नाहीं जालें । म्हणोनिया ।।३३।।**

---

जीवाला व्हावे लागते.म्हणून निर्गुणाच्या उपासनेने निर्गुणच व्हावे.(२२)यावर श्रोता विचारतो की,जी मूर्ती आपण प्रत्यक्ष पाहतो ती सगुण मूर्तीच ध्यानात आणता येते.पण जे ब्रह्म आरंभी आणि अंती निराकारच आहे,त्याचे ध्यान कसे काय करता येईल?(२३)वक्ता यावर उत्तर देतो की,ध्यानाचे काय घेऊन बसलास,ब्रह्माचे ज्ञान तरी कोणाला शक्य होणार आहे?आणि ज्ञानावाचून परपार(भवसागराचा पलीकडचा तीर,मोक्ष)कसा गाठता येईल?(२४)यावर श्रोता म्हणतो की,ब्रह्म स्वप्रकाश आहे,हे साधकास विचाराने कळते.परंतु त्याच्या अंत:करणात मात्र ब्रह्माच्या ध्यानाला कोठे जागा नाही.(२५)यावर वक्ता विचारतो की,कोणत्या ज्ञानाने साधक स्वयंप्रकाशी ब्रह्माला जाणू शकतो?कारण इंद्रिये तर जड आहेत. त्यांना हे ज्ञान होऊ शकणार नाही.(२६)यावर श्रोता म्हणतो की,कोणत्याही इंद्रियाला न कळू देता, जेव्हा बुद्धी असा निश्चय करते की आपण तेच ब्रह्म आहोत,त्याच वेळी असंगाचे(ब्रह्माचे)ज्ञान होऊ शकते.(२७)यावर वक्ता म्हणतो की,तू असंगाचे ज्ञान ज्याप्रमाणे प्राप्त केलेस आमि आपण असंग (ब्रह्म)आहोत असे तुला कळले,त्याच प्रकारे निदिध्यासाच्या रूपात त्याचे ध्यान करावेस.(२८)श्रोता यावर विचारतो की,ज्ञान व ध्यान दोन्हीही एकरूप असून सारखीच दिसतात.यावर वक्ता म्हणतो की, थांब,दोहोंमध्ये भेद आहे.(२९)स्मरण आणि विस्मरण यांच्या पलीकडे असून स्वरूपत:जे निश्चितपणे ब्रह्मच आहे,जे वस्तुतंत्र व त्रिपुटीरहित आहे त्याला ज्ञान म्हणतात.(३०)ध्यान ही कर्तृतंत्र उपासना आहे.ती कर्त्याच्या तंत्राने चालते.तिच्यात मी ब्रह्म असे ध्यान केले जाते वद्वैतरूप असल्याने तिच्यामध्ये त्रिपुटीचे भान होत असते,(३१)जोपर्यंत हे ध्यान चाल असते,तोपर्यंतच समाधान प्राप्त होते व ध्यान भंग पावले की मनात तळमळ होते,(३२)त्यामुळे ध्यानामुळे जे प्राप्त केले होते ते ध्यान थांबवताच

**वस्तुरूप व्हावयासाठीं । ध्यान साधन कचाटि। होता अभ्यासाची पुष्टि। ज्ञानही लाभे।।३४।। म्हणऊन ध्यान सोडूं नये। हे विचार ज्ञानास उपाय। ध्यानेंवीण दुजें काय। समीप असे।।३५।। कर्म अर्चन आणि योग। परंपरा तयाचा योग। निर्गुणोपासना लागवेग। असंगज्ञान करी।।३६।। श्रोता म्हणे निर्गुणोपासन। न करिती कोणी जन । कर्मयोग सगुणोपासन । बहुत करिती।।३७।। निर्गुण ध्यान श्रेष्ठ जरी। प्रवृत्ति कां नसे तरी। जेथें प्रवृत्तीची दाटी भारी । तेंचि श्रेष्ठ।।३८।। वक्ता म्हणे अवधारा।कृषिगोरक्षादि व्यापारा।जितुका प्रवृत्तिपसारा। तितुका कर्मीं कोठें।।३९।। शंभरामाजीं एकला। कर्मप्रवृत्तीं देखिला। तरी कृष्यादिकाहून कर्माला। हीनत्व न ये।।४०।। सहस्त्र कर्मी मिळतां । योगा प्रवर्ते एकुलता । कर्माहून योगयुक्ता । योग्यता असे।।४१।। योगाची ही लक्षगणति । एखादिया सगुण भक्ति । परी योगाहूनि शक्ति । उपासनेची।।४२।।तूं म्हणसी सगुणाचा ठाई।तत्पर असती बहु समुदाई।तरी ते कामनेचे अपायीं।गुंतून पडिले।।४३।। कामनेवीण सगुण भक्ति ।कीं भगवान् सर्वाभूतीं । ऐसे भक्त थोडे असती । परी श्रेष्ठत्व**

---

वाया जाते.याचे कारण हे की वस्तूशी म्हणजे परब्रह्माशी आपण एकरूप झालो नाहीत.(३३)वस्तुरूप होण्यासाठी ध्यानरूपी साधनाची खटपट करावी लागते.त्या अभ्यासाचे बळ वाढताच ज्ञानसुद्धा प्राप्त होते.(३४)म्हणून ध्यान केव्हाही सोडू नये.ज्ञानप्राप्तीसाठी आपल्या हाताशी दुसरे काय आहे?याचा विचार करावा.(अर्थात ज्ञानासाठी ध्यान हेच एकमेव साधन आहे)(३५)कर्म,पूजा,योगाभ्यास या साधनांनी ज्ञानाची प्राप्ती होईल.पण ती परंपरेने क्रमाक्रमाने होणारी प्राप्ती आहे.पण निर्गुणोपासनेने ताबडतोब असंगज्ञान होते.(असंगज्ञान-ब्रह्मज्ञान).(३६)यावर श्रोता म्हणतो की,निर्गुणोपासना कोणीही करत नाही. पण बहुतेक सर्व लोक कर्मयोग,सगुणोपासना यांची साधना करतात.(३७)निर्गुणज्ञान श्रेष्ठ असले तरी तिकडे लोकांची प्रवृत्ती का होत नाही?मग जिथे लोकांची प्रवृत्ती जास्त आहे तेच साधन श्रेष्ठ असे का मानू नये?(३८)यावर वक्ता म्हणतो की,आता लक्ष देऊन ऐका.कृषी,गोरक्षण इत्यादी व्यापारांकडे लोकांची जेवढी प्रवृत्ती असते,तेवढी प्रवृत्ती कर्मयोगाच्या आचरणाकडे कोठे असते का?(३९)शंभर माणसांमध्ये एखाद्याला कर्मयोगाच्या आचरणाची प्रवृत्ती होते.पण त्यामुळे कृषीइत्यादी व्यापारांपेक्षा कर्मयोग कमी महत्त्वाचा असे ठरत नाही.(४०)हजार कर्मयोगी असतील,तर त्यामध्ये एखादाच योगमार्गाकडे प्रवृत्त होतो;त्यामुळेच कर्मयोगापेक्षा योगमार्गाचे आचरण करणाराची योग्यता अधिक असते.(४१)असे योगाभ्यासी एक लाख असतील तर त्यात एखाद्यालाच सगुणभक्ती करावीशी वाटते.असे असले तरी भक्तिमार्गाची शक्ती योगमार्गापेक्षा अधिक आहे.(४२)तू म्हणशील की समाजामध्ये सगुणाची भक्ती करणारे खूप लोक भेटतात.पण ते सर्व कामनेच्या आहारी गेलेले असतात.कामनेच्या अपायरूपखोड्यात ते गुंतून पडलेले असतात.(४३)कामनारहित सगुणभक्ती करून परमेश्वर सर्व प्राणिमात्रांमध्ये आहे,असा अनुभव घेणारे भक्त फार थोडे असतात.पण त्यांचे श्रेष्ठत्व सकाम भक्तांपेक्षा केव्हाही जास्त आहे.(४४)

**अधिक ।।४४।। कोटीमाजी कोणी एक । पाहे निर्गुणाचा विवेक। निर्गुण ध्यान आवश्यक। श्रेष्ठचि आहे।।४५।।श्रोता म्हणे जी पुढती । निर्गुण ध्यानाची संपत्ति। श्रेष्ठ परी वाटती। अत्यंत कठिण।।४६।।इतर साधनें सुलभ जाणावीं। तरी तेंचि ना आदरावी । वक्ता म्हणे हो बरवी। युक्ति काढिली।।४७।।ब्राह्मणाचे धर्म कठिण। अत्यंत मोकळे यवन। तरि कां सांडून संध्यास्नान । ब्राह्मण भ्रष्टती।।४८।।तुजला मनें ओढिलें । देहबुद्धीसी जे सोकले। सुलभ परि तया जाले । अत्यंत कठिण।।४९।।सोपा यवनाचा पाहून धर्म।सांडिलें आपुलें सर्व कर्म। जेव्हां होईल संग्राम। तेव्हां कळेल।।५०।।द्वैतीं भय असे उघडें । वाजती श्रुतीचे चौघडे। द्वैतीं जें जें करणें पडे । तें तें भयरूप।।५१।।जरी देहबुद्धि मावळे। तयासी साधनसोहळे । पुढें सन्निधचि निवळे । ज्ञानसूर्य।।५२।।सूर्यापूर्वी अरुणाचा । प्रकाश होय साचा। तेवि निर्गुण उपासनेचा। अधिकार असे।।५३।।श्रोता म्हणे जी बरें झालें। महासंशयातें खंडिलें। आतां ध्यानचि अभ्यासिलें। पाहिजे साधकीं ।।५४।। परि हे निर्गुण ध्यान करिता। निर्बंध असे कोणता । जपादि मूर्तिध्यान धरितां । नेम बहु असती ।।५५।। तरि हे आतां सांगावें । नियमेंचि ध्यान करावें । मौनादिक अवलंबावे । किंवा कैसें।।५६।।**

---

कामनारहित सगुण भक्ती करणारे एक कोटी लोक घेतले,तर त्यांमध्ये एखादाचा निर्गुणाचा विचार करतो.त्यामुळे निर्गुणध्यान निश्चितपणे श्रेष्ठच आहे.(४५)यावर श्रोता विचारतो की, निर्गुण ध्यानरूप संपत्ती श्रेष्ठ खरी,पण ती फार कठीण आहे.(४६)त्यामानाने इतर साधने सोपी वाटतात.मग त्यांचाच स्वीकार का करू नये?वक्ता यावर म्हणतो की,'वा! छान! हा बरा युक्तिवाद केलात!'(४७)ब्राह्मणाचे आचारधर्म खूप कठीण आहेत.त्या मानाने मुस्लिम(यवन)खूप मुक्त असतात.एवढ्या एका कारणासाठी का कोणी ब्राह्मण संध्यास्नान सोडून देऊन भ्रष्ट व्हायला तयार होतील का?(४८)तुला देहबुद्धीला सोकलेल्या(चटावलेल्या)तुझ्या मनाने ओढले आहे(भुरळ घातली आहे).ते मार्ग सुलभ असले तरी शेवटी कठीण होतात.(४९)यवनांचा धर्म सोपा वाटून ज्यांनी आपले सर्व कर्म आचार सोडून दिले त्यांना युद्ध सुरू होईल तेव्हा खरे कळून येईल.(५०)द्वैतामध्ये भय असते(द्वितीयाद् वै भयं भवति)असे श्रुतीचे चौघडे वाजतात.द्वैतामध्ये राहून जे करावे लागते ते सर्व भयरूप असते.(५१)जर देहबुद्धी मावळली तरच साधनांची सुखे त्याला(साधकाला)प्राप्त होतील.त्यानंतर ज्ञानसूर्य त्याच्याजवळच प्रकट होईल.(५२)सूर्याच्या अगोदर अरुणाचा उदय होतो व त्याचा प्रकाश अगोदर दिसतो.त्याप्रमाणेच निर्गुण उपासनेचा अधिकार आहे.(५३)यावर श्रोता म्हणतो,"हे बरे झाले.तुम्ही माझ्या मनातील मोठा संशय दूर केलात.तेव्हा साधकांनी आता ध्यानाचाच अभ्यास केला पाहिजे,हे पक्के झाले.(५४)पण हे निर्गुण ध्यान करताना कोणते नियम पाळावे लागतात?कारण जप,सगुण मूर्तीचे ध्यान करत असताना खूप नियम पाळावे लागतात.(५५) तेव्हा आपण मला हे नियम सांगावेत. या नियमांनी ध्यान करावे

**वक्ता म्हणे सावधान। कोणतें नसे निर्बंधन। अखंड असावे स्मरण । ब्रह्मतत्वाचें।।५७।।नलगे एकांत आसन। अथवा जपादि मौन। दृढ राखावें अनुसंधान । योषाजारापरी।।५८।।व्हावया क्षुधाहरण । कीजे जैसें भोजन। द्वैताचें होय हनन । तैसें ध्यान करावें।।५९।।श्रोता म्हणे भोजनासी । निर्बंध असे निश्चयेसी । वक्ता म्हणे क्षुधाहरणासी। निर्बंध नलगे ।।६०।।असो ब्रह्मात्मत्वीं अखंडिं। निरंतर वृत्ति मुरडी। जगजीवादिकां रोकडी । मिथ्यता पाहे।।६१।।ब्रह्मात्मा हेचि सत्य। जगजीवादि अनित्य । इतुकेचि ध्यानाचें कृत्य। सर्वदा राहे।।६२।।जरी म्हणसी ध्यानासी। मौन असावें वाचेसी। इतुके नलगे व्यवहारेसी । स्मरण असावें ।।६३।। तेंचि वाणीचें चिंतन। श्रोतयासी करी कथन। वक्ता सांगतां करी श्रवण। हेंचि एकपरत्व।।६४।। तैसेचि व्यापार भोजनादि। आला समय संपादी । परी मन गुंतले छंदी । स्वरूपाकारत्वें।।६५।। म्हणसी भोजनीं होय विस्मर।देहादि सत्य वाटती जर।इतुका नसे अवसर।स्मरे झडकरी।।६६।। विस्मर होतां क्षणभरी।व्रतभंग नव्हे निर्धारि।वस्तुनिश्चय सदृढ करी।बंधनें येरी कासया।।६७।। भोजनादि संपादावें। काव्यतर्कादि सांडावे। कृष्यादिकही त्यागावे।ध्याना विघ्नकर जे।।६८।।**

---

काय?मौनइत्यादी पथ्ये पाळावी लागतात किंवा काय?''(५६) यावर वक्ता म्हणतो,''नीट लक्ष देऊन ऐक.या ध्यानासाठी कोणतेही निर्बंध किंवा नियम नाहीत.फक्त ब्रह्मतत्त्वाचे अखंड स्मरण ठेवावे म्हणजे झाले.''(५७)एकांत आसनाची गरज नाही किंवा जप,मौन इत्यादींचीही आवश्यकता नाही.पण स्त्री,तिचा प्रियकर हे जसे एकमेकांना विसरत नाहीत त्याप्रमाणे ब्रह्मतत्त्वाचे अखंड अनुसंधान राखावे.(५८)भूक भागवण्यासाठी जसे भोजन करावे लागते,तसे द्वैतबुद्धी नष्ट करण्यासाठी ध्यान करावे.''(५९)यावर श्रोता म्हणतो,''अहो, भोजनासाठी सुद्धा काही नियम पाळायचे असतातच की?''तेव्हा वक्ता म्हणतो,''भूक भागवण्यासाठी काही निर्बंध लागत नाहीत.''(६०)असो,ब्रह्म व आत्मा यांच्या ऐक्यभावनेवर वृत्ती वळव.जगत्,जीव इत्यादींकडे अगदी मिथ्यात्वबुद्धीने पहा.(६१)ब्रह्म व आत्मा हेच तेवढे सत्य असून जग,जीव इत्यादी अनित्य आहेत.एवढेच एक स्मरण ठेवण्याचे काम ध्यानात ठेवावयाचे असते.(६२)तू म्हणत असशील ध्यानात वाणीचे मौन पाळायला नको का?तर त्याचीही गरज नाही.नित्याच्या व्यवहारात ब्रह्मात्मैक्याचे स्मरण ठेवावे म्हणजे पुरे.(६३)हेच वाणीचे चिंतन होय.कोणी श्रोता भेटला तर त्याला हेच समजावून सांग.कोणी वक्ता सांगत असताना एकचित्ताने श्रवण कर.यालाच एकपरता म्हणतात.(६४) त्याप्रमाणेच भोजन इत्यादी व्यवहार करत राहा.आल्या प्रसंगात करावयाची कामे करत राहा.परंतु मन मात्र नेहमी स्वरूपाकार करून स्वच्छंदानेराहा.(६५)तू म्हणशील की,भोजन करताना विसर पडला,देहादी सत्य वाटले तर काय करावे?तर विस्मरणाला एवढा वेळ देऊच नकोस.लागलीच ब्रह्मात्मैक्याचे स्मरण कर.(६६)एखादा क्षण विस्मरण झाल्याने काही व्रत मोडत नाही.फक्त ब्रह्मबुद्धी कायम कर.तेवढे झाले की इतर निर्बंधांची काय गरज आहे?(६७)भोजन इत्यादी आवश्यक क्रिया जरूर कर.पण काव्य,तर्क

**काव्यतर्कादि पाहिले। तरी तत्व जाय उपेक्षिलें। म्हणून पाहिजे सांडिलें। अवश्य यासी ।।६९।। भोजनादि नये सांडितां। शरीर पडेल अवचिता। तर्क कृष्यादि न करितां। देहनिर्वाह चाले।।७०।। म्हणसी राज्य संपादी जनक । तरी दृढबोध निश्चयात्मक । तैसा तुज असतां तर्क। पढे अथवा कृषि करा ।।७१।। एवं हें निर्गुणोपासन । बहुत होताती पावन । पुढें अभ्यासलक्षण। निरोपिजेत ।।७२।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारें । निर्गुणोपासनप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - अभ्यासयोग

**ब्रह्म सच्चिदानंद पूर्ण । मागां बोलिलें लक्षण । सच्चिद्रूपा आच्छादन । अज्ञान माया करीना ।।१।। सच्चिद् जरी आच्छादावें । तरी अज्ञान कोठें संभवें । मायाकार्य व्यवहारावें। कासयावरी ।।२।। तिसरा अंश आनंदाचा । आच्छादिल्या परी साचा । नाश व्हावया आवरणाचा । महावाक्यें प्रवर्तती ।।३।। व्हावी आनंदाची प्राप्ति । सत्शास्त्र सत्संगति । उत्तम अधिकारी पावती । बिचारें अपरोक्ष ।।४।। तेवि मंदप्रज्ञा न घडे । तया अभ्यासें**

---

इत्यादीचा मात्र त्याग कर.ध्यानाला विघ्नकारक ठरतील अशी कृषी इत्यादी कर्मेही टाळावीत.(६८)काव्य,तर्क इत्यादीच्या नादी लागलास तर मुख्य तत्त्वाची उपेक्षा होईल.म्हणून त्यांचा त्याग मात्र अवश्य केला पाहिजे.(६९)पण भोजन इत्यादीचा त्याग करता येणार नाही.कारण तसे केल्याने शरीराचा त्याग घडेल.तसे तर्क,कृषिकर्म इत्यादीचे नाही.त्यांचा त्याग केला,तरी देहनिर्वाह चालू शकतो.(७०)तू म्हणशील की,जनकाने राज्य संपादन केले.ते सांभाळले.ते खरे पण त्याचे ब्रह्मात्मैक्याचे ज्ञान पक्के होते.अढळ होते.तशी जर तुझी बुद्धी असेल तर तर्कशास्त्राचे अध्ययन कर,किंवा कृष्यादी कर्मे कर. त्यांमुळे काही फरक पडणार नाही.(७१)अशा प्रकारची ही निर्गुणोपासना आहे.अनेक लोक हिच्या साधनाने मुक्त झालेले आहेत.आता यापुढे अभ्यासाचे लक्षण सांगितले जाईल.(७२)

## पंचिका ८वी, समास ३रा - अभ्यासयोग

पूर्ण सच्चिदानंद ब्रह्माचे लक्षण मागे स्पष्ट केले आहे.त्याच्या सद्रूप-चिद्रूप अंशांना अज्ञान किंवा माया आवरण घालू शकत नाहीत.(१)सच्चिद्रूपाला जर आवरण घालता आले असते तर अज्ञान कोठे निर्माण होईल?आणि मायेचा व्यवहार कशावर(कोणत्या अधिष्ठानावर)होईल?(२)ब्रह्माचा तिसरा आनंदरूप अंश मात्र आच्छादिल्यासारखा आहे.त्या आवरणाचा नाश होण्यासाठीच महावाक्ये प्रवृत्त झाली आहेत.(३) त्या महावाक्यांचा उद्देश आनंदाची प्राप्ती व्हावी हाच असतो. उत्तम अधिकारी सत्शास्त्र, सत्संगतीने व विचाराच्या साहाय्याने अपरोक्षपणे त्या आनंदाची प्राप्ती करून घेतात.(४) त्यांच्याप्रमाणे मंदप्रज्ञांना तो

**मोक्ष जोडे । यदर्थी बोलिजे रोकडे । अभ्यासयोग ।।५।। गुरुमुखें करावें श्रवण । संशयरहित परोक्षज्ञान । जाणावें ब्रह्म परिपूर्ण । श्रुतिप्रमाण जें ।।६।। तेंचि होणें निजांगें। तरी अभ्यास करणें लागवेगें । अभ्यासेंवीण वाउगें । शब्दज्ञान ।।७।। जैसी कोरडी लेखणी । न निघे अक्षरश्रेणी । ब्रह्म न जाणतां मनीं । सर्वब्रह्मता उमटेना।।८।। अंतःकरण गुहास्थानीं । ब्रह्म निहित श्रुतिवचनीं । त्या मषीतें बुद्धिलेखणी । अभ्यासें चुबकळी।।९।।मग इंद्रियांची प्रवृत्ति । जेथें तेथें प्रगटे ज्ञप्ति । तेंचि कैसे यथानिगुती।बोलिजेति साधन।।१०।। अभ्यासाचिया भूमिका। चारी गा शीष्यटिळका। त्या अभ्यासाविया एका । अंतःकरणीं।।११।। विक्षिप्तता गतायाता । संश्लिष्टता सुलीनता । एकांती बैसुनी तत्वतां । भूमिका अभ्यासी।।१२।। मन जेथून उमटतें । विषय कल्पना आठवितें । आठवणीतें जाणतें । तेंचि कवण।।१३।। सांडूनिया मनपण।स्फुरण वायूचें लक्षण। तेथें निश्चळ रूप जाणणें। अवलंबावे।।१४।।स्फुरण उपाधीस्तव।एकदेशी चंचलस्वभाव।दिसू लागलें परी तें वाव।निश्चळ गगनापरी।।१५।। तेंचि निर्धारितां अंतरीं । चैतन्य सागरापरी। मध्यें स्फुरणाची लहरी । एकदेशी दिसे।।१६।।तेंचि**

---

आनंद सहजपणे प्राप्त होत नाही. त्यांना अभ्यासाने मोक्ष प्राप्त होतो. त्यासाठीच आता अभ्यासमार्गाचे स्पष्टपणे विवेचन करावयाचे आहे.(५) प्रथम गुरुमुखाने श्रवण करावे. श्रुतिप्रमाण अशा परिपूर्ण ब्रह्माचे संशयरहित पण परोक्षज्ञान करून घ्यावे.(६) आता तेच ब्रह्म स्वत: व्हायचे असेल तर तत्परतेने अभ्यास करावा लागेल. अभ्यास नसेल तर केवळ शाब्दिक ज्ञान व्यर्थच होय.(७) ज्याप्रमाणे कोरड्या लेखणीतून अक्षरांच्या ओळी उमटत नाहीत, त्याप्रमाणे ब्रह्म न जाणता सर्वब्रह्माची कल्पना मनात ठसणार नाही.(८) अंत:करणाच्या विवरस्थानी ब्रह्म ठेविलेले आहे असे श्रुतिवचन आहे. त्या ज्ञानाच्या शाईत बुद्धिरूपी लेखणी अभ्यासाने बुडवून घे.(९)मग इंद्रियांची प्रवृत्ती ज्या ज्या ठिकाणी होईल, त्या ठिकाणी ठिकाणी जाणीव प्रगट होईल. तिचाच साधन म्हणून कसा उपयोग करावयाचा ते यथायोग्य रीतीने सांगतो.(१०) अरे शिष्योत्तमा, अभ्यासाच्या चार भूमिका असतात. त्यांचा एका अंत:करणाने अभ्यास करावा.(११) त्या अभ्यासाच्या चार भूमिका म्हणजे विक्षिप्तता, गतायाता, संश्लिष्टता, सुलीनता या होत. त्यांचा एकांतात बसून अभ्यास कर.(१२) मन जेथून उत्पन्न होते आणि विषय, कल्पना यांची आठवण करते. त्या आठवणींनाही जाणणारे असे जे काही आहे, ते काय आहे?(१३) मनपणाचा त्याग करून जेथे वायूचे स्फुरण होते. तेथे निश्चळरूप ज्ञानाचा अवलंब करावा.(तेथे निश्चळ राहून जे ज्ञान होते ते प्राप्त करून घ्यावे.)(१४) स्फुरणाच्या उपाधीमुळे मर्यादित एकदेशी चंचल स्वभावाचे जे काही दिसू लागते ते खोटे आहे. ब्रह्म हे आकाशाप्रमाणे निश्चळ असते.(१५) त्याचा मनामध्ये निर्धार केला तर चंचलत्वाने स्फुरणाच्या लहरी चैतन्य सागरावरील लाटांप्रमाणे एकदेशी दिसू लागतात.(एकदेशी-मर्यादित व्याप्तीच्या) (१६)

**आपणसें वाटलें। तेणें आनंदें ब्रह्मांड भरलें। तें सुख नवचे बोलिलें। ज्याचा तो जाणे।।१७।।परी अभ्यास करितां। विघ्नें होताती तत्वता। तेहि चार ओळखीं। आता परिहारासहित।।१८।।विक्षेप लय कषाय। चौथा रसास्वाद होय। भूमिका अभ्यासितां जाय। विघ्न निरसुनी।।१९।।विक्षेपाचें कैसें स्वरूप। विषयाकार मन संकल्प। निर्विकारीं भासती अल्प। देखिलें पदार्थ जे।।२०।। येथें पाहिजे वैराग्य । जें ऐश्वर्याचें सौभाग्य । दोषदृष्टीनें अयोग्य । त्याग कीजे ।।२१।। तो त्याग तरी कैसा। असावा विवेक सरिसा। विषय पदार्थाचा ठसा। उमटला काशावरी।।२२।। आकाशीं उमटती मेघ। कीं पाणियावरी तरंग। तैसे स्वरुपीं अमोघ। विषय भासती।।२३।।गोंडाळ सांडून एकीकडे। नीर जैसे सेवणे पडे। तैसें निजरूप रोकडे। जाणून विषय त्यागावा।।२४।। एकदा सोडितां न जाय। वारंवार भास होय । विवेकें सांडावा उपाय । दुजा नाहीं।।२५।। हा विक्षेप विक्षिप्तता। हाचि अभ्यास सर्वदा करितां। मनासि गोडी अवचिता। उपजे ब्रह्मीं।।२६।। परी दोहीकडे आवडी। विषयाकडे क्षणें वोढी। क्षणें स्वरूपीं मारी बुडी। आपुले आपण।।२७।।**

---

ते ब्रह्म आपणच आहोत असे जेव्हा वाटते तेव्हा होणाऱ्या आनंदाने सबंध ब्रह्मांड भरून गेल्याचे जाणवते.ते सुख शब्दांनी बोलून सांगता येणार नाही.ज्याचे त्यालाच ते कळते.(१७)पण हा अभ्यास करत असताना प्रत्यक्षात विघ्ने निर्माण होतात ती विघ्नेही चार प्रकारची आहेत.त्या विघ्नांचे स्वरूप आणि त्यांच्या परिहाराचे उपाय यांची आता ओळख करून घेऊ.(१८)विक्षेप,लय,कषाय आणि चौथा रसास्वाद अशी ती चार विघ्ने होत.परंतु आपल्या भूमिकेचा अभ्यास नीट केला तर त्या विघ्नांचे आपोआप निरसन होते.(१९)विक्षेपाचे स्वरूप कसे असते?मन विषयाच्या आकाराप्रमाणे संकल्प करू लागते.ब्रह्म निर्विकार असताना त्याच्या ठिकाणी आपण जे जे पदार्थ पाहिले असतील ते ते एकदेशित्वाने भासू लागतात.(२०)आता अशावेळी सर्व ऐश्वर्याचे सौभाग्य जणु असलेले वैराग्य साधकाच्या ठिकाणी असले पाहिजे.जे जे अयोग्य असेल त्याचा दोषदृष्टीने त्याग करावा.(२१) तो त्याग तरी कसा असावा. त्या त्यागाबरोबर विवेकाची जोड असावी.विषयरूप पदार्थाचा ठसा कशावर उमटला आहे, हे जाणून घ्यावे.(२२)आकाशामध्ये जसे मेघ दिसू लागतात,पाण्यावर जशा लाटा उठतात, त्याप्रमाणे अफाट अशा स्वरूपाच्या (ब्रह्माच्या) ठिकाणी विषय भासत राहतात.(२३)मग शेवाळ बाजूला सारून पाण्याचे सेवन करावे लागते त्याप्रमाणे ब्रह्मरूप प्रत्यक्ष जाणून घेऊन त्यासाठी विषयांचा त्याग करावा.(२४)हा त्याग एकदा करून भागत नाही. कारण विषयांचे भास वारंवार होत असतात.विवेकाने त्यांचा त्याग करावा,त्याखेरीज दुसरा उपाय नाही.(२५)हा विक्षेप होय आणि त्याचा त्याग करणे ही विक्षिप्तता होय.हाच अभ्यास सर्वकाळ केल्याने मनाला ब्रह्माच्या ठिकाणी अचानकपणे गोडी उत्पन्न होते.(२६) पण विषय आणि ब्रह्म या दोन्हीबद्दल सारखीच आवड असते त्यामुळे एका क्षणाला ती आवड मनाला विषयाकडे ओढते तर दुसऱ्या क्षणाला ती स्वरूपात (ब्रह्मरूपात) आपली आपण बुडी मारते.(२७)

**यासि म्हणिजे गतायाता । हा विक्षेप संस्कार ओळखी ताता । यासि पूर्वाभ्यास विवेकसहित। वैराग्य असावें।।२८।।होतां अभ्यासपाटव। मनासी विषयाचा अभाव । विषयावीण स्वभाव। मनाचा हारपे।।२९।।येणें रीती विक्षेपाचें। अभ्यासें मूळ तुटें त्याचें। पुढें विघ्न असे लयाचें। तें दोप्रकारें।।३०।।मनाचें राहतां चळण। निद्रा व्यापी येऊन। अथवा वृत्ति होय शून्य। न स्मरे कांही।।३१।।तेणें आत्मत्व अंतरलें। निज सुखासी बिघडलें। याचें निरसन पाहिजे केलें। अत्यंत आवडीनें।।३२।।मी सर्व सुखाचा कंद। अमुप निष्कल निर्द्वंद्व। आठवावें परी शब्द। अवलंबू नये।।३३।।तेणें सुखचि उमटें । वृत्तिमाजीं भरतें दाटे । तेणें निद्रादि वोहटे । प्रकाशीं तम जैसें।।३४।।तो वृत्त्यानंद अवलंबितां।तेचि जाणावी संश्लिष्टता। लय विक्षेपादि समस्ता। दवडिले इनें।।३५।।संश्लिष्टतेपासून। विघ्नें उमटतीं दोन। कषाय आणि रसास्वाद। विघ्नकर समाधीसी।।३६।।हिरवें पिवळें दिसावें । अथवा नादचि उमटावें । हें कषायाचें जाणावें। लक्षण ऐसें।।३७।।मी ब्रह्म जालों परिपूर्ण । वृत्तीनें घेतला अभिमान । स्वस्वरूपाहून पडिला भिन्न । हा रसास्वादु।।३८।।यासि कैसें करावें। भिन्न वृत्तीतें सांडावें। नादरंगही त्यागावे। वमक जैसे।।३९।।वृत्ति स्वरूपींच मुरे । भूमत्वचि**

---

या विघ्नाला गतायाता असे म्हणतात.बाबारे,हा विक्षेपाचा संस्कार आहे,हे ओळखून घे.त्याच्या निर्मूलनासाठी पूर्वाभ्यास आणि विवेकासहित वैराग्याची आवश्यकता आहे.(२८)अशा अभ्यासात प्रावीण्य प्राप्त झाल्यावर मनातून विषय नाहीसे होतात. विषय नष्ट झाल्यामुळे मनाचा स्व-भावही हरपून जातो.(२९) अशा अभ्यासाने विक्षेपाचे मुळासकट निर्मूलन होते. त्यापुढचे विघ्न म्हणजे लय हे आहे. त्याचे दोन प्रकार आहेत.(३०) मनाचे चलन थांबताच निद्रा येऊन व्यापते अथवा वृत्ती शून्य होऊन काहीही आठवत नाही.(३१) त्यामुळे आत्मत्व दूर राहून निजसुखही नष्ट होते. आता याचे निरसन आवडीने केले पाहिजे.(३२) मी सर्व सुखाचा कंद आहे, अमूप आहे,निष्कल आहे, द्वंद्वहीन एकमेव आहे असे आठवावे. पण त्यावेळी शब्दांचा आश्रय करू नये.(३३) त्यामुळे सुखच प्रकट होऊन वृत्तीमध्ये त्याचे भरते दाटते. त्या योगे प्रकाशामध्ये जसा अंधार नाहीसा होतो तशी निद्रा, वृत्तिशून्यता ही विघ्ने ओसरतात.(३४) अशा वृत्त्यानंदाची प्राप्ती म्हणजेच संश्लिष्टता होय. तिच्या योगाने लय विक्षेप इत्यादी विघ्ने दूर होतात.(३५) संश्लिष्टतेमुळे दोन विघ्ने निर्माण होतात. त्यांची नावे कषाय आणि रसास्वाद अशी असून ती दोन्ही समाधीला विघ्नकारक आहेत.(३६) हिरवे पिवळे असे रंग दिसू लागतात अथवा निरनिराळे नाद उठतात. हे कषायाचे लक्षण आहे, असे जाणावे.(३७)मी परिपूर्ण ब्रह्म झालो आहे असा वृत्ती अभिमान धारण करते. त्यामुळे स्वरूपापासून साधक वेगळा पडतो,हा रसास्वाद होय.(३८) त्यासाठी काय करावे?तर वेगळेपणाच्या वृत्तीचा त्याग करावा.नाद,रंग इत्यादींचाही ओकलेल्या पदार्थाप्रमाणे त्याग करावा.(३९) वृत्ती स्वरूपाच्या ठिकाणी मुरते आणि मग केवळ भूमत्व म्हणजे व्यापकपण उरते.

**मात्र उरे । मेघ गगनींच विरे । कीं तरंग सागरीं ।।४०।। हे जाणावी सुलीनता । निर्विकार जे अवस्था । ऐसा समाधि दृढ होतां । निर्विशेष ब्रह्मानंद ।।४१।। अपरोक्ष सुख अनुभविलें । अंत:करण चुबकळलें। मन बुद्धीसी दाटलें । अहंकारासहित।।४२।। तुटतां अज्ञान आवरण । ब्रह्म जें का सच्चिद्‌घन। हृदयाकाशीं भरलें पूर्ण । आनंदें सहित।।४३।। इंद्रियद्वारें दाटलीं । तेणें घटाची घनता विराली । सर्वांगाची दशा जाली । आकाशापरी।।४४।। आनंदप्रकाश उसळला । सर्व ब्रह्मांडभरी जाला । सकळ पिंडासी व्यापिला । अंतर्बाहेरी ।।४५।। कठिणपण उरोचि नेदी । अणुसहित सर्वातें भेदी । पृथ्वी आकाशातें कोंदी । आपुले पुष्टपणीं ।।४६।। ब्रह्मांडा न धरवे धीर । कठिणत्व विरालें समग्र । नामरूपाचा व्यवहार। मृगजळापरी ।।४७।। आत्मस्वरूपाच्या पुरीं । अनंत ब्रह्मांडाच्या हारी । अणु तुषाराच्या लहरी । दिसती स्वानुभवें ।।४८।। त्या वृत्तीतें जरी सांडिलें । अनंत ब्रह्मांड लया गेलें । उपरी जें नि:संग भरलें । केवळ ब्रह्म ।।४९।। जया अभ्यासीं आवडी।तेणें स्वानुभवें उभविली गुढी। सायोज्यमुक्ति धडफुडी। विवेकें केली।।५०।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । अभ्यासयोगप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

---

आकाशात ढग विरून जावेत किंवा समुद्रावरील लाटा ओसराव्यात तसा हा अनुभव आहे.(४०)या अवस्थेला सुलीनता म्हणतात. ती निर्विकार अशी अवस्था आहे. अशी समाधी दृढ झाली तर निर्विशेष ब्रह्मानंद होतो.(४१)अपरोक्ष सुखाचा अनुभव येतो. अंत:करण त्यात चुबकळून निघते.मन,बुद्धी,अहंकार इत्यादी सर्व त्याने व्यापून जातात.(४२)अज्ञानाचे आवरण तुटल्याबरोबर सच्चिद्‌घन असे ब्रह्म आनंदासह हृदयाच्या पोकळीत भरून जाते.(४३)इंद्रियाची दारे बंद झाल्याने घटाची घनता विरून जाते आणि सर्वांगाची दशा आकाशाप्रमाणे होऊन जाते.(४४)आनंदाचा प्रकाश उसळून सर्व ब्रह्मांड व्यापून टाकतो. तसाच पिंडासही अंतर्बाह्य व्यापून टाकतो.(४५)तो कठीणपणा राहूच देत नाही. अणूसहित सर्वांचा भेद करून आपल्या पुष्टीने आकाश,पृथ्वी सर्व व्यापून टाकतो.(४६) ब्रह्मांडाचा लोप होतो. कठीणपणा विरून जातो. नामरूपाचा सर्व व्यवहार मृगजळाप्रमाणे लटका होतो.(४७) आत्मस्वरूपाच्या या पुरात ब्रह्मांडाच्या अनंत रांगा आहेत. त्या रांगा म्हणजे त्या पुरातील पाण्याच्या तुषारकणांच्या लाटांप्रमाणे दिसतात, असा अनुभव येतो.(४८) ती वृत्ती जर सोडून दिली तर ती अनंत ब्रह्मांडेही लयाला जातात.त्यानंतर सगळीकडे केवळ नि:संग असे ब्रह्मच भरून राहिलेले असते.(४९) ज्याला अभ्यासाची गोडी असते त्याला स्वानुभवाने हे यश प्राप्त होते आणि विवेकाने सायुज्यमुक्ती प्राप्त होते.(५०)

### ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - ब्रह्मानंदविवेचन

**आणिकही एक प्रकार। आभ्यासाचा विचार। होत असतां व्यवहार। साधकीं आभ्यासावा।।१।। एक मुख्य ब्रह्मानंद । दुजेविण सुखकंद । अनुभाव्यरूप निर्द्वंद्व । द्वैतवार्ता नसे ।।२।। तयाची व्हावी प्रतीति। द्वारें दोनचि असतीं । वासनानंद अभ्यासिती। विषयानंदद्वारा ।।३।। ब्रह्मानंद विषयानंद। तिसरा तो वासनानंद । तिहीं वेगळा चौथा आनंद । भूमंडळीं असेना।।४।। श्रोता म्हणे आनंद बहुत। निजानंद आणि अद्वैत । विद्यानंदादि असत। तरी तीनचि कैसे।।५।। नांव वेगळालें जालें । परि तें तीनचि मासले। अद्वैतादि जे बोलिले । ब्रह्मानंदासी ।।६।। विद्या आणि वासनानंद । यासी नसे कांही भेद । संपूर्ण विषयांचे स्वाद । एक विषयानंदीं।।७।। आधीं या तिहींसी जाणावें। सत्य मिथ्या ओळखावें। आलिया वाटेचि जावें। मूळ उगमासी।।८।। मुख्य ब्रह्मानंद कोणता । जो सुषुप्तींत असे तत्वतां । जीव नाना श्रम पावतां। जेथें विश्रांती येतसे।।९।। हा सर्वानुभव साचार । समाधिकाली ज्ञानिया गोचर । जेथें मनादि अहंकार। लीन होती।।१०।। सुषुप्तिकाळीं असे नेणणें । तया आनंदाते कोण जाणें । दुजेनिवीण असणें । सुखरूप मात्र ।।११।। तया सुखातें जाणणें । तरी वासनानंदाच्या अनुमानें ।**

---

### पंचिका ८वी, समास ४था - ब्रह्मानंदविवेचन

आपले व्यवहार चालू असताना साधकांनी आणखी एका अभ्यासाच्या प्रकाराचा अभ्यास करावा.(१)ब्रह्मानंद एक मुख्य आहे. तेथे द्वैत नसून तो केवळ सुखाचा कंद आहे व अनुभवानेच जाणण्यायोग्य आहे.(२)त्याची प्रतीती होण्यासाठी दोनच मुख्य दारे आहेत.विषयानंदाच्या मार्गाने काही लोक वासनानंदाचा अभ्यास करतात.(३)ब्रह्मानंद,विषयानंद आणि तिसरा वासनानंद असे तीनच आनंद असतात.या तिन्ही आनंदांपेक्षा वेगळा असा चौथा आनंद या भूमंडळात नाही.(४)यावर श्रोता म्हणतो की, आनंद तर पुष्कळ प्रकारचे आहेत.निजानंद आहे,अद्वैतानंद आहे,विद्यानंद आहे.असे अनेक मुख्य प्रकार तीनच आहेत. अद्वैतानंद, निजानंद ही ब्रह्मानंदास दिलेली नावे आहेत.(६)विद्यानंद आणि वासनानंद यांच्यात काही भेद नाही. तसेच सगळ्या विषयांचे आस्वाद एका विषयानंदात समाविष्ट होतात.(७)आधी या तिन्ही आनंदांचे स्वरूप समजून घ्यावे.त्यांच्यातील सत्य कोणता,मिथ्या कोणता हे ओळखावे आणि मग आल्या वाटेनेच मूळ उगमाकडे जावे.(८)आनंद असताना केवळ तीनच आनंद आहेत असे कसे म्हणता?(५)ही नावे वेगवेगळी असली तरी मुख्य ब्रह्मानंद कोणता?तर सुषुप्तीमध्ये तो असतो.खूप परिश्रम केल्यानंतर जीव तिथेच विश्रांतीसाठी येतो.(९)हा सर्वांच्या अनुभवाचा विषय आहे. ज्ञानी माणसाला तो समाधीमध्ये दिसतो.तेथे मन,अहंकार इत्यादी लीन होतात.(१०)सुषुप्तिकाळी नेणीव असल्यामुळे त्या आनंदाला कोणी जाणू शकत नाही.फक्त द्वैताच्या अनुभवाखेरीज केवळ सुखरूप असणे हेच त्याचे स्वरूप होय.(११)त्या सुखाला जाणायचे असेल तर वासनानंदाच्या अनुमानाने जाणावे आणि त्या वासनानंदाचा

(७) मनही बुद्धीत मेळाले। (२१क) बुद्धीनें (माघारा)(२१ख)



**तो वासनानंद अनुभवणें । विषयानंदीं ।।१२।। जैसा महाजळाचा आशय । भूमिपोटीं प्रगट न होय। शीतळत्वें अनुभवास ये। परीक्षवंताच्या।।१३।। तेथें कोमळ तृणें लसलसितीं। आणि औषधी हिरवाळती। तरी ते जाणावी शक्ति। रसरूपें आपाची ।।१४।। महा आशय आच्छादिला। तैसा ब्रह्मानंद भरला।नेणपणें न जाय कळला। आच्छादिल्यापरी।।१५।। शीतस्पर्शीं अनुभविला।परीक्षवंतीं जाणितला।तो वासनानंद ओळखिला। पाहिजे अंतरीं।।१६।। नाना औषधी वनस्पती । रसरूप टवटवीती । तैसा विषयानंद सेविती । लोकसमूह।।१७।। आतां हेंचि प्रांजळ कीजें । जेणें ब्रह्मानंद उमजे । विषय—सेवनीं लाहिजे । निजसुख आपुलें।।१८।। जागृतीं विषय भोगिले । तेणें अति श्रम पावलें । इंद्रिय मनादि जाले । पराभिभूत ।।१९।। तेव्हां विश्रांति आवडे । विषयसुख तें नावडे । इंद्रियसमुदाय जाउनि पडे । मनाच्या पोटीं।।२०।। माघारा अवलोकिलें । तेव्हां आनंदाचें प्रतिबिंब पडिलें। बुद्धिमाजीं अकस्मात ।।२१।। ते समई जरी अवलोकिलें । तरी कांहीं जाय अनुभविलें । पुढें बुद्धीसी ठक पडिले । मुख्यानंद अवलंबिला ।।२२।। बुद्धि नसतां वेगळेपणें । ब्रह्मानंद जाणिजे कोणें । सुखरूपचि असणें । अनुभवेंविण ।।२३।। मन बुद्धि अहंकार।**

---

अनुभव विषयानंदातून घ्यावा.(१२)भूपृष्ठाखाली असलेला मोठा पाण्याचा साठा भूपृष्ठावर प्रगट झाला नाही तरी परीक्षावंतांना शीतलपणावरून तो अनुभवता येतो.(१३)त्या ठिकाणी कोवळे गवत लसलसत असते आणि वनस्पती हिरव्यागार झालेल्या असतात.त्यावरून पाण्याची रसरूप शक्ती जाणून घेता येते.(१४)मोठा जलाशय आच्छादित झालेला असावा,त्याप्रमाणे ब्रह्मानंद सर्वत्र व्यापून राहिला असला तरी जणु काही झाकलेला असल्याप्रमाणे नेणिवेमुळे तो कळून येत नाही.(१५)जलाशयाचे अस्तित्व भूपृष्ठाच्या शीतल स्पर्शाने परीक्षावंत ओळखतात त्याप्रमाणे साधकाला वासनानंद अंत:करणात ओळखता आला पाहिजे.(१६)विविध प्रकारच्या औषधी वनस्पती पाण्याच्या रसरूप शक्तीने टवटवीत होतात त्याप्रमाणे सर्व लोकसमूह विषयानंदाचे सेवन करताना आढळतात.(१७)आता हेच अधिक स्पष्ट करून सांगतो.त्यायोगाने ब्रह्मानंदाचे स्वरूप कळेल.विषयांचे सेवन करत असतानाही आपले निजसुख प्राप्त करून घेता येते.(१८)जागृतीमध्ये अनेक विषय भोगले त्यामुळे इंद्रिये, मन इत्यादी अतिशय श्रमामुळे अगदी थकून जातात.(१९)तेव्हा त्यांना विश्रांती आवडू लागते,त्यावेळी विषयसुखांबद्दल नावड निर्माण होते. सगळा इंद्रियांचा समूह मनाच्या पोटात जाऊन पडतो.(२०)मन-बुद्धीत जाऊन मिसळते.बुद्धीही जेव्हा मागे वळून पाहाते तेव्हा अकस्मात त्या बुद्धीत त्या ब्रह्मानंदाचे प्रतिबिंब पडते.(२१)त्याच वेळेला निरीक्षण केले तर काही अनुभव येऊ शकतो.पुढे बुद्धी मुख्यानंदाचा स्वीकार करते त्यामुळे तिला भुरळ पडते.(२२)त्यावेळी बुद्धीचे वेगळे अस्तित्व नसल्यामुळे ब्रह्मानंदाचा अनुभव कोणाला घेता येईल? अनुभवावाचून केवळ सुखरूप होऊन राहणे एवढेच त्यावेळी शक्य असते.(२३)मन, बुद्धी, अहंकार

**निःशेष हरपती समग्र । एकला उरे ज्ञप्तिमात्र । स्वानंद आत्मा ।।२४।। म्हणसी बुद्धीवीण सुख । कैसें असे अशेख । जेथें नसती सुखदुःख । निर्विशेषत्वें।।२५।। विषयापरी संपादिलें । तें सुख तेव्हांचि हरपलें । हें सदोदित कोंदाटलें । अनुभवेंवीण।।२६।। म्हणसी मृदु शय्यादि असती । सुषुप्तीं सुखसाधनें होतीं । तैसेंही न घडे । आदिअंती । आनंदरूप असे ।।२७।। भुकेस कोंडा निद्रेस धोंडा । लोकदंडक हा उघडा । म्हणऊन आनंद रोकडा । सुखदुःखाभावीं ।।२८।। श्रोता म्हणे पुढती । सुखदुःखाभावीं सुषुप्ति । तरी मृत्तिका पाषाण होती । सुखसंपन्न ।।२९।। वक्ता म्हणे सुख पाषाणीं । जाणिलें हे काशावरूनी । तेथें हर्ष किंवा ग्लानी । दोन्ही नसे।।३०।।कोणी पुरुष निजेला । तेथें सुखविकास देखिला । म्हणऊन सुखाचा स्वीकार केला । पाहिजे सुषुप्तीं ।।३१।। हें श्रोतयासी न मने । अनुभवेविण कोण जाणें । वक्ता म्हणे शून्य तरि कोणें । अनुभविलें सांग ।।३२।। श्रोता म्हणे हा अनुभव । प्रसिद्ध असे नेणिव । वक्ता म्हणे हो अपूर्व । पुसेन ते सांग पा ।।३३।। तुवा जे नेणिव देखिली । परसुषुप्ति कीं आपुली । म्हणसी परनिद्रा अनुभविली । तरी अवधारीं पा।।३४।।**

---

हे सगळे संपूर्णपणे हरवून जातात. केवळ आत्मा तेवढा ज्ञानस्वरूप होऊन स्वानंदात निमग्न असतो.(२४)आता तू प्रश्न विचारशील की, बुद्धिरहित अवस्थेमध्ये सामान्यत्वाने सुखदु:खे नसतात. अशावेळी बुद्धीवाचून सुख कसे असेल?(२५)विषयाप्रमाणे प्राप्त केलेले सुख तात्कालिक असून ते अनुभव घेतल्याबरोबर नाहीसे होते. हे सुख मात्र अनुभवावाचून सर्वत्र दाटलेले असते. (२६)तू म्हणशील की, झोपेसाठी मृदू शय्या इत्यादी सुखसाधने असतात, तर या आनंदाच्या बाबतीत आरंभापासून शेवटपर्यंत यांपैकी काहीही नसते. हे सुख सदैव आनंदरूपच असते.(२७)लोकांमध्ये 'भुकेला धोंडा,निजेस धोंडा' असे म्हणण्याचा प्रघात आहे. हा लोकदंडक स्पष्ट आहे. त्यानुसार ब्रह्मानंद हा सामान्य सुखदुखांशिवाय वेगळाच आनंद असतो.(२८)यावर श्रोता म्हणतो, 'सुखदु:खविरहित झोप हाच जर आनंद असेल तर मृत्तिका, पाषाण यांनाही सुखसंपन्न म्हणता येईल.''(२९)तेव्हा वक्ता म्हणतो,''पाषाणाला सुख असते हे कशावरून?पाषाणांच्या ठिकाणी हर्ष किंवा दु:ख दोन्ही नसतात.(३०)उलट एखादा पुरुष झोपलेला असेल तर त्याच्या ठिकाणी सुखाची वाढ झालेली दिसते. म्हणून झोपेमध्ये सुख असते याचा स्वीकार केला पाहिजे.''(३१) वक्त्याचे हे म्हणणे श्रोत्याला पटले नाही. तो म्हणतो,''प्रत्यक्ष अनुभवाखेरीज हे कुणालाच कळणार नाही.'' तेव्हा वक्ता म्हणतो,''शून्याचा तरी कोणी अनुभव घेतला आहे, सांग.''(३२) तेव्हा श्रोता म्हणतो,''नेणीव तर सर्वत्र प्रसिद्धच आहे.'' तेव्हा वक्ता म्हणतो,''ही अपूर्व गोष्ट आहे. मग आता मी विचारीन त्या प्रश्नांची उत्तरे दे.''(३३) तू जी नेणीव पाहिली म्हणतोस,ती दुसऱ्याच्या झोपेतील की स्वत:च्या? दुसऱ्याच्या झोपेतील नेणीव पाहिली असे म्हणशील तर असे पहा की,(३४)

**आपुलें सुखदुःख नेणे। तो पराचें काय जाणे । तरी नेणिवेचीं लक्षणें । पाहिलीं कोठें।।३५।। श्रोता म्हणे निद्रा आपुली । तेथेंचि नेणिव देखिली । वक्ता म्हणे हो साधिली । गोष्ट आमुची।।३६।।देखतां आपुली नेणिव । तोचि जयासी आठव । हा तरी सुखाचा अनुभव। अनुभवून सांगसी।।३७।।तरी सुख हें सुषुप्तीं असें । आपुलें अनुभवें जाणतसे । तया अज्ञान हे आलेंसे । व्यर्थचि नांव।।३८।।बागुलत्व बागुलासी। लेकुरें कल्पितीं तयासी । तैसें अज्ञानें सुषुप्तीसी । अज्ञान नाम ठेविलें ।।३९।। स्वसुखातें जाणे। आपुले निर्विशेषत्वपणें। या हेतु श्रुतिहि म्हणे । प्राज्ञचि प्रज्ञा ।।४०।। आणि ज्ञात्याचाही अनुभव । पुसून अज्ञानाचा ठाव। निजानंदाची ठेव। स्वप्रभत्वें असे ।।४१।। असो समाधि अथवा सुषुप्ति। आनंद सुखाची व्याप्ति । तेंचि पुढें अनुभविती । वासनानंदीं।।४२।। तो वासनानंद कैसा। तोचि बोलिजे अपैसा । सुषुप्त्यानंदाचा ठसा । उमटला बुद्धीं।।४३।। तैसा जागृतीच्या अंतीं। निद्रा जेव्हां व्यापिती । तैसीच निद्रेची समाप्ति । वासना सुखरूप।।४४।। समाधिकालीं ज्ञातयानीं । निर्विशेष सुखाची खाणी। तेंचि प्रगटलें उत्थानीं । वृत्तीसी आनंद ।।४५।। ज्ञात्यासि तो आनंदाचा। व्यापारीं लोप नसे साचा। जागृति येतां अज्ञानाचा। प्रवाह विषई।।४६।।**

---

ज्याला आपले सुखदुःख कळत नाही,त्याला दुसऱ्याचे सुखदुःख काय कळणार?तेव्हा तू नेणिवेची लक्षणे नेमकी कुठे पाहिलीस?(३५)यावर श्रोता म्हणतो की,आपल्या निद्रेमध्येच मी नेणीव पाहिली. तेव्हा वक्ता म्हणाला,मग तर आमचेच म्हणणे सिद्ध झाले.(३६)आपली नेणीव पाहून तिची ज्याला आठवण होते त्याला तो सुखाचा अनुभव नाही काय?तो अनुभव घेतल्यानंतरच तू सांगत आहेस.(३७)तेव्हा सुषुप्तीत सुख आहे,हे आपल्या अनुभवाने जाणतोस.असे असताना त्या ज्ञानाला अज्ञान हे नाव विनाकारणच आले आहे.(३८)बागुलबुवाला बागुलपणा देण्याचे काम मुलेच कल्पनेने करतात.त्याप्रमाणे सुषुप्तीला अज्ञानानेच अज्ञान हे नाव ठेवले आहे.(३९)आपल्या सुखाला साधक निर्विशेषपणे(सामान्यत्वाने) जाणतो,म्हणून श्रुती(वेद)सुद्धा प्राज्ञाला(सुषुप्तीतील जीवाला)प्राज्ञ(जाणता)म्हणते.(४०)ज्ञात्याचा अनुभवही तसाच आहे.अज्ञानाचे अस्तित्व समूळ पुसून टाकून निजानंदा(स्वानंद,स्वरूपानंद)चा ठेवा स्वत:च्याप्रकाशाने असतो.(४१)असो,समाधी आणि सुषुप्तीमध्ये या आनंदसुखाची व्याप्ती असते.त्याचाच नंतर वासनानंदामध्ये साधक अनुभव घेतात.(४२)आता तो वासनानंद कसा असतो ते ओघाने सांगतो.सुषुप्त्यानंदाचा बुद्धीत जो ठसा उमटतो तोच वासनानंद होय.(४३)जागृतीच्या शेवटी निद्रा जेव्हा व्यापू लागते(म्हणजे निद्रेच्या आरंभी)तेव्हा आणि निद्रेची समाप्ती होऊन जेव्हा जागृती येऊ लागते तेव्हा या दोन संधिकाळात वासना सुखरूप असतात.(४४)समाधिकाळात ज्ञात्यांना अशा निर्विशेष(सामान्य)सुखाची खाणच प्राप्त झालेली असते.समाधीनंतरच्या उत्थानकाळातही तेच सुख वृत्तीच्या आनंदाच्या रूपाने प्रकटते.(४५)ज्ञानी माणसाला व्यवहार काळातही त्या आनंदाचा लोप होत नाही. पण अज्ञानी माणसांच्या बाबतीत मात्र जागृती येताच

**म्हणोनि वासनानंद । जागृत-सुषुप्तीचा मध्य । सर्व लोकासी प्रसिद्ध । क्षणेक असे।।४७।। तो वासनानंद साधकीं । ज्ञानदृष्टीं अवलोकीं । विषयसुखीं अनेकीं। ओळखी होय ।।४८।। पात्र जळें भरिलें।बाह्य शीतत्वें अनुभविलें। परी जळा अनुमापक जालें। तेवी वासनानंद।।४९।। आतां विषयानंदद्वारां । वासनानंद अवधारा। उभयानुमानें एकसरा । ब्रह्मानंद प्रगटे ।।५०।। अंत:करण मन बुद्धि । मिळून इंद्रियाची मांदी । विषयसुखातें संपादी। जागृतीमध्यें।।५१।। परी ती बुद्धीची वृत्ति । त्रिगुणरूप व्यवहारती । तयाचीं रूपकें निश्चितीं। वेगळालीं परियेसा ।।५२।। घोर मूढ आणि शांत[१०]। गुणयोगें वृत्ति होत । शांतवृत्तींत बिंबत । आनंदांश कांहीं ।।५३।। घोर मूढ वृत्ति होतां । आनंद लोपे तत्त्वतां। सत् आणि चिद्रूपता । हे दोन्हीं असती।।५४।।अग्निसंगे जळ तप्त। ऊष्णत्व अंश दिसत । परी प्रकाशांश लोपत । जळउपाधीमुळें ।।५५।। तैसें आनंदावांचून। सच्चिल्लक्षणें दोन । घोर मूढ वृत्तिलागून । व्यवहार होय ।।५६।।मूढ वृत्ति तमोगुण । तयाचें कैसें लक्षण। आलस्य प्रमाद नेणणें।परी सच्चिदंश असे।।५७।।सदंश प्रगट असे। चिदंश मलिणत्वें दिसे । पाणी डहुळतां जैसें । प्रतिबिंब मळिण ।।५८।।घोर रजाच्या वृत्ति । काम क्रोध**

---

अज्ञानाचा विषयांकडे प्रवाह सुरू होतो.(४६)म्हणून जागृती आणि सुषुप्ती यांच्या मध्ये (संधिकाळात) सर्वच लोकांना ज्ञात असा (अनुभवता येईल असा) वासनानंद क्षणभर असतो.(४७)हा वासनानंद साधकांनी ज्ञानदृष्टीने ओळखावा. निरनिराळ्या विषयसुखांमध्ये त्याची ओळख पटते.(४८)पाण्याने भरलेले भांडे बाहेरून गार लागते. त्या गारपणावरून भांडे पाण्याने भरलेले आहे. याचे अनुमान करता येते. त्याचप्रमाणे वासनानंदाचेही अनुमान करता येते.(४९)विषयानंदाच्या द्वारा वासनानंदाचा अनुभव घेता येतो आणि विषयानंद आणि वासनानंद या दोहोंच्या एकत्र अनुभवाने ब्रह्मानंद प्रगट होतो.(५०) जागृतीमध्ये अंत:करण, मन, बुद्धी आणि इंद्रियसमुदाय एकत्र येऊन विषयसुखाची प्राप्ती करतात.(५१) पण बुद्धिवृत्ती त्रिगुणांच्या रूपाने व्यवहार करत असते. त्यांची वेगवेगळी रूपे आता ऐका. (५२) गुणांच्या योगाने वृत्तीचे घोर, मूढ आणि शांत असे तीन प्रकार होतात. शांत वृत्तीमध्ये आनंदाच्या काही अंशाचे प्रतिबिंब पडते.(५३)घोर आणि मूढ वृत्तींमध्ये आनंद लोप पावतो.मात्र सद्रूपता आणि चिद्रूपता ह्या दोन्ही असतात.(५४)अग्नीच्या संसर्गाने पाणी तापते. पाण्यामध्ये उष्णत्वाचा अंश उतरल्याचे स्पष्ट दिसते. परंतु पाण्याच्या उपाधीमुळे प्रकाशाचा अंश मात्र लोप पावतो.(५५)त्याप्रमाणे घोर,मूढ वृत्तीला आनंदावाचून पण सत् आणि चित् लक्षणांनी व्यवहार होतो.(५६)मूढ वृत्ती म्हणजे तमोगुणच होय. आळस,प्रमाद आणि अज्ञान ही त्याची चिन्हे होत.तरीसुद्धा त्या मूढ वृत्तीमध्ये सत् आणि चित् यांचा अंश असतो.(५७)सत् हा अंश प्रकट (उघड) असतो. चिदंश मात्र पाणी डहुळताच त्यातील प्रतिबिंब मलिन दिसावे त्याप्रमाणे मलिन दिसतो.(५८)घोर या रजाच्या वृत्ती होत.काम,क्रोध,लोभ,प्रीती आणि

**लोभ प्रीति । मोहादि वासना होती । नानाविध ।।५९।।तेथें सत् आणि चिदंश । वस्ती केली सावकाश । परी नसे आनंदांश । प्रगट जनीं ।।६०।। विषयभोगा सोकले । सुखदुःखा वरपडे जाले । निजसुख आच्छादिलें । येणें रीती।।६१।। शांत वृत्ति सत्त्वगुण। क्षमा तितिक्षा विरक्ति पूर्ण । तेथें सच्चित् हें लक्षण । आनंदही असे।।६२।। परी तो प्रगट असेना । किंचित् येतसे अनुमाना । विकारें शीणती कल्पना। म्हणोनिया।।६३।। हे घोर मूढ आणि शांत । गुणविकार वृत्ति होत । या तिहींमाजीं गुप्त वर्तत । उदास वृत्ति चौथी ।।६४।। गुणाचे विकार न होतां । अथवा संधिमाजीं पाहतां । अनुभव हो आइता। उदास वृत्तीचा ।।६५।। तेथें सच्चिद्रूपासहित। आनंदही प्रतिबिंबत। तो वासनानंद निश्चित। साधकीं ओळखावा ।।६६।। करूनी सत्त्वगुणाचा आश्रय । रजतमाचा करी क्षय । पुढें शांतवृत्तीचा लय । उदासवृत्तीमाजीं ।।६७।। गुण विकार होती जाती । मध्य संधीं उदासवृत्ति । तेसमईं आनंदानुभूति । प्रगटे साधका ।।६८।।जागृति स्वप्न व्यवहार होतां। निमिषोन्मेषीं अवलोकितां। मना आनंदाचें ज्ञान होतां। सुखचि होय।।६९।।तैसाचि अभ्यास वाढवावा । विषईं वासनानंद जाणावा । बळेंचि अनुभव घ्यावा । ब्रह्मानंदाचा ।।७०।।**

---

विविध मोहादी वासना या त्या वृत्ती होत.(५९) त्या ठिकाणी सत् अंश आणि चित् अंश यांनी सहज वस्ती केलेली असते. पण आनंदांश मात्र प्रकटपणे नसतो.(६०) लोक विषयोपभोगाला सोकल्यामुळे (चटावल्यामुळे) सुखदु:खांच्या अधीन होतात. अशा रीतीने निजसुख आच्छादिले जाते.(६१) जेथे शांतवृत्ती, सत्त्वगुण, क्षमा, तितिक्षा (सुखदु:खसहिष्णुता) पूर्ण वैराग्य ही सामग्री असते तेथे सत् आणि चित् ही लक्षणे तर असतातच, पण तेथे आनंद हे लक्षणही असते.(६२) पण तो आनंद प्रकट स्वरूपात नसतो. किंचित अनुमानाने तो जाणता येतो. कारण किंचित विकार होताच कल्पना शिणतात. यावरून त्या आनंदाचे अनुमान करता येते.(६३) घोर, मूढ आणि शांत गुणविकाराने बदलणाऱ्या वृत्ती होत. या तिहींमध्ये चौथी उदास वृत्ती गुप्तपणे राहात असते.(६४) गुणांचे विकार होत नसतील तेव्हा, अथवा दोन वृत्तींच्या संधीमध्ये पाहिले असता उदास वृत्तीचा अनुभव आपोआप येतो.(६५) तेथे सद्रूप, चिद्रूप या लक्षणांसह आनंद ही प्रतिबिंबित झालेला असतो. साधकांनी तो वासनानंद आहे, असे निश्चितपणे ओळखावे.(६६) तो वासनानंद सत्त्वगुणाचा आश्रय करून रज, तम या गुणांचा क्षय करतो. त्यानंतर शांतवृत्तीचाही उदास वृत्तीमध्ये लय होतो.(६७)गुणविकार होत जात असतात. त्यांच्या मध्य संधीमध्ये उदासवृत्ती असते.त्यावेळी साधकाला त्या उदासवृत्तीमध्ये आनंदानुभव मिळतो.(६८) जागृती,स्वप्न यांच्यामधील व्यवहार चालू असता पापण्यांच्या उघडझापीमध्ये क्षणभर संधिकालाचे अवलोकन केले असता मनाला त्या आनंदाचे ज्ञान होते तेव्हा सुखच होते.(६९)तोच अभ्यास वाढवावा.विषयांमध्येही वासनानंद जाणून घ्यावा आणि प्रयत्नपूर्वक ब्रह्मानंदाचा अनुभव घ्यावा.(७०)

**तोचि जागृतीच्या अंती । सुषुप्ति न ये पुरती। सहज होय अनुभूति । जागृतीं अभ्यासें।।७१।। सुषुप्तींत नलगे बोलणें । ब्रह्मानंदाचीं लक्षणें । अनुभूतिवीण असणें । सुखस्वरूप ।।७२।।एवं जागृति स्वप्न सुषुप्ति । असे आनंदाची व्याप्ति । हेंचि साधन अहोराति । साधकें कीजे।।७३।। व्यापार आणि ब्रह्मानुभूति । एकसमईं उभय प्रतीति । अभ्यासें बळाविली मति । सुखदुःखा नातळे तो ।।७४।। जैसा माध्यान्हीं गंगाजीवनीं । कटिपर्यंत उभा कोणी । तयासी उष्ण शीत दोन्हीं । एकसमईं अनुभूति ।।७५।। अखंड आनंदाचें स्मरण । हाचि समाधि संप्रज्ञ। तया नसे उत्थान । तिहीं अवस्थें ।।७६।। एवं विषय आणि वासना । ब्रह्मानंदीं पावती अवसाना । वर्तून लहरी जीवना । माजीं लय होय ।।७७।। तरंगीं जैसें जळ । कीं ज्वाळीं असे अनळ । वासनानंदीं कल्लोळ । ब्रह्मानंदाचे ।।७८।।तरंगीं जळ ओळखिलें । तरंग जरी लया गेले। परी पाणी नवचे हलवलें । जैसें तैसें ।।७९।। सुषुप्तिं अथवा प्राणप्रयाणीं। विषय वासना हरपती दोन्हीं । एकटा उरे निदानीं । ब्रह्मानंद ।।८०।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ब्रह्मानंदविवेचनप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

---

तोच आनंद जागृती संपली आहे, अजून पुरती झोप आलेली नाही अशा संधिकालात सहज अनुभवता येतो. जागृतीतही अभ्यासाने त्या आनंदाचा अनुभव घेता येतो.(७१) सुषुप्तीत तर बोलण्याची गरजच नाही. तिथे ब्रह्मानंदाची सर्वच लक्षणे असतात. कोणत्याही प्रकारचा अनुभव न घेता आपल्याला सुखरूप स्थिती प्राप्त होते. (७२)अशा प्रकारे जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तिन्ही अवस्थांमध्ये आनंदाची व्याप्ती असते. हेच साधन साधकांनी अहोरात्र करावे.(७३) व्यापार आणि ब्रह्मानुभव या दोहोंचा अनुभव अभ्यासाने एकाच वेळी घेता येतो. अभ्यासाने बुद्धी दृढ झाल्यानंतर साधक सुखदु:खांच्या पलीकडे जातो.(७४) ज्याप्रमाणे दुपारच्या वेळी एखादा नदीच्या कमरेइतक्या पाण्यात उभा राहिला तर त्याला शीतलता आणि उष्णता या दोहोंचा एकाच वेळी अनुभव येतो, (तसाच व्यापार आणि ब्रह्मानुभव हे दोन्ही अनुभव एकाच वेळी घेता येतात.)(७५) आनंदाचे अखंड स्मरण असणे याला संप्रज्ञात समाधी म्हणतात.त्या समाधीमध्ये जागृती, स्वप्न, सुषुप्ती या तिन्ही अवस्थांमध्ये उत्थान होत नाही.(७६) अशा प्रकारे विषय आणि वासना ब्रह्मानंदामध्ये विलीन होतात. पाण्यात लाटा उत्पन्न होतात आणि पाण्यामध्येच लय पावतात.तसेच येथे होते.(७७) लाटांमध्ये जसे पाणीच असते,ज्वालांमध्ये अग्नीच असतो,त्याप्रमाणे वासनानंदामध्ये ब्रह्मानंदाचे कल्लोळ असतात.(७८) लाटांमधील पाणी ओळखल्यानंतर लाटा जरी लयाला गेल्या तरी पाण्याला मात्र काहीच विकार होत नाहीत. ते जसेच्या तसेच असते.(७९) त्याप्रमाणे सुषुप्तीमध्ये अथवा प्राण निघून गेल्यानंतर विषय आणि वासना दोन्ही नाहीशा होतात आणि शेवटी एकटा ब्रह्मानंद उरतो.(८०)

**।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - आचार्योपासन**

**पुरे साधनाची कचाटी। किती करूं पा चावटी। सकळ शेवटाचें शेवटीं। मुख्यत्वें साधन।।१।। सकळ साधनांमाजीं वरिष्ठ। सुलभ आणि स्पष्ट।सकळ साधनांचे कष्ट।येणें साधनें सफळ।।२।। सकल उपायांसी विश्रांति । ते जाणावें आचार्योपास्ति । जया घडे साधकाप्रति । मुक्ति करतळीं त्याच्या ।।३।। ज्ञान वैराग्य विचार । निद्रेंत उपासिती त्यासमोर । श्रुतिस्मृति घेऊनी चामर । साधकापुढें सर्वदा ।।४।। ब्रह्मानंद घर पुसे । कीं गुरुपुत्र कोठें राहतसे । मज वियोग बहु जालासे । तयावांचुनी ।।५।। ईश्वर अष्टमहासिद्धींसहित। हृदयींच असे नांदत । ॐकार राहिला द्वारांत । द्वारपाळ होउनी ।।६।। बहु काय बोलूं वचनीं । लाजून पळाली मायराणी । अविद्येसी धीर कोठोनि । उभ्या प्राण सांडिला ।।७।। ऐसें माहात्म्य गुरुभक्तीचें । नेणवे नेणवे साचें । अनंत ढीग पुण्याचे । तयासीच घडे ।।८।। गुरुवीण ब्रह्म निर्गुण । दुजें नसेचि भिन्न । तेथें देव हे सगुण । वेगळे कैंचे ।।९।। नेणे ज्ञान नेणे ध्यान । नेणे समाधि उत्थान । गुरुविण द्वैतभान । मोक्षादि कां कैंचें ।।१०।। रात्री दिवस**

---

**पंचिका ८वी, समास ५वा - आचार्योपासन**

आता साधनांची खटपट पुरे. त्यासाठी किती बडबड करू? या सगळ्या साधनांमध्ये शेवटचे मुख्य साधन वेगळेच आहे.(१) ते सर्व साधनांमध्ये श्रेष्ठ साधन आहे. ते सोपे आणि स्पष्ट आहे. इतर साधनांत केलेले सर्व कष्ट या एका साधनाने सफळ होतात.(२) सगळ्या साधनांना विश्रांती देणारे असे ते साधन म्हणजे आचार्योपासन (सद्‌गुरूंची सेवा) हे होय. हे साधन ज्या साधकाला घडते त्याच्या तळहातावर मुक्ती वास्तव्य करते. (मुक्ती त्याला अतिशय सुलभ आहे.)(३) ज्ञान, वैराग्य, विचार ही साधने झोपेतही या साधकाची सेवा करतात. श्रुती, स्मृती हातात चवऱ्या घेऊन त्याच्यासमोर नेहमी उभ्या असतात.(४) 'ब्रह्मानंद, 'गुरुपुत्र कोठे राहतो?' असे म्हणून त्याच्या घराचा पत्ता विचारतो. तो म्हणतो, ''त्याला न भेटल्यामुळे मला त्याच्या वियोगाचे फार दुःख होते आहे.''(५)साक्षात ईश्वर आठ महासिद्धींसमवेत त्याच्या हृदयातच नांदत असतो. ॐकार (प्रणव) त्याच्या दारात द्वारपाल होऊन राहातो.(६) आणखी शब्दांनी अधिक काय सांगू? त्याला पाहाताच मायाराणी लाजून पळून गेली. अविद्येला तर तेवढाही धीर उरला नाही. तिने उभ्याउभ्याच प्राणत्याग केला.(७) गुरुभक्तीचे असे थोर माहात्म्य आहे. ते खरे पाहता समजतच नाही. ज्याच्या गाठी पुण्याचे अनंत ढिगारे आहेत, त्यालाच गुरुभक्तीचे माहात्म्य कळेल.(८) गुरू नसल्यामुळे ब्रह्म निर्गुण (गुणरहित) राहिले. ब्रह्म हे गुरूपेक्षा भिन्न असे नाहीच.मग सगुण देव हे गुरूपासून वेगळे कसे असतील?(९) गुरुभक्ताला गुरुभक्तीपुढे ज्ञान, ध्यान, समाधी, उत्थान इत्यादी कशाचीही जाणीव नसते. गुरूवाचून या सर्व साधनांना द्वैतभान येते. मग त्यांनी मोक्ष इत्यादी कसे प्राप्त होतील?(१०) त्याला गुरुसेवेपुढे रात्र, दिवस यांचेही भान

**नेणें । जग तरी जाणावें कोणें । एक सद्‌गुरू व्यापकपणें । दुजें न देखे सर्वथा ।।११।। घबाडा साधलें घबाड । घबाड जालें कबाड । घबाडीं उरलें घबाड । घबाडपणीं ।।१२।। जाणीव नेणीव बाबुळी । हरपती होय समुळीं । रत्नदीप्तीची काजळी । झाडली जैसी।।१३।। ऐसा महाराज गुरुदास । केवळ परब्रह्माची मूस । जीवशिव येती विश्रांतीस । उपाधि सांडुनी।।१४।।वेदासी माहात्म्य न कळे । तें वाणीसी केवि चावळे । मौनाचेही जेथें गळे। निस्तत्वपण।।१५।।राजा कोणी संग्रामशूर । त्याचें सामर्थ्य त्यासमोर । भाट वर्णिती किंकर । परी सामर्थ्य ज्याचें त्या।।१६।।तैसें त्याचें महत्त्व त्यासी । भाटापरी तल्लक्षणासी। वर्णिजेती गुरुभक्तीसी। यथामती।।१७।।गुरुभक्ति गुरुभक्तासी । वर्णनीं काय फळे म्हणसी । माळीण हार गुंफी जैसी । भोगे तरी राजपत्नी।।१८।।भोगेविण माळिणीसी। सुगंधाची समृद्धि जैसी। तैसें वर्णितां गुरुभक्तीसी। ब्रह्मानंद होय।।१९।।म्हणून गुरुभक्तीचें लक्षण। श्रोता वक्ता होय पावन। आतां ऐका सावधान। कांही एक बोलूं।।२०।। सांडुनी अहं आणि ममता।सद्‌गुरुपदीं अनन्यता।आपणासगट समर्पिता। होय गुरुचरणीं।।२१।।**

---

नसते.मग इतर जगाचे ज्ञान कुणाला असणार?एक सद्‌गुरूच व्यापक रूपात त्याला सर्वत्र दिसतो.त्यावाचून दुसरे काहीही त्याला दिसत नाही.(११)पूर्णाला पूर्ण मिळाल्याबरोबर सर्व दृश्यजात पूर्ण बनते,पूर्णातून पूर्णच उरते आणि पूर्णत्वानेच ते राहते.(१२)साधकाची जाणीव,नेणीव त्या पूर्णाच्या अनुभवात पाण्याच्या पृष्ठभागावरून जसे शेवाळ हटवले जाते, अथवा दीपाची काजळी जशी झाडली जाते,त्याप्रमाणे नाहीशा होतात.(१३)असा गुरुदास महाराज (शिष्योत्तम) म्हणजे केवळ परब्रह्माची मूस होय. त्याच्याकडे जीव आणि शिव आपल्या उपाधींचा त्याग करून विश्रांतीस येतात.(१४)त्याचे मोठेपण वेदांनासुद्धा कळत नाही,ते साध्या वाणीला कसे बडबडता येईल?मौनाचेही असारपण तेथे गळून पडते.(१५)एखादा संग्रामशूर राजा असतो.त्याच्या सामर्थ्याचे त्याच्यासमोर त्याचे भाट इतर सेवक वर्णन करत असतात.पण ज्याचे सामर्थ्य त्यालाच ते माहीत.(इतरांनी केलेल्या वर्णनाने त्याची कल्पना येणार आहे का?)(१६)त्याप्रमाणे त्याचा मोठेपणा त्याच्यापाशीच असतो. परंतु तरीसुद्धा भाट त्याचे वर्णन करतातच ना! त्यांच्याप्रमाणे आपल्या बुद्धीला कळेल त्याप्रमाणे गुरुभक्तीचे वर्णन करावे हे बरे !(१७) गुरुभक्ती गुरुभक्तापाशीच असते.तिचे वर्णन करून तुम्हाला लाभ काय असे म्हणशील तर ऐक.माळीण हार गुंफते. त्या हाराचे सुख राणी भोगते.(१८) पण माळीण ते हाराचे सुख भोगत नसली तरी तिला सुगंधाचा घमघमाट भोगायला मिळतोच ना ! त्याप्रमाणे गुरुभक्तीचे वर्णन करण्याने ब्रह्मानंद होतो.(१९) म्हणून गुरुभक्तीच्या वर्णनाने श्रोता आणि वक्ता हे दोघेही पावन होतात. म्हणून आता सावधपणे लक्ष द्या. त्या गुरुभक्तीचे (जसे जमेल तसे) थोडेफार वर्णन करतो.(२०) गुरुभक्त मी आणि माझेपण यांचा त्याग करून सद्‌गुरूंच्या पायांपाशी अनन्य भावाने सादर झालेला असतो. तो स्वत:ला गुरुचरणांवर वाहून घेतो.(२१)

**गुरुसेवनीं लागली गोडी । कल्प मानिला एक घडी । नित्य चौगुणी आवडी । जैसी वाढी उद्भिजा ।।२२।। सूर्यविकाशनी कमळ । सूर्यासमोर सर्वकाळ । तेवीं गुरुदास केवळ । सद्गुरूपुढें ।।२३।। काया वाचा आणि मन । गुरुसेवेचें लक्षण । बोलिजेती भिन्न भिन्न। संक्षेपमात्रें ।।२४।। सुखदु:ख नेणें देहाचें । सदा सोहळे सेवेचे । सूर्योदयापासून उद्याचें। सूर्योदया पावेतों ।।२५।। सद्गुरू जागृतीसी आले । मस्तक चरणीं समर्पिलें । पादुकेसी पुढें केलें । वेगें चालिले दिशेकडे ।।२७।। तें स्थान पूर्वीच शोधिलें । चंदनें संमार्जन केलें। दीपमाळा अति शोभले । नाना सुगंधीं ।।२८।। शौचक्रिया संपादून । आलें जेथें उदकस्थान । चौकीवरी बैसऊन । चरण क्षाळिले।।२९।। मुखमार्जन जालियावरी । नाना सुगंध उटणें करी । दधिमधुघृतक्षिरीं । पंचामृतस्नानें।।३०।। शुद्ध जीवन मंगलस्नान । करऊनि पुसिलें आपण । शुद्धवस्त्र परिधान । इकडे आसन सिद्ध जालें ।।३१।। सद्गुरूसी बैसविले । पूजासाहित्य सिद्ध केलें । गंधपुष्पीं पूजन जालें । वस्त्रालंकार।।३२।।**

---

गुरूंची सेवा करण्यात त्याला एवढी गोडी लागते की एक कल्प त्याला अर्ध घटकेप्रमाणे वाटतो.(त्याने कितीही वेळ सेवा केली तरी त्याला तो काळ फार थोडा वाटतो.) वेळूचा अंकुर (अथवा कोणतीही वनस्पती)जसा दिवसेंदिवस वाढत जातो, तशी त्याची गुरुसेवेची आवड चौपटीने वाढत जाते.(२२)सूर्यविकासी कमळ जसे नेहमी सूर्याकडे तोंड करून असते त्याप्रमाणे गुरुदास सद्गुरूंपुढे तत्परतेने उभा असतो.(२३)या गुरुसेवेची लक्षणे शरीर, वाणी आणि मन अशी तीन प्रकारांनी विभागली गेली आहेत. ती संक्षेपाने वेगवेगळी सांगतो.(२४)गुरुभक्ताला आपल्या शरीराचे सुखदु:ख माहीत नसते. त्याच्यासाठी गुरुसेवेचे प्रसंग नेहमी आनंदाचे क्षण असतात. आजच्या सूर्योदयापासून ते उद्याच्या सूर्योदयापर्यंत तो या सेवेच्या आनंदात असतो.(२५)सद्गुरू बिछान्यावर झोपेत असताना तो बाजूला सतत हात जोडून उभा असतो किंवा चवरी घेऊन सतत ढाळत असतो.(२६)सद्गुरू जागे झाले की लगेच तो आपले मस्तक त्यांच्या पायांवर ठेवतो, मग तो सद्गुरूंच्या पादुका (पादत्राणे)समोर ठेवतो. ते लगेच पातर्विधीसाठी बहिर्दिशेला जातात.(२७)प्रातर्विधीचे स्थान त्याने अगोदरच स्वच्छ केलेले असते. त्यावर चंदनाचा सडा टाकलेलाअसतो. दिव्याच्या रांगांनी ते सुशोभित केलेले असते. निरनिराळ्या सुगंधांनी सुगंधित केलेले असते.(२८) शौचक्रिया संपवून सद्गुरू पाण्याचा साठा असलेल्या ठिकाणी येतात. तेथे त्यांना चौकीवर (चौरंगावर) बसवून तो त्यांचे पाय धुतो.(२९)नंतर तोंड धुवून झाल्यानंतर तो निरनिराळ्या सुगंधी द्रव्यांचे उटणे त्यांच्या अंगाला लावतो.दही,मध,तूप,दूध घालून त्यांना पंचामृताचे स्नान घालतो.(३०) पंचामृत स्नान झाल्यानंतर शुद्ध जलाने मंगलस्नान घालतो. तो त्यांचे अंग पुसतो आणि त्यांना शुद्ध वस्त्र नेसायला देतो. लागलीच आसन तयार करून ठेवतो.(३१) सद्गुरूंना आसनावर बसवतो. पूजासाहित्य तयार करतो. सुगंधयुक्त फुले त्यांना अर्पण करून त्यांची पूजा करतो. त्यांना वस्त्रे आणि अलंकार देतो.(३२)

**पूजा जालिया सांग । नैवेद्याची लगबग । षड्रस पात्रीं मग । वाढून आणिले ।।३३।। धूपदीप समर्पिले । भोजन समाप्त जालें । गंगाजळासीं घेतलें । तृप्त जाले गुरुराजे।।३४।। पात्रीं राहिले जे शेष । तेचि सेविलें सावकाश । तस्तीचें उदक निःशेष। उच्छिष्टपान।।३५।। अन्यस्थानीं दुजें आसन । तेथें बैसविलें नेऊन । तांबूल अर्पी प्रीतिकरून । पीकपात्र घेऊन उभा।।३६।।ज्या ज्या काळीं जे जे भोग । ते ते अर्पी यथासांग । गुरुमुखीं ठेवी अभंग। दृष्टि आपुली।।३७।।सद्गुरू करितां गमन। पाठी चाले आपण । सद्गुरुचरणींचे रजःकण। मस्तकीं वंदी।।३८।।वातें रजःकण उडतां। माथा ओडवी खालुता । अतिकृपाळू सद्गुरुमाता। मजला शुद्ध करितसे ।।३९।। गुरु वाहनीं आरूढती । आपण चाले सन्निध गति । खडे किंवा कांटे मोडती । परी तो नेणे सर्वथा ।।४०।। मस्तकीं धरूनीया छत्र । उष्ण न लगे अणुमात्र । ऐसें धरी परी वस्त्र । किमपि सुकेना ।।४१।। जों जों देहा कष्ट होती। तों तों अधिक वाढे प्रीति। सद्गुरू जेथें बैसती। तेथें उभा सन्मुख।।४२।। सूर्य जातां अस्तासी। पुन्हा आरंभिलें पूजेसी । गंधमाला धूसरासी । धूप दीप नैवेद्य ।।४३।।तांबुलादि पूर्वरीती।**

---

अशा प्रकारे सर्वसांग पूजा केल्याबरोबर नैवेद्याची लगबगीने तयारी करतो आणि ताटात षड्रसयुक्त पक्वान्ने वाढून आणतो.(३३)त्यानंतर धूप, दीप अर्पण करतो.सद्गुरूंचे भोजन मग संपते.मग तृप्त झालेले ते गुरुराज गंगाजलाची आपोष्णी घेतात.(३४)त्यांच्या पानात जे उरलेले अन्न असेल ते हा शिष्य सेवन करतो आणि मग त्यांच्या तस्तातील उच्छिष्ट पाणी सगळे पिऊन टाकतो.(३५)मग दुसऱ्या ठिकाणी सद्गुरूंसाठी दुसरे आसन घातलेले असते.तेथे तो सद्गुरूंना नेऊन बसवतो.मग त्यांना प्रेमाने विडा देतो आणि स्वत: पीक टाकण्याचे पात्र हातात धरून जवळ उभा राहतो.(३६)ज्या ज्या काळी सद्गुरूंना जे जे भोग द्यायचे असतात,ते ते तो त्यांना यथासांग अर्पण करतो.त्याने आपली दृष्टी सतत गुरुमुखावर केंद्रित केलेली असते.(३७)सद्गुरू कोठे जाऊ लागले की हाही त्यांच्या पाठीमागे चालू लागतो.सद्गुरूंच्या पायांनी उडालेली धूळ आपल्या मस्तकावर घेऊन तिला वंदन करतो.(३८)वाऱ्याने धूळ उडू लागली असता ती घेण्यासाठी तो आपला माथा खाली वाकवून पुढे करतो.ती धूळ अंगावर उडताच दयाळू सद्गुरुमाउली मला शुद्ध करत आहे,असे म्हणतो.(३९)गुरू वाहनात बसून जाऊ लागतात तेव्हा तोही त्यांच्या वाहनाच्या बरोबर चालू लागतो.त्याला चालताना खडे किंवा काटे मोडतात,पण त्यांचे त्याला भान नसते.(४०) सद्गुरूंना चालताना थोडेसुद्धा ऊन लागू नये म्हणून तो त्यांच्या मस्तकावर छत्री धरतो,त्यामुळे त्यांनी उन्हासाठी डोक्यावर घेतलेले ओले वस्त्र थोडेसुद्धा सुकत नाही.(४१)गुरुसेवा करत असताना देहाला जेवढे कष्ट होतील,तेवढे त्याचे सद्गुरूंबद्दलचे प्रेम अधिक वाढते.सद्गुरू जेथे बसतील तेथे तो त्यांच्यासमोर उभा राहतो.(४२)सूर्य अस्ताला जाताच तो पुन्हा पूजेला आरंभ करतो.गंध,माळा,गुलाल,बुक्का(धूसर),धूप,दीप,नैवेद्य,(४३)विडा इत्यादी निरांजन ओवाळून

**नीरांजनादि आरती । जे जे गुरूसी प्रीति । तेंचि अर्पी तें काळीं।।४४।।शयनस्थान सिद्ध केलें। मग गुरूसी उठविले। मंचकीं शयन करविले । गुरुपदीं ठेविलें मस्तक।।४५।।चरण चुरी आवडी। मुख अवलोकी घडि घडि। नसे निद्रेची साकडी। मारिली दडी गुरुपदीं।।४६।। तथापि निद्रेनें व्यापिलें । पदींच मस्तक ठेविलें । अनंत जन्मींचे श्रम गेले। क्षणामाजीं।।४७।। ऐशी काया गुंतली सेवेसी।पवित्रता वर्णावी कैसी। तीर्थे पातलीं स्नानासी। चरणरजाच्या।।४८।। गुरुउच्छिष्ट भोजन । गुरुतीर्थाचें स्नानपान । तया देहाचें महिमान। सहस्त्रवदना कळेना।।४९।। या रीती कायीक सेवन । आतां वाणीचें कैसें भजन । गुरु हीं अक्षरें दोन । नख शिख व्यापिलीं।।५०।। परेपासून वैखरी। गुरु अक्षराच्या हारी। जैसीं रत्नें सुवर्णावरी । कोंदण केलें।।५१।।पन्नास मातृका आटल्या। दोहीं अक्षरीं साठविल्या। ज्याच्या वैखरीसी आल्या। पवित्र व्हावया ।।५२।। गुरु गुरु जयजय गुरु । नादाचा चालिला सधरु। तेणें प्राण जाला स्थिरु। परादिक एक जाल्या ।।५३।। मन बापुडें वेडावलें । भजनींच नाचूं लागलें । ओवाळुनी सांडिलें । समाधिसुखा ।।५४।। होतां कांही निरूपण । श्रवण करी सावधान।**

---

आरती इत्यादी जे जे गुरूंना आवडते ते ते त्याकाळी अर्पण करतो.(४४)त्यानंतर गुरूंचे अंथरूण घालतो. मग गुरूंना उठवून त्यांना मंचकावर झोपवतो. मग गुरूंच्या पायावर मस्तक टेकवून त्यांना नमस्कार करतो.(४५)त्यांचे पाय आवडीने चुरतो. पुन्हा पुन्हा त्यांच्या तोंडाकडे पहातो. त्याला झोपेचे संकट नसते. तो सतत गुरूंच्या चरणांमध्ये दडी मारून राहतो.(४६) तरीसुद्धा झोपेने घेरलेच तर गुरूंच्या पायांवरच मस्तक टेकवतो. त्यावेळी त्या क्षणी अनंत जन्मांचे श्रम नाहीसे झाल्यासारखे त्यास वाटते.(४७) अशा तऱ्हेने त्याचे शरीर गुरुसेवेमध्ये गुंतलेले असते.त्याचे पावित्र्य किती वर्णावे? त्याच्या चरणांच्या धुळीत स्नान करण्यासाठी तीर्थक्षेत्रे येतात.(४८) जो गुरूच्या उच्छिष्टाचे (गुरूंनी उष्टावलेल्या) अन्नाचे जेवण करतो,गुरूंच्या तीर्थाचे स्नान,प्राशन इत्यादीसाठी सेवन करतो, त्या देहाचे माहात्म्य प्रत्यक्ष शेषालाही कळत नाही.(४९) अशा रीतीने गुरुभक्ताने करावयाच्या कायिक सेवेचे वर्णन झाले. आता वाणीने करावयाची भक्ती कशी असते ते पाहू. गुरू या दोन अक्षरांनी त्याचे नखापासून ते शिखेपर्यंतचे शरीर व्यापलेले असते.(५०)ज्याप्रमाणे सुवर्णाच्या कोंदणात रत्ने बसवली जातात. त्याप्रमाणे 'गुरू' या अक्षरांच्या हारांनी त्याच्या परेपासून ते वैखरीपर्यंतच्या चारी वाणी सुशोभित झालेल्या असतात.(५१) पन्नास वर्ण आटवून गुरू या दोन अक्षरात साठवले. ते दोन्ही वर्ण त्याच्या वैखरी वाणीत पवित्र होण्यासाठी येतात.(५२) 'गुरू,जय जय गुरू'असा नादाचा जोरदार गजर चालत असल्यामुळे त्याचा प्राण स्थिर होतो. परादी चार वाचा एक होतात.(५३) त्याचे मन बिचारे मोहित होऊन गुरूंच्या भजनात नाचू लागते आणि तो समाधिसुखाला या भजनानंदावरून ओवाळून टाकतो.(५४) काही निरूपण चालू असेल तर सावधानतेने त्याचे श्रवण करतो. मधून मधून नम्रतेने

**नम्रपणें करी प्रश्न। समाधान पावे।।५५।।गुरुसी आवडे कैसा। आपुला प्रत्यगात्मा जैसा। क्षण एक न विसंबे पाडसा। हरिणी जैसी।।५६।।हें परब्रह्म गोठलें । दो ठाईंचि विभागलें। गुरुशिष्यरूपें जालें। एकपण न मोडितां।।५७।।येथें काय उपमावें। कासया व्यर्थ स्तववावें। उभयामाजीं जाऊन पडावें । मीपणेंविण।।५८।।असो जयाचे वचनीं । वेद राहिला येउनी। अर्थ प्रवेशला अंत:करणीं। झडि देउनी बळेंचि।।५९।।अंत:करण प्राण मन । चारी वाणी संपूर्ण।गुरु गुरु हेंचि भजन।गुरुरूपचि जालें।।६०।।पुढें मन कैसें प्रवर्तलें।गुरुभजनीं जें लागलें।तेंचि संक्षेपें बोलिलें।पाहिजे आतां।।६१।।निमिष्यभरि गुरुचा।वियोग होतां मनाचा। धिवसा नव्हे राहवयाचा।म्हणुन गुरु आठवी।।६२।।गुरूचें जें सिंहासन।अंगें जालों आपण।वरी मृदु अस्तरण। तेंहि जालों।।६३।।गुरुपरिधानवस्त्र। जालों आपण वरी छत्र।आणि विंझणें चामर।वारिता मीचि।।६४।।गुरुसी जें जें आवडे।तें तें मी होईन रोकडें।गुरु पाहती जिकडे।ते दिशा मी होईन।।६५।।गुरुसी सुमनें आवडती।बाग होईन मी निश्चिती।नानाप्रकारें पुष्पजाति।समूळ होईन मी।।६६।।मीच होऊनी दोरा। मीच होईन फुलारा। मीच गुंफीन**

---

प्रश्न विचारून समाधान करून घेतो.(५५) तो गुरूला अत्यंत प्रिय असतो,कसा म्हणाल तर अगदी आपल्या शरीरातील प्रत्यगात्म्याप्रमाणे (कूटस्थाप्रमाणे). हरिणी जशी आपल्या पाडसाला एक क्षणभरही विसरत नाही तसे सद्गुरू त्याला विसरत नाहीत.(५६) हे परब्रह्मच जणु गोठले असून त्याचे दोन भागात विभाजन झाले आहे. ते दोन भाग म्हणजे स्वत:चे एकपण न मोडता वेगळे दिसणारे गुरू आणि शिष्य हे होत.(५७) या ऐक्याच्या बाबतीत कोणाची कोणाला उपमा द्यावी? विनाकारण ही स्तुती कशासाठी करावी? या दोघांच्या ऐक्यात मीपणा टाकून देऊन समरस व्हावे हेच योग्य होय.(५८) त्याच्या बोलण्यामध्ये साक्षात वेद येऊन राहिलेला असतो. त्यामध्ये अर्थ बळजबरीने मुसंडी देऊन प्रवेश करत असतो.(५९)अंत:करण, प्राण, मन, चारी वाणी या सगळ्यांमध्ये गुरू गुरू असेच भजन चाललेले असते. ते गुरुरूपच झालेले असते.(६०)आता गुरुभक्तीकडे वळलेले मन तिकडे कसे प्रवृत्त झालेले असते तेच संक्षेपाने सांगतो.(६१)आता गुरूचा मनाने एक क्षणभर जरी वियोग झाला तरी तो सहन करण्याचे धैर्य नसल्यामुळे तो भक्त लगेच सद्गुरूचे स्मरण करतो.(६२) गुरूंचे जे सिंहासन तेच आपण स्वत: झालो अशी तो कल्पना करतो. त्यावर घातलेले मऊ अस्तरणही आपणच झालो, अशी तो कल्पना करतो.(६३) गुरू परिधान करतात ते वस्त्रही आपणच झालो, त्यावर विंझणे म्हणजे चवरी ढाळणाराही मीच झालो, असेही त्याला वाटते.(६४)गुरूंना जे जे आवडते ते ते मीच व्हावे असे त्यास वाटते. गुरू जिकडे पाहतील ती दिशाही मीच होईन असे तो ठरवतो.(६५)गुरूंना फुले आवडतात म्हणून त्यासाठी मीच बाग होईन आणि त्या बागेतील फुलांच्या निरनिराळ्या जातीही मीच होईन, अशी त्याची इच्छा असते.(६६) मीच दोरा होईन, मीच फुलारी होईन. मीच हार होईन आणि तो हार मीच

**हारा । मीच घालीन कंठीं ।।६७।। मीच सुगंध होईन। गुरुघ्राणीं प्रवेशेन। गंधही मीचि घेईन। देवतारूपें।।६८।। नाना धान्यें मी जालों । मीच दळू कांडू लागलों । जातिं उखळीं साठविलों । पीठही जालों बारिक।।६९।। अग्नि पाक पाककर्ता । पात्रें काष्ठें तत्त्वतां । धमनी होउनी फुंकिता । मीचि होय ।।७०।। मधुर तीक्ष्ण क्षार । रसरूप जालों सविस्तर। ताट वाट्या समग्र । होऊन मी भरल्या।।७१।। खाली पृथ्वीवरी आडणी । केली ताटाची मांडणी । मीच मक्षिकाच्या श्रेणी । विंझण वारी मीच तेथें।।७२।।मीच ग्रास होईन । मीच करीं उचलीन । गुरुमुखींहि शिरून । म्यां मुख पसरिलें।।७३।।मीच गुरूचे दशन । जिव्हा मीचि होईन । चावणें आणि रस घेणें। मजचि असे।।७४।।मी कुतर्काचा खडा । मजचि कळे उघडा । मीच काढी रोकडा । एकीकडा मी टाकी।।७५।।मीच झारी मीच जीवन । मीच करितसें पान । मीच तृष्णा तृषाहरण । मजचि होय।।७६।।मजची मी खाऊन । तृप्त जालों परिपूर्ण । मीच ढेंकर देऊन । निज संतोष पावलों।।७७।।मीचि तांबूल मीचि सुरंग । मीचि सुगंध मीचि रंग। गुरुमुखीं शिरतां अभंग । अविट होईन।।७८।।मी पीकपात्र मी उगाळ।मीच सेवीन अळुमाळ। मीचि सुगंध शीतळ। विंझणा होऊन घालीन।।७९।।**

---

स्वत: गळ्यात घालीन असा त्याचा ध्यास असतो.(६७)मीच सुगंध होईन,मीच गुरूंच्या नासिकारंध्रात (नाकात)प्रवेश करीन आणि गुरुदेवतेचे रूपही मीच होऊन तो गंधही मीच घेईन,असे तो मानतो.(६८)मीच निरनिराळ्या धान्यांची रूपे घेईन.त्यांचे दळण कांडण मीच करीन,जात्यामध्ये,उखळामध्ये साठवलेले बारीक पीठही मीच होईन असे त्याला वाटत असते.(६९)अग्नी,स्वयंपाक,स्वयंपाकी,निरनिराळी भांडी,लाकडे सर्व मीच होईन.मीच फुंकणी होईन आणि फुंकणाराही मीच होईन,असे त्याला वाटते.(७०)जेवणातले मधुर,तिखट,खारट इत्यादी रस आपणच झालो असून ताट,वाट्या इत्यादी मीच होऊन त्या मीच भरल्या अशी तो कल्पना करतो.(७१)जमिनीवर ताट ठेवण्याची आडणी मीच झालो असून त्यावर ताट मीच मांडले आणि मीच विंझणवारा होऊन माशांच्या झुंडी वारीन अशी तो कल्पना करतो.(७२)मीच घास होईन,मी हाताने उचलीन,मीच गुरुमुखात शिरून पुन्हा पुढील घासासाठी मुख पसरीन.(७३)मीच गुरूचे दात होईन,जिव्हा मीच होईन,त्यामुळे घास चावणे,त्याचा रसास्वाद घेणे हे माझेच काम आहे.(७४)मीच घासात असलेला कुतर्काचा खडा असेन,तो खडाही मलाच कळेल,मी तो स्पष्टपणे काढीन,मीच तो बाजूला टाकीन.(७५)मीच झारी होईन,मीच पाणी होईन आणि ते पाणी पिणाराही मीच होईन,मीच तृष्णा असेन आणि तृष्णा हरण करणाराही मीच असेन.(७६)मीच मला खाऊन टाकले,मीच पूर्णपणे तृप्ती प्राप्त केली आणि मीच ढेकर दिला आणि संतोषही मलाच झाला.(७७)मी विडा असून त्यामुळे आलेला चांगला रंगही मीच झालो.मीच गुरुमुखात शिरल्यावर अखंडित,अवीट होईन.(७८)मीच पिकदाणी होईन,त्यात टाकलेला पीक ही मीच होईन.मीच तो हळूहळू सेवन करीन.(पिकदाणी तो पीक

**मी चंदन मी उगाळीं । मीचि समतेच्या कचोळीं । मीचि उटी करकमळीं । सद्‌गुरू अंगी शोभत ।।८०।। मृगमदाचा तिलक । मीच करीन अलोलिक । मुगुट वनमाळा अनेक । मीच अळंकार।।८१।।मी हा सप्तधातू कठिण । मीचि अग्नींत आटेन । मग मी सुशोभित होईन । अळंकार सर्व।।८२।।करीं मुद्या पवित्रें। चरणीं वाक्या नेपुरें। मंद मंद मी गजरें। सुखशब्द करीन।।८३।।जेणें संतोष गुरूचा । नाना कळा तर्काचा । वेद होऊन वेदचर्चा। मीच वाचा शब्द मी ।।८४।। सद्‌गुरूमनीं जें आवडे । तें मी होईन रोकडें । सद्‌गुरुदृष्टि जेथें पडे । दृश्य उघडें मी सर्व ।।८५।।मी हा आरसा अति सुंदर। मीचि होईन गुरुसमोर। गुरुराज बिंबले साचार। माझाच ठाई ।।८६।। मी पंचप्राणाची वाति । लावीन ब्रह्माग्निज्योतीं। मी मी जळेन पुढतीं। मी आरती ओवाळीं ।।८७।। मीच प्रकाशरूप जालों । मीच तम अज्ञान गेलों । मी सद्‌गुरू ओळखून धालों । आनंदलों मी।।८८।। मीचि होऊन सुखसाधन। मीचि गाद्या लोड संपूर्ण । गुरुराज करिती आरोहण । मजवरी प्रीति ।।८९।। मी जाळिया गोंडे चांदवे । त्या मध्यभागीं जो मिरवे। गुरुराज धरिती स्वभावें । थोरला गोंडा मीचि।।९०।।**

---

धारण करील हा अर्थ)मीच पंखा होऊन सद्‌गुरूंना सुगंधित आणि शीतल वारा घालीन.(७९)मीच चंदन होईन.मीच ते उगाळीन.मीच ते गंध समतेच्या(समदृष्टीच्या)कचोळ्यात साठवीन. मीच माझ्या हातांनी त्याची उटी सद्‌गुरूंच्या अंगी लावीन. मीच सद्‌गुरूंच्या अंगी शोभेन.(८०)मीच कस्तुरीचा अपूर्व टिळा सद्‌गुरूंना लावीन.मीच मुगुट होईन, मीच अनेक वनमाळा होईन आणि गुरूंच्या अंगावरील अलंकारही मीच होईन.(८१)मीच कठीण असे सप्तधातू होईन, मीच स्वत: अग्नीत आटेन, मग मीच सर्व सुशोभित अलंकार होईन.(८२)हातामध्ये अंगठ्या,पवित्रके,पायात वाक्या,नूपुरे इत्यादी मीच होईन आमि मीच मंद मंद मधुर नाद करीन.(८३)सद्‌गुरूंना समाधान वाटेल असे विविध प्रकारचे युक्तिवाद मी करीन,वेद होऊन वेदचर्चाही मी करीन,मीच वाणी होईन,मीच शब्द होईन.(८४)सद्‌गुरूंना जाण्यासाठी जे ठिकाण आवडेल ते ठिकाण प्रत्यक्षात मीच होईन,सद्‌गुरूंची दृष्टी जेथे पडेल असे सर्व दृश्य मीच होईन.(८५)मीच सुंदर आरसा होऊन गुरूंच्या समोर येईन,त्यावेळी गुरुराजांचे प्रतिबिंब माझ्यातच उमटेल.(८६)मी पंचप्राणांची वात करून ब्रह्मरूप अग्नीच्या ज्योतीवर ती वात लावीन.त्या वातीच्या रूपाने मी सद्‌गुरूंच्या पुढे जळेन,मीच त्या वातीच्या रूपाने सद्‌गुरूंना आरती ओवाळीन.(८७)मीच प्रकाशरूप झालो.मीच अज्ञानरूपी अंधकार होतो.प्रकाश येताच तो मी नाहीसा झालो.सद्‌गुरूंची ओळख पटताच मी संतुष्ट झालो.मीच आनंदित झालो.(८८)मीच सुखसाधने होईन,मीच गाद्या,लोड होईन.मग गुरुराज माझ्यावर आरोहण करतील.माझ्यावर त्यांची प्रीती होईल.(त्यांना मी आवडेन.)(८९)मीच बिछान्यावर लोंबणाऱ्या जाळ्या,गोंडे,चांदवे होईन. त्या गोंड्यांच्या मध्यभागी शोभून दिसणारा गोंडा मीच असेन. मग गुरुराज स्वाभाविकपणेच त्याला हातात धरतील, तो थोरला गोंडा मीच होईन.(९०)

**गुरुचरणींच्या पादुका । मीच माझिया मस्तका । छत्र चामरें वाद्य डंका । सर्व सकटका मी होईन।।९१।।मीच भोई होऊन । मीच पालखी घेईन । मीचि मार्गासी चालेन । आडवाट सांडूनी।।९२।।श्रुतीचिया राजमार्गे। नाना मतांचे काटवण लागे। मी स्वानुभवकुठारीं निजांगें। संशयमूळ छेदीन।।९३।।मोक्षापर्यंत जागृतिपासून। सडका केल्या समान। चतुरंग सेनेचा दणाण। चालतां दाटी नव्हे।।९४।।कामक्रोधादि तस्कर। पळून गेले हे समग्र। प्रति घाटि संग्रामशूर । महावीर मीच जालों।।९५।।गुरुमुख निहाळून । मीच उलटा चालेन। फडकें प्रेमाचें निशाण । नाना वाद्यें वाजवी।।९६।।पदार्थमात्र मीच जालों। सद्गुरुसेवेसी लागलों। आणि सन्निध राहिलों । गुरुपदीं अनन्य।।९७।।गुरु तरी निर्विकार। होतो माझाचि जोजार। आतां पातलों महाद्वार। अवघा केर राहूंद्या।।९८।।पुढे मीपणावाचून। गुरुराज चैतन्यघन।मी मी हे तेथें मरोन। गुरुचरणीं दडालों ।।९९।। एवं ऐसी हे गुरुभक्ति। जया घडे साधकाप्रती। तयासी कायसी पा मुक्ति । आहे ऐसी म्हणों ।।१००।।ऐसा जो कां गुरुभक्त। स्वर्गीचें देव तटस्थ। कैलासवासी वर्णित । प्रेमभरित सर्वदा ।।१।। आणि वैकुंठीचा राणा। पुसे नारदादी मुनिजना । ऐसा सद्गुरू भक्त पहाना । कोणी असे।।२।।**

---

गुरूंच्या पायातील पादुका मीच होईन.त्या मीच मस्तकावर धारण करीन.गुरूंच्या मस्तकावरील छत्र, चवऱ्या,वाद्ये,नगारा सर्व लवाजमा मीच होईन.(९१)मीच भोई होईन.मीच पालखी घेईन.मी आडवाट सोडून रस्त्याने चालेन.(९२)श्रुतीच्या(वेदाच्या)राजरस्त्यावर भिन्न भिन्न मतांच्या काटेरी जाळ्या लागतात.मी स्वानुभवरूपी कुऱ्हाडीने संशयरूपी मुळे तोडून टाकीन.(९३)जागृतीपासून मोक्षापर्यंत श्रुतींनी सरळ चांगल्या सडका तयार केल्या आहेत.त्यावरून चतुरंग सेना वाजत गाजत गेली तरी चालताना गर्दी होत नाही.(९४)कामक्रोध इत्यादी वाटमाऱ्ये,चोर सगळे पळून गेले आहेत.डोंगरातील प्रत्येक घाटामध्ये युद्धातील झुंजार महावीर मीच होतो.(९५)गुरू चालत असताना त्यांच्या मुखाकडे पाहात मी उलटा चालेन,माझ्या गुरुप्रेमाचे निशाण असे फडकत असताना मीच निरनिराळी वाद्ये वाजवीन.(९६)मीच सगळे पदार्थ झालो,सद्गुरूच्या सेवेस लागलो आहेआणि गुरुचरणांवर अनन्य होऊन त्यांच्या सांनिध्यात राहिलो आहे.(९७)गुरू तर निर्विकार आहेत.सगळा माझा एकट्याचाच पसारा आहे.आता महाद्वारात पोचलो आहे.आता सर्व कचरा(फालतू गोष्टी)राहू द्यात.(९८)माझ्यासमोर चैतन्याने ओतप्रोत असे सद्गुरुराज आहेत.मी देखील मी,माझे या भावना नष्ट करून त्यांच्या चरणांवर दडी मारली आहे.(९९)अशा प्रकारची ही गुरुभक्ती ज्या साधकाला घडते त्याला मुक्ती अशा प्रकारची आहे असे मी सांगत बसू काय?(त्याला मुक्तीचे स्वरूप सांगण्याची गरज नाही.)(१००)असा गुरुभक्त जो कोणी असेल त्याचे स्वत: कैलासनाथ शंकर मोठ्या प्रेमाने वर्णन करत असतात व स्वर्गातील देव तटस्थ होऊन ते ऐकत असतात.(१०१)आणि वैकुंठाधिपती विष्णू नारदादी मुनिजनांना विचारत असतात की,अशा प्रकारचा

**वेद जयाचें बंदिजन । तो हा ब्रह्म परिपूर्ण । येणें उद्धरिलें त्रिभुवन । कृपादृष्टी ।।३।। चतुर्भुजादि रूप आमुचें । इतुकें नावडे साचें । जैसे देह गुरुभक्ताचें । अत्यंत आवडे।।४।। धन्य धन्य गुरुभक्ति । धन्य धन्य साधक मूर्ती । धन्य धन्य जी का प्रसवती । ऐसीया पुत्रा।।५।। धन्य धन्य ते जन । गुरुपुत्रासी करिती भाषण । धन्य धन्य ते पावन । जे अळंगिती त्या ।।७।। धन्य धन्य जे वंदिती । धन्य धन्य जे स्तविती । ते ते पावन होती । श्रोते वक्ते ।।१०८।।**

**इति श्रीमदागमसारे उपनिषत्तात्पर्यानुसारे । आचार्योपासनप्रकारे । पंचमसमासः ।।५।।**
**इति पंचिका संपूर्णा ।।८।। ओवीसंख्या ३५३**

---

गुरुभक्त कोणी आहे का याचा शोध करा.(१०२) असा गुरुभक्त स्वत:च परिपूर्ण ब्रह्म असतो. वेद त्याचे भाट बनतात. त्याच्या साध्या कृपादृष्टीने सर्व त्रिभुवनाचा उद्धार होतो.(१०३) आम्हांला (विष्णूला) आमचे चतुर्भुज रूप तितकेसे आवडत नाही. त्यापेक्षा गुरुभक्ताचा देह आम्हांला अधिक प्रिय वाटतो.(१०४) त्याची गुरुभक्ती धन्य होय. त्याचे साधक रूप धन्य होय. अशा पुत्राला जन्म देणारी माता धन्य होय.(१०५) तो ज्या पृथ्वीवर आहे ती पृथ्वी धन्य होय. तो ज्या वसाहतीत राहतो ती वसाहत धन्य होय. अशा गुरुभक्ताला जे डोळ्यांनी पाहतात ते धन्य होत.(१०६) गुरुभक्तासी जे भाषण करतात ते लोक धन्य होत. त्याला जे आलिंगन देतात ते लोक धन्य होत.(१०७) जे त्याला नमस्कार करतात, ते धन्य होत, त्याची जे स्तुती करतात, ते धन्य होत; त्याच्याबद्दल ऐकणारे, त्याच्याबद्दल बोलणारे श्रोते, वक्ते पवित्र होत.(१०८)



# पंचिका ९वी - अद्वैतसिद्धिविवेचन

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - निर्भयत्वसाम्राज्य

**मोहार्णव हा सागर।साधन सेतु केला थोर।शमदमादि वानर।गेला रघुवीर पैलतीरा।।१।। कामक्रोधादि असुर।निर्दाळुनिया समग्र।शांतिसीता हे सुंदर।आत्मारामा प्राप्त जाली।।२।। स्वानुभवविमानीं बैसले।भावार्थभरतासि भेटले।निःसंदेह राज्य केलें।अयोध्येचें।।३।।तैसें साधनचतुष्टय।चतुरंगसेना समुदाय।अज्ञानशत्रूचा पराजय।करुनि विजय पावला।।४।।स्वात्मबोध लाभ जाला।साम्राज्यपदासी पावला।सुमुहूर्तीं अभिषेक केला।संतमुनिजनीं।।५।।विवेकादि महाशूर।विजय पावोनि समग्र।आवेश टाकोनियां थोर।ब्रह्मानंदी शोभलें।।६।।मग स्वानुभवाचें भांडार।उचित दिधलें अपार।जैसा जयाचा अधिकार।आतृप्ति निजधन।।७।।शिष्यवर्ग याचक आले।तया साधनधन वाटिले।कोणी ज्ञानें तृप्त जाले।कोणी उपासना।।८।। कोणा विहित अनुष्ठान।जैसा अधिकार जया पूर्ण।तें तें तयासी देऊन तृप्त केलें।।९।। द्वितीयापासून[११] भय होतें।तरी द्वैताचि जाली प्रेतें।हे जनक पावलासी अभयातें।श्रुतिसिद्ध निर्भयता।।१०।।**

---

### पंचिका ९वी, समास १ला - निर्भयत्वसाम्राज्य

मोहार्णव(मोहरूपी सागर)हा मोठा सागर असून त्यावर साधनांचा मोठा सेतू बांधला.शमदमादी वानरांबरोबर रघुवीर पैलतीरावर पोचला.(१)त्यांनी काम,क्रोध इत्यादी सगळ्या राक्षसांचे निर्दालन केले,तेव्हा शांतिरूप सीता आत्मारूप रामाला प्राप्त झाली.(२)मग ती दोघे स्वानुभवरूपी विमानात बसली.नंतर भावार्थरूपी भरताला भेटली व नंतर त्यांनी संदेहरहित होऊन अयोध्येचे राज्य केले.(३)साधनचतुष्टय हीच चतुरंगसेना होय.तिच्या साहाय्याने अज्ञानरूपी शत्रूचा पराभव करून आत्माराम विजयी झाला.(४)त्यामुळे त्याला स्वात्मज्ञानरूपी लाभ झाला,त्याला साम्राज्यपदाची प्राप्ती झाली.मग चांगला मुहूर्त पाहून संत,मुनिजनांनी त्याला स्वानंदसाम्राज्यपदावर अभिषेक केला.(५)विवेक इत्यादी महाशूर असे सर्व योद्धे विजयी झाले. तेही अहंकाररहित होऊन ब्रह्मानंदपदावर शोभू लागले.(६)मग त्यांनी स्वानुभवाचे अपार भांडार योग्यता पाहून वाटून टाकले.जसा ज्याचा अधिकार होता तसे त्याला तृप्त होईपर्यंत त्यांनी निजधन वाटले.(७)त्यांचे शिष्यवर्ग आले,याचक आले त्यांना त्यांनी साधनरूप द्रव्य वाटले.कोणाला ज्ञान देऊन तृप्त केले,कोणाला उपासना सांगून तृप्त केले.(८)कोणाला शास्त्रविहित अनुष्ठान सांगितले.अशा रीतीने ज्याचा जसा अधिकार होता त्याप्रमाणे त्याला ते ते देऊन त्यांनी तृप्त केले.(९)द्वितीयापासून भय निर्माण होते, असे म्हणतात.पण येथे द्वैताची प्रेते झाली आहेत.जनक राजाला अशी निर्भयता प्राप्त झाली होती. त्याची

**एकपणीं समरसला । द्वैतेंवीण एकला । अहंकारू तरी घातला । निज बंदिखानीं ।।११।। आतां भय तरी कोणाचें । कोणासी होईल साचें । अद्वैतीं पाहतां द्वैताचें । नामचि नाहीं।।१२।। ऐसें ऐकोनि श्रोता । वक्त्यासी म्हणे तत्त्वतां । नसे द्वैताची वार्ता । हें बोलणें अप्रमाण ।।१३।। कामक्रोधादि गेले । विवेकादिकीं निवटिले । परी दिसती वेगळाले । ज्ञात्याचे ठाई ।।१४।। तरी हे निमाले कैसें । द्वैतही कैसें न दिसे । ज्ञाता निर्भय जालासे। कोणे परी ।।१५।। वक्ता म्हणे ऐका सादर । ज्ञातयासी ज्ञानोत्तर । द्वैत दिसे परी साचार। सत्यत्वें नाहीं ।।१६।। मृगजळ उभयांसी दिसतें । सारिखें परी जाणत्या कळतें। नेणतें बापुडें कष्टी होतें । सत्यत्वबुद्धीं मृग ।।१७।। नसतां अज्ञानें सत्य केलें । ज्ञानें जाणतां लया गेलें । मिथ्यात्वें जरी दिसलें । तरी काय भीति ।।१८।। तैसेचि कामक्रोधादिक। प्रेतरूप जाले सकळिक । तरी आतां याचा धाक । कासयाचा ।।१९।। जोंवरी अविद्या पाठीसी। तोंवरी सामर्थ्य होतें यासी। तेव्हांचि जर्जर केलें तयासी। विवेकादिकीं।।२०।।ज्ञानें घालूनियां घाला।अज्ञानशत्रु जिवें मारिला।अहंकारप्रधान धरिला।सहज निर्बळ कामादि।।२१।। मग विवेक वैराग्य उठावले। कामक्रोधादि वधिले। शिरें धडें छिन्न पडिले। रणभूमीसी।।२२।।**

---

निर्भयता श्रुतिसिद्ध (वेदांनी सांगितल्याप्रमाणे) होती.(१०)द्वैतरहित अशा ऐक्यामध्ये तो समरस झाला. अहंकारही त्याने स्वत:च्या बंदिखान्यात घातला होता.(११)आता भय कोणाचे राहिले? आणि कोणाला होईल? अद्वैताच्या अनुभवात द्वैताचे नावही शिल्लक राहात नाही.(१२)हे ऐकल्यानंतर श्रोता वक्त्याला म्हणतो,"द्वैताची गोष्टही ऐकू येत नाही हे बोलणे विश्वसनीय वाटत नाही.(१३) कामक्रोधादी गेले.विवेकादींनी त्यांचा नायनाट केला,हे खरे असले तरी ज्ञात्याच्या ठिकाणी ते वेगळेपणाने दिसतातच की?(१४)मग त्यांचा नायनाट झाला असे कसे म्हणावे?द्वैतही दिसत नाही म्हणता ते कसे? मग ज्ञाता निर्भय झाला असे आपण म्हणता ते कोणत्या प्रकाराने?"(१५)यावर वक्ता म्हणतो,"आता लक्ष देऊन ऐका. ज्ञात्याच्या ठिकाणी ज्ञानानंतरही द्वैत दिसते.पण ते सत्यत्वाने दिसत नाही.(१६)जाणता आणि नेणता या दोघांनाही मृगजळ सारखेच दिसते.पण ते खोटे आहे,हे जाणत्याला कळते.पण नेणते हरिण मात्र ते सत्य आहे असे मानून कष्टी होते.(१७)मृगजळ नसताना देखील अज्ञानाने ते सत्य मानले. पण ज्ञानाने त्याचे खरे स्वरूप जाणल्यामुळे ते लयास गेले. तेव्हा मिथ्यात्वाने ते दिसले तरी भीती कशाची?(१८) त्याप्रमाणे कामक्रोध इत्यादी सगळे प्रेतरूप झाले असताना आता कशाचा धाक मनात धरायचा?(१९) जोपर्यंत त्यांच्या पाठीशी अज्ञान होते. तोपर्यंत त्यांना सामर्थ्य होते. पण विवेक इत्यादीनी त्यांना लगेच जर्जर केले.(२०)ज्ञानाने जोरदार हल्ला करून अज्ञानरूप शत्रूला जिवानिशी मारले. अहंकाररूप प्रधानाला पकडून बंदिस्त केले.त्यामुळे काम इत्यादी सहजच निर्बळ झाले.(२१)मग विवेक, वैराग्य यांनी बळ धरले आणि त्यांनी काम,क्रोध यांचा वध केला.त्यांची शिरे आणि धडे रणभूमीवर पडली.(२२)

**ही साम्राज्यसंपदा । भाट गाताती सदा । जयजयकारें आनंदा । प्रेतें पाहुनी करिती।।२३।।प्रेतादि जेव्हां दिसती। म्हणसी निर्भयता नसे चित्तीं । तरि हे जिवंत जैं होतीं । समोर न राहती कोणीही ।।२४।।आतां तरी प्रेतें जालीं । कैसीं लढतील मेलीं । म्हणून निर्भयता पावलीं। ब्रह्मानंदीं ।।२५।। जैसी जिवंत उंदिरें । न होती मांजरासमोरे । मेल्या मारिती मांजरें । काशावरूनी ।।२६।। पाशुपतास्त्रें वांचला । तो जलफेसें मृत्यु पावला । प्रमाण मानिजे या बोला । बाळपणींच।।२७।। असे निर्भयत्व परिपूर्ण । चक्रवर्ती साम्राज्य पाऊन । निर्वैर भोगी स्वानंदघन । अविट आणि अचळ।।२८।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । निर्भयत्वसाम्राज्यद्वारे । प्रथमसमासः ।।१।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास २रा - ग्रंथिभेद

**परावर आत्मा परिपूर्ण । तेथें बुद्धीचें पडिलें ठाण । तेंसमई ग्रंथीचे भेदन । आणि निवर्तन संशया ।।१।। अशेष कर्माची क्षीणता । हा श्रुति–उद्‌घोष तत्त्वतां । आणि अनुभूतीही पाहतां । ऐसीच असे।।२।। चित् म्हणिजे चैतन्य । अचित् हें जड संपूर्ण । अहि नसता**

---

हे साम्राज्यवैभव भाट सतत गात आले आहेत.त्या कामक्रोधांची प्रेते पाहून ते आनंदाने जयजयकार करतात.(२३)तू म्हणशील की,प्रेतादी जेव्हा प्रत्यक्ष दिसतात तेव्हा सत् आणि चित् ही लक्षणे घेऊन व्यर्थ असूनसुद्धा उगाचच मीपणा घेऊन स्फुरण पावत असतात.मनात निर्भयता नसते.अरे,मग ते जिवंत असताना त्यावेळी त्यांच्या समोर उभे रहायलाही कोणी तयार नव्हते ना!(२४)आता ते तर प्रेते झाले आहेत.ते मेल्यानंतर कसे लढतील या विचाराने तरी निर्भयता झाली असे म्हणता येईल की नाही?ही निर्भयता ब्रह्मानंदामध्ये असते.(२५) मांजरे जिवंत असताना उंदीर मांजरांसमोर यायला घाबरत होते.आता मांजरांना मारून टाकल्यानंतर ते मांजरे कसे मारू शकतील?(२६)पाशुपतास्त्रासमोर जो जिवंत राहिला,तो पाण्याच्या फेसाने मरण पावला.ही (वृत्रासुराची गोष्ट) लहानपणातच खरी वाटत होती.मोठेपणी ती खरी मानली जात नाही.(२७)अशा प्रकारे परिपूर्ण निर्भयत्व प्राप्त करून निर्वैर,अवीट आणि अचल असे चक्रवर्ती साम्राज्य आत्माराम भोगत राहतो.(२८)

## पंचिका ९वी, समास २रा - ग्रंथिभेदप्रकार

आत्मा सर्वश्रेष्ठ आहे, सर्वव्यापी आहे. परिपूर्ण आहे. त्यात बुद्धीचा मुक्काम पडल्यानंतर जो ग्रंथी निर्माण होतो त्या ग्रंथीचे भेदन झाले पाहिजे आणि आपल्या संशयाची निवृत्ती झाली पाहिजे. (१) त्याद्वारे संपूर्ण कर्माची निवृत्ती झाली पाहिजे. असा श्रुतीचा उद्‌घोष (गर्जना) आहे आणि अनुभूती पाहिली तरी अशीच आहे.(२) चित् म्हणजे चैतन्य, अचित् म्हणजे संपूर्णपणे जड. आत्म्याखेरीज

**रज्जुत्व जाण । सर्पाकार जालें ।।३।। तेवि अहंकारासमवेत । देहादि जे असत् । उगेंच मीपणें स्फुरत । सच्चिद् घेउनी ।।४।। असज्जड दुःखात्मक । आत्मत्वीं आरोपी अविवेक। अस्तिभातिप्रियात्मक । देहादिकां आलें ।।५।। अन्योन्याध्यास ऐसा । अज्ञानकार्याचा ठसा । उमटला तो अपैसा । ज्ञानें नष्ट जाला ।।६।। रज्जु यथार्थ कळतां । मिथ्या सर्पाची वार्ता । तैसें सत्यत्व यथार्थ जाणतां । अहंममता विराली ।।७।। सच्चिदानंद आत्मा आपण । असज्जड दुःख संपूर्ण । यासी निवडिलें भिन्न भिन्न । विवेकदृष्टीं ।।८।। पुन्हा तयासी एकत्र। होऊंचि नेदी अणुमात्र। होत असतां व्यापार । तक्र लोणी न मिळें जैसे।।९।।हाच जाणिजे ग्रंथिभेद। निवडिले चित् आणि अचित्। जन्ममृत्यूचा खेद। तुटला एकसरां।।१०।। श्रोता म्हणे ज्ञान रज्जूचें । होतां सर्पदृष्टि न वचे । ज्ञान होतां आत्मयाचें।देहादिक दिसती।।११।। वक्ता म्हणे उपाधिक भ्रम । स्फटिक आणि जपाकुसुम । एक स्थळीं असतां परम । रक्त स्फटिक दिसे ।।१२।। वेगळेपणें जाणितला । श्वेत स्फटिक जरी कळला । यावत्सांनिध्य**

---

बाकीचे हे सर्व जगत् जड असून सर्प नसताना दोरीलाच सर्पाकार प्राप्त होतो त्याप्रमाणे ते निर्माण झाले आहे.(३) अहंकारासह देह इत्यादी असत् (सत्ता म्हणजे अस्तित्व नसलेले) असून सत् आणि चित् ही लक्षणे घेऊन व्यर्थ असूनसुद्धा उगाचच मीपणा घेऊन स्फुरण पावत असतात.(४) सदसद्विवेक नसल्यामुळे अविचाराने आत्म्यावर असत्, जड आणि दुःखरूप असा आरोप केला जातो आणि त्याउलट देह इत्यादींना आत्म्याची लक्षणे चिकटवली जातात. म्हणजे त्यांना अस्ति (सत्ता), भाति (चिद्रूपता) आणि प्रियत्व (आनंदात्मकता) ही लक्षणे दिली जातात.(५) याला अन्योन्याध्यास असे म्हणतात. हा अन्योन्याध्यास म्हणजे अज्ञानकार्याचा ठसाच होय. तो ज्ञानाने आपोआपच नष्ट होतो.(६) दोरीचे यथार्थ रूप कळताच सर्पाची गोष्ट आपोआप खोटी ठरते. त्याप्रमाणे खरे सत्य कळल्याबरोबर मीपणा आणि माझेपणा या दोन्हींचा निरास होतो.(७) आपले सत्, चित् आणि आनंद स्वरूप आणि बाकीचे सर्व असत्, जड आणि दुःखात्मक विश्व असे दोन भिन्न प्रकार विवेकदृष्टीने वेगवेगळे लक्षात येतात.(८) आपले नित्याचे व्यवहार चालू असताना देखील या दोहोंना, ज्याप्रमाणे दह्याचे मंथन करून काढलेले लोणी आणि ताक पुन्हा एकत्र मिसळू शकत नाहीत त्याप्रमाणे ती विवेकदृष्टी सरमिसळ होऊ देत नाही. (एकदा ज्ञानदृष्टी प्राप्त झाली की सच्चिदानंद आणि असज्जडदुःख यांचा अन्योन्याध्यास होत नाही.)(९) हाच ग्रंथिभेद होय. एकदा की चित् आणि अचित् हे वेगळे आहेत असे कळले की जन्म आणि मृत्यू यांचे दुःख एकदम नाहीसे होते.(१०) यावर श्रोता विचारतो की, एकदा दोरीचे ज्ञान झाले की पुन्हा सर्प दृष्टीस पडत नाही हे बरोबर आहे, पण आत्म्याचे ज्ञान झाल्यानंतरही देह इत्यादी पदार्थ दिसतात त्याचे काय?(११) यावर वक्ता म्हणतो की हा उपाधिक भ्रम आहे. स्फटिक जास्वंदीच्या फुलावर ठेवला की तो लाल दिसतो.(१२) जोपर्यंत तेथे आहे तोपर्यंत तो तसा दिसणारच. तो स्फटिक

**कुसुमाला । तों काळ तांबडा दिसे ।।१३।। तैसा आत्मा जरी कळला । सच्चिदानंद प्रतीति आला । तरी देहादि दिसती त्याला । उपाधिक भ्रमें ।।१४।। जों काल प्रारब्ध देहाचें । तों काल दिसणें साचें । दिसतां पुन्हा ग्रंथीचें । ऐक्य नव्हे ।।१५।। म्हणसी व्यापार करितां । दिसताहे अहंममता । तरी चिद्रूप आणि अहंता। न मिळे कदा।।१६।। हर्ष विषाद सांडुनी । प्रारब्ध भोगी ज्ञानी । श्रीकृष्ण बोलिला वचनीं । गीतेमाजीं अर्जुना[११]।।१७।। प्राप्ताचा द्वेष न करी । गेलियाची इच्छा न धरी । भोगी उदासीनापरी। हाचि ग्रंथिभेद ।।१८।। म्हणसी जड होऊनी पडिला । त्या उदासीन कृष्ण बोलिला । तरी त्यासारिखा या शब्दाला । व्यर्थता आली ।।१९।। उदासीनापरी म्हणतां । जड नव्हे कीं ज्ञाता । प्रारब्ध भोग भोगितां । अलिप्तता असे।।२०।। श्रोता म्हणे भरतादिक । जडत्व पावले अनेक । जडत्व तेचि अवश्यक । ज्ञानी म्हणावे।।२१।।वक्ता म्हणे राज्य करितां। जनका नाम विदेहता । येविशीं श्रुतीहि संमता । नायकसी ते।।२२।।यानीं अथवा उपवनीं। स्त्रियासंघ अथवा जनीं । विनोदें क्रीडे अनुदिनी । परी क्रीडतों हें स्मरेना ।।२३।। ज्ञानी जाला काष्ठवत् । तैसेचि रोगीही निचेष्टित । ज्ञाता आणि रोगयुक्त । एक कैसे।।२४।।**

---

असून तो पांढरा आहे असे ज्ञान झाले तरी फुलाचे सांनिध्य असेपर्यंत तो लालच दिसणार.(१३)त्याप्रमाणे आपण आत्मा असून सच्चिदानंद स्वरूप आहोत,असा त्याला प्रत्यय आला तरी औपाधिक भ्रमामुळे त्याला देहादी पदार्थ दिसणारच.(१४) जोपर्यंत देहाचे प्रारब्ध असेल तोपर्यंत असे पदार्थ दिसतात हे खरे असले तरी एकदा ग्रंथिभेद झाला तो झालाच.त्यांच्यात पुन्हा ऐक्य केव्हाही होणार नाही.(१५)व्यापार करीत असताना अहंममता दिसते असे म्हणशील तर चिद्रूप आणि अहंता कधी एकत्र येत नाहीत,(हे ध्यानात घे.)(१६)श्रीकृष्णाने गीतेत अर्जुनाला सांगितले आहे की,हर्षविशाद यांचा त्याग करून ज्ञानी मनुष्य प्रारब्ध भोगत असतो.(१७)जो प्रसंग आला आहे,त्याचा द्वेष करू नकोस,गेलेल्याची इच्छा धरू नकोस.आल्या गोष्टी उदासीनासारखा राहून भोग.हाच ग्रंथिभेद होय.(१८) माणूस जड होऊन पडला,तर त्याला कृष्णाने जड असे म्हटलेले आहे.असे म्हणशील तर'त्यासारखा'या शब्दाला अर्थहीनता येईल.(१९) उदासीनासारखा असे म्हटल्याने ज्ञानी माणसाला जड व्हावे लागत नाही.प्रारब्ध भोग भोगताना तो अलिप्ततेने भोगतो एवढाच त्याचा अर्थ आहे.(२०) यावर श्रोता म्हणतो की, भरत इत्यादी अनेक लोक ज्ञानप्राप्तीनंतर जडत्व पावले होते.ज्ञानी माणसाला जडत्व आवश्यकच आहे,असे समजायचे काय?(२१)यावर वक्ता म्हणतो की,जनक राजा राज्य करत असतानादेखील विदेही अवस्थेत होता.याला वेदाचाही आधार आहे,हे तू ऐकत नाहीस काय?(२२) वाहनात,उपवनात,स्त्रियांसह अथवा इतर जनांसह रोज क्रीडा करत असतानाही आपण क्रीडा करतो आहोत हे त्यास स्मरण नव्हते.(२३)ज्ञानी लाकडासारखा निश्चेष्ट होऊन पडला,तसेच ज्ञानी आणि रोगी सारखेच म्हणता येतील काय?(२४)

**रोगी आणि जीवन्मुक्त । एक अज्ञानी मानित। हेंचि बोलणें अयुक्त । प्रमाणसिद्ध नव्हे।।२५।। भरतादि जे जाले । दुष्ट संगासि भ्याले । जनसमुदाय वर्जिले । सुखें राहिले निवांत।।२६।। तेहि काष्ठवत् न होती। खाती चालती नेत्रीं पाहती। मौन म्हणतां रहुगणाप्रति। उपदेश केला ।।२७।। म्हणोनि ज्ञाता जीवन्मुक्त । प्रारब्ध भोगून अलिप्त । तेथे जडत्वाचा संकेत । लाऊं नये ।।२८।। ब्रह्मानंदस्वानुभवें। नित्य तृप्त स्वभावें। प्रारब्ध देहादि अघवे। उपाधि तोंवरी ।।२९।। देह जातां आत्मा न जाय । देह खातां आत्मा न खाय । देह भोगितां नाना विषय । आत्मा भोगातीत ।।३०।। देह जन्मला कीं मेला । आत्मा परिपूर्ण संचला । क्रीडला अथवा पडिला । देहचि प्रारब्धें ।।३१।। ते देह जरी आपण । तरिच हटनिग्रह करणें । देहबुद्धीचें निसंतान । ज्ञानेंचि केलें ।।३२।। आतां देह आणि देहसंबंध। वर्तो पडो नसे खेद । आपुला आपण स्वानंदकंद । बोध सदृढ जाला ।।३३।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे ग्रंथिभेदप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

---

रोगी माणूसही निश्चेष्ट होऊन पडला. एवढ्यावरून रोगी आणि जीवन्मुक्त एकच आहेत असे फक्त अज्ञानी लोकच मानू शकतात. पण हे बोलणे अयोग्य आणि प्रमाणांना सोडून होत नाही काय?(२५) भरतादिक हे दुष्ट सहवासाला भ्याले आणि त्यांनी जनसमुदायाचा त्याग करून ते सुखाने निवांत राहिले.(२६) तेही काष्ठवत् पडले नव्हते. ते खात होते,चालत होते, डोळ्यांनी पाहत होते, मौन धारण केलेले असले, तरी भरताने राजा रहुगणाला उपदेश केलाच होता ना!(२७) म्हणून ज्ञाता हा खरा जीवन्मुक्त असतो. तो प्रारब्ध भोगत असूनही अलिप्त असतो. पण त्यामुळे त्याच्या बाबतीत जडत्वाचा संकेत लावू नये.(२८) ब्रह्मानंदाच्या स्वानुभवाने तो स्वभावत:च नित्यतृप्त असतो. देहादी प्रारब्ध फक्त उपाधी असेपर्यंतच असते.(२९) देह जात असला तरी आत्मा त्याबरोबर जात नाही, देह खात असला तरी आत्मा खात नाही. देहाने विविध विषय भोगले तरी आत्मा मात्र भोगातीत असतो.(३०) देहाला जन्म प्राप्त होवो अथवा मृत्यू, प्रारब्धामुळे देह क्रीडा करत राहिला अथवा पडून राहिला, आत्मा मात्र सर्वत्र परिपूर्णपणे भरून राहिला आहे.(३१) जर तो देह आपण असतो तर त्याच्याबाबतीत बळजबरी किंवा नियंत्रण करता आले असते. पण ज्ञानानेच देहबुद्धी समूळ नष्ट केली आहे.(३२) आता देह अथवा देहसंबंध असो अथवा पडो त्याच्याबद्दल खेद मानण्याचे कारण नाही. कारण आपण स्वानंदकंद आहोत हा बोध पक्का झाला आहे.(३३)

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - संशयच्छेदनप्रकार

**सांगीतला ग्रंथि भेद। संशयाचा कैसा छेद। तोचि कीजेतो विशद। येणें समासीं।।१।।संशयात्मा नाश पावे। म्हणुन संशय खंडावे। मळमळ करीत जेवावें। हें बरवें नव्हे।।२।।लौकिक रीतीचे दंडक।वर्तताती अनेक।इतुके पाहतां एक।निश्चय नव्हे।।३।।असो अज्ञानाची कृति। काज नसे निश्चिती। संशय जे ज्ञात्याप्रती। संक्षेपगती बोलूं ते।।४।।नानाशास्त्रांचा गलबला। तेथें मोक्षही बोलिला। तया साधनकचाटिला। साधकीं न पडावें।।५।।जेथें अज्ञान-निवृत्ति। स्वात्मलाभाची तृप्ति।हाचि मोक्ष आदिअंतीं।दुसरा नाहीं।।६।।मागां ज्ञाते जाले उदंड। कोणी उन्मत्त कोणी जड। एक करिती बडबड। एक चाहाड सर्वदा।।७।। एक कर्मचि आचरती। एक कर्मातें त्यागिती। एक राज्यादि करिती। एक फिरती नागवे।।८।। तरी आपण कैसें वर्तावें।भिन्न भिन्न दिसती अघवे।ऐशा संशया करूं धावे।क्षण क्षणा एक।।९।। वर्तणूक ही प्रारब्धाची।स्थिति नव्हे कीं ज्ञानाची।सर्वांचें प्रारब्ध एकचि।बोलोंचि नये।।१०।।जैसी कर्मगती गहन। तैसें देहा घडो वर्तन। ब्रह्मबुद्धि करी जतन।करणें न करणें सांडीं ।।११।।**

---

## पंचिका ९वी, समास ३रा - संशयच्छेदनप्रकार

ग्रंथिभेद म्हणजे काय ते सांगितले, आता संशयाचे निरसन कसे करायचे तो प्रकार या समासात सांगावयाचा आहे.(१) संशयात्मा (सतत संशयात राहणारा माणूस) नाश पावतो. म्हणून संशयाचे प्रथम खंडन करावे लागते. मळमळत असताना जेवण करणे बरे नव्हे.(२) लौकिक व्यवहारात अनेक दंडक घालून दिलेले असतात. ते सर्व पाहिले असता एकच एक निश्चय निष्पन्न होत नाही.(३) असो, हे संशय अज्ञानी माणसाने घेतले असतील तर त्यांच्याशी आपल्याला इथे काही कर्तव्य नाही.पण ज्ञात्याला जे संशय येतात त्यांच्यासाठी संक्षेपाने येथे निरूपण करू. (४) अनेक शास्त्रे आहेत.ती सर्वच शास्त्रे मोक्षाबद्दल स्वत:ची मते मांडतात. या कष्टमय साधनांच्या वाटेला साधकांनी जाऊ नये.(५) अज्ञानाची निवृत्तीं होऊन स्वात्मलाभाचे समाधान मिळणे हाच एकमेव मोक्ष आहे. यापेक्षा दुसरा कुठलाही मोक्ष नाही.(६) मागे जे अनेक ज्ञाते होऊन गेले त्यांमध्ये कोणी उन्मत्त होते, कोणी जड होते, कोणी बडबड करणारे,तर कोणी सर्वकाळ चुगल्या सांगणारे होते. (७) कोणी कर्माचे आचरण करत होते,तर कोणी कर्माचा त्याग करणारे होते,कोणी राज्यकर्ते होते तर कोणी तसेच उघडे फिरत होते.(८) हे सर्व पाहून आपण कसे वागावे असा संभ्रम निर्माण होतो. ते सगळे भिन्न भिन्नच दिसताहेत. तेव्हा आपण कसे वागावे असा संशय दरक्षणी मनात येतो.(९) यावर उत्तर असे की,ही सर्व प्रारब्धाची वर्तणूक आहे. ही ज्ञानाची स्थिती मानू नये. सर्वांचे प्रारब्ध एकसारखेच असले पाहिजे असे कधीच म्हणू नये. (१०) कर्मगती ज्या प्रमाणात गहन असेल त्याप्रमाणे देहाचे वर्तन घडत असते. ते तसे खुशाल घडो. आपण मात्र करणे न करणे याचा विचार सोडून देऊन ब्रह्मबुद्धीचे तेवढे जतन करावे.(११)

**तथापि कांहीं अवलंबिसी । प्रारब्ध भोगितां कष्टी होसी । तेणें जीवन्मुक्तिसुखासी । अंचविसी निर्धारी ।।१२।। सकळ धर्मामध्ये धर्म । स्वरूपीं राहणें हा स्वधर्म । या विरहित सर्व कर्म । तें निरर्थक ।।१३।। सामर्थ्यवंत तेचि ज्ञाते । आमुचें ज्ञानचि नुसतें। म्हणोनियां सामर्थ्यातें । इच्छी जो ज्ञाता ।।१४।। तरी हें सामर्थ्य[६३] तपाचें । बोलूं नये ज्ञानाचें। सामर्थ्य तरी देहाचें । येणें आत्म्यासी काय ।।१५।। लोकरीती सामर्थ्य आलें । जगीं मोठे मान्य जाले । परी आपुलें घर बुडविलें । देहबुद्धीनें ।।१६।। म्हणोनि देहबुद्धि सांडावी । माइकाची उठाठेवी । आत्मलाभेंचि तृप्ति व्हावी । सामर्थ्य कैचें ।।१७।। काम्य कर्म त्यागावें । विहित कर्म आचरावें । कोठें निःशेष त्यागावें । बोलिलें ऐसें।।१८।। आतां हे कर्म करूं कीं न करूं । ऐसा संशयाचा भरू । याचें कैसें उत्तरू । दिधलें पाहिजे।।१९।। करूं न करूं मनचि करितें । वृथा आरोपिसी आत्मयातें । देहयोगें होतें जातें । तुजला काय तेणें ।।२०।। कर्म देहानें केलें । तुज काय प्राप्त जालें । अथवा निःशेष सांडिलें । तुझी हानी कोणती ।।२१।। अथवा कर्मी प्रवर्ततां । देहादिपंचकसत्ता।**

---

तथापि, कर्तव्याकर्तव्याचा विचार मनात बाळगशील तर प्रारब्ध भोगत असताना तू दुःखी होशील आणि परिणामी जीवन्मुक्तिसुखाला अंचवशील (पारखा) होशील.(१२) सगळ्या धर्मामध्ये श्रेष्ठ धर्म म्हणजे स्वरूपामध्ये वास्तव्य करणे हा होय. याखेरीज जे काही कर्म करशील ते सर्व निरर्थक होय.(१३) ज्यांच्याजवळ सामर्थ्य आहे, त्यांनाच खरे ज्ञानी म्हणावे, आपल्याकडे फक्त ज्ञानच आहे, अशी उणीव वाटून जो ज्ञाता सामर्थ्याची इच्छा करतो,(१४) त्याने हे लक्षात ठेवावे की, असे सामर्थ्य तपश्चर्येचे सामर्थ्य असते, ते ज्ञानाचे सामर्थ्य मुळीच मानू नये. सामर्थ्य हे देहाचेच असते. आत्म्याला त्याचा काय उपयोग?(१५) लोकदृष्टीने सामर्थ्यही प्राप्त होईल, त्यामुळे जगात मान्यताही खूप मिळेल. परंतु त्याचा पारमार्थिक लाभ काय? उलट देहबुद्धीमुळे आपले घर सर्व बुडेल. अशी परिस्थिती होते. (देहबुद्धी धारण केल्याने हाती आलेले मोक्षसुख दूर जाईल.) (१६) म्हणून देहबुद्धीचा त्याग करावा. सामर्थ्याची अपेक्षा करणे म्हणजे सर्व मायिकाचा व्यवहार. त्याचाही त्याग करावा. आत्मलाभानेच खरे समाधान मिळते. सामर्थ्याने ते कसे मिळेल?(१७) काम्य कर्मांचा त्याग करावा. काहींच्या मते विहित कर्मांचे आचरण करावे. काहींनी कर्मांचा संपूर्णपणे त्याग करावा असे सांगितले आहे.(१८) तेव्हा कर्म करावे की न करावे? असा संशय निर्माण होतो. त्याचे उत्तर दिले पाहिजे. (१९) करावे की न करावे असा विचार मनच करत असते. आत्म्यावर त्या विचाराचा आरोप व्यर्थ करत आहेस. देहाच्या प्रारब्धाप्रमाणे कर्मे होत जातात. त्याचा तुझ्यावर (तुझ्या आत्म्यावर) काही परिणाम होतो काय?(२०) कर्म देहाने केले. त्यातून तुला काय मिळाले? अथवा कर्मे करण्याचे पूर्णपणे सोडून दिले, त्यामुळे तुझे काय नुकसान झाले?(२१) किंवा कर्मामध्ये प्रवृत्त झाला, तरी ते देहादि पंचकाच्या सत्तेनेच होय.

**आत्मयासी श्रम केउता । विचारीं मनीं ।।२२।। करूं न करूं जे धरिलें । इतुकेंचि पाहिजे सांडिले । बुद्धीनें सांडिलें अथवा केलें । तरी प्रायश्चित्त आणि बद्धता ।।२३।। देह विस्मरण जरी जालें । तरी अनायासें राहिलें । अथवा जें जें कर्म निपजलें । हें म्यां केलें नसावें ।।२४।। आतां हें घडो कीं न घडो । आत्मा तेथें न सांपडो । अहंकर्तव्यता झडो। सद्गुरुप्रसादें ।।२५।।ऐसे उदंड संशय । श्रवणमननें करावें क्षय । तरिच पाविजे निश्चय। समाधानाचा ।।२६।। सर्व ग्रंथींचे निरूपण । करिती संशयाचें खंडण । किंचित संशयाचें लक्षण । कळावया बोलिलें ।।२७।। आणीक अवधारा पुढती । थोर संशय दोन असती। तयासी जे ओळखिती । तेचि ज्ञाते ।।२८।। ब्रह्मात्मज्ञान पूर्ण जालें। अज्ञान निःशेष हरपलें। देहद्वय दिसूं लागलें । दग्धपटापरी ।।२९।। जैसें स्थूळाचें दिसणें । तैसेंचि लिंगाचें भासणें। सोपाधि भ्रमाच्या गुणें । भ्रमाभावीं राहती ।।३०।।मनादि अंतःकरण । तें न राहेचि स्फुरण । ज्ञाता धरी अनुमान । म्हणे मज हे बाधिती ।।३१।। नाना प्रकारें कष्टी होतां । शीणचि होय तत्वतां । आपुलें पूर्णत्व न जाणतां । अज्ञानचि आलें ।।३२।।**

---

(अंतःकरण पंचक,पंचप्राण,पंचज्ञानेंद्रिये,पंच कर्मेन्द्रिये) यांमध्ये आत्म्याला किती प्रमाणात श्रम पडले याचा विचार तूच कर.(२२) तेव्हा तू 'कर्म करू की नको' हे जे मनात धरलेस ते मात्र सोडून दे. बुद्धिपूर्वर जर ते स्वीकारले असशील अथवा त्यांचा त्याग केला असशील तर प्रायश्चित्त आणि बद्धता ही मागे लागलीच म्हणून समज.(२३) देहाचे विस्मरणच जर झाले तर आपोआपच ती कर्मे थांबतील. अथवा जे कर्म हातून घडेल ते 'मी केले' असे मनात येऊ देऊ नकोस.(२४) कर्म होवो अथवा न होवो, आत्मा मात्र तेथे सापडता कामा नये आणि सद्गुरूंच्या कृपाप्रसादाने 'अहं कर्तव्यता' (हे मी केले,हे मला करायचे आहे'अशी भावना) मात्र गळून पडावी.(२५) अशा तऱ्हेच्या अनेक संशयांचा श्रवणमनाने क्षय झाला तरच समाधानाचा निश्चय होईल.(२६) सर्वच ग्रंथांतील निरूपण आपल्या मनातील संशयांचे खंडन करण्यासाठीच असते. पण संशय कशाप्रकारचे असतात,हे थोडेसे कळावे म्हणून हे थोडेफार स्पष्ट केले आहे.(२७) आणखी थोडे लक्ष देऊन ऐका. याखेरीज दोन मोठे संशय असतात. त्यांना जे ओळखतात तेच ज्ञाते होत.(२८) ब्रह्मात्मज्ञान पूर्ण झालेले आहे, अज्ञान संपूर्णपणे नाहीसे झालेले आहे आणि स्थूल आणि सूक्ष्म देह हे जळालेल्या पटाप्रमाणे दिसू लागले आहेत.(२९) स्थूल देहाचे दिसणे आणि सूक्ष्म देहाचे भासणे ही दोन्हीही सोपाधिक भ्रमाच्या प्रभावामुळे होतात. ती दोन्ही भ्रम नसतानाही राहतात.(३०) मन,अंतःकरण इत्यादींचे स्फुरण थांबतच नाही. तेव्हा ज्ञाता हे आपल्याला बाधक ठरतील असे अनुमान करत असतो.(३१) या शंकेने ते स्फुरण उठू नये म्हणून तो खूप धडपड करतो.खूप प्रकारचे प्रयत्न करतो.पण त्यात तो यशस्वी होत नाहीच,उलट त्याला श्रम मात्र होतात.याचा अर्थ असा की,स्वतःचे पूर्णत्व त्याला कळलेच नाही.हे एक तऱ्हेचे अज्ञानच होय.(३२)

**जळें तरंग काय सांडिले । कीं आकाशें मेघ दवडिले । तैसें आत्मस्वरूपीं भासलें । अज्ञान तोंवरी बाधक ।।३३।। तेचि आपण असावें । तरी जन्ममृत्यू सोसावे । परिपूर्ण असतां स्वभावें। भय काय त्याचें ।।३४।। दग्ध पटाचें दिसणें । तैसें स्थूलाचें असणें । भर्जित बीजाचे राहणें । लिंगदेह तैसा ।।३५।।भर्जितबीजें क्षुधाहरण । परी पेरितां ते निष्कारण। लिंगदेहाचें जें चळण । प्रारब्ध भोगार्थ।।३६।।परी जन्मा नव्हे हेतु। हें निश्चये जाण पा तूं । आत्मा परिपूर्ण अनंतु । तरी संशय कासया।।३७।।दुसरा अंतकाळीं आठवे । तें तें होणें असे बरवें। अंतकाळी स्मरण असावें। म्हणोनी तळमळी।।३८।।अंतकाळ तो कोणता। अज्ञान निरसे ज्ञान होतां। चिदचिद्ग्रंथि तत्वतां। तुटे तोचि मोक्ष।।३९।।मरणा ऐलीकडे मेला। मृत्यु यावा कोणाला।मरणाभावीं स्मरणाला। काय काज।।४०।।त्याचा प्रकार पुढें असे। येथें बोलिलें कांहींसें। कारण संशय कांहीं न सोसे। परब्रह्मीं ।।४१।। संशय तितुका घातक। बळेंचि धरी वेगळिक। म्हणून संशय-छेदक। विचार असावा ।।४२।। आतां श्रुति युक्ति अनुभव । जाणावें हें सर्व । संशयाचा ठाव । पुसून टाकी ।।४३।।**

---

पाणी कधी लाटांचा त्याग करते काय?आकाश मेघांचा त्याग करते काय?त्याप्रमाणे आत्मस्वरूपाच्या ठिकाणी देहादिक भासणारच व अज्ञान असेतोपर्यंत ते बाधणारच.(३३)आपण जर तेच म्हणजे अज्ञानी असू तर जन्म-मृत्यू सोसावेच लागणार.जर आपण स्वभावत:च परिपूर्ण आत्मस्वरूप असू तर जन्म,मरण यांची भीती कशासाठी?(३४)स्थूल शरीर दिसते म्हणजे काय?दग्ध पट दिसत नाही कातसेच ते असते आणि लिंगदेह म्हणजे भाजलेले बी.(३५)भाजलेल्या बियांमुळे एकवेळची भूक भागेल. पण पेरणीसाठी ते निरुपयोगी असते.ते पेरल्यास वाया जाते.त्याप्रमाणे लिंगदेहाच्या ज्या हालचाली होतात ते प्रारब्ध भोगण्यासाठीच होय.(३६)परंतु लिंगदेहाच्या हालचालींचा पुनर्जन्मासाठी काही उपयोग नाही,हे तू निश्चयपूर्वक समजून घे.आत्मा परिपूर्ण,अनंत असताना असा संशय तरी कशासाठी?(३७)दुसरा संशय अंतकाळी आठवतो.अंतकाळी ज्याचे स्मरण आपण करतो,त्याप्रमाणे आपल्याला व्हावे लागते.अशा समजुतीने आपल्याला अंतकाळी स्मरण असावे म्हणून काहीजण तळमळ करत असतात.(३८) पण अंतकाळ कशाला म्हणावे? ज्ञान होताच अज्ञानाचा निरास होतो. चित् आणि अचित् यांचा ग्रंथी तुटला की तोच मोक्ष होय.(३९)जो मरणाच्या अलीकडेच मृत्यू पावला त्याला आणखी मृत्यू कोणता येणार? आणि जर मरणच नसेल तर स्मरणाची तरी आवश्यकता काय?(४०)हा विचार पुढे येणार आहेच,येथे थोडेफार त्याबद्दल सांगितले आहे.कारण परब्रह्माच्या बाबतीत थोडा देखील संशय कामाचा नाही.(४१)संशय हा नेहमी घातकच असतो.तो बळजबरीने वेगळेपणा निर्माण करतो. म्हणून विचार नेहमी संशयाचे खंडन करणारा असावा.(४२)आता श्रुती,युक्तिवाद,अनुभव हे सर्व संशयाचे निरसन करतात.म्हणून त्यांचे ज्ञान करून घ्यावे(किंवा हे सर्व जाणून घ्यावे आणि आपल्या संशयाचे निरसन करून घ्यावे.)(४३)

**करणें न करणें अन्यथा करणें। इतुकें देहाचेनि गुणें। श्रवणमननादि साधनें । देहास्तव।।४४।। पाप पुण्य सुख दुःख। ज्ञान ध्यान अशेख। निश्चय समाधिहि देख। देहसंबंध ।।४५।।आत्मत्वीं हें काहीं नसे। बोलिजे त्याहून अनारिसें। तेंचि आपण ज्ञान ऐसें। तरी संशय कोणा।।४६।। आत्मा आत्मत्वीं उरला। तत्क्षणीं संशय हरपला। येणें रीती प्रसंग जाला। संशयछेद।।४७।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । संशयछेदनप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - कर्मक्षयानुकार

**आतां श्रुतीचा संकेत । कीं सर्व कर्मांचा घात । बहुवचनें प्रारब्धसमवेत । सर्वहि गेलें।।१।।संचित जें पूर्वार्जित । तेंचि प्रारब्ध भोगा येत । प्रस्तुत जें होय संपादित । तेंचि क्रियमाण।।२।।स्वात्मानुभवअज्ञान । तेणेंचि संभवे कर्तेपण । व्यर्थचि सोसी जन्ममरण। चक्रभ्रमणापरी।।३।।संचितेंचि देह जाला । प्रारब्धें सुखदुःख पावला । क्रियमाण येथें करूं लागला । पुढील जन्मा आधारु।।४।।इतुक्याचें बीज अज्ञान । तेंचि ज्ञानें होय दहन। जन्ममरणातीत आपण । ज्ञान तें हेंचि।।५।।तरी आतां कोण कर्ता । अहंपणाची मिथ्या**

---

करणे,न करणे,विपरीत करणे हे सर्व देहामुळेच घडते.श्रवण,मननादी साधनेदेखील देहामुळेच शक्य होतात.(४४) त्याप्रमाणेच पाप,पुण्य,सुख,दु:ख,ज्ञान,समाधी,ध्यान हे सर्व देहसंबंधानेच निर्माण होतात.(४५) यातील काहीही आत्म्याच्या ठिकाणी नाही. आपण जे त्यासंबंधी बोलू. त्यापेक्षा ते वेगळेच आहे.तेच ज्ञान आपण स्वत:च झालो तर संशय कोणाला येणार?(४६)आत्मा आत्मत्वात राहिल्याने सर्व संशय त्याक्षणी नष्ट झाला.अशा रीतीने संशयच्छेद ह्या विषयाचे विवेचन प्रसंगानुसार पूर्ण झाले.(४७)

### पंचिका ९वी, समास ४था - कर्मक्षयानुकार

आता श्रुतीचा संकेत असा आहे की,सर्व कर्मांचा नाश झाला पाहिजे.बहुवचनाच्या प्रयोगामुळे प्रारब्धाबरोबर सर्वच कर्मांचा त्यात समावेश होतो.(१) संचित म्हणजे पूर्वी पूर्वजन्मात केलेल्या कर्मांचा संचय. प्रारब्ध म्हणजे त्या संचिताचा,उपभोग घेण्यासाठी वेगळा काढलेला भाग आणि सध्या जे आपण करतो ते क्रियमाण कर्म होय.(२)स्वात्मानुभवाच्या अज्ञानामुळे आपण केलेल्या कर्माचे कर्तृत्व आपल्या अंगाला चिकटते.त्यामुळे जीव विनाकारणच फिरणाऱ्या चाकाप्रमाणे जन्ममरणाचे फेरे सोसत राहातो.(३) संचितामुळे त्याला देह प्राप्त होतो. प्रारब्धामुळे तो सुखदु:खाचा अधिकारी होतो आणि पुढील जन्माचा आधार म्हणून सध्या येथे क्रियमाण कर्मे करत राहातो.(४) या सर्व कर्मांमागचे मुख्य कारण म्हणजे अज्ञान होय.ते ज्ञानाने दग्ध होते.आपण जन्ममरणांच्या पलीकडे गेलेले आहोत, हेच ते ज्ञान होय.(५) ते ज्ञान झाल्यानंतर कर्ता म्हणायला कोण उरला? अहंपणाची भाषादेखील खोटीच ठरली. अहंपणा

**वार्ता । अहंकर्तृत्वचि निमतां । त्रिविध कर्मे नासलीं ।।६।। स्वप्नीं होताती व्यवहार । अवस्थाकालीं जे साचार । पुण्यपापाचे संस्कार । सुखदुःखप्रतीति ।।७।। तेथें जें जें पुण्य घडलें । जागृतीं कोण स्वर्गा गेलें । अथवा महापाप प्रतीतीस आलें । कोणें घेतलें प्रायश्चित्त ।।८।। सुखदुःख पुण्यपाप । हा तोंवरीचि संताप । जागृति येतां आपेआप । सर्वहि निमालें ।।९।। अज्ञान सुषुप्ती गहन । मी कर्ता भोक्ता हें स्वप्न । मी आत्मा हें होतां ज्ञान। सकार्य नासे ।।१०।। मागें जें पुण्यपाप केलें । तें ज्ञान होतां जळालें । अहंकर्तृत्व जेव्हां निमालें । शून्य पडिले क्रियमाणा ।।११।। प्रारब्ध देहासी भोग । नाना सुखदुःखांचा प्रसंग । आत्मा आपण असंग । एवं प्रारब्धही नाहीं ।।१२।। ऐसें ऐकतां म्हणे श्रोता । सर्व करीतसे ज्ञाता । करून कैसा तो अकर्ता । आम्हां सांगावें ।।१३।। वक्ता म्हणे सावधान । गीतेंत बोलिला श्रीकृष्ण[१४] । देहेंद्रिय अहंकार प्राण । पांचवें दैव ।।१४।। इतुका मिळे संघात । न्यायान्याय कर्म समस्त । होत तया आत्मा अलिप्त । गृहकर्मा दीप जैसा ।।१५।। न जाणतां आत्मस्वरूप। संघाताचें**

---

आणि कर्तृत्व नाहीशी झाल्यानंतर तीन प्रकारची कर्मेदेखील नष्ट झाली.(६) स्वप्नामध्ये जे व्यवहार होतात, ते त्या अवस्थेपुरते खरे असतात. पुण्यपापाचे जे संस्कार असतील त्यानुसार सुखदुःखाचे अनुभव हे सर्वही स्वप्नापुरतेच खरे असतात.(७) त्या अवस्थेत जे पुण्य घडते त्या पुण्यामुळे जागृतीत कोणी कधी स्वर्गाला गेले आहे काय? अथवा स्वप्नामध्ये महापापाचा अनुभव घेतल्यामुळे जागृतीत कोणी कधी प्रायश्चित्त घेतले आहे काय?(८) स्वप्नातील सुखदुःखे, पुण्यपापे इत्यादी संताप स्वप्न असेपर्यंतच असतात. जागृती येताच ते सर्व आपोआपच नष्ट होतात.(९) अज्ञान ही गाढ निद्रा आहे. 'मी भोक्ता, मी कर्ता' अशी जाणीव हे तीत पडलेले स्वप्न होय. ते स्वप्न 'मी आत्मा आहे' असे ज्ञान होताक्षणीच आपल्या कार्यासहित नष्ट होते.(१०)पूर्वी जी पुण्यपापे केलेली असतील ती ज्ञान झाल्याबरोबर जळून जातात. अहंपणा आणि कर्तृत्व जेव्हा नाहीशी होतात, त्याच वेळी क्रियमाण कर्मेही नष्ट होतात.(११) प्रारब्ध म्हणजे देहाचा भोग म्हणजेच विविध सुखदुःखांचा अनुभव. आपण असंग असा आत्मा आहोत असे कळताच प्रारब्धही नष्ट होते.(१२) हे ऐकताच श्रोता विचारतो, "ज्ञाता सर्व काही करतो. पण सर्व काही करूनही तो अकर्ता कसा हे आम्हांस सांगावे."(१३) वक्ता त्याला म्हणतो, की लक्ष देऊन ऐक. गीतेत भगवान श्रीकृष्णाने असे सांगितले आहे की, देह, इंद्रिये, अहंकार, प्राण आणि पाचवे दैव.(१४) इतका समुदाय जेव्हा एकत्र होईल तेव्हाच कर्मे घडतात. (भ.गी.१८.१४) अशा प्रकारे न्याय्य अथवा अन्याय्य अशी कर्मे घडत असताना आत्मा मात्र, घरातल्या वेगवेगळ्या कर्मांचा दीप हा साक्षी असूनही त्यांपासून अलिप्त असतो, तसा अलिप्त असतो.(१५)आत्म्याची ही भूमिका न जाणता, आणि या कर्मकारणांच्या संघाताचे स्वरूप न ओळखता लोक आत्म्यावर उगीचच कर्तेपणाचा

**नेणतां रूप । आत्मत्वीं करिती आरोप। कर्तेपणाचा ।।१६।। मेघगति चंद्रावरी । बाळ जैसा आरोप करी । तैसे अज्ञान तोंवरी । अहंकर्तव्यता ।।१७।। संशयातीत आपण । ज्ञानेंचि गळालें मीपण । संचित आणि क्रियमाण । तत्क्षणीं दग्ध जालें ।।१८।। म्हणसी स्वप्न सुकृत दुष्कृता । दग्ध जालें जागृति येतां । तैसें पूर्वार्जित संचिता । ज्ञानें नाशिलें।।१९।। परी जागृतीसी कर्म जालें । तें पुढें पाहिजे भोगिलें । ज्ञानोत्तरीं क्रियमाण घडलें । तें भोगणें लागे ।।२०।। ऐसें न घडे सर्वथा । नाहंकर्तृत्वें गेलें वृथा । पापपुण्यादि अनर्था । बोलोंचि नये।।२१।।तेणें सर्वांसि वधिलें । अथवा ब्रह्मांड रचिलें । श्रीकृष्णवचनें कळलें। ज्ञाता अलिप्त।।२२।।जेव्हां अज्ञान बळकट होतें । तेव्हांचि नातळे कर्मातें । उगेंचि धरितां मीपणातें । सुखदुःख पावे।।२३।।सुखादि भोक्तृत्व मुळीं नाहीं । अहंकर्तृत्वें दिसें कांही। ज्ञानें निमतां अहं-अही । न बोलतां अकर्ता।।२४।।मृगजळ जेथें पडिलें। तेथें तृणहि नाहीं बुडालें । आटतां कोरडें जालें । बोलावें नलगे ।।२५।। एवं क्रियमाण नाहीं ज्ञात्यासी। घडतसे तया गति कैसी । ऐसें कांहीं कल्पिसी । श्रुतिसिद्ध ऐका तें।।२६।। ज्ञात्याचें कर्म पुण्यात्मक । त्याचे अधिकारी सेवक । वंदिती पूजिती निष्ठा एक। मानसीं जया ।।२७।।**

---

आरोप करत असतात.(१६)बालक ज्याप्रमाणे मेघातून अस्पष्ट दिसणाऱ्या चंद्रावर मेघांच्या गतीचा आरोप करते,त्याप्रमाणे अज्ञान असेतोपर्यंत'मी कर्ता'असा कर्तृत्वाचा अभिमान बाळगला जातो.(१७) आपण(आत्मा)संशयातीत असून ज्ञानाने मीपण गळून जाते.त्याचक्षणी संचित,क्रियमाण कर्मे जळून जातात.(१८)यावर तू म्हणशील की,स्वप्नातील पाप किंवा पुण्य जागृतीत नष्ट होते त्याप्रमाणे पूर्वार्जित संचित ज्ञानाने नष्ट होते,हे मान्य.(१९)पण जागृतीत होणारी कर्मे पुढे भोगली पाहिजेतच ना!ज्ञान झाल्यानंतर जे क्रियमाण कर्म घडते ते भोगावे लागतेच.(२०)यावर उत्तर असे की,तू म्हणतोस त्याप्रमाणे होत नाही,कारण'मी कर्ता नाही'या ज्ञानाने ते सर्व कर्म व्यर्थ होते.त्यामुळे पाप पुण्य इत्यादी अनर्थांची गोष्टच काढू नये.(२१)त्या साधकाने सर्वांचा वध केला अथवा ब्रह्मांडाची रचना केली तरी ज्ञाता अलिप्तच असतो,असे श्रीकृष्णाच्या वचनावरून कळते.(भ.गी.१८.१७)(२२)खरे पाहिले तर अज्ञान बळकट असतानादेखील ज्ञाता तसाच कर्मापासून अलिप्तच होता.पण उगीचच मीपणा धारण केल्याने सुखदुःख भोगू लागला.(२३)सुखादी भोगणे असा प्रकार मुळीच नाही.पण मी कर्ता आहे या भावनेमुळे ते तसे दिसते.त्या अहमरूपी सर्पाचा ज्ञानाने नाश होताच तो काही न बोलताच अकर्ताहोतो.(२४) ज्या ठिकाणी मृगजळ दिसते तेथे गवतसुद्धा बुडलेले नसते.त्यामुळे मृगजळ आटल्यामुळे सर्व कोरडे झाले हे सांगावे लागत नाही.(२५)अशा प्रकारे ज्ञात्याला क्रियमाण कर्माची बाधा नाही.पण एरव्ही जे कर्म ज्ञात्याच्या हातून घडते त्याची गती कोणती अशी कल्पना करत असशील तर वेदाने यावर जे उत्तर दिले आहे ते ऐक.(२६)ज्ञात्याचे जे कर्म पुण्यात्मक असते ते पुण्य त्याच्या सेवकांना मिळते.ते त्याला

**जे कां निंदक दुर्जन । गांजिती लाविती दूषण । ज्ञात्याचें जें पाप गहन । तयांचे माथां।।२८।।पशु धन वस्त्र जितुकें। त्यासि अधिकारी पुत्रादिकें । ज्ञाता अलिप्त विवेकें। मोकळा जाला।।२९।। श्रोता म्हणे जी भलें जालें । संचित क्रियमाण नासलें। परी प्रारब्ध पाहिजे भोगिलें । ज्ञातयानीं।।३०।।वक्ता म्हणे हो आयिका । उगा गलबला करूं नका । प्रारब्धभोग देहादिकां । कीं आत्मयासी।।३१।।देहाचें तादात्म्य जो धरिता । अज्ञान अहंकार तत्वतां। देहसंघात नव्हे कीं ज्ञाता । तरी प्रारब्ध कोणा।।३२।।प्रारब्ध देहासी भोगवी। आत्मत्वीं केवि बोलावी। ज्ञाता आत्मा भेद भावी । तोचि अधम ।।३३।। लोखंड कुटितां घणीं। अग्नीसी नव्हे जाचणी। बळें कल्पिजे अज्ञानीं। प्रारब्धही तैसें।।३४।। श्रुति अज्ञांना सांगत। कीं ज्ञाता प्रारब्धीं वर्तत। माता जैसी बुझावीत । रडतयासी ।।३५।। ज्ञातयासी प्रारब्ध नाहीं। श्रुतीनें उभवून बाही। सर्व कर्मांचा लेश नाहीं। बहुवचनें बोलत।।३६।। एवं सर्व कर्मांची क्षीणता[५५]। वस्तुरूप असे ज्ञाता। यदर्थी संशयाची वार्ता। बोलोंचि नये।।३७।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । कर्मक्षयानुकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

---

वंदन करतात.त्याची पूजा करतात.त्यांच्या मनात त्याच्याबद्दल एक निष्ठा असते.म्हणून त्या पुण्यकर्माचे ते अधिकारी असतात.(२७) पण जे लोक त्याचे निंदक असतात,दुर्जन असतात,जे त्याचा छळ करतात,त्याला दोष देतात त्या लोकांच्या माथी ज्ञात्याचे जे पापकृत्य असेल ते बसते.(२८)त्याचे जे पशू,धन,वस्त्रे इत्यादी जेवढे असेल त्याला त्याचे पुत्र इत्यादी नातेवाईक अधिकारी आहेत.ज्ञाता मात्र अलिप्त असून विवेकाने तो या सर्वांपासून मुक्त असतो.(२९)यावर श्रोता म्हणतो की,ज्ञात्याचे संचित कर्म आणि क्रियमाण कर्म नष्ट झाले ही गोष्ट छान झाली.पण यावर श्रोता म्हणतो की,ज्ञात्याचे संचित कर्म आणि क्रियमाण कर्म नष्ट झाले ही गोष्ट छान झाली.पण प्रारब्ध कर्म तरी ज्ञात्यालाच भोगावे लागते ना?(३०) तेव्हा वक्ता म्हणतो की,शांतपणे ऐका.उगीच गोंधळ करू नका.प्रारब्धभोग कुणाला भोगावे लागतात?देहाला की आत्म्याला?(३१) देहाशी तादात्म्य जो धरतो तो अज्ञानी आणि अहंकारी आहे. पण देहसंघात म्हणजे ज्ञाता नव्हे. मग प्रारब्ध कोणाचे?(३२) प्रारब्ध देहाला भोगावे लागते. ते आत्म्याचे कसे म्हणता येईल? जो ज्ञाता आणि आत्मा यात भेद करतो, तोच अधम होय.(३३)लोखंड घणांनी ठोकत असता अग्नीला काय त्रास? पण अज्ञानी लोक मात्र अग्नीला त्रास होतो असे मानतात.प्रारब्धही बळेच आत्म्याच्या माथी मारतात.(३४) एखाद्या रडणाऱ्या लहानमुलाला जसे समजावून सांगावे तसे श्रुती अज्ञानी लोकांना सांगते की,ज्ञाता प्रारब्धानुसार वागतो खरा,(३५) पण ज्ञात्याला प्रारब्धाची झळ पोचत नाही.श्रुतीने आपले बाहू उभारून सांगितले आहे की, ज्ञात्याला सर्वच प्रकारच्या कर्मांची बाधा होत नाही.श्रुती 'कर्मांचा' असा अनेकवचनी प्रयोग करीत आहे,हे लक्षात घ्यावे.(३६) अशा तऱ्हेने सर्व कर्मे नाहीशी होतात. ज्ञाता ब्रह्मरूपच असतो. या संदर्भात आता संशयाची गोष्टसुद्धा काढू नये.(३७)

## ।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - प्रारब्धकर्मानुकार

**विवेकें प्रारब्ध देहासी । भोगितां भय काय आत्मयासी । अखंड परिपूर्ण अभेदासी । ज्ञाता पावला।।१।।म्हणसी अभेदज्ञान जालिया । प्रारब्ध नसावें ज्ञातया । भोगानंतरें पावे क्षया। हें अघटित।।२।।तरी ऐसें न कल्पावें । ज्ञान होतां लया जावें । तरी जगदोद्धार संभवे । कोणें प्रकारें।।३।।ज्ञाते प्रारब्धिं वर्ततां । ज्ञातयासी नसे वार्ता । मुमुक्षुसाधकापुरता। महोदय जाला ।।४।।जैसें सूर्यादिकां भ्रमण । स्वात्मार्थे नसे जाण । त्रिभुवनींचे सर्व जन। प्रकाशें वर्तती।।५।।ब्रह्मा विष्णु सदाशिव । तेथून परंपरा समुदाव । गुरुशिष्यद्वारां अपूर्व। ज्ञानप्रवाह चालिला।।६।।मागें पुढे आणि वर्तमानीं । समाधान पावले ज्ञानीं । हें प्रारब्धाची करणी। ज्ञानोत्तर ज्ञात्याचे।।७।।अज्ञान ज्ञानिया प्रारब्ध । सारिखा देहाचा संबंध । निद्रा आहारादिकां भेद। किमपि नाहीं।।८।।भोग उभयातें समान । परी ज्ञाता आनंदें समाधान। अज्ञान पावती शीण। नाना सुखदुःखें।।९।।मज अप्राप्त तें प्राप्त व्हावें। प्राप्त तें चिरकाल राहावें। नाना सायास करूं धावे। दुःखरूप नेणें।।१०।।प्राप्त विषयासी आनंदें। सर्वेंचि**

---

### पंचिका ९वी, समास ५वा - प्रारब्धकर्मानुकार

प्रारब्ध हे देहाचे आहे. ज्ञाता अखंड संपूर्ण अभेदस्वरूप झाल्यावर त्याने विवेकपूर्वक जर देहाचे प्रारब्ध भोगले तर आत्म्याला कशाचे भय आहे?(१) तू असे म्हणतोस की, अभेदज्ञान झाल्यानंतर ज्ञात्याला प्रारब्ध भोगायला लागू नये. प्रारब्ध हे भोगल्यानंतरच नष्ट होते, हा न्याय बरोबर नाही.(२) तर माझे सांगणे असे की, तू अशा प्रकारचा विचार करू नकोस. ज्ञान झाल्याबरोबर ज्ञात्याने लयाला जावे असे तू म्हणत असशील तर जगाचा उद्धार कसा होईल?(३) ज्ञाता प्रारब्धानुसार वागत असताना ज्ञात्याला त्याची जाणीवही नसते. पण ज्ञात्याच्या या प्रारब्धकर्मानुसार वागण्याने मुमुक्षू साधकांना मात्र ती पर्वणी वाटते (भाग्योत्कर्ष वाटतो). (४) सूर्य इत्यादी ग्रह भ्रमण करतात. ते स्वतःसाठी नसते. पण त्यांच्या भ्रमणामुळे त्रिभुवनातील सर्व लोक प्रकाशात व्यवहार करू शकतात.(५) ब्रह्मदेव, विष्णू आणि शंकर यांच्यापासून ज्ञानाची परंपरा सुरू होऊन गुरुशिष्यक्रमाने अपूर्व ज्ञानप्रवाह चालू आहे.(६) भूतकाळात, भविष्यकाळात आणि वर्तमानकाळात तिन्ही काळांत ज्ञान्यांना समाधान प्राप्त झाले आहे. ही सर्व करामत ज्ञात्याच्या ज्ञानोत्तर प्रारब्ध कर्माची आहे.(७) अज्ञानी माणूस आणि ज्ञानी माणूस यांना प्रारब्धामुळे सारखीच देहप्राप्ती होते. निद्रा, आहार इत्यादींमध्ये काहीही भेद नाही.(८) प्रारब्धाचे भोग दोघांनाही सारखेच असतात. पण ज्ञाता मात्र आनंदात राहून समाधानी असतो. अज्ञानी मनुष्य मात्र निरनिराळ्या प्रकारच्या सुखदुःखांनी व्यर्थ शिणतो. (९) मला अद्याप जे मिळालेले नाही, ते मिळावे; जे मिळालेले आहे ते चिरकाल राहावे या इच्छेने तो अनेक प्रकारचे कष्ट करायला लागतो. त्या कष्टांची दुःखरूपता त्याला माहीत नसते.(१०) त्यामुळे विषय प्राप्त होताच तो आनंदित होतो तो नष्ट होताच

**नासतां खेदे। रडे पडे आक्रंदे। वासनाबद्ध होऊनी।।११।।ज्ञाता ज्ञानें समाधान । आपणांहून जें कांहीं भिन्न । तें मृगजळासमान । मिथ्यात्वें पाहे।।१२।।मृगजळें तृषाहरण। होय यासी काय प्रमाण । विषयजाता पडिलें शून्य । आतां काय इच्छावें।।१३।।इच्छा नसतां प्राप्त जालें। तें तें उगेंची भोगिलें। तेणें सुख अनुभविलें । न वचे विषयाचें।।१४।।अंत्यजाच्या घरिंचा पाक। जालासे परम रसिक। तया सोवळे वैदिक। नातळती जैसें।।१५।।आत्मा हा सोवळा ब्राह्मण। देहादि अंत्यज संपूर्ण। तरी प्रारब्धभोगाचा शीण। आत्मबोधें कैचा।।१६।। कर्मानुसार विषय नासती । ज्ञात्यासी विषाद न ये चित्तीं। जैसी वांजेची संतती । एकदाचि बुडाली।।१७।।इंद्रपदादि प्राप्त जालें। अथवा सर्वही बुडालें। परी हर्ष विषाद टाकिले। तरी सुखदु:ख कैचें।।१८।।सुखदु:ख धर्म मनाचा। संगचि सांडिला तयाचा। तेणेंविण विषयभोगाचा। संबंध नसे।।१९।।आत्मबोधें संतोषला। सर्व विषयाचा त्याग केला। दरिद्री राज्यपद पावला। पूर्वील चिंध्या नेणे तों।।२०।।येथें आक्षेपु असे केला। ज्ञाता इच्छितो विषयाला। तरी अभाव कामनेचा जाला। काशावरुनी।।२१।।इच्छा जरी ज्ञातयासी।**

---

तो दु:खी होतो. अशा तऱ्हेने वासनाबद्ध झाल्यामुळे तो रडू पडू लागतो,आक्रंदन करतो.(११) ज्ञाता ज्ञानाने समाधानी असतो. त्यामुळे आपल्याहून जे काही भिन्न असेल ते मृगजळाप्रमाणे मिथ्या म्हणून तो पाहत असतो.(१२) मृगजळाने तहान भागते याला काही प्रमाण आहे का? सर्वच विषय जेथे शून्यासारखे झाले तेथे कशाची इच्छा करणार?(१३) इच्छा न करता जे प्राप्त होते ते तो उदासीनपणाने भोगतो.अशा भोगण्यामुळे त्याने विषयांचे सुख अनुभवले असे होत नाही.(१४) अंत्यजाच्या घरी अगदी उत्कृष्ट स्वयंपाक झालेला असला तरी सोवळे वैदिक त्यापासून अलिप्त राहतात.(१५) येथेही आत्मा हा सोवळा ब्राह्मण असून देहादी अंत्यजाप्रमाणे आहेत.तेव्हा प्रारब्धाच्या भोगाचा शीण ज्ञान झालेल्या माणसाला कसा होईल?(१६)कर्मानुसार विषय नष्ट झाले तरी ज्ञात्याला त्यांबद्दल मनात दु:ख वाटत नाही, वांझेची अपत्ये एकदमच बुडाली, तेव्हा त्यांच्याबद्दल शोक करण्याचे कारण नाही,तसेच विषय नष्ट झाल्यानंतर त्याला वाटते.(१७) इंद्रपद प्राप्त झाले अथवा सर्वस्व बुडाले तरी त्यासंबंधी हर्ष आणि विषाद दोन्ही टाकूनच दिल्यामुळे त्याला सुख अथवा दु:ख कोठून होणार?(१८) सुखदु:ख मानणे हा मनाचा धर्म आहे.पण त्याने मनाची संगतीच टाळली असल्याने मनोरहित अवस्थेत विषयभोगाचा संबंधच येत नाही.(१९) एकदा आत्मज्ञानाच्या योगाने त्याला समाधान प्राप्त झाले आणि त्याने विषयांचा त्याग केला म्हणजे दरिद्री माणसाला राज्यपद प्राप्त झाल्यानंतर पूर्वायुष्यातील चिंध्यांचा जसा विसर पडतो तसे त्याचे होते.(२०) यावर एक आक्षेप असा की, ज्ञातासुद्धा विषयांची इच्छा करताना दिसतो, तरी त्याच्या ठिकाणी विषयाबद्दलची कामना नसते असे कशावरून समजावयाचे?(२१) जर इच्छा होते तर सुखादिकांचा

**तरी सुखादि अप्रतीति कैसी । सांडोनि हर्ष शोकासी । समाधान कैसें तें ।।२२।। आतां याचें कैसें उत्तर । प्रारब्धाचे तीन प्रकार । इच्छा अनेच्छा आणि पर । भोगवी देहासी।।२३।। इच्छून यत्नें संपादिलें। तें इच्छाप्रारब्ध बोलिलें। न इच्छितां भोगासि आलें। अनेच्छाकर्म।।२४।। इच्छा अनेच्छा दोन्ही नसे। परदाक्षिण्याचें मिषें । भोगणें सुखदु:खाचें अपैसे । परेच्छाकर्म तें।।२५।।हे तिन्हींही एकासि असती । एक नेमिता न ये मति । इच्छिता न इच्छिता होय प्राप्ति । काल-कर्माधीन तें।।२६।।क्षुधेचें करावें हरण । इच्छून करी भिक्षाटण । तेथें मिळालें वस्त्रधन। इच्छेवाचुनी।।२७।।मित्र कोणी आवडता । त्या नसावी दु:खवार्ता । उपायार्थ लगबग करितां । सुख दु:ख पावे।।२८।।देहधारी जितुका जाला । प्रारब्धें न वचे सोडिला । अरे कर्माचाचि उभारिला । तेणेंवीण न राहे।।२९।।पट सुताचा विणिला। तंतूंत तंतू गोविला । गोवा अवघाचि काढिला । तरी पट कैचा।।३०।। तैसें प्रारब्धावाचुनी। देह हा न दिसे नयनीं । सुखदु:ख-भोग तया लागुनी । चुकेना कीं ।।३१।। प्रतिकार होणाराचा । जरी होता सुखदु:खाचा । नल-राम-धर्मादिकांचा । वनीं वास न होय।।३२।।**

---

त्याला अनुभव नसतो हे कसे? आणि हर्षशोक टाकून दिल्यानंतर त्याला समाधान तरी कसे मिळते?(२२) आता या प्रश्नांचे उत्तर कसे द्यायचे? देहाला भोगावी लागणारी प्रारब्धे तीन प्रकारची आहेत. इच्छाप्रारब्ध, अनिच्छाप्रारब्ध आणि परप्रारब्ध असे ते तीन प्रकार होत.(२३) ज्याची इच्छा करून प्राप्ती करून घेतलेली असते, ते इच्छाप्रारब्ध होय. जे आपण इच्छा न करताही भोगावे लागते ते अनिच्छा प्रारब्ध होय.(२४) इच्छाही केलेली नसते, अथवा अनिच्छेनेही जे आपण भोगत नाही तर परोपकारासाठी किंवा दुसऱ्याची दया येऊन त्या निमित्ताने आपण सुखदु:ख भोगतो ते परेच्छाकर्म अथवा परेच्छाप्रारब्ध होय.(२५) ही तिन्हीही एकाच्या ठिकाणी आढळतात. एक निश्चित असे ठरविता येत नाही. इच्छा करून अथवा इच्छा न करता ज्याची प्राप्ती होते, ते काल व कर्म यांच्या अधीन असते.(२६) क्षुधा म्हणजे भूक भागविण्यासाठी इच्छा करून भिक्षेसाठी फिरत असता अचानक अन्नाबरोबर वस्त्रे आणि धनही इच्छा न करता मिळते.(२७) आपला एखादा आवडता मित्र असेल त्याला दु:ख नसावे म्हणून धडपड करताना कधी अचानक सुखदु:खाची प्राप्ती होते.(२८) जेवढे म्हणून देहधारी जीव आहेत त्यांपैकी कोणीही प्रारब्धातून मुक्त होत नाही. अरे, देहच जर मुळात कर्माचाच बनला आहे तो कर्मापासून मुक्त राहूच शकणार नाही.(२९) सुताचा पट तयार केला म्हणजे तंतूत तंतू गुंतवून ठेवण्याचा प्रकार होय. त्यांची ती गुंफण सगळीच उकलली तर पट कसा राहील?(३०) त्याप्रमाणे प्रारब्धावाचून असलेला एकही देह डोळ्यांना दिसणार नाही. त्यामुळे देहाला सुखदु:खभोग चुकणार नाहीत.(३१) वाट्यास येणाऱ्या सुखदु:खांचा प्रतिकार करता येत असता तर नलराजा, रामचंद्र, धर्म इत्यादींना वनात वास्तव्य करावे लागले नसते.(३२)

**ईश्वर अंगें आपण । प्रारब्ध भोग नव्हे न्यून । ईशसामर्थ्य मानिसी उणें । तोचि प्रेरक कर्मासी ।।३३।। आपुली आज्ञा चक्रवर्ती । पाळितसे यथा रीती । म्हणोनि राजसामर्थ्य-शक्ति । काय उणी जाली ।।३४।। असो प्रारब्ध देहा सुटेना । ज्ञाता प्रतिकारही करीना। हर्ष शोक टाकुनी नाना । मौनेंचि भोगी ।।३५।। इच्छून भोगी जरी ज्ञाता । तरी त्या हर्षशोकाची नसे वार्ता । कारण नामरूपात्मक द्वैता । शून्य पडिलें ।।३६।। द्वैत सत्य जरी असावें । तरी हानि लाभ संभवे । हानिलाभेविण असावें । हर्ष शोक केवी ।।३७।। जैसे देहीं नाना अवयव । इतुका मीचि हा दृढभाव । उजवे करींचे अलंकार सर्व । डावे हातीं घातले ।।३८।। एका लाभ एकासी हानी । काय दिसती भिन्नपणीं । हर्ष शोक न वाटे मनीं । एकात्मता दृढ जाली ।।३९।। तैसें हे चराचर जितुकें । आपुला ठाई अनेकें । मीतूंपणेंविण विवेकें । एक आत्मा परिपूर्ण ।।४०।। आपणामध्यें विषयजात । येथें कोणतें अप्राप्त । गेले आले आपणांत । लाभ ना हानी ।।४१।। दृढ बोधें अद्वैत जाला। हर्ष शोक निःशेष गेला । मग कोटि इच्छा करूं लागला । तेणें उणें कोणतें ।।४२।।**

---

स्वत: ईश्वर असला तरी त्याच्या प्रारब्धभोगात काही कमी होत नाही.त्याचे सामर्थ्य कमी पडले असे तुला वाटत असेल तर हे लक्षात घे की,तो तर सर्व कर्मांचा प्रेरक आहे.(३३)चक्रवर्ती राजा स्वत:चीच आज्ञा रीतीप्रमाणे पाळतो.पण त्यामुळे त्याच्या सामर्थ्याची शक्ती कमी होते काय?(३४)असो,देहाला प्रारब्ध काही सुटत नाही.ज्ञाता त्याचा प्रतिकारही करत नाही.निरनिराळे हर्षशोक टाकून मौनानेच तो प्रारब्ध भोगतो.(३५)इच्छा धरून जरी ज्ञात्याने प्रारब्धाचा भोग घेतला,तरी त्याला त्या हर्षशोकांची वार्ताही नसते,कारण नामरूपात्मक द्वैतच त्याच्या मनातून नष्ट झालेले असते.(३६)द्वैत जर सत्यस्वरूपात असते तर हानि,लाभ संभवले असते.पण हानिलाभच नसतील तर हर्षशोक कसे होतील?(३७)देहात विविध अवयव आहेत,ते सर्व मीच आहे अशी दृढ भावना ज्ञात्याच्या मनात झालेली असते.तेव्हा उजव्या हातातले अलंकार डाव्या हातात घातले,(३८)तर एका हाताला लाभ झाला व दुसऱ्या हाताचे नुकसान झाले असे आपण म्हणतो काय?ते भिन्न आहेत असे तरी दिसते का?त्यांची एकात्मता दृढ झाल्याकारणाने मनास हर्ष,शोक इ.जाणवतच नाहीत.(३९)त्याप्रमाणे हे चराचर विश्व आपल्या स्वत:च्या शरीरातूनच सामावलेले (ठिकाणी)आहे अशी भावना धरून मी-तूपणा सोडून देऊन विवेकाच्यासाहाय्याने एकच आत्मा सर्वत्र भरला आहे असे ज्ञाता मानतो.(४०)आपल्यामध्येच सर्व विषय सामावलेलेअसल्याने आपल्याला कोणती वस्तू अप्राप्त असेल?(सर्व वस्तू माझ्याच आहेत)त्यातल्या काही वस्तू गेल्या,तरी माझ्यावाचून दुसरीकडे कोठे जाणार?आणि आल्या तरी माझ्यातच येणार!त्यामुळे या आल्यागेल्याचा मला लाभही नाही,नुकसानही नाही.(४१)ज्ञान दृढ झाल्यामुळे तो द्वैतरहित झालेला असतो त्यामुळे त्याचे हर्षशोक संपूर्णपणे नाहीसे झालेले असतात.तेव्हा त्याने कोट्यवधी इच्छा केल्या तरी त्यात काय

**इच्छा हें अज्ञान जीवातें। बांधून घाली बळें जन्मातें। त्याचि इच्छेनें ज्ञानियां होतें। द्विगुण समाधान।।४३।।एक मुळी मार्गी पडली। एक भ्याला एकें ओळखिली। दोघांची अवस्था भिन्न जाली। विवेक अविवेकें।।४४।।अबोधाचें चिन्ह ते प्रीति। अनुराग असो ज्ञात्याप्रती। दोहीं वचनांची यथा स्थिति। सार्थक्यता जाली।।४५।।शंकराचें जें आभरण। तेंचि इतरासी मरण। अज्ञानाचें जें दूषण। होय भूषण ज्ञानियां।।४६।।म्हणोनि ज्ञानी आणि अज्ञान। उभयतां भोग समान। देहद्वयाचेंहि दिसणें। सारिखें असे।।४७।।प्रारब्ध ज्ञाना विरोधि असे। तरी जनकादि राहती कैसे। प्रवर्तती हननीं तैसे। ज्ञानसिद्धि व्हावया।।४८।।अथवा ज्ञान विरोधी प्रारब्धासी। बोलूं नये निश्चयेसी। एक विषय असतां दोहींसी। विरोध होता।।४९।।भिन्न विषय भिन्नपणीं। विरोध नव्हे यालागुनी। पूर्वपश्चिमे एकत्र गमनीं। नवचे जैसें।।५०।।स्वरूपाविण जितकें अन्य। तितुकें मिथ्यात्वें अवलोकन। हेंचि ज्ञानाचें लक्षण। प्रारब्धें न नासे।।५१।।विषय सत्यत्वें स्थापावे। मग जीवासी भोग द्यावे। ऐसें कदा न संभवे। मिथ्यात्वें भोग घडती।।५२।।इंद्रजाल मिथ्याचि परी। विनोदें मनरंजन करी। पाहतां तयासी निर्धारी। सत्यत्व नवचे।।५३।।प्रारब्ध अग्र हें जीवासी। सुखदुःख द्यावे निश्चयेसी। सत्यचि प्रतिपादी विषयासी। हें तो न घडे।।५४।।**

---

बिघडले?(४२)इच्छा ही अज्ञानी जीवांना बांधून बळेच जन्माला घालते. त्याच इच्छेने ज्ञानी माणसाला दुप्पट समाधान होते(४३)रस्त्यामध्ये एक मुळी पडलेली आहे. एकजण तिला पाहून घाबरतो. दुसऱ्याने ती मुळी ओळखली. त्यामुळे एकाच्या अविवेकामुळे व दुसऱ्याच्या विवेकामुळे दोघांच्या अवस्था भिन्न भिन्न झाल्या.(४४)प्रीती हे अज्ञानाचे चिह्न होय. तशीच ज्ञात्यालाही प्रीती असायला हरकत नाही. ही दोन्ही वाक्ये आपापल्या परीने सार्थच आहेत.(४५)शंकराचा जो दागिना(सर्प)आहे तोच इतरांचे मरण ठरू शकतो. त्याप्रमाणे अज्ञानी माणसांचा जो दोष ठरतो तोच ज्ञानी माणसाचा अलंकार होऊ शकतो.(४६) म्हणून ज्ञाना-अज्ञानी दोघांनाही शरीरभोग सारखेच असतात. दोघांचे देहही सारखेच दिसतात.(४७) प्रारब्ध जर ज्ञानाचे विरोधक असते, तर जनक इ. कसे राहिले असते? ज्ञान प्राप्त होण्यासाठी प्रारब्ध नष्ट करण्याचा त्यांनी प्रयत्न केला असता.(४८)किंवा प्रारब्ध हे ज्ञानाच्या विरुद्ध आहे असे म्हणूही नये. दोघांचा विषय एकच असता तर त्यांच्यात विरोध आला असता.(४९)दोघांचेही विषय भिन्न आहेत. त्यामुळे त्यांच्यात विरोध येत नाही. एकाच प्रवासात एकाच वेळी पूर्वेला व पश्चिमेला जाता येईल काय?(५०) स्वरूपाहून जे जे भिन्न असेल त्याच्याकडे मिथ्यात्वाने पाहणे हे ज्ञानाचे लक्षण होय. ते प्रारब्धामुळे नष्ट होत नाही.(५१)विषय सत्य म्हणून स्वीकारावेत तेव्हाच जीवाला त्याचे भोग घेता येतात. मिथ्यात्वाने भोग घडतात, असे कधीच संभवत नाही.(५२)इंद्रजाल(जादू)जरी मिथ्या असले तरी ते मनोरंजन करते. पण निश्चयाने त्याच्याकडे पहाताच त्याचे सत्यत्व नष्ट होते.(५३)प्रारब्ध हे जीवाला अग्रक्रमाने अटळ आहे. त्याने जीवाला सुखदुःख खुशाल द्यावे. पण तत्पूर्वी विषयांना सत्यत्व असले पाहिजे. पण ते नसते.

**म्हणोनि ज्ञाना विरोधि नव्हे । प्रारब्ध भोगून नासताहे। प्रारब्धासीहि नासून लाहे । नि:शेष ज्ञान।।५५।।सर्व मिथ्या जाणावें । खांदून नवचे काढावें । प्रारब्धभोग सुखें नावें । घडेना कां।।५६।।असो ज्ञान प्रारब्धाप्रती । विरोध नसे गा निश्चिती । ज्ञान अज्ञाना एक स्थिति। न घडे कदा।।५७।।अज्ञान नि:शेष जरी गेलें। तरिच ज्ञान प्रतिष्ठिलें। म्हणून अज्ञान नाशिलें। ज्ञानें येणें।।५८।।विषदंत उपडिला सर्पाचा। क्रीडतां लेश नसे भीतीचा। तैसा ठाव पुसून अज्ञानाचा। प्रारब्ध भोगी।।५९।।अज्ञान कारण गेलें। प्रारब्ध कार्य कैसें उरलें। म्हणसी तरी राहिलें। कारणाभावीं क्षणभरी।।६०।।वृक्ष मुळींहूनि तोडिला। तत्क्षणीं न वचे वाळला। रज्जु कळतां सर्प गेला। परी कंप राहे।।६१।।देह बहुत काळ राहतो। क्षणिक कैसा मानावा तो। म्हणसी तरी कल्पांत होतो। आमुचे क्षणीं।।६२।। स्वप्नीं जैसे क्षणांत। बहु काळ वाटे लोटत। ज्ञानोत्तरीं महाकल्पांत। क्षणाहि न वचे।।६३।।असो देहद्वयाचे भोग। होतांहि आपण नि:संग । परिपूर्ण अक्षई अभंग । कालकर्मातीत तो।।६४।।**

**इति श्रीमदागमसारे उपनिषत्तात्पर्यानुसारे।प्रारब्धकर्मानुकारे।पंचमसमास:।।५।।**

**इति पंचिका संपूर्णा।।१।।ओवीसंख्या २०९**

---

(विषयांच्या मिथ्यात्वामुळे प्रारब्धाने दिलेली सुखदु:खेही मिथ्याच ठरतात)(५४)म्हणून प्रारब्ध हे ज्ञानविरोधी नव्हे.प्रारब्ध हे भोगून नष्ट होते.प्रारब्धाला नष्ट करून निखळ ज्ञानप्राप्ती होते.(५५)हे सर्व मिथ्या आहे,हे समजून घ्यावे.पण त्याचा समूळ नाश मात्र करू नये.प्रारब्धभोग सुखाने घडेनात का?(५६)असो,ज्ञान व प्रारब्ध यांच्यामध्ये निश्चितपणे विरोध नाही.कारण ज्ञान-अज्ञान एका ठिकाणी कधी राहात नाहीत.(५७)अज्ञान पूर्णपणे जाईल तेव्हाच ज्ञानाची प्रतिष्ठापना होईल म्हणून ज्ञानाने अज्ञानाचा नाश होतो.(५८)सापाचा विषारी दात उपटून टाकल्यानंतर त्याच्याशी क्रीडा करताना भीतीचा लेशही राहत नाही.त्याप्रमाणे अज्ञानाचा ठावठिकाणा पुसून प्रारब्ध भोगावे.(५९)यावर शंका अशी की,अज्ञान कारण नष्ट झाल्यानंतरही प्रारब्धरूपी कार्य कसे उरते?तर उत्तर असे आहे की कारण नसतानाही कार्य काही काळ(क्षणभर)राहते.(६०)वृक्ष मुळासकट तोडला तरी तो ताबडतोब वाळत नाही.दोरीचे ज्ञान झाल्यानंतर सर्प नाहीसा होतो खरा,पण शरीराचा कंप काही काळ राहतोच ना!(६१)श्रोता विचारतो की,देह तर पुष्कळ दिवस राहतो.त्याला क्षणिक कसे मानावे?यावर उत्तर असे की,आमच्या एका क्षणात एक कल्प संपून जाते.(क्षणकल्पना सापेक्ष आहे.)(६२)स्वप्नामध्ये एका क्षणात पुष्कळ काळ गेल्याचा अनुभव येतो.तसे ज्ञान झाल्यानंतर महाकल्पान्त सुद्धा क्षणाएवढा वाटतो.(६३)असो,दोन्ही देहांचे भोग भोगत असताही ज्ञाता स्वत: नि:संग असतो.तो परिपूर्ण, अक्षयी,अभंग आणि कालकर्मातीत असतो.(६४)



# पंचिका १०वी - जीवन्मुक्तिलक्षण

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - जीवद्वैतसंहार

**नित्यमुक्त जीवन्मुक्त। तिसरा तो विदेहमुक्त। स्वस्वरूप बद्ध ना मुक्त। मायायोगें बोलावें।।१।।**
**स्वइच्छेनें देह धरिले। ज्ञानसंपन्नचि प्रगटले। शिवादि नित्यमुक्त बोलिले।व्यापारा अलिप्त।।२।।**
**गुरुमुखें ज्ञानसंपन्न। तयाचीं दोन लक्षणें। एक ते जीवन्मुक्त जाण। एक विदेहमुक्त।।३।।**
**वासनाक्षय दोहींपरी। सरूप अरूप निर्धारी। सरूपें जीवन्मुक्ति वरी । विदेहमुक्ति अरूप।।४।।**
**सरूप तेंचि सविकल्प। तेंचि जीवन्मुक्ताचें रूप। विदेहमुक्त निर्विकल्प। अरूप जे कां।।५।।**
**प्रस्तुत जीवन्मुक्ताची लक्षणें। पंचसमासीं बोलणें। जीवद्वैताच्या हननें। पराकाष्ठा ज्ञानाची।।६।।**
**येथें असे उपोद्घात। ईशसृष्ट जीवद्वैत। विवेचन करितां उभयांत । हेयोपादेय कळे ।।७।।**
**ईशसृष्ट असे जितुकें। मिथ्या जाणावें विवेकें। नाहीं नव्हे हे असिकें। देहउपाधि तोंवरी।।८।।**
**ईशसृष्ट द्वैताचा। ती प्रकारें नाश याचा। परोक्षज्ञानें सत्यत्वाचा। क्षय होतसे।।९।। अपरोक्ष जेव्हां कळलें।तेव्हां कार्यक्षेम नासलें।उपाधिक्षयें सर्वही गेलें।त्रिविध नाश यापरी।।१०।।**

---

### पंचिका १०वी, समास १ला - जीवद्वैतसंहार

स्वस्वरूप हे बद्धही नसते,अथवा मुक्तही नसते.फक्त मायेच्या बाबतीत तसे बोलले जाते.मुक्तांचे तीन प्रकार होत.नित्यमुक्त,जीवन्मुक्त,तिसरा विदेहमुक्त.(१)शंकरादी देवांनी स्वइच्छेने देह धारण केले असून ते ज्ञानसंपन्न अवस्थेतच प्रकट झाले.ते नित्यमुक्त असून जगाच्या व्यापारापासूनअलिप्त असतात.(२) गुरुमुखातून ज्यांना ज्ञानप्राप्ती होते त्यांचे दोन प्रकार आहेत.जीवन्मुक्त,विदेहमुक्त.(३)दोन्ही मुक्तांमध्ये वासनाक्षय सारखाच झालेला असतो.पण त्यांच्यामध्ये सरूप व अरूप असे उपासनेचे दोन प्रकार आहेत.सरूप उपासनेने जीवन्मुक्ती मिळते,अरूप उपासनेने विदेह मुक्ती मिळते.(४)सरूप म्हणजेच सविकल्प उपासना होय.तेच जीवन्मुक्ताचे स्वरूप होय.निर्विकल्प मात्र विदेह मुक्ताचे स्वरूप असते.ते अरूप असते.(५)पुढील पाच समासांमध्ये जीवन्मुक्ताची लक्षणे सांगितली जातील.जीवाने निर्माण केलेल्या द्वैताच्या नाशाने ज्ञानाची पराकाष्ठा होते.(६)येथे प्रस्तावनेदाखल ईशसृष्ट व जीवसृष्ट याप्रकारच्या सृष्टीचे विवेचन केले जाईल.त्यामुळे या दोहोंतील त्याज्य,ग्राह्य हे कळेल.(७)जेवढे म्हणून ईशसृष्ट असेल ते विवेकाच्या साहाय्याने मिथ्या जाणावे.नाहीतर देहउपाधी असेतो ते मिथ्या नाही,हे कळणारच नाही.(८)ईशसृष्ट द्वैताचा तीन प्रकारे नाश करता येतो.परोक्षज्ञानाने त्यातील सत्यत्वाचा नाश होतो.(९) अपरोक्षज्ञानाने कार्याकार्य कळते आणि त्याचा नाश होतो व उपाधीच्या नाशाबरोबर मात्र सर्वांचाच नाश

**ईशसृष्ट मिथ्या पाहणें । जीवद्वैताचेनि हननें । कार्यक्षेम नासे तेणें । जीवन्मुक्ति लाभे।।११।। म्हणसी ईशसृष्ट मृषा पाहतां । आली गुरुशास्त्रां मिथ्यता । गुरुशास्त्रावीण तत्वतां । ज्ञानलाभ कैंचा ।।१२।। साधक अबाधक ईशद्वैत । सर्व नामरूप मिथ्याभूत । दग्धपटापरी दिसत । बाधा होत बाधका ।।१३।। गुरुशास्त्र हे साधक । येणेंचि निरसें हें माइक । ब्रह्म अविनाश कळे एक । उपाय ज्ञानाचा ।।१४।।मीपणेंविण गुरुदेव । एकचि असे स्वयमेव। तरी मग द्वैतासी ठाव । उरे कोठोनी ।।१५।। जीवद्वैतहनन कैसें । तेंहि दो प्रकारेंचि असे। शास्त्रीयद्वैतें अविद्या नासे । तेंहि साधन उपयोगी ।।१६।। अहं ब्रह्म अनुसंधान । शास्त्रीय द्वैताचें लक्षण । अविद्येचें होतां हनन । तेंहि विरे ब्रह्मरूपीं ।।१७।। अशास्त्रीय जीवद्वैत । ज्ञानें होय तयाचा घात । तरीच जीवन्मुक्ति वरित । असे साधकासी ।।१८।। अशास्त्रिय जें बोलिलें । त्याचेहि दो प्रकारें मासले । कामादि तीव्रसे भासले । मनोराज्य तें मंद।।१९।। कामक्रोधादि असुर । हेचि मोक्षासी विघ्नकर । विवेक वैराग्य महावीर । क्षणमात्रें जिंकिती ।।२०।। बोधापूर्वीच हे निमाले । तरीच ज्ञान उपतिष्ठलें । दोषदृष्टीं त्यागितां पावलें । अति समाधान ।।२१।।बोधा ऊर्ध्व तरी निःशेष । निरसावे हे विशेष । बहुधा**

---

होतो.अशा प्रकारे तीन प्रकारचे नाश होत.(१०)जीवद्वैताचा(जीवसृष्टाचा)संहार करून,ईशसृष्ट सर्व मिथ्या पाहून कार्याकार्यता नष्ट होते आणि जीवन्मुक्तीचा लाभ होतो.(११)तू जर म्हणशील की,ईशसृष्ट जर खोटे ठरवले तर गुरुशास्त्रही खोटे मानावे लागेलगुरुशास्त्रावाचून ज्ञानलाभ शक्य आहे काय?(१२)ईशद्वैत साधक आणि अबाधक असे दोन प्रकारचे आहे.साधक ईशद्वैत हे अबाधक असून साधनास उपयोगी असते.त्यामध्ये सर्व नामरूप मिथ्या असून दग्ध पटाप्रमाणे दिसते.पण बाधक ईशसृष्टामुळे साधनेस बाधा येते.(१३) गुरू, शास्त्र हे साधक ईशसृष्ट असून त्यायोगाने या मायिकाचे निरसन होते.अविनाशी ब्रह्म एक आहे,हे त्यामुळे कळते. ज्ञानाचा उपायही त्यायोगे कळतो.(१४)गुरुदेव तर मीपणापासून मुक्त आहेत.ते एकमेव आहेत.त्यामुळे द्वैताला वाव कोठून उरेल?(१५)जीवद्वैताचे निरसन कसे करावे?तेही दोन प्रकारचे आहे.शास्त्रीय जीवद्वैत आणि अशास्त्रीय जीवद्वैत.शास्त्रीय द्वैताने अविद्येचा नाश होतो.तेही साधनेस उपयोगी आहे.(१६)अहंब्रह्माचे अनुसंधान हे शास्त्रीय द्वैताचे लक्षण होय.अविद्येचा घात झाल्यानंतर तीही ब्रह्मरूपात विरून जाते.(१७)दुसरा प्रकार म्हणजे अशास्त्रीय जीवद्वैताचा होय.ज्ञानाने त्याचा घात होतो. त्यानंतर साधकाला जीवन्मुक्ती प्राप्त होते.(१८)अशास्त्रीय जे आहे त्याचेही दोन प्रकार आहेत.तीव्र आणि मंद.कामादी तीव्र भासतात आणि मनोराज्यादी मंद भासतात.(१९)कामक्रोधादी आसुर गुण हे मोक्षमार्गाला विघ्नकर होत.विवेक,वैराग्य हे शूर योद्धे त्यांना क्षणात जिंकतात.(२०) ज्ञान होण्यापूर्वीच त्या कामादिकांचा निरास झाला तरच ज्ञानाची प्राप्ती होते. दोषदृष्टीने त्यांचा त्याग करताच अतिशय समाधान होते(२१) ज्ञानानंतर तरी निदान त्यांचा संपूर्ण निरास व्हावा. सर्वच श्रुती

**श्रुतीचे घोष । जीवन्मुक्तिसुखार्थ।।२२।।जरी कामादि सांडिसी । जीवन्मुक्ति-सुख पावसी। कामादि अंगिकारिसी । दृष्ट दुःख नासेना।।२३।।श्रोता म्हणे जालिया ज्ञान। मोक्ष तो नव्हे अप्रमाण । जन्ममरणाचें खंडण । ज्ञानें जालें ।।२४।। नव्हे जरी जीवन्मुक्ति। दृष्ट दुःखें न नासतीं। अंतकाळीं होय मुक्ति । इतुकेंचि पुरे।।२५।।वक्ता म्हणे ऐका वचन । अत्यंत दोष कामालागून । राहतां घडे यथेष्टाचरण । हेंचि निषिद्ध ।।२६।। ज्ञानापूर्वी कामे सळिलें । तेणें अत्यंत दुःख झाले । पुढें यथेष्टाचरणीं वर्तले । लोकनिंदा होईल ।।२७।। इहलोकीं मुक्तिसुखाचें । फळचि गेलें हातींचें । कोण जाणें मोक्षा अंतींचें । देहपातानंतरें।।२८।। जो या कामाकरितां । जीवन्मुक्ति होय त्यागितां । पुढें स्वर्गादि अपेक्षितां । विदेहमुक्ति त्यागील ।।२९।। श्रोता म्हणे स्वर्गसुखासी । नाश आहे निश्चयेंसी। त्याची अपेक्षा कायसी । स्वसुखापुढें ।।३०।। वक्ता म्हणे भले भले । स्वर्गसुख म्हणसी नाथिलें । कामादि दुष्ट दोषें भरलें । त्याची अपेक्षा करिसी ।।३१।। तत्ववेत्ता होऊनी । प्रवर्तसी यथेष्टाचरणीं । तरी श्वानसूकरादि योनी । त्याहून विशेष कोणतें ।।३२।। अहो आश्चर्य ज्ञानाचें । दुःख मोठें लोकनिंदेचें । हेंचि वैभव तत्वज्ञानाचें । तुजचि साजे।।३३।।**

---

जीवन्मुक्तिसुखासाठीच उद्‌घोष करत आहेत.(२२) जर तू कामादिकांचा त्याग केलास तर तुला जीवन्मुक्तीचे सुख प्राप्त होईल. जर तू कामादिकांचा अंगीकार केलास तर समोर पाहिलेले दुःखही नष्ट होणार नाही. (२३) श्रोता यावर म्हणतो की, ज्ञान झाल्यावर मोक्ष मिळतोच. ज्ञानानेच जन्ममरणाचेही खंडन झाले आहे.(२४) जर जीवन्मुक्ती प्राप्त झाली नाही, तर समोर पाहिलेली दुःखे फारतर नष्ट होणार नाहीत. तेव्हा निदान अंतकाळी तरी मुक्ती मिळाली तरी तेवढेही पुरेसे होईल. एवढे आश्वासन पुरे आहे.(२५) यावर वक्ता म्हणतो की,"एक विचार ऐकून घ्या.कामाच्या ठिकाणी अत्यंत दोष आहेत. काम राहिला तर यथेष्टाचरण घडते, हेच सर्वात निषिद्ध आहे. (२६) ज्ञानापूर्वी कामाने अत्यंत छळल्यामुळे अतिशय दुःख होते. त्यामुळे यथेष्टाचरणाकडे प्रवृत्ती होते. त्यामुळे लोकनिंदा होते.(२७) तात्पर्य,इहलोकीचे मुक्तिसुख हातचे गमवावे लागेल.देह पडल्यानंतर अंतीच्या मोक्षाबद्दल कोण जाणे!(२८) जो या कामाकरिता जीवन्मुक्तीचा त्याग करतो,पुढे स्वर्गादी सुखाच्या अभिलाषेकरता विदेहमुक्तीचाही तो त्याग करील"(२९) यावर श्रोता म्हणतो की,स्वर्गसुखाला निश्चितपणे नाश आहे. स्वसुखापुढे स्वर्गसुखाची अपेक्षा कशासाठी करायची? (३०) तेव्हा वक्ता म्हणतो की,"वा! वा! स्वर्गसुख लटके आहे असे म्हणतोस आणि ते नको म्हणतोस ! आणि जे कामादी अनेक दुष्ट दोषांनी भरले आहेत त्यांची अपेक्षा करतोस !"(३१) "तत्त्ववेत्ता असूनही यथेष्टाचरणाकडे प्रवृत्त होतोस ! तरी श्वान सूकर इत्यादी योनींमध्ये आणखी काय वेगळे असते?"(३२) "काय आश्चर्य आहे पहा! ज्ञान प्राप्त होऊनही लोकनिंदेचे भय बाळगतोस! हेच का तुझ्या तत्त्वज्ञानाचे वैभव?ते तुझे तुलाच शोभून दिसो!"(३३)

**आणीक एक उपपत्ति। यथेष्टाचरणनिवृत्ति । वार्षिकीं प्रवाहीं नदी वाहती । महापूर येतां।।३४।। ऊष्णकाळीं पात्र फोडिलें । ऐसें नाहीं ऐकिलें । अज्ञानीं कामादि त्यागिलें । ज्ञान जालिया राहतीना ।।३५।। तथापि वैरी कामादिक । अज्ञान कार्य हे सकळिक । राहतां ज्ञानाचा परिपाक । जालाचि नाहीं ।।३६।। शांतिरसाचें होतां पान । तृष्णेचें होय निसंतान। नित्यानंदे तृप्त पूर्ण । इच्छी कोण कामादि ।।३७।। दोषदृष्टी याचा त्याग । करुनी होईजे निसंग । देह जैसा प्रारब्धयोग । वर्तो सुखें ।।३८।। श्वानसूकरासी तुल्यता । नांगिकारीं तूं तत्ववेत्ता । जगीं पूज्य होई समस्तां । देवासारिखा ।।३९।। तुजला सुख जीवन्मुक्तीचें। शास्त्ररीती वर्ततां साचें । प्रमाण घेवून वर्तणुकीचें । जनां मार्ग लागे ।।४०।। आपण तरून जगातें तारी । तोचि ईश्वर गा निर्धारी । म्हणुनि त्याग केलाचि करी । कामादिकांचा।।४१।। अशास्त्रीय तीव्र जें जीवद्वैत । याचें हनन तो जीवन्मुक्त । परी मंद जें जीवद्वैत। तेंहि जिंकावें।।४२।।म्हणसी कामादि गेलिया। मनोजय तो कासया। अनर्थहेतु नव्हे तया । काय काज ।।४३।।हें अनर्था नव्हें कारण । प्रत्यक्ष परी परंपरेनें । कामादिकांचे बीज पूर्ण । तें हेंचि मन ।।४४।। विषय ध्यातां उपजे संग । संगे काम क्रोध**

---

यथेष्टाचरणापासून निवृत्त होण्यासाठी आणखी एक उपपत्ती आहे.पावसाळ्यात महापूर येऊन जी नदी आपल्या पात्रातून प्रवाहाने वाहू लागते,(३४) तिने उन्हाळ्यात आपले पात्र फोडले व ती दुथडी ओलांडून वाहू लागली,असे कधी ऐकले नाही.अज्ञानात ज्या कामादिकांचा त्याग केला,ते ज्ञान झाल्यावर कसे राहतील?(३५)तरीसुद्धा कामादिक हे जे वैरी आहेत ते अज्ञानातून निर्माण झाले आहेत. ज्ञानानंतर ते शिल्लक राहतात याचा अर्थ ज्ञानाचा पूर्ण परिपाक अद्याप झालाच नाही असा होतो.(३६) शांतिरसाचे पान केल्यामुळे तृष्णा समूळ नष्ट होते.नित्यानंदाने तृप्त व पूर्ण असल्यानंतर कामादिकांची कोण इच्छा करील?(३७)तेव्हा दोषदृष्टीने त्यांचा त्याग करून नि:संग व्हावे मग जसा प्रारब्धाचा योग असेल तसा देह खुशाल राहेना का?(३८) तेव्हा हे तत्त्ववेत्त्या,तू श्वानसूकरांप्रमाणे होऊ नकोस.जगात सर्वांना देवांसारखा पूज्य हो.(३९) शास्त्रात सांगितलेल्या रीतीने तू वर्तन करू लागलास तर तुलाही जीवन्मुक्तीचे सुख लाभेल आणि तुझ्या वर्तनाचा आदर्श मानून लोकांनाही मार्गदर्शन होईल.(४०)आपण तरून जो विश्वाला तारतो तोच खरा ईश्वर होय.म्हणून लोकांच्यापुढे आदर्श ठेवण्यासाठी कामादिकांचा त्याग झालेला असला तरी पुन्हा त्याग कर.(४१) अशास्त्रीय तीव्र जीवद्वैताचा नाश करणारा तो जीवन्मुक्त होतो.पण त्याचबरोबर मंद जीवद्वैतही त्याने जिंकावे.(४२)यावर असे म्हणशील की,कामादी नष्ट झाल्यावर मनोजय कशासाठी करायचा?जर ते मन अनर्थाला कारणीभूत नसेल तर त्याची फिकीर कशाला?(४३)यावर उत्तर असे की,मन हे प्रत्यक्ष अनर्थाला कारणीभूत नसेल,पण परंपरेने ते अनर्थकारक ठरते.सर्व कामादिकांचे बीज हे मनच आहे.(४४) विषयांचे चिंतन केले की आसक्ती निर्माण होते.

**मग । मोह होतां स्मृतिभंग । बुद्धिनाशें प्रणश्यति।।४५।।ऐसे परंपरा अनर्थकर। यास्तव मनोजय हाचि सुखकर । श्रोता आक्षेपी सत्वर । म्हणे विरोध दिसे ।।४६।। मनासवें कासया जावें। स्वस्वरूपातेंचि अनुभवावें। यासि मृगजलवत् पाहावें। मागें ऐसें बोलिला।।४७।। आतां मनोजय करावा म्हणतां । हाचि विरोध तत्त्वतां । वक्ता म्हणे पाहा पुरता । हाचि मनोजय ।।४८।। विषयचिंतन मात्र सांडावें । चिदचित्तादात्म्य न व्हावें । मग दिसेना कां स्वभावें । मृगजलापरी ।।४९।। हा सरूप वासनाक्षय । हाचि बापा मनोजय । सविकल्प समाधि होय । हाचि स्मृतिरूप ।।५०।। हें जीवन्मुक्तीचें लक्षण । विस्तारें पुढें निरूपण। अशास्त्रीय जीवद्वैतहनन येथें जालें ।।५१।।**

**इति श्रीमदागमसारे उपनिषत्तात्पर्यानुसारे । जीवद्वैतसंहारे । प्रथमसमासः ।।१।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास २रा – जीवन्मुक्तिलक्षण

**जीवन्मुक्तीचें श्रवण । सर्वांसी असे प्रयोजन । याचा अव्हेर करी कोण । विना पशू।।१।। जीवन्मुक्ताची स्थिति । अति आनंद ज्ञात्या प्रति । साधका मननसंपत्ति । सदृढ होय।।२।। मुमुक्षूसी वाटे मनीं। हीं चिन्हें कधीं मजलागुनी। प्राप्तिसाठीं साधनीं । नित्य नूतन श्रद्धा।।३।।**

---

आसक्तीने काम,क्रोध निर्माण होतात. क्रोधामुळे मोह निर्माण होतो आणि मोहामुळे स्मरण नाहीसे होते आणि एकदा का स्मरण नाहीसे झाले की बुद्धी नाश पावते आणि बुद्धिनाशामुळे विनाश होतो.(४५) अशा तऱ्हेने मन हे परंपरेने अनर्थकारक आहे. म्हणून मनोजय हा सुखकारक ठरतो. यावर श्रोता लगेच आक्षेप घेतो.तो म्हणतो की या तुमच्या प्रतिपादनात विरोध दिसतो.(४६) स्वस्वरूपाचा अनुभव घेत असताना मनाबरोबर जायचेच कशाला?मनाला मृगजळाप्रमाणे पहावे असे तुम्हीच म्हणालात.(४७) आणि आता मनोजय करावा असे तुम्ही म्हणत आहात! हाच विरोध होय. यावर वक्ता म्हणतो की,नीट पहा.अरे स्वरूपचिंतन हाच मनोजय होय.(४८) विषयांचे चिंतन तेवढे सोडून द्यावे. चित् आणि अचित् यांचे तादात्म्य होऊ देऊ नये.मग खुशाल ते मृगजलाप्रमाणे दिसेना का?(४९) हा सरूप वासनाक्षय होय.हाच मनोजय होय. यालाच स्मृतिरूप सविकल्प समाधी म्हणावे.(५०) हे जीवन्मुक्तीचे लक्षण होय.याचाच विस्तार पुढे करू. येथे अशास्त्रीय जीवद्वैताचे निरसन कसे करावे हे येथे सांगून झाले.(५१)

### पंचिका १०वी, समास २रा - जीवन्मुक्तिलक्षण

जीवन्मुक्तीचे श्रवण सर्वांनीच करावे. ते सर्वांनाच उपयोगी आहे. पशूखेरीज दुसरा कोण मानवप्राणी त्याचा अव्हेर करील?(१) जीवन्मुक्तीच्या स्थितीच्या श्रवणाने ज्ञात्याला अतिशय आनंद होतोच,पण साधकाचीसुद्धा मननसंपत्ती दृढ होते.(२) मुमुक्षूला वाटते, ही चिन्हे आपल्याला कधी प्राप्त होतील?

**बद्ध जरी हे ऐकतां । क्षणभरी पस्तावती चित्ता। तयासीही अनुताप होतां। मुमुक्षा उपजे।।४।। हटयोगी जरी जाले । जीवन्मुक्तीसी अंतरले । तयासी ऐसें जरी कळलें । म्हणती कष्टलों व्यर्थ ।।५।। असो हा सर्वांचा विषय । मुमुक्षुसाधकां हाचि उपाय । जीवन्मुक्ता संचारु होय । तोचि अवधारा ।।६।। साधकसिद्धां नाहीं भेद । करणें हा साधका छंद । निःसंशय सिद्ध निर्द्वंद्व । सहजस्थिति ।।७।। गेली अवघी तळमळ । आनंदें डुले सर्वकाळ। तिहीं अवस्थेसी कल्लोळ । समाधिसुखाचे ।।८।। आत्मा ब्रह्म परिपूर्ण । कैचें समाधि उत्थान । त्याहून आपण असावें भिन्न । तरी अवस्थांतर होतें।।९।। आतां करणें ना धरणें। पाहणें ना ऐकणें । चालणें ना बोलणें । तेंहि नाहीं।।१०।। निद्रा ना आहार । स्वप्न ना जागर । बैसणें ना व्यापार । तेंहि नाहीं ।।११।। इंद्रिय विषय देवता। भिन्नपणें कैची आतां । अंतःकरण प्राणां समस्ता । एकरस जालें ।।१२।। तोंवरी अलंकारा मासले । जों मुसेंत नाहीं साठवले । अग्निसंगें जरी आटिले । तरी मग सुवर्ण ।।१३।। जेव्हां होती अलंकार । सुवर्णचि आंत बाहेर । हा वाचारंभण प्रकार । नामरूपाचा।।१४।।**

---

त्यामुळे ती प्राप्त करण्यासाठी साधनांच्या ठिकाणी तो नित्य नवी श्रद्धा बाळगत जातो.(३) बद्धांनी जर ती ऐकली तर त्यांना क्षणभर पश्चात्ताप वाटू लागतो आणि त्यांनासुद्धा पश्चात्तापामुळे मुमुक्षा उत्पन्न होते.(४) जर हठयोग्यांनी जीवन्मुक्तीची स्थिती ऐकली तर स्वत: जीवन्मुक्तीच्या अनुभवाला अंतरल्यामुळे त्यांना दु:ख होते आणि ते म्हणू लागतात,"इतके दिवस आपण उगाचच कष्ट उपसत होतो."(५) असो,हा सर्वांचाच विषय आहे. मुमुक्षू, साधक यांना हाच एक मार्ग आहे. जीवन्मुक्तांचा याच अवस्थेत संचार असतो. म्हणून त्याचे स्वरूप ऐका.(६) साधक आणि सिद्ध यात भेद नाही. साधक कार्य करत असतो, त्याचा तोच एक छंद असतो आणि सिद्ध हा नि:संशयपणे निर्द्वंद्व सहजस्थितीत असतो. (७) त्याची सर्व तळमळ नष्ट होऊन तो सर्वकाळ आनंदाने डुलत असतो. तिन्ही अवस्थांमध्ये त्याच्यावर समाधिसुखाचे कल्लोळ दाटत असतात.(८) आत्मा परिपूर्ण ब्रह्म असून त्याच्या ठिकाणी समाधी कसली आणि उत्थान कसले? आपण त्याहून भिन्न असतो तर असे अवस्थाभेद झाले असते.(९) आता काही करणे नाही, की धरणे नाही; पाहणे नाही की ऐकणे नाही; चालणे नाही किंवा बोलणे नाही, काहीच क्रिया नाही.(१०) निद्रा नाही, आहार नाही; स्वप्न नाही की जागृती नाही; बसून राहाणेही नाही अथवा व्यापार करणेही नाही; काहीच नाही.(११) इंद्रिये, विषय, देवता आता भिन्न कशी असतील?अंत:करण, सगळे प्राण हे सगळे एकत्र येऊन एकरस झालेले असतात.(१२) अलंकार मुशीत आटवले नाहीत तोपर्यंत वेगवेगळे वाटतात. पण अग्नीच्या संपर्काने ते आटवले की सगळेच सोने होऊन जाते.(१३) जेव्हा ते अलंकारस्वरूपात येतात तेव्हाही त्यांच्यात अंतर्बाह्य सोनेच असते. सोन्याला अलंकार असे म्हणणे म्हणजे नामरूपांचा शब्दांनी बोलण्याचा प्रकार होय. (वाचारंभण).(१४)

**माझे अस्तित्वें भरले । माझे स्फुरणें दिसूं लागले । पृथक्सत्व कैचें आलें । यासि मजवांचुनी ।।१५।। आतां मीच सदोदित । देहगेहा मी नातळत । शुद्धबुद्ध मी अनंत । अवस्था मज केवी ।।१६।। देहासि घडे व्यापार । म्हणसि कैसा निर्विकार । येविशींचे उत्तर । सावध ऐका ।।१७।। तरंग जळेंविण न राहे । तरंगीं पाहतां पाणीच आहे । परी तरंग अवस्था साहे । जळासि केवी ।।१८।। मज वांचून प्राणादिकासी । असणेंचि नाहीं निश्चयेसी । माझें सदत्व या सर्वांसी । सारिखें असे ।।१९।। परी त्या त्या नामरूपात्मकाचे। धर्म मजलागी न वचे । सुखदुःख उद्भवलयाचे । ज्याचे त्या विकार।।२०।।मी विकारापूर्वी आहे । विकार होतां जाणताहें । लया जातां असतची आहें । असण्यानसण्याविण।।२१।। म्हणुन मी सर्वातीत। व्यापून धर्म धर्मीसहित । या सर्वांसी येतां अंत । मी जैसा तैसा।।२२।। अवस्था धर्म बुद्धि धर्मी । जागृति स्वप्नातें नेमी । अथवा लीनत्वें अज्ञान तमीं । सुषुप्तीं बुद्धीसी ।।२३।।जागृतींच्या व्यापारीं । इंद्रियें धावती विषयावरी । धर्मिधर्मत्वें निर्धारी । भिन्न भिन्न असती ।।२४।। श्रोत्र-शब्द-वाचे-तें । अधिष्ठिलें मिया त्यातें । परी ऐकणें बोलणें मातें । स्पर्शलें नाहीं ।।२५।। त्वचा स्पर्श पाणी । वेगळें कैचे मजवाचुनी । परी**

---

हे सर्व माझ्या अस्तित्वाने व्यापले आहे. माझ्या स्फुरणामुळे ते सर्व मला दिसताहेत. माझ्यावाचून त्यांना वेगळे अस्तित्व कसे येईल?(१५) मीच नेहमी असणारा असून देह, घर इत्यादींनी मी बंदिस्त होणारा नाही. मी त्यांच्या पलीकडचा आहे. मी शुद्ध, बुद्ध आणि अनंत असून मला अवस्था कशा असतील?(१६) आता देहाचे व्यापार होताना दिसत असूनही आपण निर्विकार आहोत असे कसे म्हणतोस, असे म्हणशील तर त्याचे उत्तर ऐक.(१७) लाटा पाण्यावाचून राहात नाहीत. पण लाटात पाहता पाणीच असते. पण अवस्था तरंगांचीच असते. जळाची नसते.(१८) माझ्यावाचून प्राणादिकांना अस्तित्व खात्रीपूर्वक नसते. त्या सर्वांना माझेच अस्तित्व (सदत्व) व्यापून असते.(१९) पण नामरूपात्मक विकारांचे गुणधर्म मला लागत नाहीत. सुख, दुःख, उद्भव, लय हे विकार ज्याचे त्याला बाधतात. मला नाही.(२०) मी विकारापूर्वी होतो, विकार होत असताना त्यांना जाणत होतो, विकार लयाला जाताच मी असण्यानसण्याच्या अवस्थांवाचून अस्तित्वात असतोच.(२१) म्हणून मी धर्म आणि धर्मी या सर्वांना व्यापून त्या सर्वांच्या अतीत आहे. त्या सर्वांचा अंत झाला तरी जसाच्या तसा राहतो.(२२) अवस्था ही धर्म असून बुद्धी ही धर्मी असते. जागृती, स्वप्न या अवस्था तीच नेमते आणि सुषुप्ती अवस्थेत ती अज्ञानरूपी अंधकारात लीन होऊन जाते. तेव्हा या तिन्ही अवस्था बुद्धीच्याच होत.(२३) जागृतीच्या व्यापारात इंद्रिये विषयावर धाव घेतात. त्यावेळी धर्म व धर्मी वेगवेगळे असतात.(२४) मी श्रोत्र, शब्द, वाचा यांना अधिष्ठून असतो. पण ऐकणे, बोलणे यांचा मला स्पर्श होत नाही. मी त्यांच्या पलीकडचा आहे.(२५) त्वचा, स्पर्श, हात हे माझ्यावाचून वेगळेपणाने कसे असतील? पण स्पर्शत्व,

**स्पर्शत्वग्रहणदानीं । नातळेंचि मी ।।२६।। चक्षु पाद आणि रूपातें। व्यापिलें मिया अनंते। परी पाहणें चालणें मातें । किमपि नाहीं।।२७।। रसना उपस्थ मात्र रस । मजमाजीं असे वास । परी अन्नपानरतिसुखास । मज संबंध असेना ।।२८।। घ्राण गुद गंध विषय । माझा सर्वत्रीं अन्वय । सुगंध विसर्ग जो होय । मज काय तेणें ।।२९।। जन्ममृत्यु धर्म शरीराचे। तैसेचि बाल्यादि अवस्थेचे। मज भय काय असे त्याचें। मज म्यां ओळखितां।।३०।। क्षुधा तृषा प्राणधर्म। तेणें देहाची पुष्टि परम। मी तो परिपूर्ण आत्माराम। स्थूळ रोडनव्हे।।३१।। मनोधर्म मोह शोक। अविवेकेंचि वाहतसे धाक। मी केवळ निष्कलंक । चंचलत्व नाहीं।।३२।। वर्ण आश्रम मज कैचा। अवघा जोजार स्थूलाचा। तेणेंविण कर्मधर्माचा। कर्ता मी नव्हे।।३३।। अंतःकरण हें प्रमाण। इंद्रियद्वारा विषयग्रहण। यास्तव प्रमाता अभिधान। आभासा आलें।।३४।। तया कर्ता भोक्ता आरोप । यथार्थ नव्हे जीवासि रूप । तरी माझा ठाई आपेआप । न बोलतां अकर्तृत्व ।।३५।। मी करी ना करवी । भोगी ना भोगवी । हले ना हलवी । चंचळपणें ।।३६।। जागृति स्वप्न आणि सुषुप्ति । अथवा समाधि ज्यातें म्हणती । मजसी संबंध अर्थाअर्थी । कल्पांती नाहीं ।।३७।। व्यापार व्हावा कीं राहावा।**

---

ग्रहण, दान यांच्या मी पलीकडेच असतो.(२६) चक्षू, पाय आणि रूप यांना अनंत अशा मीच व्यापून टाकले आहे.पण पाहणे, चालणे या क्रिया माझ्या नाहीत.(२७) जीभ,शिश्न,मात्रा,रस हे सर्व माझ्यामध्येच राहतात.पण अन्नग्रहण,पिणे,रतिसुख यांचा माझ्याशी काही संबंध नाही.(२८) तसेच घ्राण, गुद, गंध या सर्वांच्या ठिकाणी माझाच संबंध असूनही जो विसर्ग अथवा सुगंध निर्माण होतो,त्याचे मला काय?(२९) जन्म,मृत्यू हे शरीराचे धर्म होत. त्याचप्रमाणे बाल्यादी अवस्थांच्या बाबतीत म्हणता येईल.पण एकदा मला माझी ओळख पटली की मला त्यांची कसली भीती?(३०) क्षुधा,तृषा हे प्राणधर्म असून त्यांमुळे देहाचे पोषण होते.मी मात्र परिपूर्ण असा आत्माराम आहे. स्थूल,रोड ही विशेषणे मला लागू नाहीत.(३१) मोह,शोक हे मनोधर्म असून केवळ अविवेकाने मी त्यांचा धाक बाळगत होतो.मी केवळ निष्कलंक असून चंचलत्वादी गुणधर्म माझ्या ठिकाणी नाहीत.(३२) वर्ण, आश्रम हे मला कुठले?हा सगळा स्थूलाचा पसारा आहे.मी त्यापासून अलिप्त असून कर्मधर्म इत्यादीचा मी कर्ता नाही.(३३) अंतःकरण हे प्रमाण (साधन) असून इंद्रियांच्या द्वारा जीव विषयांचे ग्रहण करतो. त्यामुळे चिदाभास जो जीव त्याला प्रमाता असे म्हणण्यात येते.(३४) त्याच्यावरच कर्ता,भोक्ता इत्यादी आरोप केले जातात. जीवाचे हे खरे स्वरूप नाही. माझ्या ठिकाणी मात्र न बोलता सहजच अकर्तृत्व आले आहे.(३५) मी करत नाही किंवा करवीतही नाही,मी भोगत नाही किंवा भोगवीतही नाही, मी चंचलपणे हलत नाही किंवा हलवीत नाही,(३६)जागृती,स्वप्न,सुषुप्ती अथवा जिला समाधी म्हणतात,त्यांचा आणि माझा कल्पान्तापर्यंत देखील अर्थाअर्थी संबंध येणार नाही.(३७) व्यापार होवोत अथवा राहोत,

**देह दुःखी कीं सुखी व्हावा । जन्मतां मरतां असावा । संबंध मज केवी ।।३८।। एक पिंडीचा मासला। स्वानुभवें जाणीतला। हा ब्रह्मगोळ अवघा व्यापला। म्याचि व्यापकत्वें।।३९।। एक देही असुनी । लिप्त नव्हे देहाचरणीं । तैसा सर्व ब्रह्मांडभुवनीं । व्यापून अलिप्त।।४०।। मी सुखदुःखा नातळें । पापपुण्यासी निराळे । चंचळ जळीं प्रतिबिंब चळे । मुख्य बिंब ते चळेना ।।४१।। कोठें चंचळ कोठें निश्चळ । परि मी एकलाचि असे सकळ । व्यापोनि अलिप्त केवळ । आकाश जैसें ।।४२।। हेचि पुढें निरूपण । श्रोते ऐकोत सावधान । एक पिंडींचे विवेचन । स्वानुभवें केलें ।।४३।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । जीवन्मुक्तिलक्षणप्रकारे द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - ब्रह्मांडतादात्म्यप्रकार

**पुढती जीवन्मुक्त लक्षण । सविकल्पात्मक जाण । सकळ ब्रह्मांडीं आपण । ब्रह्मगोळ आपणांत ।।१।। मीतूंपण आटिलें निजरूपीं । माझें तुझें साठविलें मापीं । क्रीडे कैसा स्वस्वरूपीं । आपपर नेणतां ।।२।। जें जें तत्व दिसतें । नामरूप निस्तत्व वाटतें । अस्तिभाति संचलें तें । दुजे आढळेचि ना।।३।।पृथ्वीवरी चालतां चरणीं। आपुली आपणा**

---

देह दुःखी असो की सुखी, जन्मो की मरो, माझा त्यांच्याशी काय संबंध?(३८) एका पिंडाचा हा स्वानुभव जाणून घेतला, पण हा सर्व ब्रह्मगोल माझ्या व्यापकत्वामुळे मी व्यापून टाकला आहे !(३९) एका देहात असूनसुद्धा देहाच्या आचरणापासून मी अलिप्त आहे, तसा सर्व ब्रह्मांडभुवन व्यापूनही मी अलिप्त आहे.(४०) मी सुखदुःखांच्या पलीकडे आहे, पापपुण्यांपासून निराळा आहे. चंचल पाण्यात प्रतिबिंब हलते,मुख्य बिंब मात्र अचल असते. (४१) बिंब क्वचित चंचल असते, क्वचित निश्चल असते, पण मी मात्र एकटाच असून सर्व व्यापून आकाशाप्रमाणे अलिप्त असतो.(४२) हेच निरूपण श्रोत्यांनी पुढील समासात सावधानपणे ऐकावे. हे एका पिंडाचे विवेचन स्वानुभवाने केलेले आहे.(४३)

### पंचिका १०वी, समास ३रा - ब्रह्मांडतादात्म्यप्रकार

यापुढे जीवन्मुक्ताचे लक्षण सांगावयाचे आहे.ते सविकल्पात्मक आहे.सर्व ब्रह्मांडात आपणच व्यापलेले असून सर्व ब्रह्मगोल आपल्यातच सामावलेला आहे,असा हा अनुभव आहे.(१)त्याने मी-तूपण ही भावना आत्मरूपात आटवून टाकलेली असते आणि माझे-तुझेपणाची भावना मापात बंदिस्त करून टाकलेली असते आणि त्यामुळे आपले परक्याचे असा भेद न ठेवता तो स्वस्वरूपात क्रीडा करतअसतो.(२)जे जे तत्त्व नामरूपात्मक आढळते ते त्याला निस्तत्त्व म्हणजे असार वाटू लागते.ते तत्त्व अस्ति भातिमध्ये सामावलेले आहे असे त्याला जाणवते.अस्तिभातिशिवाय त्याला दुसरे काही आढळतच नाही.(३)

**होय घसणी । पाय ठेवितां उचलोनी । तळीं ब्रह्म ।।४।। पृथ्वीचें कठिणत्व विरालें । चरण गमनासी विसरले । त्रैलोक्य पलाटण जरी केलें । तरी ठाईचा ठाई ।।५।। आपीं देह बुचकळिला। आपण ओतप्रोत संचला। हे पाणी हा देह विसरला। तरी स्नान कैचें।।६।। अग्नि धडधडी रक्तवर्ण । आपण वर्णरहित अवर्ण । आंत बाहेरि व्यापून । अग्नित्व नाम सांडिले ।।७।। तेज आप तिजें अन्न । तीनच भूतें संपूर्ण । हें छांदोग्यश्रुतीचें वचन । यापासून चराचर ।।८।। जितके भौतिक समस्त । तेथें तिन्हीं भूतें मिश्रित । तेज रक्त आप श्वेत । पृथ्वी कृष्ण ।।९।। जड चंचल सकळिक । शीत उष्णप्रकाशक । तेथें तिहींचे रूपक । तिहीं वर्णीं ।।१०।। चंद्रसूर्य तारांगण । औषधी धातू संपूर्ण । स्थावर जंगमें भिन्न भिन्न । नामरूप जितुकें ।।११।। कृष्ण तितुकें अन्नाचें । श्वेतरूप तें आपाचें। रक्त जाणिजे तेजाचें । कार्यजात ।।१२।। तिहींचे रूप निवडिलें। नामरूपा निस्तत्व आलें। वाचारंभण श्रुति बोले । तिन्हींच सत्य ।।१३।। सर्व मिथ्या कळावें । तिहीमाजीं**

---

पृथ्वीवर पायांनी चालत जात असताना आपणच आपल्याला घासत चाललो आहोत असे त्यालावाटते. एक पाऊल उचलून पुढे टाकावे तो आपल्या पायाखाली ब्रह्म सापडले आहे असे त्याला जाणवते.(४) त्याच्यासाठी पृथ्वीचे कठीणपण विरून जाते. पाय चालायचे विसरतात. त्याने त्रैलोक्याचे पर्यटन जरी केले तरी आपण जेथे होतो तेथेच आहोत असे त्याला वाटते.(५) पाण्यात देह बुचकळला तरी आपणच सर्वत्र ओतप्रोत भरून राहिलो असून आपल्यापेक्षा निराळे असे हे पाणी आहे, हे त्याचा देह विसरूनच जातो. मग त्याला स्नान कुठले?(६) अग्नी प्रखर असून रक्तवर्ण असतो. पण आत्मरूप मात्र वर्णरहित बिनरंगाचे असते. ते आतबाहेर सर्वत्र व्यापून असल्यामुळे अग्नीचे वेगळे नाव त्याने टाकूनच दिलेले असते.(७) तेज,पाणी आणि अन्न(पृथ्वी)ही तीनच भूते सर्वत्र व्यापलेली आहेत असे छान्दोग्य उपनिषद (श्रुती)सांगते आणि या तीन भूतांपासून सर्व चराचरविश्व निर्माण झाले असे ती श्रुती सांगते.(८) जेवढे म्हणून भौतिक (भूतांपासून उत्पन्न झालेले आहे ते) म्हणून जे जे काही आहे ते सर्व या तिन्ही भूतांनी मिश्रित आहे. तेज लाल असते, आप (पाणी) पांढरे शुभ्र असते आणि पृथ्वी कृष्ण (काळी) असते. हे तिन्ही वर्णच त्या भौतिक पदार्थात आढळतात.(९) सगळे जड,चंचल,शीत,उष्ण,प्रकाशक असे जेवढे म्हणून पदार्थ आढळतात त्यांच्या ठिकाणी याच तीन भूतांचे रूप आढळते. यांच्याच तीन वर्णांनी ते पदार्थ व्यापलेले असतात.(१०) चंद्र,सूर्य,तारांगण,सर्व औषधी धातू,भिन्न भिन्न स्थावर पदार्थ,जंगम जीव असे जेवढे म्हणून नामरूपात्मक आहे,(११) त्यांतील जेवढे म्हणून कृष्ण वर्णाचे आहे ते सर्व अन्नाचे (म्हणजे पृथ्वीचे);शुभ्रवर्णाचे ते आपाचे(जलाचे)आणि रक्त म्हणजे लाल ते तेजाचे कार्य आहे, असे जाणावे.(१२) या तीन तत्त्वांचे रूप कळल्याबरोबर सर्व नामरूप व्यर्थ होते.श्रुती सांगते की ती सर्व नामरूपे म्हणजे वाणीचे विकार होत.तेव्हा वरील तीन भूतेच तेवढी सत्य होत.(१३)

**समरसावें । पुढें तिहीं भूतांचें जाणावें । रूप कैसें।।१४।।एकमेकां संहारिती । पाहतां नासे हे प्रतीति। सत्यत्वें प्रतिपादी श्रुति । तरी लय बोलतीना ।।१५।। आणि तैसाचि अनुभव । सद्रूपेंवीण कैचा ठाव । विवेकें कळतां रूपनांव । निस्तत्वरूप।।१६।।तिहीं भूतांसी मिथ्यात्व आलें। भौतिकें तैसींच होती फोलें। सत्य सत्यत्वें उरलें । निस्तत्वेंविण।।१७।। आतां चंचळ आणि अवकाश । हेचि माया शून्य फोस । निश्चळीं आकाश वायूस । रिगचि कैसा।।१८।।समुद्रामाजी लवण। राहे जरी घर बांधून । तरीच वायू आणि गगन। स्वस्वरूपीं राहे।।१९।।जोंवरी पाणियासी वेगळें। तोंवरी लवण राहिलें । जोंवरी स्वरूप नाहीं कळलें। तोवरी गगन वायू।।२०।।परब्रह्मीं होतां अभिन्न । अवकाश आणि चंचलपण। निस्तत्वें उरे सद्रूपाविण । जळेंवीण तरंग जैसा।।२१।।असो ऐसा जीवन्मुक्त। परब्रह्मीं असे क्रीडत । ऊर्णनाभि तंतु सृजित । आणि विहरत एकला ।।२२।। होतां वृत्तीचें स्फुरण। सर्व जगा करी निर्माण। शेवटीं वृत्तींत साठऊन। तेहि ग्रासून आपण उरे।।२३।।**

---

अशा तऱ्हेने सर्व मिथ्या आहे, असे कळावे आणि या तीन भूतांमध्येच सगळ्यांचा समावेश होतो, हे कळावे आणि त्यानंतर या तीन भूतांचे रूप कसे आहे ते जाणून घ्यावे.(१४) ही तीन भूते एकमेकांचा संहार करतात, शेवटी ती नष्ट होतात अशी प्रतीती येते. श्रुतीने हे सर्व सत्यत्वानेच सांगितले आहे. अन्यथा तिने त्यांचा लय सांगितला नसता.(१५) आणि अनुभवही तसाच आहे. विवेकाने सर्व नामरूप हे मिथ्या आहे, असे कळल्यानंतर एका सद्रूपावाचून त्यांना अस्तित्व कसे असेल?(१६) अशा प्रकारे तिन्ही भूते मिथ्या ठरली. त्या भूतांपासून निर्माण झालेले सर्व भौतिक पदार्थही त्याचप्रकारे व्यर्थ ठरतात आणि शेवटी सत्य हे सत्यच ठरते. सर्व मिथ्या पदार्थांचा त्यावेळी अभाव होतो.(१७) आता चंचल आणि अवकाशयुक्त जे असेल तीच माया होय. ती खरी शून्य आणि फोस आहे. तिला ब्रह्माच्या ठिकाणी प्रवेश नाही, आकाश हे सावकाश (अवकाशयुक्त) असते, आणि वायू चंचल असतो. मायेचे दोन्ही गुणधर्म या दोहोंच्या ठिकाणी असल्यामुळे त्यांनाही ब्रह्ममध्ये प्रवेश नाही.(१८) मिठाचा समुद्रामध्ये घर बांधून राहण्याचा प्रयत्न जर यशस्वी झाला तरच वायू आणि आकाश स्वस्वरूपात (ब्रह्मात) राहतील.(१९) मीठ जोपर्यंत पाण्यापासून वेगळे असते तोपर्यंतच त्याला स्वतंत्र अस्तित्व असते. त्याप्रमाणे स्वरूप जोपर्यंत कळले नाही, तोपर्यंतच आकाश आणि वायू अस्तित्वात असतात.(२०) आकाश आणि वायू परब्रह्मात अभिन्नपणे विलीन होताच अवकाश आणि चंचलत्व हे गुणधर्म पाण्यावाचून जशा लाटा त्याप्रमाणे सद्रूपाअभावी अस्तित्वशून्य होतात.(२१) असो तर कोळी नावाचा किडा (ऊर्णनाभी) तंतू निर्माण करतो आणि एकटाच विहार करतो, त्याप्रमाणे जीवन्मुक्त परब्रह्मामध्ये विहार करत असतो.(२२) वृत्तीचे स्फुरण होताच तो सर्व जगाची निर्मिती करतो. शेवटी त्या सर्व जगाची वृत्तीत साठवण करून, अखेर तेही ग्रासून (गिळंकृत करून) पुन्हा आपण एकटाच उरतो.(२३)

**ऐसें चराचर आपणांत । आपणचि ब्रह्मांडीं वर्तत । नामरूपाचा करुनि घात । एकरस स्वानंदीं ।।२४।। ब्रह्मांड वृत्तींत साठवलें । कीं सप्तावर्णापरी वेष्टिलें । जैसे समुद्रीं राहिले । नाना जलचर ।।२५।। ऐसें अनंत ब्रह्मांड । रेणू ऐसे उदंड। वृत्तींत करिती बुडबुड । निस्तत्त्वपणें ।।२६।। गवसणी अनंत ब्रह्मांडाची । मर्यादा नव्हे कीं वृत्तीची । मग केवळ निरावलंबाची । केवि बोलावी ।।२७।। अंत नव्हे म्हणोनि अनंत । ऐसा श्रुतीचा संकेत । ब्रह्मांडें जैसीं सागरांत । बुदबुद फेण ।।२८।। आपणावीण कांही नाहीं । आपणचि असे सर्वदाही । आतां नाहीं आहे कांहीं । बोलावे लागे ।।२९।। आपुलिये निजस्वरूपीं । वृत्ति एकदेशी आरोपी । तया वृत्तिचिये मापीं । साठवलीं ब्रह्मांडे ।।३०।। एका ब्रह्मांडाच्या पोंटीं । अनंत पिंडांची दाटी । त्यांतील एक पिंडाची रहाटी । मी मी हे कोणेपरी ।।३१।। मी मी होतां लहाणाळला । वाढत वाढत शेवटा गेला । अवधि सरतां मावळला । दीपु जैसा ।।३२।। आधीं एकपणें सांडिलें । मग बहुपणीं पैसावलें । एक बहु एकीं आटलें । एकपणेंविण ।।३३।। आकाश राहिलें घटीं । घट आकाशाचे पोटीं।**

---

अशा प्रकारे सर्व चराचर आपणात सामावून आपणच सर्व ब्रह्मांडात व्यापून, नामरूपांचा घात करून स्वानंदात एकरस होऊन तो राहतो.(२४) सर्व ब्रह्मांड त्याच्या वृत्तीत साठवलेले असते किंवा समुद्रात अनेक जलचर जसे राहतात त्याप्रमाणे त्याच्या वृत्तीने पृथ्वीच्या सात आवरणाप्रमाणे सबंध ब्रह्मांड वेढून घेतलेले असते आणि ते त्या जलचरांप्रमाणे त्याच्या वृत्तीत राहत असते.(२५) अशा प्रकारे अनेक ब्रह्मांडे असंख्य धूलिकणांप्रमाणे त्याच्या वृत्तीत व्यर्थपणे बुडबुड करत असतात.(२६) अनंत ब्रह्मांडांना गवसणी घालण्यापुरतीच त्याच्या वृत्तीची मर्यादा नसते. मग निरावलंब ब्रह्माची ती मर्यादा कशी सांगता येईल? (२७) त्याला अंत नाही म्हणून ते अनंत आहे. असा श्रुतीचा संकेत आहे. समुद्रात ज्याप्रमाणे बुडबुडे किंवा फेस असतो त्याप्रमाणे ब्रह्मांडे त्यात राहतात.(२८)आपल्यावाचून काहीही नाही आपणच एकटे सर्वकाळ असतो अशी जीवन्मुक्ताची अवस्था असते. त्याच्या बाबतीत काही आहे अथवा नाही असे बोलावेच लागत नाही.(२९)त्याने आपल्या निजस्वरूपाच्या एका भागात वृत्तीची स्थापना केलेली असते आणि त्या वृत्तीच्या मापट्यामध्ये ब्रह्मांडे साठवलेली असतात.(३०) त्यांपैकी एकेका ब्रह्मांडाच्या पोटात अनंत पिंडांची दाटी असते.त्यातील एका पिंडाने'मी मी'करत व्यवहार करणे हे किती क्षुद्र असेल!(३१) तो पिंड'मी मी'म्हणत होता त्यावेळी तो खूप क्षुद्र झाला.पण तोच पिंड वाढत वाढत शेवटपर्यंत जाऊन पोहोचला आणि आपली मर्यादा किंवा मुदत संपताच दिवा विझावा त्याप्रमाणे अस्तंगत झाला.(३२) आधी एकपणा धारण करून सर्व ब्रह्मांड त्याने बाजूस सारले. नंतर बहुपणा स्वीकारून तो विस्तारत गेला. एक होता तो बहु झाला,पुन्हा शेवटी एकपणावाचून एकातच ते एक आणि बहू (पुष्कळ,व्यापक) सर्व आटून गेले.(३३) आकाश घटात राहिले. घट आकाशाच्या पोटात

**पिंड ब्रह्मांडीं ब्रह्माची दाटी । ब्रह्मी राहाटी सर्वांची ।।३४।। घट जैसा आकाशीं फिरे । तैसा जीवन्मुक्त वावरे । आकाशापरी निश्चय बारे । ज्ञानी अखंड।।३५।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ब्रह्मांडतादात्म्यप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - सविकल्पसमाधिप्रकार

**परब्रह्मीं नित्य विचरती। परी तयासी न जाणती। शयनप्राय ते सुषुप्ति। कलिप्राय तो बद्ध।।१।।तें परब्रह्म जाणावें । ऐसें इच्छी मनोभावें । शयनींच जागृतीं यावें । तोचि द्वापार मुमुक्षु।।२।।श्रवणमननें ब्रह्म जाणें । निदिध्यासें अपरोक्ष होणें । साधनीं संपन्न साधकपणें। उठिला तो त्रेतायुग।।३।।साधनें संपून साध्य झाला । परब्रह्मीं संचरे एकला। तोचि जीवन्मुक्त बोलिला। कृतयुग तें[६६]।।४।।सर्व जन जेथें जागती । तेथें जयासी आली सुषुप्ति। जन जेथें शयन करिती। तेथें जागृति अखंड[६७]।।५।।सर्वांसि जें अगोचर। तेथेंचि जयाचें बिढार। सर्वांचा जेथे विहार। वमकापरी तें त्यागिलें ।।६।। सर्वांहूनी विलक्षण ।**

---

राहिल. पिंड ब्रह्मांडात ब्रह्म व्यापून राहिले आणि त्या ब्रह्मात सर्व ब्रह्मांडे वावरू लागली.(३४) घट ज्याप्रमाणे आकाशात वावरतो. त्याप्रमाणे जीवन्मुक्त वावरतो. ज्ञानी पुरुष आकाशाप्रमाणे अखंड असतो.(३५)

## पंचिका १०वी, समास ४था - सविकल्पसमाधिप्रकार

परब्रह्मामध्ये नित्य संचार करूनही त्याला जे जाणत नाहीत ते बिछान्यावर झोपलेल्या माणसाप्रमाणे सुषुप्तिअवस्थेतच असतात. असा माणूस कलियुगाप्रमाणेच बद्ध होय.(१) ते परब्रह्म जाणून घ्यावे, अशी मनोभावे इच्छा करतो, तो मुमुक्षू होय. बिछान्यावर असून जागा झालेल्या माणसाप्रमाणे तो असून द्वापार युगाप्रमाणे त्याची स्थिती असते.(२) श्रवणमननाच्या योगाने ब्रह्म जाणावे, निदिध्यासाने त्याचे अपरोक्ष (प्रत्यक्ष) ज्ञान व्हावे असे ज्याला वाटते आणि साधनांनी जो संपन्न असतो तो अंथरुणावरून उठून कामाला लागलेल्या माणसाप्रमाणे असून तो साधक होय. त्याची स्थिती त्रेतायुगाप्रमाणे असते.(३) यापुढे साधने संपली आणि तो स्वतःच साध्यरूप बनला आणि परब्रह्मामध्ये एकटाच संचार करू लागला की तो खरा जीवन्मुक्त होतो. त्यावेळी त्याची स्थिती कृतयुगासारखी असते.(४) सर्व लोक जेथे जागृत असतात (लौकिक व्यवहारात रस घेत असतात) तेथे हा जीवन्मुक्त सुप्त दशेत असतो आणि लोक जेथे शयन करतात (पारमार्थिक विषयाकडे पाठ फिरवतात) तेथे हा अखंड जागृती (सावध, दक्ष) भोगत असतो.(५) सर्वांना जे स्थान अदृश्य असते, तेथे त्याची वसती असते. आणि सर्वसामान्य लोक जेथे विहार करतात, ते स्थान त्याने ओकलेल्या पदार्थाप्रमाणे टाळलेले असते.(६)

**विवेकें निघाला आपण । जनसमुदाय गेला टाकुन । ऐसेंहि न घडे।।७।।मथून नवनीत काढिलें। परी तक्रींच जैसे ठेविलें । पुन्हा जरी एक केलें । तरी नव्हे कल्पांती।।८।।तैसा जनसमुदाईं ज्ञाता। अलिप्त राहे जनीं वर्ततां। वर्तणूक तयाची तत्वतां । यथामति बोलूं।।९।।नामरूपातें सांडिलें। अस्तिभाति कोंदाटलें। म्हणे मीचि मातें देखिलें। नवल माझें।।१०।।अहो मज माझा नमस्कारु।माझा मीच जाणे बडिवारु। वाहा वाहाजी सद्गुरू। मी मज चोजविला[६८]।।११।।नेणों माझें अज्ञान। कोठें गेलें संपूर्ण। ज्ञानें ब्रह्मांडादि जाळून। राखोंडी केली।।१२।।मी येवढा घनदाट। कीं अणूसी नव्हे वाट। ओतप्रोत आणि अविट[६९]। काहींचा बाही।।१३।।परि मी दिसेना कोणासी । ब्रह्मादि कष्टतां सायासी । माझा मी अखंडैकरसीं। परिपूर्ण अनंत।।१४।।माझा मज अंत कळेना। मज कोण आणितो अनुमाना। असो तैसा अंतःकरणा । न चोजवें[७०] मी ।।१५।। तेथें जिव्हा हे चामडी । केउती पा बडबडी । परेनें मारिली दडी । जाणीव सांडुनी ।।१६।। जें कां ज्ञानासी चोरिलें। तरी तेथें ज्ञानें काय केलें। अज्ञान जाळून मावळलें । उरलें चिन्मात्र तें मीं।।१७।।मजला तूर्य[७१] ऐसे म्हणती। जाणतसें तिही अवस्थेप्रति। हे उपाधियोगें आरोपिती। मी स्वयंज्योती एकला।।१८।।**

---

तो विवेकी असल्यामुळे सर्वांपेक्षा वेगळा असला,तरी तो लोकांचा समुदाय सोडून निघून जातो,असेही होत नाही.(७)दही घुसळून(मंथन करून)लोणी काढले,पण ते ताकातून वेगळे न काढता ताकातच ठेवले,तरी ते कल्पांतीही ताकात पुन्हा मिसळून जात नाही.(८)त्याप्रमाणे जनसमुदायामध्ये ज्ञाता वावरत असला,तरी त्या ताकातच राहिलेल्या लोण्याप्रमाणे अलिप्त असतो.त्याची वर्तणूक आतायथामती सांगतो.(९)नामरूपांचा त्याग केल्यानंतर सर्व विश्व त्याला अस्तिभाति प्रियात्मकाने कोंदाटलेले आढळते. आणि मग"अहो,काय आश्चर्य!मीच मला पाहिले!"असे तो म्हणू लागतो.(१०)"माझाच मला नमस्कार असो.माझा मोठेपणा मीच जाणतो.वा! सद्गुरुराया,तुम्ही माझीच मला ओळख करून दिलीत."(११) "माझे सगळे अज्ञान कोठे गेले कळत नाही.ज्ञानाने सर्व ब्रह्मांडादी सृष्टी जाळून राख केली."(१२) मी एवढा घनदाट असून आता अणूलाही तेथे शिरकाव नाही. असा मी ओतप्रोत अविकारी (अविट),अविश्वसनीय वाटेने इतका वाढलो आहे.(काहीचा बाही).(१३)पण तरीसुद्धा मी कोणालाच दिसत नाही. ब्रह्मादी देव विनाकारण धडपडतात.पण मी मात्र अखंडैकरस अशा ब्रह्माने परिपूर्ण असून अनंत आहे.(१४)माझा अंत(विस्तार,मर्यादा)मलाच माहीत नाही.माझे अनुमान तरी कोण करू शकणार?माझ्या अंतःकरणालासुद्धा माझे ज्ञान होत नाही.(१५)अशा परिस्थितीत जीभ ही केवळ चामडी ठरते.ती काय बडबड करील?पराही जाणीव सोडून तेथे दडी मारते.(१६)"जे ब्रह्म ज्ञानापासून लपून राहिले आहे,तेथे ज्ञान बापडे काय करणार?त्याने अज्ञान जाळून टाकले व स्वतः मावळले.उरला तो केवळ चैतन्यरूप असा मी."(१७) "मला तूर्य(चौथा)असे म्हणतात,कारण मी तिन्ही अवस्थांना जाणतो.हा आरोप केवळ उपाधीच्यासंदर्भात

**मी तरी अखंड एकला । व्याप्येवीण केवि व्यापिला । नुसधेपणें थोटावला । अनुभव अनुभवी ।।१९।। वेदें सर्व प्रकाशिलें । मज पाहून मौन धरिलें । मौनही सांडून राहिले। मीच होऊनी ।।२०।। अहो हें ब्रह्मांड काय जालें । कीं मजमाजीं सांठवलें । मूळमायेचें घेतलें । आपोशन[७२] मीचि ।।२१।। येवढा परिपूर्ण मी असतां । नाथिली कल्पिली अहंममता । अहा कष्टलों निर्हेतुता । म्हणुन रडूंचि लागे ।।२२।। लोक पुसती काय जालें । म्हणे माझे आईबाप मेले । पुत्रकांतेसी वधिलें । माझे म्यांचि ।।२३।। लोक समजाविती कोडें । मन जालें स्वरूपा येव्हडें । माझा मी मजचि आवडे । हासूं लागे या हेतू ।।२४।। हासतां आनंदें दाटला । स्वेदरोमांचें थरारिला । आवेशें वेगिं उडाला । जाउनी पडला अन्य स्थानीं ।।२५।। अहो हें कैसें जालें । आश्चर्यें मन भुलून गेलें । देह नाचूंचि लागले । कळसूत्रापरी ।।२६।। माझिया सुखाची सरोभरी । लोक होतील वाटेकरी । म्हणोनि पळाला निर्धारी । मर्यादेविण ।।२७।। माझे मीचि जाणें सुख। कोण जाणती बापुडे मूर्ख । म्हणोनि बैसला अधोमुख । पृथ्वीसारिखा।।२८।। जयाचा चोहटा[७३] तोचि एकांत । हटयोगी व्यर्थचि कष्टत । जनीं विजनीं सदोदित । ब्रह्म एकदेशी नव्हे।।२९।।**

---

माझ्यावर करतात.पण मी स्वयंप्रकाशी आणि एकटा आहे.''(१८)''मी अखंड असा एकटा आहे. व्याप्य पदार्थावाचून मी व्यापक आहे. मी एकटाच असल्याने अनुभवी आणि अनुभव असा भेद माझ्या ठिकाणी थोटा पडतो.''(१९)''वेदांनी सर्व प्रकाशित केले असले तरी मला पाहताच त्यांनी मौन धरले. पुढे तर ते मौनही टाकून ते मीच होऊन राहिले.''(२० ''अहो, हे ब्रह्मांड कोठे गेले? की माझ्यामध्येच ते सामावले? मी मूळमायेचेही आपोशन घेतले आहे. (म्हणजे मूळ मायेला संपवून टाकले आहे.)'' (२१)''असा मी परिपूर्ण असता विनाकारणच मी खोटी अहंममता धारण केली आणि विनाकारणच की हो कष्टात पडलो''असे म्हणून तो रडू लागला.(२२)यावर लोक त्याला विचारू लागतात, ''काय हो! काय झाले?''त्यावेळी तो म्हणतो''माझे आईबाप गेले!मीच माझ्या पत्नी आणि पुत्रांचा वध केला!''(२३)यावर लोक ते कोडे समजावून सांगण्याचा प्रयत्न करतात. त्यावेळी त्याचे मन स्वरूपाकार होते.मग त्याचा तोच त्याला आवडू लागतो. त्यामुळे तो हसायला लागतो.(२४)हसता हसता त्याचा आनंद दाटून येतो.त्याचे अंग स्वेद,रोमांच यांनी थरारून जाते आणि मग त्या भरात तो आवेशाने उडी मारतो आणि दुसऱ्या ठिकाणी जाऊन पडतो.(२५)अहो हे कसे झाले!'अशा आश्चर्याने त्याचे मन भुरळ पडल्याप्रमाणे होते आणि कळसूत्री बाहुलीप्रमाणे त्याचा देह नाचू लागतो.(२६)''माझ्या या सुखात लोक बरोबरीने वाटेकरी होतील''असे म्हणून तो बेसुमारपणे धावत सुटतो.(२७)कधी''माझे सुख मलाच ठाऊक.मूर्खांना त्याची काय कल्पना?''असे म्हणून पृथ्वीकडे तोंड करून अधोमुख होऊन बसून राहतो.(२८)चव्हाटा हाच त्याचा एकांत असतो. हठयोगी मात्र विनाकारण कष्ट घेत असतात.जनात-विजनात सर्वत्र सारखे

**खोलींत ब्रह्म योगियाचें । डोळांचि असे मुद्राधाराचें । हें उघडें कैवल्य जयाचें । तोचि जाणें स्वप्रभ ।।३०।। उपासक वैष्णव म्हणती। देव असे वैकुंठाप्रती। शैवही गलबला करिती। शिव कैलासीं आहे।।३१।।येवढा मोठा देवराय। वैकुंठीं कैलासीं कैसा सामाय । अहा हे भुलले काय । उपाय तो कळेना ।।३२।।असो परोपदेशीं काज। काय असे बापा मज। माझें मजला गुह्य गुज । प्राप्त सद्गुरुप्रसादें।।३३।।अगस्तीनें तप केलें । सागरातें उदरीं भरिलें।मी तो दृष्टीनें ग्रासिलें। मायेसहित ब्रह्मांड।।३४।।मस्तकींचे केस उडती। ते स्वर्गसुखा वाकुल्या दाविती। अधोमुखें हात शेषाप्रती। म्हणती हा भारवाही।।३५।।नेत्रकटाक्षें पाहिलें। तेणें सदाशिवा सुचविलें। कीं तुमचें ऐश्वर्य प्राप्त जालें। मजलागी हें।।३६।। विष्णूतें म्हणे अवतार घ्यावे। सज्जनासी प्रतिपाळावें। आमुचें वंदन तुम्हां बरवें। हस्तसंकेतें करी।।३७।। अहो अहोजी ब्रह्मदेवा।आतां लोभ असो द्यावा। तुम्हां उत्पत्तीचा गोवा। बहुकाळ पडिला।।३८।। पुन्हा वृत्ति चित्सागरीं । बुडून गेली निर्धारीं। देह शुष्क तृणाचे परी। वर्तत असे।।३९।।प्रारब्धें जे जे भोग येती। ते ते भोग यथारीती। संकल्पविकल्पाची रती। उरली नाहीं ।।४०।।**

---

असणारे ब्रह्म काही एकदेशी नाही.(२९) "योग्याचे ब्रह्म खोलीतच तेवढे आढळते; मुद्राधारकाचे ब्रह्म फक्त डोळ्यात साठवलेले असते, पण ज्याचे कैवल्य उघडे आहे, त्या जीवन्मुक्तालाच फक्त स्वप्रभ (स्वयंप्रकाशी) ब्रह्म खऱ्या अर्थाने जाणवते."(३०) "वैष्णव उपासक म्हणतात की, देव वैकुंठात आहे, त्याचवेळी शैवही ओरडून सांगतात की शंकर कैलासात आहे."(३१) "पण एवढा मोठा देव वैकुंठात किंवा कैलासात कसा सामावला जाईल? अहो, या लोकांना वेड लागले काय? याला काय उपाय करावा ते समजत नाही."(३२) "जाऊ द्या, परोपदेश करून मला काय साध्य होणार आहे? मला मात्र सद्गुरुकृपेने गुह्य गोष्ट प्राप्त झाली आहे!"(३३) अगस्ती ऋषींनी तप केले आणि त्या तप:सामर्थ्याने संपूर्ण सागर आपल्या पोटात सामावून घेतला. पण मी तर केवळ दृष्टीने सर्व मायेसहित ब्रह्मांडाला गिळून टाकले."(३४) जीवन्मुक्ताच्या मस्तकावरचे केस उडत असतात. ते जणू स्वर्गसुखाला वाकुल्या दाखवत असतात. त्याचे हात खाली वळलेले असतात. ते जणू शेषाला 'तू केवळ भारवाही आहेस' म्हणून हिणवत असतात.(३५) त्याने आपल्या नेत्रकटाक्षाने पाहून शंकराला सुचवले की, "पहा, मला तुमचे ऐश्वर्य प्राप्त झाले आहे."(३६) तो विष्णूला हाताने खुणावून म्हणतो की, "तुम्ही अवतार घ्यावे, सज्जनांचे परिपालन करावे. तुम्हाला माझे वंदन असो."(३७) "अहो ब्रह्मदेवा, तुम्हाला उत्पत्तीचे श्रम फार काळ पडले. पण आमच्यावर लोभ असू द्या."(३८) अशा तऱ्हेने विचार करत असतानाच त्याची वृत्ती पुन्हा चैतन्यात बुडून जाते आणि त्याचा देह मात्र वाळलेल्या गवताप्रमाणे झालेला असतो.(३९) प्रारब्धाने जे जे भोग प्राप्त होतील ते ते तो भोग तो रीतीप्रमाणे भोगत असतो. संकल्पविकल्पांची आवड त्याला राहिलेलीच नसते.(४०)

**बद्धता पुढें जातसे । मागें मोक्ष वाटा पुसे। एकेविण राहणें नसे । एकवरी जाउळिया।।४१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । सविकल्पसमाधिप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

**।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - अंतकालप्रकार**

**ब्रह्मीं ब्रह्म परिपूर्ण। निर्भय ज्ञाता अभिन्न। देहायेवढेंपण। राहिलें नाहीं।।१।।देह हा आकल्प राहिला। अथवा आजचि मरण पावला। संबंध नाहीं गा तयाला। अर्थाअर्थीं।।२।।चक्राचें भ्रमण पुरें। तरी आपेआप थावरें।[७४] तैसा श्वास जेधवा सरे। देह पडे अचेतन।।३।।क्रिमि विष्ठा अथवा भस्म । याचे तीनचि परिणाम । पुढें अनायासें अनुक्रम । पृथ्वीमाजीं।।४।।सर्वांची गती ऐसी। इतर लोकांची कल्पना कैसी। कीं मरावें काशीसी। प्रयागादितीर्थीं।।५।।शुक्लपक्ष उत्तरायण। गृहीं दीप दिवामरण। अंतीं असावें स्मरण। उत्तर गतीसी।।६।।सुस्थळीं बोलतां चालतां । समुदाय असावा भोवतां । ऐसा जरी मृत्यु येतां । जना आश्चर्य वाटे ।।७।। ज्ञान अज्ञान कळेना। उगेचि करीति कल्पना। म्हणती कोठें हो वासना। गुंतली नाहीं।।८।। न करितां तत्त्व विवेचन। नव्हे तो ब्रह्म सनातन । जरी आलें बरें मरण । तरी अधोगती।।९।।**

---

बद्धता पुढे निघून जात असते आणि त्याच्यामागे मोक्ष वाटा पुसत येत असतो.जुळ्या मुलांमध्ये एकावाचून दुसऱ्याला करमत नाही तसे मोक्षाला त्याच्यावाचून राहवत नाही.(४१)

**पंचिका १०वी, समास ५वा - अंतकालप्रकार**

ब्रह्म ब्रह्मामध्येच परिपूर्ण आहे.ज्ञाता निर्भय असून ब्रह्माबरोबर अभिन्न असतो.तो आता ब्रह्मरूप बनल्याने त्याची व्याप्ती देहापुरती मर्यादित राहिलेली नाही.(१)त्याचा देह कल्पान्तापर्यंत राहिला किंवा आजच मरण पावला तरी त्याचा त्या देहाशी अर्थाअर्थी काही संबंध नसतो.(२)चाकाची भ्रमणगती थांबताच ते आपोआप थांबते.त्याप्रमाणे श्वास संपताच देह अचेतन होऊन पडतो.(३)कृमी,विष्ठा अथवा भस्म असे त्याचे तीनच परिणाम होतात.पुढे शेवटी पृथ्वीत सहजपणे मिळून जाणे हे ओघानेच घडते.(४)सर्वांची हीच गती असताना सर्वसामान्य लोक वेगवेगळ्या कल्पना करत असतात.उदाहरणार्थ,काशीमध्ये अथवा प्रयागादी तीर्थक्षेत्रांतच मरावे,उत्तरायणातील शुक्ल पक्ष असावा,गृहात दीप असताना किंवादिवसा मरण यावे,मरणोत्तर गतीसाठी अंतकाळी(परमेश्वराचेस्मरण असावे इत्यादी.(५-६)सुस्थळी मरण यावे,बोलता चालता ते यावे,त्यावेळी सभोवती लोकांचा समुदाय असावा इत्यादी;अशा प्रकारचा मृत्यू आला की लोकांना त्याचे आश्चर्य वाटते.(७)लोकांना ज्ञान म्हणजे काय,अज्ञान म्हणजे काय हे काही कळत नाही.मात्र ते उगीचच कल्पना करत बसतात,मृत जीवाची वासना कोठेही गुंतली नाही अशी भाषा ते करतात.(८)तत्त्वविवेचन केल्याखेरीज कोणीही प्राणी सनातन ब्रह्म होऊ शकत नाही आणि त्याखेरीज

**ज्ञानेंवीण जें जें स्मरलें। तें तें पुढें प्राप्त जालें। म्हणती देवासी आठविलें। परि तें कैंचें।।१०।। जैसा असे पूर्वाध्यास। तेचि कल्पि मानस। दु:खें केलें कासावीस । भ्रमचि व्यापी।।११।।तथापि पुण्यसंस्कारें । अंतीं देवातें स्मरे । तरी देवलोकीं वास बारे । कर्मानुसार होय।।१२।।पुण्य असे तंवचिवरि । सरतां जन्मती भूमीवरी । ज्ञानावांचून निर्धारि । मोक्ष कैंचा ।।१३।। योगी अथवा उपासक । ब्रह्मरंध्रा पाडून भोंक। पावती सत्यादि ब्रह्मलोक । तेहि फल निकृष्ट।।१४।।कामना जरी दिव्य भोगाची । अधिकाधिक साची । सामुग्री सरतां गांठीची। पुन्हा जन्मे ।।१५।।वैराग्यें कामना जरी सांडिली । दिव्य भोगेच्छा अव्हेरिली । अपरोक्ष ज्ञानाची किल्ली । ब्रह्मयापासून प्राप्त।।१६।। तरी ब्रह्मदेवा होईल अंत । पंचभूतादि कल्पांत । तों काल राहे मूर्तिमंत । ब्रह्मदेवासह।।१७।। सर्व जेव्हां लया जाय। त्याकाळीं मोक्षाची सोय। हा क्रममुक्तिप्रकार होय। कर्मयोगियासी।।१८।। येचि देहीं येचि डोळां । न भोगिजे मुक्तीचा सोहळा । कोण जाणे अंतकाळा । क्रम मुक्तीच्या ।।१९।। असो ज्ञाता जीवन्मुक्त । करून संकल्पाचा घात । देह असतां जिवंत। ब्रह्मानंद पावला।।२०।।**

---

तसेच त्याला मरण आले तर अधोगती आहेच.(९)एका ज्ञानाखेरीज इतर ज्या ज्या गोष्टीचे त्याला स्मरण होते ते ते त्याला पुढे प्राप्त होतेच.देवाचे स्मरण झाले म्हणतात.पण ते कसचे स्मरण?(१०)जसा त्याचा पूर्वाध्यास असतो त्याप्रमाणेच तो मनात कल्पना करतो. अंतकाळी त्याला दु:खाने कासावीस केले असता बुद्धीला भ्रमच व्यापतो.हाही एक प्रकारचा भ्रमच होय.(११) तथापि काही पुण्यसंस्कारांमुळे अंतकाळी त्याला देवाचे स्मरण झाले तर त्याच्या कर्मानुसार त्याला देवलोकात वास्तव्य करावयास मिळते.(१२) पण हे वास्तव्य जोपर्यंत पदरी पुण्य असेल तोपर्यंतच करता येते.ते पुण्य संपताच त्यांना परत भूमीवर (पृथ्वीवर) जन्म मिळतो. ज्ञानावाचून मोक्ष कसा मिळेल?(१३) योगी अथवा उपासक ब्रह्मरंध्राला भोक पाडून सत्यलोक, ब्रह्मलोक असे लोक प्राप्त करतात. पण तेही निकृष्टच होय.(१४) मनात जर स्वर्गीय सुखाची अधिकाधिक इच्छा असेल तर गाठची सामग्री संपताच त्यालाही पुन्हा जन्म घ्यावा लागतो.(१५) त्याच्या अंगी वैराग्य असेल आणि त्याने कामनेचा त्याग केला असेल आणि त्यातही स्वर्गीय सुखाच्या भोगाची इच्छा नाकारली असेल तरीसुद्धा अपरोक्ष ज्ञानाची किल्ली ब्रह्मदेवाच्याच हातात असते. ती ब्रह्मदेवापासूनच प्राप्त होते.(१६) या परिस्थितीत ब्रह्मदेवाचा सुद्धा अंत होत असतो. पंचभूते कल्पान्तापर्यंत राहतात. त्या काळापर्यंत तो ब्रह्मदेवासह मूर्ती धारण करून राहतो.(१७) जेव्हा हे सर्व लयाला जाते तेव्हा कोठे त्याच्या मोक्षाचा मार्ग सोपा होतो. कर्मयोगाचे आचरण करणाऱ्या योग्याला अशाप्रकारे क्रममुक्ती मिळते.(१८) पण याच देहात, याच डोळ्यांनी मुक्तीचा सोहळा त्याला भोगता येत नाही. खरे पाहता क्रममुक्तींचा शेवट कसा होईल, हे कुणाला माहीत आहे?(१९) पण जीवन्मुक्त ज्ञाता संकल्पाचा घात करून देह जिवंत असताही ब्रह्मानंद प्राप्त करून घेतो.(२०)

**त्यासि नलगे उत्तरायण । काशी अथवा बरें मरण । अंतकालीं नको स्मरण । आधींच ब्रह्मरूप अंगें।।२१।।ब्रह्म जरी जन्मे मरे । पाप पुण्य कर्मद्वारें । तरिच ज्ञाताही भरीं भरे। जन्ममृत्यूच्या ।।२२।।कर्तृतंत्र जो असेल।तरिच भीति त्या होईल।हा ब्रह्मचि कोणा स्मरेल। अंतकाळीं।।२३।।चिदचिद्ग्रंथीचा भेद। तेव्हांचि प्राणाचा उपमर्द । तोचि अंतकाल प्रसिद्ध। आत्यंतिक प्रलय जो।२४।।जयासी फिरून असे जन्मणें। त्यासी अंतकाळ कोण म्हणे। जन्ममरणाच्या भ्रमणें। मध्यकाल बोलावा।।२५।।म्हणून प्रलय आत्यंतिकु। हाचि अंतकाल विवेकु। प्राणवियोगाचा धाकु। मीपणेंविण कोणा।।२६।।मरणा ऐलीकडे मेला। संपादिलें उत्तर क्रियेला।पुढें देह राहिला कीं गेला।कोण काज।।२७।।रज्जूवरी सर्प भासला। रज्जू ओळखितांच गेला। तैसा प्राणादिकांचा मासला। अज्ञान तोंवरी।।२८।।जावें ब्रह्मांड भेदून। तो प्राणा नव्हे उत्क्रमण। श्वास सरतां होती लीन। जेथील जेथें।।२९।।आधींच ब्रह्माकार जाला।आठवविसरा विसरला।स्मरण उर्ध्वगमन कासयाला।जीवन्मुक्तासी।।३०।।जैसी दग्धवस्त्राची घडी।पांघरावया कोण काढी। फिरून लावितां सनकाडी।रक्षा ती जळेना।।३१।। तैसा मेला तो पुन्हा मरे। हे प्रमाण नव्हेती उत्तरे।यास्तव जीवन्मुक्ता बारे।भीतीचि नाहीं।।३२।।**

---

त्याला उत्तरायणाची गरज नाही,काशीचे वास्तव्य,तेथील अनुकूल मरण हेही लागत नाही.फार काय अंतकाळी स्मरण असण्याचीही गरज नाही.कारण तो अगोदरच स्वत:च ब्रह्मरूप झालेला असतो.(२१)जर कदाचित ब्रह्म जन्म पावले अथवा मृत्यू पावले किंवा कर्मे करून त्यास पाप पुण्य प्राप्त होऊ लागले तरच ज्ञाताही जन्ममृत्यूच्या प्रवाहात सापडेल.(२२)तो कर्तृतंत्र(साधक)असता तरच त्याला जन्ममृत्यूचे भय वाटले असते.पण हा स्वत:च ब्रह्मरूप असल्याने अंतकाळी कोणाचे स्मरण करील?(२३)चिदचिद् ग्रंथीचा भेद जेव्हा होतो तेव्हाच त्याच्या प्राणाचा अंत झालेला असतो.तोच त्याचा अंतकाल होय.तोच आत्यंतिक प्रलय होय.(२४)ज्याला पुन्हा जन्म घ्यायचा असतो त्याच्या मरणाला अंतकाळ कोण म्हणेल?जन्ममरणाच्या भ्रमणातील तो मध्यकाल समजावा.(२५)म्हणून आत्यंतिक प्रलय (चिदचिद्ग्रंथिभेद, ब्रह्मात्मैक्य) हाच खरा अंतकाल होय.येथे मीपणाचा अभाव असल्याने ज्ञाता मरणाला कसा भिईल?(२६)जो मरणाच्या अलीकडेच मेला,त्याच्या उत्तरक्रिया अगोदरच झालेल्या आहेत,त्याच्या बाबतीत देह गेला काय नि राहिला काय,त्याला त्याचे काय होय?(२७)दोरीवर सर्प भासला तो रज्जूची(दोरीची)ओळख पटताच नाहीसा होतो त्याप्रमाणे प्राणादिकांना अनुभव अज्ञान आहे तोपर्यंतच येतो.(२८)ब्रह्मांड भेदून गेले तरी प्राण देहाबाहेर जात नाहीत.श्वास संपताच जागच्या जागी लीन होतात.(२९)आधीच ब्रह्माकार झाल्यावर स्मरण विस्मरण यांचे भान तो विसरून जातो.जीवन्मुक्ताला स्मरण,ऊर्ध्वगमन इत्यादीची जरुरी काय?(३०)जळालेल्या वस्त्राची घडी कोणी पांघरण्यासाठी काढील काय?तिला फिरून सनकाडी लावली तरी ती राख जळत नाही.(३१)त्याप्रमाणे जो अगोदर मेला आहे, तो पुन्हा मरतो, ही उत्तरे

**साधूचा देह पडिला रानीं।कीं मरे किकटीं जाऊनी।अथवा पडिला जाउनी।लेंड वोहळीं।।३३।। भोंवतीं श्वान शूकरें।विष्ठेनें सर्वांग भरे।गीध श्वापदें मांजरें।रिसें व्याघ्रें फाडिती।।३४।।ग्रामीं अथवा विदेशीं।अंत्यजगृहीं कीं काशी।सर्व समान जयासी।भेदचि नाहीं।।३५।।पुण्यपापा सांडिलें।उंचनीच हें त्यागिलें।नरकासि होणें पडिलें।कैवल्यापरी।।३६।।सुवर्णावांचून कांही।परिसा स्पर्श अन्य धातूस नाहीं।तैसे दृष्टी जे पडता तेंही।कैवल्यचि होय।।३७।। वैकुंठकैलासादि अधवे।आणि घरें ग्रामें पुरें सर्वे।जनीं विजनीं अपूर्वे।आपणावीण नाहीं।।३८।। ऐसा महाराज राजयोगी।स्पर्श होतांचि भूमीलागी।अत्यंत हर्षे रोमांगीं।हेलावती उद्‌भिज।।३९।। मग देह जेथें पडिला । ते पवित्रता न कळे शेषाला । सर्व तीर्थांचा मेळा पातला । चतुःसागरांतील ।।४०।। सकळ सुरवर हें सुख वांछितां । लेश न मिळे कीं पुरता । तें मुमुक्षूचें धन तत्वतां । इतरां प्राप्त कैचें ।।४१।। ऐसें जया सुख व्हावें । तेणे सद्‌गुरुपाद सेवावे । जीवन्मुक्तीतें पावावें । अनायासें ।।४२।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । अंतकालप्रकारे । पंचमसमासः ।।५।।**

**।। इति जीवन्मुक्तिलक्षणपंचिका संपूर्णा ।।१०।। ओवीसंख्या २१२**

---

प्रमाण नव्हेत.म्हणून जीवन्मुक्ताला भीतीच नाही.(३२)साधूचा देह रानात पडला किंवा स्मशानात जाऊन तो साधू मेला किंवा लेंडी,ओहळी यांमध्ये पडला,(३३)किंवा त्याच्या मृतदेहाभोवती कुत्री,डुकरं आहेत अथवा त्याचे अंग विष्ठेने भरलेले आहे किंवा गिधाडे,मांजरे,अस्वले, हिंस्र श्वापदे त्याला फाडून खात आहेत,(३४)गावात असो अथवा विदेशात असो,अंत्यजाच्या घरात असो अथवा काशीमध्ये असो.त्याच्याबाबतीत सर्व सारखेच आहे.त्याला काही भेदच वाटत नाही.(३५)पुण्यपाप,उच्चनीच अशा भेदांचा त्याग केल्यानंतर नरकसुद्धा मोक्षासारखा होणे क्रमप्राप्त आहे.(३६)परिसाला सोन्याखेरीज दुसऱ्या धातूचा स्पर्शच माहीत नाही(परिसाचा स्पर्श होताच सगळेच धातू सुवर्ण बनतात)त्याप्रमाणे जीवन्मुक्ताच्यादृष्टीला जे जे पडेल ते सर्व मोक्षच होते.(३७)वैकुंठ,कैलास,घर,गाव,जन अथवा विजन काहीही असो त्याला आपल्यावाचून तेथे दुसरे काही नाही.(३८)अशा प्रकारचा राजयोगी साधू असतो.त्याचा जमिनीला स्पर्श होताच ती आनंदाने रोमांचित होते,सर्व वनस्पती हेलावतात.(३९)मग त्याचा देह जेथे पडतो,त्या प्रदेशाची पवित्रता शेषालासुद्धा कळत नाही.चारी समुद्रातील तीर्थांचा मेळावा त्याच्यादेहाकडे धाव घेतो.(४०)सर्व देवांनी या सुखाची इच्छा केली तरी त्याचा कणदेखील त्यांना मिळत नाही. कारण ते केवळ मुमुक्षूंचे धन होय. ते इतरांना कसे प्राप्त होईल?(४१)असे सुख ज्याला हवे असेल, त्याने आपल्या सद्‌गुरूचरणांची सेवा करावी आणि अनायासे जीवन्मुक्तीचा लाभ करून घ्यावा.(४२)



# पंचिका ११वी - विदेहमुक्तिलक्षण

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - सप्तविधसमाधान

**सांगितली जीवन्मुक्ति। परी विदेहमुक्ति ते कोणती। ये पंचसमासीं यथामति। बोलिजेत असे।।१।। परी येथें पडिला विचार । आचार्यादि मुनिवर । विदेहमुक्तीचा निर्धार । प्रारब्धक्षयीं केला।।२।। देह असतां विदेहमुक्ति । बोलतां विरोध येईल त्याप्रति । प्रारब्धक्षयीं जें प्रतिपादिती । तें विदेहकैवल्य।।३।।तरी विरोध न ये तयांसी । त्यांची विवक्षाचि ऐशी । पावतो विदेहकैवल्यासी। देहप्रारब्ध संपता।।४। देह असतां विदेहमुक्ति। निर्विकल्पत्वें होय प्रतीति । मुक्तिकोपनिषदश्रुति। विदेहमुक्तीपर असे।।५।।अरूप जो वासनाक्षय। जो निर्विकल्प समाधि होय। तेचि विदेहमुक्ति निश्चय। श्रोतीं केला पाहिजे।।६।। तुर्येसहित वृत्तीसी। जो कां स्वानुभवें ग्रासी। पावला पूर्ण समाधानासी। उन्मनी तेही सांडुनी।।७।। मनाचे जालें उन्मन । उन्मनी तया अभिधान । स्वस्वरूपीं पाहतां मन । उत्पन्नचि नाहीं।।८।। दृश्य द्रष्टृत्वींच विरे । द्रष्टा द्रष्टेपणें नुरे । ते समयीं फुंज उतरे। मीपणाचा ।।९।। मी ब्रह्म**

---

### पंचिका ११वी, समास १ला - सप्तविधसमाधान

जीवन्मुक्ती म्हणजे काय ते सांगितले. आता विदेहमुक्ती म्हणजे काय ते यापुढील पाच समासांत यथामती सांगितले जाईल.(१) पण एक विचार असा येतो की, आचार्यादी मुनिवरांनी प्रारब्धनाशानंतर विदेहमुक्तीची प्राप्ती होते, असा विचार मांडला आहे. (२) पण प्रारब्धक्षयानंतर विदेहकैवल्य (विदेहमुक्ती) प्राप्त होते असे प्रतिपादन करणाऱ्यांच्या प्रतिपादनात विरोध जाणवतो. देह असताना विदेहमुक्ती कशी शक्य होईल?(३) पण त्यात विरोध येत नाही. देहप्रारब्ध संपताच विदेह कैवल्य प्राप्त होते असे त्यांना म्हणावयाचे आहे (विवक्षा).(४) देह असतानाही निर्विकल्पत्वामुळे विदेहमुक्तीचा प्रत्यय येतो. सर्व मुक्तिकोपनिषद हे विदेहमुक्तिपरच आहे.(५) अरूप वासनाक्षय म्हणजेच निर्विकल्पसमाधी होय. तीच विदेहमुक्ती होय, असा निश्चय श्रोत्यांनी केला पाहिजे.(६)जो स्वानुभवाने तुर्यावस्थेसहित वृत्तीला ग्रासून टाकतो आणि शेवटी उन्मनीचाही त्याग करतो. त्यालाच पूर्ण समाधान प्राप्त होते.(७)ज्यावेळी मनच उन्मन (मनोलयाची अवस्था) होते त्या अवस्थेला उन्मनी म्हणतात. पण स्वस्वरूपाचा विचार केला तर मन उत्पन्नच होत नसते.(८)दृश्य द्रष्टेपणातच विरून जाते, पुढे द्रष्टादेखील द्रष्टेपणाने शिल्लक राहात नाही, त्यावेळी मीपणाचा अभिमान देखील गळून पडतो.(९) 'मी ब्रह्म आहे' असा जो

**हा अभिमान। यासी वृत्तीचि कारण । निवृत्ति-पद तें अभिन्न। कळलें पाहिजे ।।१०।। उपाधियोगें सात नामें । समाधानाचीं संकेत वर्मे । बोलिलीं असतीं श्रीरामें । दासरूपें अवतारू।।११।।संगत्याग आणि निवेदन । विदेहस्थिति अलिप्तपण । सहजस्थिति उन्मनी विज्ञान । हे सप्तही एकरूप।।१२।।याही वेगळे नामाभिधान । समाधानाचें संकेत वचन। असो हे सातचि लक्षण । भिन्न भिन्न सांगों।।१३।।संग म्हणजे मीपण। जें मुक्तपणाचे बंधन । तेंचि सांडिल्यावाचून । संगत्याग कैचा।।१४।।अहं ब्रह्म हें प्रतीति । तेचि त्रिपुटीतें दाविती । ते त्रिपुटी जेथें लया जाती। अधिष्ठानशेषत्वें।।१५।।दीप कापुरा मिळणी । कापुर जातां जळुनी । ज्योति काजळी दोन्ही । किमपी उरेना।।१६।।तैसें अज्ञान स्वानुभवज्ञानें। जाळून आपण लया जाणें । अनुभवेविण जे कां असणें । हाचि संगत्याग।।१७।। मीपणासहित तूंपण गेलें। मी ब्रह्म हेंही विरालें । उपरी जें निःसंग भरलें । हेंचि निवेदन।।१८।। मी देह कीं मी ब्रह्म । वृत्तीनें सांडिला हा भ्रम । केवळब्रह्मीं उपरम/हे विदेहस्थिति ।।१९।। जळीं जैसें कमळ भिजेना। आकाश वायूनें हलेना। वृत्तीवीण तैसे आपणां । सदृढ केले।।२०।। संपूर्ण उपाधि असतां। परीपूर्ण असें अलिप्तता। हें चवथें लक्षण तत्वतां। समाधानाचें।।२१।।**

---

अभिमान निर्माण होतो, त्याला वृत्तीच कारण असते. निवृत्ति (वृत्तिरहित अवस्था) पद म्हणजे काय ते अभिन्नपणे कळले पाहिजे.(१०) समर्थ रामदासस्वामींच्या रूपाने अवतार घेऊन स्वतः श्रीरामांनीच समाधानाची लक्षणे सांगितली आहेत. उपाधिभेदामुळे त्यांना सात भिन्न नामे प्राप्त झाली आहेत. (दासबोध ४.४.८-९)(११) संगत्याग, निवेदन, विदेहस्थिती, अलिप्तपणा, सहजस्थिती, उन्मनी आणि विज्ञान अशी ती सात नावे होत. पण ती सर्व एकरूपच आहेत.(१२) याही वेगळी समाधानाची चिन्हे सांगणारी आणखी काही नामे असतील. पण या सातांचीच भिन्न भिन्न लक्षणे येथे सांगतो.(१३) संग म्हणजे मीपणा.तो मुक्तपणाचे बंधन आहे.त्याचा त्याग केल्यावाचून संगत्याग कसा घडेल?(१४) 'अहं ब्रह्मास्मि'हा जो अनुभव आहे.तो त्रिपुटीचा निदर्शक आहे.तो अनुभव त्रिपुटीसापेक्ष आहे.ती त्रिपुटी अधिष्ठानाला मागे शिल्लक ठेवून जेव्हा लय पावते;(१५) दिवा आणि कापूर यांचा संयोग होताच कापूर जळतो,त्याबरोबरच ज्योत आणि काजळी दोन्हीही नष्ट होतात.मागे काहीच शिल्लक राहात नाही.(१६) त्याप्रमाणे स्वानुभवज्ञान हे अज्ञान नष्ट करून (जाळून) शेवटी स्वतःही लय पावते, त्यानंतर अनुभवविरहित अवस्थेत असणे हाच संगत्याग होय.(१७) मीपणासहित तूपणाही गेला, मी ब्रह्म हा अनुभवही विरून गेला त्यानंतर जे निःसंग उरते तेच निवेदन होय.(१८) मी देह आहे की ब्रह्म,हा संभ्रम सोडून देताच केवळ ब्रह्मामध्ये शांत होणे ही विदेहस्थिती होय.(१९) पाण्यात कमळ भिजत नाही, आकाश वायूने हलत नाही, त्याप्रमाणे वृत्तीवाचून स्वतःला स्थिर करणे,(२०) संपूर्ण उपाधी असूनही परिपूर्ण अलिप्तता ठेवणे हे समाधानाचे चवथे लक्षण (म्हणजे अलिप्तता) होय.(२१)

**जैसें प्रारब्धें देह व्यापारे। तैसे वर्तेना कां बारे। होय नव्हे करणें सरे। हें सहजस्थिति।।२२।।**
**मन सांडून एकीकडे। आपण ओतप्रोत चहूंकडे। वृत्तिसहित मन बुडे। हेचि उन्मनी गा।।२३।।**
**ज्ञान निःशेष हरपलें। अखंड परिपूर्णचि उरलें। यासींच विज्ञान बोलिलें। लक्षण सातवें।।२४।।**
**वृत्तीरहित जें समाधान। निवडुनियां ज्ञानाज्ञान। संकेत जे कां भिन्नाभिन्न। परी ते एकरूप।।२५।।**

**इति श्रीमदागमसारे। उपनिषत्तात्पर्यानुसारे। सप्तविधसमाधानप्रकारे। प्रथमसमासः।।१।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास २रा - निर्विकल्पसमाधिप्रकार

**जागृति स्वप्न सुषुप्ति। ऐका जयातें म्हणती। कैसी तयांची स्थिति। स्वानुभवें वर्णिजे।।१।।**
**लोकरीती जैसे दंडक। जागृदादि जें रूपक। त्या विलक्षण स्वानुभविक। बोलिजेत असे।।२।।**
**आदौ सुषुप्ति अवधारा। स्वप्न जाणिजे तदनंतर। मुख्य जागृतीचे निर्धारा। निर्विकल्प वस्तु।।३।।**
**लोकव्यापार जागृति। स्वप्न आणि सुषुप्ति। हे तिन्हीही अज्ञानभ्रांति। सुषुप्तीच निश्चयें।।४।।**
**वार्ता नाहीं निज वस्तूची। भ्रमरूप अवस्था साची। यातना भोगिती फुकाची। जन्ममृत्युरूप।।५।।**
**निद्रेमाजीं पुण्यपाप। स्वर्गनरकादि अमूप। सुख दुःख भोगिती परी अल्प। स्वप्नजागृती नाहीं।।६।।**

---

प्रारब्ध असेल त्याप्रमाणे देह व्यापार करत असेल तर त्याला तसे खुशाल करू देत,पण करणे अथवा न करणे,हे जेव्हा संपते त्याअवस्थेला सहजस्थिती म्हणतात.(२२)मनाचा एकीकडे त्याग करून आपण चोहीकडे ओतप्रोत भरला आहे;जेथे वृत्तीसहित मन बुडून जाते त्या अवस्थेला उन्मनी अवस्था म्हणतात.(२३)ज्ञान संपूर्णपणे हरवल्यानंतर शेवटी अखंड परिपूर्ण उरते,त्या अवस्थेला विज्ञान म्हणतात. हे समाधानाचे सातवे लक्षण होय.(२४)वृत्तिरहित जे समाधान ज्ञान आणि अज्ञान यांना बाजूला सारून राहते त्याला भिन्न भिन्न नावे दिली तरी ते एकच असते.(२५)

## पंचिका ११वी, समास २रा - निर्विकल्पसमाधिप्रकार

ज्यांना जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती असे म्हणतात त्यांची स्थिती स्वानुभवाच्या आधाराने वर्णन करतो.(१)लोकांमध्ये जागृती इ.जी कल्पना असते त्यापेक्षा स्वानुभवातील त्यांचे स्वरूप एकदम भिन्न असते.तेच आता सांगतो.(२)प्रथम सुषुप्तीचे स्वरूप ऐका.त्यानंतर स्वप्न अवस्थेचे स्वरूप ऐका.नंतर जागृतीतील निर्विकल्प ब्रह्म समजून घ्या.(३)लोकव्यवहारातील जागृती,स्वप्न,सुषुप्ती या तिन्ही अवस्था म्हणजे अज्ञानजन्य भ्रमच होत.त्या तिन्ही अवस्था म्हणजे खरी सुषुप्तीच आहेत.(४)या अवस्थांमध्ये लोकांना निजवस्तू म्हणजे आत्मस्वरूपाची खबरही नसते.ती खरी भ्रमरूप अवस्थाच आहे.त्यामुळे लोक विनाकारण जन्ममरणरूप यातना भोगत असतात.(५)त्या निद्रेमध्ये पुण्यपाप,स्वर्ग नरक इ. पुष्कळ सुखदुःखे ते भोगतात.पण त्या निद्रेतून त्यांना स्वप्न अथवा जागृती अजिबात प्राप्त होतनाही.(६)

**अनंत जन्माचें सुकृत । पुण्यमार्गी जे वर्तत। तयासी विविदिषा होत। कीं ब्रह्म जाणावें।।७।।गुरु शास्त्र आणि विचार। श्रवणमननादि प्रकार। स्वानुभवें आत्मसाक्षात्कार। अपरोक्ष जाले।।८।। हेंचि स्वप्न गा निश्चिती । चराचरें स्वप्नापरी दिसतीं । स्वानुभवें आत्मप्रतीति । परि ते भ्रमरूप।।९।जागृतिपरी स्वप्नीं वाटे। परी ते माईक जाणावें खोटें। स्वानुभवें त्रिपुटी उठे। तरी जागृति कैसी।।१०।।नानात्व मिटलें एकनिर्वाणीं । एकचि जालें बहुधापणीं । दोन्हीं उर्मी जातां आटोनी । आपणा आपण लाभे।।११।।लाभे आपुला आपण। किंचिन्नसतां द्वैतभान। हेचि अनुभवाची खूण। स्वप्नांतील जागृती।।१२।।अनुभव अनुभवियांत। अनुभवेवीण अनुभव होत। स्वतां असतांही निवांत। स्वप्नाकडे येतसे।।१३।।अनुभाव्यरूप जाला। अनुभव अनुभविता विराला। तरी वाटे कांही आला। जागृतीकडे।।१४।।जागरीं स्वप्न आठवी। तैसी अनुभाव्य उठाठेवी। पुढें जागृतीची पदवी। बोलतांचि नये।।१५।।न बोलतां कळे कैसे।बोलतां अर्थरूप होतसे।त्रिपुटी आटतां अपैसे। तेचि ते जागृती।।१६।। त्रिपुटीरहित जो अनुभव।परी अनुभवियासी कैंचा ठाव।एकलाचि उरे अपूर्व। एकपणेंविण।।१७।। द्वैत उत्पन्नचि नाहीं। रज्जूवरील जैसा अही। एका एकपण तेंही। बोलणे कैसें ।।१८।।**

---

ज्यांचे अनंत जन्मांचे पुण्य गाठी असेल आणि जे पुण्य मार्गाने जाणारे असतील त्यांनाच ब्रह्म जाणावे अशी इच्छा निर्माण होते.(७)गुरू,शास्त्र आणि विचार,श्रवण मननादी साधने आणि स्वानुभवाने अपरोक्ष आत्मसाक्षात्कार होतो.(८)यालाच स्वप्नावस्था म्हणतात या अवस्थेत सर्व चराचरे स्वप्नाप्रमाणे दिसतात. स्वानुभवाने आत्मप्रतीती येते. पण ती भ्रमरूप असते.(९)या स्वप्नावस्थेत जागृतीतल्याप्रमाणे वाटते.पण ते मायिक असते, खोटे असते.स्वानुभवात जर त्रिपुटी निर्माण होत असेल तर ती जागृती कशी म्हणावी?(१०)नानात्वाचा एकामध्ये लय झाला, अथवा एकाचा बहुधापणात विस्तार झाला. या दोन्ही ऊर्मींचा लोप झाल्यानंतर आपण आपल्याला प्राप्त होवो.(११)काहीही द्वैताचे भान नसता आपली आपल्याला प्राप्ती होते हीच स्वप्नातील जागृतीच्या अनुभवाची खूण आहे.(१२)अनुभव अनुभवित्यामध्ये विरून अनुभवावाचून अनुभव बनतो. स्वत: निवांत असताही स्वप्नावस्थेकडे येतो.(१३) तो स्वत: अनुभाव्यरूप(अनुभवाचा विषय)झाल्यावर अनुभव आणि अनुभविता विरून जातात. तेव्हाच तो काही जागृतीकडे थोडाफार आला असे वाटते.(१४)जागृतीमध्ये स्वप्नाची आठवण व्हावी, तद्वत अनुभाव्याची उठाठेव तो करतो.पण त्या प्रकाराला जागृतीची पदवी देता येत नाही.(१५)हे न बोलताच कळावे.कारण,बोलू पाहताच त्याला 'अर्थरूप' येते. त्रिपुटी आपोआप आटेल तीच जागृती होय.(१६) त्रिपुटीरहित अनुभव येतो तो अनुभवित्याला कसा कळेल?शेवटी तो एकटाच पण एकटेपणाची जाणीव नसलेला असा उरतो.(१७)रज्जूवरील सर्पाभासाप्रमाणे द्वैतच मुळात उत्पन्न झालेले नसते.तो एकटाच असतो.पण त्याला एकटेपण तरी कसे म्हणायचे?(कारण एक म्हणताना दुसऱ्याची अपेक्षा

**म्हणून एकपणेवीण । होणें न होणें सांडून । अखंड जे का परिपूर्ण । आपण वस्तु।।१९।। हेंही बोलणें नवचे । काज नसेचि मौनाचें । आहे नाहीं जाऊन साचें। नाहींपणें असे।।२०।। चंचलें निश्चल दवडिलें। चंचल स्वभावेंचि नाथिलें । मिथ्या तें सत्यत्वें राहिलें । नवचे कदा ।।२१।। अनुभव अनुभविता । अनुभव्य आणि ध्येय ध्याता । ध्यान ज्ञानज्ञेय ज्ञाता। त्रिपुटी जितुक्या।।२२।।हे सर्वही चंचलपण । निश्चळ नव्हेती आपण । आठवितां निश्चल पूर्ण। चंचलत्व होतें।।२३।। कुंथून आकाशीं वळघता । शीणचि उरे तत्वतां । ठाइचे ठाई राहतां। पृथ्वीचवरी।।२४।। घाणवटीचें ढोर चालतां । श्रमे परी नवचे पंथा। ठाइचे ठाई असतां। चालणें व्यर्थ।।२५।। तैसें निश्चलपणें पाहतां । चंचलचि होय मागुतां । म्हणून मिथ्या चंचलाची वार्ता । सांडितां बरें।।२६।। चंचल जेणें सांडिलें । त्यासीही पाहिजे त्यागिलें। आतां जें कांही उरलें । कोण जाणे ।।२७।। जेथें वाणी निवर्तली । अप्राप्य मनासी किल्ली । श्रुति जे ऐसी बोलिली । तें सत्यसत्य।।२८।। चंचल चक्र सांडून । ज्ञाता होय जो अभिन्न । या नांव पूर्णसमाधान । निर्विकल्परूप।।२९।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । निर्विकल्पसमाधिप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

---

असते. तशी अपेक्षा येथे नसतेच.)(१८) इथे एकपणाही नाही. काही व्हायचे नसते अथवा न व्हायचेही नसते. फक्त जे अखंड परिपूर्ण असे जे उरते ती वस्तू म्हणजे आपण होय.(१९) हेही बोलणे अशक्य होय. येथे मौनाचेही कारण नाही. आहे नाही, केवळ नाहीपणाने तो असतो.(२०) चंचलाबरोबर निश्चलही घालवून टाकले. चंचल स्वभावानेच मिथ्या होते.जे मिथ्या असते ते कधीच सत्यत्वाने राहू शकत नाही.(२१) अनुभव, अनुभविता आणि अनुभाव्य, ध्येय ध्याता आणि ध्यान; ज्ञेय, ज्ञाता आणि ज्ञान अशा जेवढ्या म्हणून त्रिपुटी असतील,(२२) त्या सर्व चंचलपणात येतात. त्या कधीच निश्चळ नसतात. निश्चलाचे स्मरण करायला गेले की त्याला चंचलत्व येते.(२३) महत्प्रयासाने आकाशात जायचा प्रयत्न करताच कष्टच होतात. जागचे जागी राहायचे ठरविल्यास पृथ्वीवरच राहतो,(२४) घाण्याचे जनावर चालत राहते, त्याला श्रम होतात. पण ते रस्त्याला लागत नाही. जागच्या जागी राहिल्यामुळे त्याचे चालणे व्यर्थ होय.(२५) त्याप्रमाणे निश्चलपणाने पाहू लागले की मागाहून पुन्हा चंचलच बनतो. म्हणून मिथ्या चंचलाची गोष्टच टाकून देणे बरे.(२६) ज्याने चंचलाचा त्याग केला त्याचाही (अनुभविते पणाचाही) त्याग केला पाहिजे. आता त्यानंतर जे काही उरेल ते काय आहे कोण जाणे! (ते अनिर्वचनीय आहे.)(२७) जेथे वाणी परतते, मनाची किल्ली अप्राप्य असते, असे जे श्रुतीने म्हटले आहे ते अगदी सत्य आहे.(२८) चंचलाचे जे चक्र त्याचा त्याग करून ज्ञाता जेव्हा अभिन्न राहतो, त्या स्थितीला निर्विकल्परूप पूर्ण समाधान असे नाव आहे.(२९)

⊙ ३ गद्य- कळे वृत्तीतें कीं शून्यासी। विचारीं (बापा) ।। ३।।
* १० गा- त्याही करितां अप्रमाण।



**।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - शून्यखंडण**

**श्रोता म्हणे हेचि कैसें । कीं अनुभविता अनुभव नसते । तरी शून्यची निश्चयें असे । कांहीं नाहीं।।१।।आपण वृत्तिशून्यचि व्हावें। तरीच समाधान पावावें। अन्यथा असे तें स्वभावें। अनुभवासी येतें।।२।।वक्ता म्हणे शून्य म्हणसी। तरी चंचल वृत्ति ते कोणासी/बापा।।३।।शून्य तरी कांही नाहीं। वृत्तीसी कैसें जाणे पाहीं। जाणे तरी भूतजडातेंही । जाणीव असती।।४।।वृत्तीसी जरी जाणीव । हें बोलणेंची तो माव । मृगजलपानें अपूर्व । तृषाहरण होती।।५।।आणि श्रुतीसीही विरोध। स्वानुभवियासी आला बाध । श्रुति-ज्ञात्याहून अगाध । प्रमाण तें कोणतें।।६।।ज्याचे भासा सर्व भासती[७५]। ऐसे बोलतसे श्रुति । वृत्तीवीण स्वानुभवप्रतीति । समाधिकालीं ज्ञात्यासी।।७।।हे दोनीही खोटे केले। मग घरचि बुडालें। वृत्तीनें वृत्ति जाणतां आले। अति दूषणचि कीं।।८।।जे वेदबाह्य असती। तेही वेदातें वंदिती। आणि ब्राह्मण असून जे दूषिती। ते अंत्यजाहुनी निकृष्ट।।९।।आणि स्वानुभवियांचे प्रमाण। वेदें घेतलें आपण /* त्याहून अधम कोणता।।१०।। वृत्ति जेणें जाणितली। वृत्ति नव्हे पाहिजे कळली। हे स्वानुभवें जरी उगवली। तरीच भुलि निवर्ते।।११।।**

---

**पंचिका ११वी, समास ३रा - शून्यखंडन**

श्रोता म्हणतो असे कसे असेल? अनुभविता आणि अनुभव नसतील तर ते शून्याचेच प्रतिपादन नव्हे काय?(१) आपण वृत्तिशून्य झालो तरच समाधान प्राप्त करू शकतो. नाहीतर जे असेल त्याचा अनुभव येतच राहणार.(२) यावर वक्ता म्हणतो की, जर शून्य म्हणत असशील तर चंचल वृत्ती कोणाला कळते? वृत्तीला की शून्याला? यावर जरा विचार कर.(३) शून्य म्हणजे काही नसणे. मग त्याला वृत्तीचे ज्ञान कसे होते? शून्य जाणणारे असते तर भूते,जड पदार्थ यांनाही ती जाणीव असायला पाहिजे.(४) वृत्तीला जाणीव असते असे म्हणावे तर ते बोलणे व्यर्थ ठरेल. कारण मृगजळ पिऊन तहान भागते,असे म्हणण्यासारखा तो प्रकार होईल.(५) हे बोलणे वेदविरुद्धही आहे. तसेच स्वानुभवी ज्ञात्याच्या अनुभवालाही त्यामुळे विरोध येतो. वेद आणि ज्ञाते यांच्यापेक्षा दुसरे श्रेष्ठ प्रमाण कोणते?(६) ज्याच्या तेजाने हे सर्व जग भासते (प्रकाशित होते) असे श्रुतीच सांगते. (मुंडक२.२.१०) आणि ज्ञात्याला समाधिकाळी वृत्तीवाचून स्वानुभवप्रतीती येत असते.(७) या दोघांनाही खोटे करणे म्हणजे घरच बुडविणे होय. वृत्तीनेच वृत्तीचे ज्ञान होते म्हणताना अतिशय दोष येतो.(८) वेदबाह्य असणारेही वेदांना वंदन करतात आणि ब्राह्मण असूनही जे वेदांना दूषण देतात ते अंत्यजाहूनही निकृष्ट होत.(९) आणि वेदही स्वानुभवी ज्ञात्यांचे प्रामाण्य स्वीकारतो आणि त्या अनुभवी ज्ञात्यांनादेखील जो अविश्वसनीय ठरवितो, त्याच्यापेक्षा अधिक अधम दुसरा कोण असेल?(१०) वृत्तीचे अस्तित्व ज्याला कळते त्यालाच वृत्तीचा अभावसुद्धा कळला पाहिजे. ही जाणीव स्वानुभवाने कळली तरच भ्रम ओसरेल.(११)

**सेवक जैसा राजयाचा। राजचिन्हीं मिरवे साचा। राजा म्हणून तयाचा। निर्धारू केला।।१२।।तैसी वृत्ति हे बापुडी। काय जाणे धडफुडी। सुषुप्तींत मारिली दडी। शून्यामाजीं।।१३।।वृत्ति असतांआपण जाणें। वृत्तीचा अंत पाहिला जेणें। शून्यासही प्रकाश करणें। स्वप्रभत्वें।।१४।। जाणतां सर्वज्ञ तो एक। त्यावीण सर्व हे माईक। असो शून्याचें कौतुक। वाटे या हेतु असे।।१५।। सर्व दृश्यजात सांडिले। चंचल तितुकें प्रतीती आलें। वृत्तीनें अनुभवूं लागलें। ठक पडिले सहजची।।१६।।आपण निश्चळ हें कळेना। वृत्तीसी सत्यत्व असेना। कांही नाहीं हे वासना। सदृढ केली।।१७।।स्वरूपीं न होतां अभिन्न। वृत्तीचें गळालें अहंपण । सहजचि जाले वृत्तिशून्य । अविवेकानें।।१८।।वेगळेपणें पाहूं जातां। शून्यचि होतसे ज्ञाता । स्वरूपीं अभिन्न तत्वतां । विचारें जालें पाहिजे।।१९।।अभिन्न मुळींच आहे । साधक शोधून न पाहे । बळेंचि संदेहीं पडताहे । शून्यावस्थें।।२०।। एक वृत्तीकडे भरंगळती। एक शून्यामाजी पडती। विचारें जें अभिन्न होती । तेचि धन्य धन्य ।।२१।। येथें श्रोता समजला। शून्याचा ठाव पुसिला । नाहीं तें नाहीं तयाला । बोलणें नलगे ।।२२।। परी अनुभवासी ठाव नाहीं। यासी कैसें करणें पाही। जैसे असे यथार्थ तेंही। निरोपावें आम्हां।।२३।।**

---

राजाचा सेवक राजचिन्हे धारण करून मिरवतो. पण त्यालाच राजा म्हणून समजण्यात यावे.(१२) त्याप्रमाणे वृत्ती बिचारी तिला काय कळणार? सुषुप्तीत तर ती शून्यामध्ये दडी मारून बसते.(१३) वृत्ती असलेली ज्याला कळते, त्यालाच वृत्तीचा अंतही कळतो. तो स्वप्रभेच्या बळावर शून्यालाही प्रकाशित करतो.(१४) तोच एक सर्वज्ञ जाणता आहे. त्याच्यावाचून हे सर्व मायिक आहे. शून्याचे कौतुक याच कारणासाठी वाटते. (कारण शून्याला जाणणाराही कोणीतरी आहे.)(१५) सर्व दृश्य पदार्थांचा त्याग केला. ते सगळे चंचल आहे असे अनुभवास आले. त्यांच्या वृत्तीने अनुभव घेऊ लागले की तिला भुरळ पडते.(१६) आपण चंचल नसून निश्चळ आहोत हे त्याला कळत नाही, वृत्तीला सत्यत्व देता येत नाही. त्यामुळे काहीच नाही (शून्य आहे) अशी वासना पक्की केली जाते.(१७) वृत्ती स्वरूपाशी अभिन्न होत नाही (एकरूप होत नाही) तरी पण तिचा अहंपणा गळून गेला. अशा वेळी अविचाराने तो सहज वृत्तिशून्यतेचा अनुभव घेऊ लागला.(१८) स्वरूपापेक्षा वेगळा राहून ज्ञाता पाहू लागला तेव्हा शून्याचाच तो अनुभव घेऊ लागतो. तेव्हा विचाराने स्वरूपाशी एकरूप होता आले पाहिजे.(१९)खरे तर तो स्वरूपाहून मूळचाच अभिन्न आहे.पण साधक ते शोधून पाहत नाही आणि मग शून्यावस्थेत पडून तो विनाकारण संशयात सापडतो.(२०)एकजण वृत्तीकडे घसरतो,तर एकजण शून्यामध्ये पडतो. विचाराने जे साधक स्वरूपाशी अभिन्न होतात, तेच धन्य होत.(२१) आता श्रोत्याला याचा अर्थ कळला. त्याने मनातून शून्याचे अस्तित्व काढून टाकिले, जे नाही ते नाहीच. त्याविषयी बोलण्याचेही कारण नाही.(२२)पण अनुभव येत नाही.याला काय करावे? तेव्हा जी वस्तुस्थिती असेल

**याचें उत्तर पुढलें समासीं। दीजेत असे निश्चयेसी। श्रोता सावधान मानसीं। सदृढ असावे।।२४।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । शून्यखंडनप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - पूर्णसमाधानप्रकार

**वृत्तीसहित सर्वांतें जाणे । आपुलेनि सर्वज्ञपणें । वृत्त्यादि जडें संपूर्णे । हें काय जाणती।।१।। गर्भगत लेंकुरा ज्ञान । होतें मातेचें परिपूर्ण । तरी अखंड दंडायमान । वृत्तीसी कळूं येतें।।२।। गर्भस्थ न जाणें माता । वृत्तीसी न कळे हिंपुटी होतां । तरी अनुभवाची वार्ता। केवी बोलावी ।।३।। अनुभववृत्ति सांडून । विचारेंचि व्हावें अभिन्न । न जाणतां जें का परिपूर्ण । तेंचि आपण निश्चयेसी ।।४।। दृश्यत्वें वृत्तीसी सांडिलें । स्वप्रभत्वें शून्य ओलांडिलें । मग अपसयाचि उरलें । अभिन्न ब्रह्म जे कां ।।५।। ब्रह्म जरी अगोचर। आपण भिन्न असतां जर । तरी अनुभवाचा विकार । सुखी होता ।।६।। आपण तेंचि जरी जाणावें । अभिन्न कैसें अनुभवावें । आपुला खांदा बैसावें । आपण केवी ।।७।। साखर गोड जिव्हेसी । कस्तुरी सुगंध घ्राणासी । रूप सुंदर डोळ्यासी । भिन्नत्वामुळें।।८।।**

---

ती आम्हाला सांगावी असे श्रोते विनंती करून सांगतात.(२३)तेव्हा वक्ता पुढल्या समासात याचे उत्तर देण्याचे आश्वासन देतो.श्रोत्यांनी सावधान असावे.मनाने दृढ असावे.असे तो त्यांनासांगतो.(२४)

## पंचिका ११वी, समास ४था - पूर्णसमाधानप्रकार

ब्रह्म वृत्तीसहित सगळ्यांना आपल्या सर्वज्ञपणाच्या बळावर जाणते.वृत्त्यादी मात्र संपूर्णपणे जड आहेत.ते काय जाणू शकणार आहेत?(१)गर्भातील लेकराला मातेचे परिपूर्ण ज्ञान होऊ शकेल तरच अखंडपणे सर्वत्र असणाऱ्या ब्रह्माला वृत्ती जाणू शकेल.(२)गर्भस्थाला आईचे ज्ञान होऊ शकत नाही.वृत्तीलाही ब्रह्म कळत नाही आणि त्यामुळे निराश व्हावे लागते.तिच्या ब्रह्मानुभवाची गोष्ट तर दूरच राहिली.(३) अनुभववृत्तीचा त्याग करून विचाराच्या साहाय्यानेच ब्रह्माशी अभिन्न व्हावे.परिपूर्ण ब्रह्माला जाणून घेण्याच्या खटपटीत न पडता निश्चयाच्या बळावर आपण प्रत्यक्ष तेच व्हावे.(४) दृश्य म्हणून वृत्तीचा त्याग केला,स्वप्रभेच्या बळावर शून्य ओलांडले की मग आपोआपच ब्रह्म अभिन्नपणे उरते.(५)ब्रह्म जरी अगोचर(इंद्रियांनी न समजणारे) असले,आणि आपण जर त्यापेक्षा वेगळे असतो तर अनुभवाचा विकार सुखाने होऊ शकला असता.(६) पण आपणच ब्रह्म आहोत असे ज्ञान झाल्यावर आपल्याहून अभिन्न अशा त्या ब्रह्माचा अनुभव कसा घ्यायचा?आपल्याच खांद्यावर आपल्याला बसता येईल का?(७)आपल्या जिभेला साखर गोड लागते,नाकाला कस्तुरीचा सुगंध घेता येतो, एखादे रूप डोळ्यांना सुंदर दिसते. या गोष्टी अथवा हे अनुभव केवळ आपण त्या त्या पदार्थांपेक्षा भिन्न असतो म्हणून शक्य होतात.(८)

**साखर साखरेची न घे गोडी । कस्तुरी सुगंध केवी निवडी । आपणातें देखे आवडी । डोळाचि कैसा ।।९।। जिव्हा सर्व रसातें जाणे । आपणातें चाखूं नेणें । परी जिव्हेची रसज्ञता कोणें । निवारिली पा ।।१०।। तैसा आपण आपणासी । अनुभवा नवचे दशी । परी अनुभव्य रूप तयासी । निवारी कोण ।।११।। आहे तैसें आहेच आहे । अनुभवासी कोण लाहे । अखंड अद्वैतचि राहे । अनंतरूप ।।१२।। द्वैताद्वैत बोलणें काय । नामसंकेत वाया जाय । पुढें खुंटला उपाय । अनिर्वाच्य वस्तु ।।१३।। ऐसें ऐकोनि श्रोता । स्वानुभवें होय बोलतां । सप्रेम दाटला पुरता । माथा चरणीं ठेविला।।१४।। म्हणे स्वस्वरूप निर्विकार। अभिन्नत्वेंचि निर्धार। तेथें अनुभूतीचा केर । द्वैतेंवीण असेना।।१५।। चंचलें जरी अनुभवावें। तरी तें माईकचि स्वभावें । तेणेंगुणें बळें संभवें । शून्य संदेह।।१६।। आपण परिपूर्ण अखंड। वितुळलें चंचळाचें बंड । शून्य शून्यपणें द्वाड। मुळिंच नाहीं।।१७।। कैचें जड कैचें चंचळ।शून्यत्वाचा धुतला विटाळ। आपुला आपण केवळ। परिपूर्ण असे।।१८।। ब्रह्मासि ब्रह्मत्व दिधलें। निःसंगासी निःसंग केले । निर्विकल्पाचें मोडिलें। सविकल्पपण।।१९।।**

---

साखर साखरेची गोडी चाखू शकत नाही, कस्तुरीला आपला सुगंध ओळखता येईल का? डोळाच स्वतः आपल्याला आवडीने पाहू शकतो काय?(९) जीभ सर्व रसांचा आस्वाद घेऊ शकते, पण स्वतःची चव तिला स्वतःला चाखता येत नाही. पण त्यामुळे जिभेची रस जाणण्याची क्षमता कोणी नाकाराली आहे काय?(१०) त्याप्रमाणे ब्रह्म आपण आपणाला एक दशीएवढे देखील अनुभवू शकत नाही. पण त्यामुळे त्याचे अनुभाव्य (अनुभवाचा विषय होण्याची क्षमता) रूप कोण नाकारू शकेल? (११) ब्रह्म आहे तसे आहेच पण त्याचा अनुभव कोणाला घेता येईल? ते अखंड, अद्वैत आणि अनंत असेच आहे. (१२) द्वैताद्वैत अशा संज्ञांचा तरी इथे उपयोग काय? त्याला नाव देण्याचा प्रयत्न फोलच जाणार आहे. परब्रह्म अनिर्वाच्य असल्याने त्याच्या बाबतीत असे भिन्नत्वाने जाणण्याचे सर्व उपाय खुंटतात.(१३) हे ऐकून श्रोता स्वानुभवाने 'होय' असे म्हणाला. त्यावेळी त्याला प्रेमाने गहिवरून आले आणि त्याने वक्त्याच्या चरणांवर मस्तक ठेविले.(१४) तो म्हणाला, "ब्रह्म हे निर्विकार आहे. त्याचा अनुभव अभिन्न राहून घेता येतो. तेथे द्वैत नसल्यामुळे अनुभूतीचा फापटपसारा मुळीच नसतो."(१५) चंचल मायिकाच्या साहाय्याने त्याचा अनुभव घेतला तर तो अनुभव स्वाभाविकपणेच मायिक ठरणार. त्यामुळे विनाकारणच शून्याचा संशय येत राहील.(१६) ब्रह्म आपण स्वतः परिपूर्ण अखंड असल्याने त्याच्यापुढे चंचलाचे सर्व प्रयत्न निष्फल होतात. आणि ते त्रासदायक शून्य शून्यपणामुळे मुळीच नाही असे ठरते.(१७) कसले जड, कसले चंचळ? त्यांच्याबरोबर शून्यत्वाचा विटाळही धुतला गेला. आणि परमात्मा आपला आपण केवळ परिपूर्ण अशा स्वरूपात राहिला.(१८) अशा प्रकारे ब्रह्माचे ब्रह्मत्व त्याला दिले, निःसंगाला निःसंग केले, निर्विकल्पाचेही सविकल्पपण मोडून काढले.(१९)

**आतां संदेहचि नाहीं। नसे संशया उरी कांहीं । धन्य तुमचा अनुग्रही । साफल्य जालें।।२०।। ऐकोनी श्रोत्याचें समाधान। वक्ता आनंदला पूर्ण । पडलें दोघा आलिंगन । अश्रु नयन डवरले ।।२१।। म्हणे माझिया श्रमाचें । परिहार जाले गा साचे । गुह्य जें का सदाशिवाचें। आकळलें तुम्हां ।।२२।। आमुच्या अंतरीं होतें । तें तुम्हां बाणलें अवचितें । हेंचि असो सुदृढ तुमतें । सत्य सत्य त्रिवाचा ।।२३।। जालें परम समाधान । तुटला बोल खुंटलें मौन। परिपूर्ण स्वानंदघन । वस्तु वस्तुत्वें ।।२४।। निर्विकल्पता जया बाणली । त्याची वर्तणूक कैसीं जाली । तें पुढिले समासीं बोलिली । अवधारोत साधक ।।२५।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । पूर्णसमाधानप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - विदेहस्थितिप्रकार

**ऐका तया पुरुषाची स्थिति । ब्रह्माकारत्व आदिअंतीं । मी ब्रह्म कीं देह निश्चिती । आठवचि नाहीं।।१।।मी देह आहे कीं नाही। याचें विस्मरण पडिलें पाहीं। मी ब्रह्म होय अथवा नाहीं । हा संशयोचि मेला।।२।।एवं कल्पनेसी सांडिलें। पूर्ण पूर्णत्वीं समरसलें। म्हणसी देह काष्ठवत् पडिले। ऐसें नाहीं।।३।।तें पूर्वसंस्कारें चळतें। त्रिविध कार्य निफजतें।**

---

आता संदेह उरला नाही. संशयाला अवसर राहिला नाही, तुमच्या अनुग्रहामुळे मी धन्य झालो. माझ्या जन्माचे सार्थक झाले.(२०) श्रोत्याचे हे समाधानाचे उद्‌गार ऐकून वक्त्याला पूर्ण आनंद झाला.त्यांनी एकमेकांना आलिंगन दिले. त्या दोघांचेही डोळे त्या आनंदाने भरून आले.(२१) वक्ता म्हणाला की, "माझ्या श्रमाचा आज परिहार झाला. कारण तुम्हांला सदा शिव अशा परब्रह्माचे रहस्य कळले. (गुह्य ज्ञान प्राप्त झाले.)"(२२) माझ्या अंत:करणात जे होते, ते तुम्हाला अचानक कळले. तुमच्या मनावर ठसले. हेच ज्ञान तुमचे ज्ञान पक्के आणि कायम राहील. हे त्रिवार सत्य मी सांगत आहे.(२३) श्रोत्याला अतिशय समाधान झाले. त्यामुळे बोलणे खुंटले. मौनालाही आवर घातला गेला. परिपूर्ण, घनदाट स्वानंदस्वरूप,ब्रह्म ब्रह्मरूपानेच उरले.(२४) आता ज्याच्या अंगी निर्विकल्पता पूर्णपणे बाणली, त्याची वर्तणूक कशी असते, ते पुढील समासात सांगितले जाईल. साधकांनी लक्षपूर्वक ऐकावे. (२५)

## पंचिका ११वी, समास ५वा - विदेहस्थितिप्रकार

त्या पुरुषांची स्थिती ऐका.तो आदी-अंती ब्रह्माकारच झालेला असतो.मी ब्रह्म आहे किंवा देह आहे,याचे त्याला स्मरणच नसते.(१)मी देह आहे की नाही,याचे त्याला विस्मरण पडलेले असते.त्यामुळे मी ब्रह्म आहे अथवा नाही हा संशय त्याच्या मनातून फिटलेला असतो.(२)अशा प्रकारे त्याने कल्पनेचा त्याग केला,पूर्ण आहे ते पूर्णत्वामध्ये समरसून गेले.पण याचा अर्थ त्याचा देह काष्ठवत् पडला असेनाही.(३)

**आपण स्वस्वरूप स्मरणातें । विस्मरणातीत ।।४।। कुल्लाळ पावला राजपदवी। मग रासभें कासया राखावी । तैसी देहद्वयाची उठाठेवी । निर्विकल्पा कासया ।।५।। असो स्मरणविस्मरणावरी । बिंदुलें घातलें निर्धारीं । शुष्क तृणाचे परी । देहद्वय वर्तती ।।६।। देहासी अति सुख जालें। कीं अत्यंत दुःखें पीडिलें। जागृत कीं झोपीं गेलें। न स्मरे तो।।७।।देह स्वजनीं कीं रानीं। भूमीं कीं अंथरूणीं। ग्रामीं कीं स्मशानीं। न स्मरे तो।।८।। देशीं कीं विदेशीं। कुग्रामीं कीं काशीं। वोहळीं कीं भागिर्थीसी। न स्मरे तो।।९।।पलंगीं कीं चौरंगीं। शीतळीं की आगीं। भोगीं कीं विरागीं। न स्मरे तो।।१०।। ब्राह्मण कीं क्षत्रीं। संन्यासी कीं अग्निहोत्री। पुत्रपौत्रीं कीं अपुत्रीं। न स्मरे तो।।११।। मनुष्य कीं गंधर्व। देव किंवा दानव। रंक असे कीं राव। न स्मरे तो।।१२।। समुदाई कीं एकला। चालतो कीं बैसला। नाचतो कीं निजेला। न स्मरे तो ।।१३।। तृषित किंवा प्याला। धाला किंवा भुकेला । चंदनें कीं विष्ठेनें लेपिला । न स्मरे तो।।१४।। पादचारी कीं सुखासनी । संगे**

---

त्याचा देह पूर्वसंस्कारांनी चलनवलन करत असतो. त्याच्याकडून कायिक,वाचिक,मानसिक अशी तिन्ही प्रकारची कार्ये होत असतात.तो स्वत: मात्र विस्मरणातीत होऊन म्हणजे विस्मरण सोडून स्वस्वरूपाच्या स्मरणात मग्न असतो.(४) कुंभाराला राजाचे पद प्राप्त झाले. मग त्याने गाढवे कशाला राखत बसावे? त्याप्रमाणे एकदा निर्विकल्प झाल्यानंतर स्थूल आणि सूक्ष्म या दोन देहांची उठाठेव करण्याचे त्याला कारण काय?(५) असो,याप्रमाणे तो स्मरण आणि विस्मरण या दोन्हींचाही त्याग करतो, मग त्याचे दोन्ही देह वाळलेल्या गवताप्रमाणे होतात.(६)त्याच्या देहाला अतिशय सुख झाले किंवा तो देह अतिशय दु:खाने पीडित झाला,तो जागृतीत असला काय किंवा झोपेत गेला काय, त्याला कशाचेच स्मरण नसते. (७)देह आप्तस्वकीयांच्या मध्ये आहे की आडरानात आहे, भूमीवर आहे की अंथरुणावर आहे,गावात आहे की स्मशानात आहे याचे त्याला स्मरण नसते.(८)देह स्वत:च्या देशात आहे की विदेशात आहे,कुग्रामात आहे की काशीमध्ये आहे,ओढ्यात आहे की भागीरथीमध्ये आहे,याचे त्याला स्मरण नसते.(९)तो पलंगावर आहे की,चौरंगावर आहे,थंड जागी आहे की आगीत आहे,भोग भोगत आहे की विरक्त अवस्थेत आहे,याचे त्याला स्मरण नसते.(१०)तो ब्राह्मण आहे की क्षत्रिय, संन्यासी आहे की अग्निहोत्री; पुत्र, नातवंडे यांच्यामध्ये आहे की निपुत्रिक आहे; याचे त्याला स्मरण नसते.(११) तो मनुष्य आहे की गंधर्व, देव आहे की दानव, गरीब आहे की राजा, याचे त्याला स्मरण नसते.(१२) तो समुदायात बसलेला आहे की एकटाच आहे; चालतो आहे की बसलेला आहे, नाचतो आहे की झोपलेला आहे, याचे त्याला स्मरण नसते.(१३)तहानेलेले आहे की पाणी पिऊन तृप्त झालेला आहे,जेवण करून तृप्त झालेला आहे की भुकेलेला आहे, चंदनाचा लेप दिलेला आहे की विष्ठेने लिडबिडलेला आहे, याचे त्याला स्मरण नसते.(१४)तो पायी चालतो आहे की पालखीत आहे,

**पुरुष कीं कामिनी । कंठी हार कीं धामिनी । न स्मरे तो ।।१५।। निंदिती कीं स्तविती। पूजिती कीं ताडिती । ओढिती कीं फाडिती । न स्मरे तो ।।१६।। नेसला कीं नागवा । चेतन कीं जड पडावा । बांधिला किंवा सोडावा। न स्मरे तो ।।१७।। जन्मलें कीं मेलें । जाळिलें कीं पुरिलें । किंवा वैकुंठासी नेलें । न स्मरे तो ।।१८।। मद्यपी जैसा उन्मत्त । वस्त्रशस्त्रातें नेणत । तैसा हा विदेहमुक्त । देहातें न स्मरे तो ।।१९।। येणेंचि परी वाणी। बोलती किंवा मौनी । लौकिकी कीं पुराणी । न स्मरे तो ।।२०।। शिकवी कीं वेडा लावी। शुभाशुभ कोणे जाणावी । निंदा कीं स्तवनीं प्रवर्तावी । न स्मरे तो ।।२१।। भजनीं कीं श्रवणीं । कीं प्रवर्ते वक्तेपणीं । आगमीं कीं वेदपठणीं । न स्मरे तो ।।२२।। ऐकतो कीं पाहतो । खातो कीं वास घेतो । अस्पर्श किंवा स्पर्शतो । तेही स्मरेना ।।२३।। तैसेचि मनाचेही धर्म । धर्म चिंती की अधर्म । कुकर्म कीं अकर्म । न स्मरे तो ।।२४।। व्यापारीं कीं स्वप्नीं । कीं सुषुप्तींत पडे जाउनी। शोकें कीं हर्षे दोन्ही । न स्मरे तो ।।२५।। मननीं कीं देवताध्यानीं। सगुणीं किंवा निर्गुणीं। अथवा लागे विषयचिंतनीं। न स्मरे तो।।२६।।**

---

त्याच्याबरोबर पुरुष आहे की स्त्री,त्याच्या गळ्यात हार आहे की धामण,याचे त्याला स्मरण नसते.(१५)लोक त्याची निंदा करत आहेत की स्तुती,त्याची पूजा करत आहेत की त्याला मारत आहेत,त्याला ओढत आहेत की फाडत आहेत,त्याला त्याचे स्मरण नसते.(१६)त्याने वस्त्र नेसलेले आहे की तो विवस्त्र आहे,तो चैतन्ययुक्त आहे की जड होऊन पडलेला आहे, त्याला बांधून ठेवलेले आहे की मुक्त आहे. याचे त्याला स्मरण नसते.(१७)तो जन्मला आहे की मरण पावलेला आहे,त्याला जाळलेले आहे की पुरलेले आहे की त्याला वैकुंठाला नेण्यात आले. याचे त्याला स्मरण नसते.(१८)त्याचा देह दारुड्यासारखा उन्मत्त आहे,त्याला वस्त्राचे अथवा शस्त्राचे भान नसते,असा हा विदेहमुक्त असतो;त्याला देहाचे स्मरण नसते.(१९)याच प्रकारे त्याची वाणी बोलती आहे की मौनी,ती लौकिक आहे की पुराणकालीन आहे, याचे त्याला स्मरण नसते.(२०)ती वाणी लोकांना शिकवते की वेड लावते?ती शुभ आहे की अशुभ हे कोणी ठरवायचं?ती निंदेस प्रवृत्त होते की स्तुतीस?याचे त्याला स्मरण नसते.(२१)तो भजन करतो आहे की श्रवण करतो आहे?की वक्तृत्व करतो आहे?तो उपनिषदे वाचतो आहे की वेदपठन करतो आहे,याचे स्मरण त्याला नसते.(२२)तो ऐकतो आहे की पाहतो आहे?तो खात आहे की नुसताच वास घेतो आहे?तो स्पर्श करतो आहे की स्पर्श करत नाही आहे?तेही त्याला स्मरत नाही.(२३)त्याप्रमाणेच मनाच्या धर्माबाबतीतही असते.तो धर्माचे चिंतन करतो की अधर्माचे?तो वाईट कर्मे करतो आहे की कर्मेच करत नाही आहे?हे काही त्याला स्मरत नाही.(२४)तो व्यवहार करतो आहे की स्वप्नात आहे? की झोपेत गेला आहे?तो शोकात निमग्न आहे की आनंद भोगतो आहे? हे त्याला स्मरत नाही.(२५) तो मनन करतो आहे की देवतेचे ध्यान करतो आहे?तो सगुणाचे ध्यान करतो आहे की निर्गुणाचे?

**लोकांती कीं एकांती । भोगीं किंवा विरक्ति । सुवर्ण किंवा माती । न स्मरे तो।।२७।। स्वर्गीं की पाताळीं । सत्यलोकीं कीं भूमंडळीं । कीर्तनी कीं गोंधळीं । न स्मरे तो ।।२८।। धामीं की आरामीं । जनीं किंवा श्रीरामीं । निष्काम किंवा कामीं । न स्मरे तो।।२९।। मन आहे कीं नाहीं । समाधीं कीं प्रवाहीं । गेलें कीं आलें पाहीं । न स्मरे तो ।।३०।। हें ब्रह्मांड गेलें कीं आहे। सृष्टि कीं स्थिति होताहे। कीं लया गेलें सर्व हें। न स्मरे तो।।३१।। कैचें वैकुंठ कैंचें कैलास। सर्व आटलें एक मूस। पंचभूतांचा बा कस । वितळून गेला।।३२।। कैंची माया कैंचे अज्ञान । कैंचें ध्यान कैंचें ज्ञान । कैंची समाधि उत्थान । जाणिव नेणीव कैंची ।।३३।। ऐशी स्थिति जया पुरुषाची । तया वर्णिता मति कैंची। सविकल्प की निर्विकल्पाची। दशा राहिली ।।३४।। ऐशी दशा नव्हे जयासी । स्थिति तरी आठवा मानसीं । संग्रामशूर जो पुण्यराशी । त्यासीच घडे।।३५।।मुखीं बोलतां वाटे सोपें । करणीं करतां टीर कांपें[76]। देहबुद्धि सांडितां अति सोपें। कठीण नव्हे।।३६।।देह प्रारब्धा**

---

अथवा विषयांच्या चिंतनात दंग आहे हे काही त्याला स्मरत नाही.(२६) तो लोकांमध्ये आहे की एकांतात आहे? भोगात आहे की विरक्तीत आहे? समोरची वस्तू सोने आहे की माती? हे काही त्याला स्मरत नाही.(२७) तो स्वर्गलोकात आहे की पाताळात?सत्यलोकात आहे की भूमंडळात? कीर्तनात रमलेला आहे की गोंधळात? याचे त्याला स्मरण नसते.(२८) तो आपल्या घरी आहे की बागेत आहे?तो लोकामध्ये वावरतो आहे की श्रीरामाचे चिंतन करतो आहे? तो कामनारहित आहे की कामनेने व्याप्त आहे याचे त्याला स्मरण नसते.(२९) त्याला मन आहे की नाही? तो समाधीत आहे की प्रवाहात पडला आहे? आपल्या वस्तू गेल्या की आल्या? याचे त्याला स्मरण नसते.(३०) हे ब्रह्मांड नष्ट झाले आहे की अजून आहे?सृष्टिरचना चालू आहे की तिला स्थैर्य प्राप्त झाले आहे? की हे सर्वच लय पावले आहे? याचे त्याला स्मरण नसते.(३१) त्याला वैकुंठ काय नी कैलास काय, सर्व एका मुशीत आटून गेल्यासारखे वाटते. पंचभूतांचा वेगळेपणाही वितळून गेल्यासारखे वाटते.(३२) त्याला माया काय, अज्ञान काय; ध्यान काय ज्ञान काय; समाधी काय, उत्थान काय; जाणीव काय,नेणीव काय; या कशाचेच भान नसते.(३३) ज्या पुरुषाची अशी अवस्था असते, त्याचे वर्णन करायला बुद्धी कशी समर्थ होईल? त्याची अवस्था सविकल्पाची आहे की निर्विकल्पाची हेही ठरवता येत नाही.(३४) अशी दशा ज्याला अनुभवता येत नाही. त्याने निदान त्याच्या स्थितीचे मनाने स्मरण तरी करावे. अशा प्रसंगाशी दोन हात करायला जो समर्थ शूरवीर असेल आणि ज्याच्या पदरी पुण्याचा साठा असेल त्यालाच हे शक्य होईल.(३५) तोंडाने बोलायला हे सोपे वाटते. पण त्याप्रमाणे आचरण करताना मात्र कठीण परिस्थिती होते. देहबुद्धीचा त्याग करणे ही सोपी गोष्ट नाही. ती कठीण नाही काय?(३६) देह तर प्रारब्धाच्या

**आधीन । हें नव्हें की अप्रमाण । याचा सांडिताही अभिमान । आयुष्य आहे तों न मरे।।३७।। येथें असे गुरुकिल्ली । अहंकारें तनु धरिली । उभयासहित जेणें टाकिली । टाकित्या सहित ।।३८।। एक गेला एक राहिला । तेणें अवलंबिलें तिजला । राहो जावो आम्हांला । शब्द नाहीं ।।३९।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । विदेहस्थितिप्रकारे । पंचमसमासः ।।५।।**

**इति विदेहलक्षणपंचिका संपूर्णा ।।११।। ओवीसंख्या १४२**

---

अधीन असतो हे खोटे नाही. पण त्याचा अभिमान सोडणे हे आयुष्य असतोपर्यंत शक्य नाही. तो अभिमान आयुष्य सरेपर्यंत सरत नाही. (३७) देहबुद्धी सोडण्यासाठी एक गुरुकिल्ली आहे. अहंकाराने देहाचा ताबा घेतला आहे. त्या दोहोंचाही त्याग करणाऱ्यासह करता आला पाहिजे.(३८) मग एक गेला, एक राहिला; त्याने देहबुद्धीला ग्रासले; तो राहो अथवा जावो इत्यादींच्या बाबतीत आम्हांला बोल देऊ नका (आम्हांला दोष देऊ नका.)(३९)



# पंचिका १२वी - सहजस्थितिलक्षण

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - मिथ्यात्वलक्षण

**जीवन्मुक्ति विदेहमुक्ति । दोहीं वेगळी सहजस्थिति । बद्धमुक्ततेची समाप्ति । जाली जेथें।।१।। शिंपीचें काढून रजतु । मृगजळावरी बांधिला सेतु । परपार पावे वंध्यासुतु । जाला निवांत सुखरूप ।।२।। भवसागरीं साधनांचा । सेतु बांधिला हा साचा । परपार पावला सुखाचा । चिदाभास ।।३।। रज्जुसर्प जीवें मारिला । मारिता बहु कष्टी जाला । शेवटीं जाउनी निजेला । आकाशामाजीं ।।४।। तैसा शब्द हा शिणला । येणें मोहाचा घात केला। होपळपणें लया गेला । शून्यामाजीं ।।५।। मुक्याबहिरिया गांठी पडली । निरूपणाची सीमा जाली । दोन्हींपणें वहात गेलीं । उगमाचिकडे ।।६।। शिष्य बहिरा गुरु मुका। तुटला द्वैताचा तवका । मीतूंपण मिळाले एका । नामरूप सांडोनी ।।७।। मेहुणी पाहुणी आली। तिनें गृहधनीण ग्रासिली। खातां खातांचि विराली । आपणही तेथें ।।८।। देहबुद्धि हे दांडुगी।ब्रह्मबुद्धि पावली वेगीं। देहबुद्धि झडतां वाउगी । ब्रह्मबुद्धि होय।।९।। आकाशपुष्पें करून गोळा। वायुतंतूनें केली माळा। तेचि वंध्यापुत्राचे गळां। अति शोभापावली।।१०।।**

---

### पंचिका १२वी, समास १ला - मिथ्यात्वलक्षण

जीवन्मुक्ती व विदेहमुक्ती या दोहोंपेक्षा सहजस्थिती वेगळी असते.त्या स्थितीमध्ये बद्धमुक्ततेची समाप्तीच होते.(१)शिंपल्याची चांदी काढून त्याचा मृगजळावर पूल बांधला.वंध्येचा पुत्र त्यावरून जाऊन परतीराला पोहोचला व निवांत सुखरूप झाला.(२)त्याप्रमाणे संसारसागरावर विविध साधनांचा पूल बांधला.हा जीव त्यावरून पलीकडे जाऊन सुखी झाला.(३)रज्जुसर्पाला प्राणांनिशी ठार मारताना वंध्यापुत्र खूप कष्टी झाला.शेवटी तो आकाशात जाऊन झोपला.(४)त्याप्रमाणे शब्दाने मोहाचा घात केला त्यामुळे त्याला खूप शीण आला व पोकळपणाने तो शून्यामध्ये लय पावला.(५)मुक्याबहिऱ्यांची गाठ पडली.निरूपणाची अगदी सीमा झाली.दोघेही वाहत वाहत उगमाकडे येऊन पोहोचले.(६)शिष्य बहिरा होता,गुरू मुका होता.त्यांच्यातील द्वैतभावाची पकड सुटली.त्यामुळे नामरूपांचा त्याग करून त्यांचे मी-तूपण शेवटी एकरूप झाले.(७)मेहुणी पाहुणी म्हणून आली.तिने घरधनिणीला गिळून टाकले व खाता खाता स्वत:ही तेथेच विरून गेली.(८) तशी देहबुद्धी बलवान होती. पण तिच्याकडे ब्रह्मबुद्धी आली त्यामुळे देहबुद्धी तर झडलीच,पण त्यानंतर ब्रह्मबुद्धीही व्यर्थ ठरून नाहीशी झाली.(९) आकाशापुष्पे गोळा करून वाऱ्याच्या धाग्यांनी त्यांची माळ केली. ती माळ वंध्यापुत्राच्या गळ्यात अतिशय शोभू

**सकळ शास्त्रीचे सिद्धांत। मननामाजीं प्रवर्तात । विचार जाला सुशोभित । वंध्यापुत्रापरी।।११।। रांझणींचें प्रतिबिंब काढिलें। दग्धपल्लवीं दृढ बांधिलें। चांदणियामाजीं घातलें। सुकावया।।१२।। संचितक्रियमाणीं अडकलें । चैतन्य विवेकें काढिलें । प्रारब्धभोगार्थ सुकूं घातलें । अंतःकरणीं ।।१३।। शिर उडवितां स्थाणुपुरुषाचें । तीन विभाग जालें त्याचे । एक निमाले एक नाचे । तिजा सागरीं पडिला ।।१४।। एक अहंकार त्रिविध जाला । मुख्य तो तेथेंचि निमाला । लौकिकी एक राहिला । एक गेला पूर्व स्थळा।।१५।। वायु काटवणीं अडकला । पुत्र वेगेसी धाविला । सर्व वृक्षाचा ग्रास केला । सोडविलें पित्यातें ।।१६।। देहद्वयीं हा आत्मा । सापडलासे महात्मा । ज्ञानें जाळूनि सकार्य तमा । आत्मारामा सोडविलें ।।१७।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । मिथ्यात्वलक्षणप्रकारे । प्रथमसमासः ।।१।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास २रा - सहजत्वलक्षण

**बंधचि हा साच असावा। तरी मोक्ष ही मिरवी नांवा। यास्तव बंधमोक्षगोवा। सर्वथा नाहीं।।१।। ब्रह्मीहून भिन्न असता। तरी कैसा पा अभिन्न होता। ज्ञानेंचि केला सरता। हें व्यर्थ नव्हे।।२।।**

---

लागली.(१०) त्याप्रमाणे सर्व शास्त्रांचे सिद्धान्त मननाकडे प्रवृत्त होतात. त्यामुळे त्या वांझेच्या पुत्राप्रमाणे विचारही सजला.(११)रांजणातील प्रतिबिंब काढून जळालेल्या पालवीमध्ये ते पक्के बांधले आणि चांदण्यामध्ये सुकण्यासाठी वाळत घातले.(१२) त्याप्रमाणे संचित क्रियमाण यात अडकलेल्या चैतन्याला विवेकाने बाहेर काढून प्रारब्ध भोगण्यासाठी अंतःकरणामध्ये सुकायला घातले.(१३) स्थाणुपुरुषाचे शिर उडविताच त्याचे तीन विभाग झाले. एक मृत्यू पावला, एक नाचू लागला आणि तिसरा सागरात जाऊन पडला.(१४)त्याप्रमाणे एक अहंकार तीन ठिकाणी विभागला गेला. मुख्य अहंकार जागचे जागी शांत झाला. एक लौकिकात राहिला आणि तिसरा पूर्वस्थळाकडे परत गेला.(१५) वारा काट्याच्या जाळीत अडकला. त्याचा पुत्र त्याच्या सुटकेसाठी धावला. त्याने सर्व वृक्षांचा घास करून पित्याला मुक्त केले.(१६) त्याप्रमाणे दोन देहांच्या कचाट्यात बिचारा आत्मा अडकून पडला. तेव्हा ज्ञानाने कार्यासहित अज्ञानाला (तमाला) जाळून आत्मारामाला सोडविले.(१७)

### पंचिका १२वी, समास २रा - सहजत्वलक्षण

बंध जर खरोखर सत्य असता तर मोक्ष या नावालाही अर्थ प्राप्त झाला असता. म्हणून दोन्ही मिथ्या असल्यामुळे बंध आणि मोक्ष यांचा गुंता अजिबात नाही.(१) जीव ब्रह्माहून मुळातच भिन्न असता तर तो अभिन्न कसा होईल? आणि ज्ञानाने त्याला मुक्त केला असे म्हणणेही व्यर्थ नाही काय?(२)

**अरे हें उगोंचि सहजगति । इतुकीही मायेची शक्ति । मिथ्यात्वें बांधिती सांडिती । नवल तिचें ।।३।। सहज ब्रह्म परिपूर्ण । सहज अखंड दंडायमान । सहजचि जालें स्फुरण । ज्ञानाज्ञानरूप ।।४।। सहज अज्ञानीं पडिलें । सहज जडा अवलंबिलें । सहजचि भोगू लागलें । जन्ममृत्यूतें ।।५।। सहज कर्म करूं लागला । सहज योनी फिरे भ्रमला । सहजचि पुण्यपापें अवंतिला । सहज सुखदुःखा ।।६।। सहज पुण्याच्या कोटी । नरदेहाची लाधली पेटी । सहज उपजला अनुताप पोटीं । सहज विरक्ति बाणे ।।७।। सहज सद्गुरू सत्शास्त्र । सहज श्रवणादि विचार । सहज होय साक्षात्कार । सहज भेटी आपुली।।८।। सहजची अज्ञान गेले । सहजची ज्ञान मावळलें । सहजपणें उरलें । सहजी सहज ।।९।। सहज संचित जळालें । सहज क्रियमाण विरालें । सहज देह वर्तू लागले । प्रारब्धभोगीं।।१०।। सहज निमाला संशय । सहज प्रवर्ते यथान्वय । सहजचि न करी उपाय । प्रारब्धक्षयासी।।११।। सहज हे होती जाती । सहज इंद्रियें शिणतीं । सहजची आपली स्थिति । परिपूर्ण असे।।१२।। सहजत्व आपुलें नवचे । सहज होईना फुकाचें । क्षयवृद्धिवीण सहजाचें । सहजत्व असे ।।१३।। सहज भोग संपतां । सहज देहाची नुरे**

---

अरे हे सर्व व्यर्थच चालले आहे. ही सर्व मायेची शक्ती आहे. खोटी असूनही ती जीवांना बांधते, सोडवते हे तिचे नवलच होय.(३) परिपूर्ण ब्रह्म सहजावस्थेतच असून ते अखंड अस्तित्व असलेले असे आहे. त्याच्या ठिकाणी ज्ञानाज्ञानारूपी स्फुरण सहजच झालेले असते.(४) जीवही अज्ञानात सहजच सापडतो. तो सहजच जड देहाचा स्वीकार करतो आणि तो सहजच जन्म, मृत्यू यांचा भोग घेऊ लागतो.(५) तो सहजच कर्मे करू लागतो, सहजच अनेक योनी फिरत राहतो, सहजच पुण्यपापांच्या कचाट्यात सापडतो आणि सुखदुःखांना सहजच निमंत्रण देतो.(६) पुण्याच्या कोटिभर राशींमुळे त्याला नरदेहाची पेटी सहज प्राप्त होते. त्यानंतर ओघानेच त्याला पश्चात्ताप वाटू लागतो, त्यानंतर त्याला सहजच वैराग्य प्राप्त होते.(७) नंतर सद्गुरूंची भेट सहजच घडते, सच्छास्त्राचे सहजच श्रवण इत्यादी घडते, मग विचारही करतो आणि त्यातून सहजच साक्षात्कार घडतो आणि आपल्या आत्म्याची भेटही सहजच होते.(८) मग अज्ञान सहजच नष्ट होते, त्यानंतर ज्ञानही सहजच मावळते आणि सहजपणे सहजांत सहज आत्मतत्त्व उरून राहते.(९) मग संचित सहजच जळून जाते, क्रियमाण विरून जाते, आणि देह सहजपणे प्रारब्ध भोगत राहतो. (१०) मग संशय सहजपणे नष्ट होतो आणि मग तो पुरुष यथाक्रम सहजपणे वावरू लागतो. तो प्रारब्धक्षय होण्यासाठी मुद्दाम प्रयत्न करत नाही.(११) या सर्व गोष्टी सहजच होत राहतात,इंद्रियांना सहजपणे थकवा येतो, तसे आत्म्याची स्थिती सहजपणेच परिपूर्ण असते.(१२) आपले सहजपण कोठेही जात नाही, सहजपण व्यर्थ होत नाही. सहज आत्मतत्त्वाचे सहजपण क्षय, वृद्धी यांवाचून कायम असते.(१३) मग प्रारब्धभोग सहजपणे संपून जातात,त्यामुळे

**वार्ता । ऐसें सहजची असतां । निर्भय सहज ।।१४।। सहज नामरूप गेलें । सहजचि अस्ति भाति उरलें । सहज सर्व दिसूं लागलें । मिथ्यात्व सहज ।।१५।।सहज मिथ्यात्व जडासी । सहज खंडिले विजातीयासी । ब्रह्मात्मैक्यीं सजातीय भेदासी । सहज निर्मूळ केले।।१६।। सहज विरालें स्फुरण । स्वगत भेदाचें हें खंडन । सहज पावलें समाधान । प्रबोध होता ।।१७।। सहज देश आटला । तरी देशपरिच्छेद कोणाला । स्फुरणाभावीं काळाला । कलनत्व कैंचे ।।१८।। सहज कालपरिच्छेद । जाउनी सहजत्वें अभेद । वस्तुजाताचा उपमर्द । सहजची झाला ।।१९।। वस्तुपरिच्छेद निमतां । सहज अनंतत्व अनंता । सहज स्वप्नींचा जागा होतां । सकार्य नासलें ।।२०।। सहज इतके मायेने । खेळ खेळून लय पावणें । सहज सहजीं अखंडपणें । जैसें तैसें संचले ।।२१।। सृष्टि पूर्वी सहजचि असे । सहजत्व प्रलयीं उरलेसे । मध्येंही जें जें होतसें । तेंही सहजपणें ।।२२।। सहज होतां जातां । सहज हलेना तत्वतां । मग हानिलाभाची वार्ता । सहजत्वीं कोठें।।२३।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । सहजत्वलक्षणानुकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

---

देहाचे अस्तित्वच संपल्यासारखे होते, असे सगळे सहजपणे घडत असल्याने पुरुष सहजच निर्भय होतो.(१४) मग नामरूपे सहजच नष्ट होतात,सहजच अस्तिभाति ही लक्षणे उरतात. सगळ्याच गोष्टी सहजपणे मिथ्या दिसू लागतात.(१५) जड पदार्थांना सहजपणेच मिथ्यात्व येते, विजातीय असतील त्याचे सहजच खंडन होते आणि ब्रह्मात्मैक्याच्या अनुभवामध्ये सजातीय भेदही निर्मूल ठरतात.(१६) स्फुरण सहज विरून जाते. स्वगत भेदाचे अशा प्रकारे खंडन होते. ज्ञान होताच समाधानही सहजपणेच प्राप्त होते.(१७) या अनुभवात देशभेद सहज आटून जातो, मग देश परिच्छेद कोणाला लागू होईल? स्फुरणाचा अभाव असल्याने काळाला गती तरी कशी प्राप्त होईल?(१८) कालपरिच्छेद सहजपणेच नष्ट झाल्यानंतर सहजपणेच जीवाची ब्रह्मतत्त्वाशी अभिन्नता होते. त्यामुळे सर्व पदार्थांचा निरास आपोआपच होतो.(१९) अशा तऱ्हेने वस्तुपरिच्छेद नाहीसा झाल्यानंतर अनंत अशा आत्मतत्त्वाची अनंतता सहजच होते. तो स्वप्नातून सहजच जागा होतो. मग ते स्वप्न त्याच्या कार्यासह नष्ट होते.(२०) एवढा सगळा खेळ करून माया सहजपणे लय पावते. सहज ब्रह्म हे अखंडपणे आपल्या सहजपणात जसेच्या तसे असते.(२१) सृष्टी सहजच झाली आहे. प्रलयही सहजच होणार आहे. मधल्या काळात जे जे होत आहे तेही सहजपणेच होत असते.(२२) सर्व घडामोडी सहज होत जात असताना सहज ब्रह्म मात्र हलत नाही. त्यामुळे सहजपणात हानिलाभाची गोष्ट कशी असेल?(२३)

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - अकर्तृत्वनिरूपण

**सहज होतांही व्यापार । समाधि न मोडे अणुमात्र । तिहीं अवस्थेचे विकार । असतांचि सरले।।१।।सत्वांश अंत:करण भोक्ता । रजांश इंद्रिय साधनता । तमांश विषय कार्यजाता। गुणा गुण सेविती।।२।।परी हे विकार बुद्धीचे । प्रतिबिंबाहि भोक्तृत्व नवचे । मा अलिप्तत्व मुख्यबिंबाचें । काय बोलावें लागे।।३।।लहरीवरी लहरी। एक मरे एक मारी। परी पाणियासी दुसरी । अवस्था नसे ।।४।। असो तरंगीं असे पाणी । कीं ज्वाळामाजीं अग्नि । तैसे अंतर्बाह्यकरणीं । विषयां व्यापुनी आत्मा ।।५।। अग्निसी वेगळे असती । ते अग्निसंगें जळती । अग्नि अग्निचिये दीप्तीं । जळे कैसा ।।६।। लहरीयोगें जळासी । हुडहुडी न ये जैसी । इंद्रियव्यापारें तैसी । बाधा नव्हे ज्ञानिया ।।७।। प्राण सर्वदा वाहती। ते गमनागमनीं दिसती । ठाईच असतां तयाप्रति । गमनगती न संभवे।।८।। श्रवणें ऐके शब्दजात । पन्नास मात्रा एक स्वरांत । शब्द उठे अवकाशांत। आकाशींच विरे।।९।। तरी बोलिके कोण जाले। काय श्रवणीं ऐकिलें। ऐकोनी नायकणें जालें। सहज ज्ञानिया।।१०।।वायु त्वचा स्पर्श तिन्ही। असती जरी भिन्नपणीं।तरी स्पर्श विषय ज्ञात्यालागुनी। ग्रहण होता।।११।।**

---

## पंचिका १२वी, समास ३रा - अकर्तृत्वनिरूपण

व्यापार सहजपणे होत असताही समाधी अणुमात्रही भंग पावत नाही. तिन्ही अवस्थांचे विकार त्या तीन अवस्था असतानाच संपतात.(१) सत्त्वगुणाचा अंश अंत:करण हे भोक्ता आहे. रजोगुणाचा अंश इंद्रिये ही साधने आहेत आणि तमोगुणाचा अंश विषय हे कार्य आहे. म्हणजे गुणच गुणांचे सेवन करतात. (२) पण हे सर्व विकार बुद्धीचे होत. प्रतिबिंबालाही कधी भोक्तृत्व येत नाही. मग मुख्य बिंब अलिप्त असते हे काय सांगायला पाहिजे?(३) एका लाटेवर दुसरी लाट येते. एक मरते दुसरी मारते. पण पाण्याला दुसरी अवस्था नसते.(४) असो, लाटांमध्ये पाणी असते किंवा ज्वाळांमध्ये अग्नी असतो. त्याप्रमाणे अंतर्बाह्य इंद्रियांमध्ये आणि विषयांना आत्मा व्यापून असतो. (५) अग्नीपेक्षा जे वेगळे असतील ते अग्नीबरोबर जळून जातील पण अग्नीच अग्नीच्या ज्वालेने कसा काय जळून जाईल?(६) लाटेमुळे पाण्याला हुडहुडी येत नाही, त्याप्रमाणे ज्ञानी माणसाला इंद्रियांच्या व्यापारांनी बाधा होत नाही.(७) प्राण वाहात असतात, ते येतात आणि जातात. त्यांच्या या गमनागमनामुळे त्यांचे हे वाहणे समजते. ते एकाच जागी असते तर त्यांच्यात गमनगती निर्माण होणार नाही. (८) कानांनी सर्व शब्द ऐकू येतात. एका स्वरात पन्नास मात्रा अंतर्भूत आहेत. पण शब्द आकाशात उत्पन्न होतो आणि आकाशातच विरतो.(९) तर त्यांमध्ये बोलणारे कोण? कानांनी कोणाला ऐकले? त्याप्रमाणे ज्ञानी माणसालासुद्धा ऐकू येऊनसुद्धा न ऐकल्याप्रमाणे होते.(१०) वायू, त्वचा, स्पर्श हे खरोखर भिन्न असते तर ज्ञानी माणसाला स्पर्शविषयाचे ग्रहण होईल.(११)

**स्पर्शामाजीं असे सघन। पदार्थमात्रींहि आपण। तरी मग स्पर्श स्पर्शणें । कोण कोणासी।।१२।। मक्षिका कोठें न बैसे । पवित्र अपवित्र तें कायसे । डोळिया काय एक न दिसे । तरी उष्टा नव्हेची ।।१३।। पाहणें डोळाहि तेजाचें । पदार्थी भासकत्व हें कोणाचें । त्रिपुटीसी घनत्व आत्म्याचें । तेथें भिन्नत्व कोणतें ।।१४।। हें वेगळें कैसें निवडावें । तरी कोणें कोणासी पाहावें । ऐसे ज्ञात्याचें स्वभावें । पाहणें तें न पाहणें ।।१५।। रस रसना रसज्ञ । निवडितां न ये एक क्षण । रसरूपें एक जीवन । विभागलेसे ।।१६।। अन्न जल आणि गोडी । या वेगळे कोण निवडी । सच्चिद्रूप पाहून अर्ध घडी । राहों न शकती ।।१७।। गुळें गुळासी खादलें । कीं जीवनें जिवनाचें पान केलें । हे कांहीच न संभवले । भिन्नत्वाविण ।।१८।। द्वैताचा न होतां उमस । आणि सर्व सेवीतसे रस । तरी भोजन आणि उपवास । सारखाचि तया ।।१९।। पृथ्वीयेचा गंध गुण । आणि भूमीचाचि अंश घ्राण । एकरूपें विभागून । द्विधा जाली।।२०।।अश्विन तोचि कुमार । हा नामचि भेद मात्र । व्यापुनी आत्मा स्वतंत्र। आकाशापरी ।।२१।। कापुरें कापूर हुंगावा । कीं घ्राणाचा गंध घ्राणें घ्यावा । भिन्नत्वाचा नसतां गोवा । विषय कैचा।।२२।। येणें रीती कर्मेंद्रिय । प्रवर्तती स्वस्वविषय । विषयासी**

---

पण तो स्पर्शामध्ये किंवा स्पर्शविषय पदार्थांमध्ये सर्वत्र आपणच दाट भरून राहिला आहे. मग स्पर्श अथवा स्पर्शाची कृती कोणी कोणाला करायची?(१२) माशी कोठे बसत नाही? तिला पवित्र आणि अपवित्र यांचे काय? डोळ्याला सर्व दिसत असले तरी त्यामुळे तो पदार्थ उष्टा होत नाही.(१३) कारण डोळा तेजामुळे पाहतो. पदार्थात भासण्याचा (दिसण्याचा) गुणधर्म कोणाचा? सर्वच त्रिपुटीमध्ये आत्मा दाट असा व्यापून राहिला आहे. तेथे वेगळेपणा कसा राहील?(१४) हे वेगळे कसे काढावे? कोणी कोणाला पाहावे? अशा तऱ्हेने स्वाभाविकच ज्ञात्याचे पाहणेही न पाहणेच असते.(१५) रस, रसना, रसज्ञ या तिहींना एक क्षणभर सुद्धा वेगळे काढता येणार नाही. सर्व ठिकाणी एकच जलतत्त्व रसरूपाने विभागलेले असते.(१६) अन्न, जल आणि गोडी यांना वेगळे वेगळे कोण काढील? या तिन्ही गोष्टी सच्चिद्रूप पाहिल्यानंतर अर्ध घटकासुद्धा वेगळ्या राहू शकत नाहीत.(१७) गुळाने गूळ खाल्ला किंवा पाण्यानेच पाणी पिऊन टाकले. पण भिन्नत्व नसल्याकारणाने या गोष्टी संभवत नाहीत.(१८) द्वैताची उत्पत्तीच झाली नसताना सर्व रसांचे सेवन केले तर भोजन आणि उपवास त्या पुरुषाला सारखेच की !(१९) पृथ्वीचा गंध हा गुण होय, घ्राण (म्हणजे नाक) हा भूमीचाच अंश आहे. दोन्ही एकच पण त्यांच्या एकरूपाचे विभाजन होऊन त्यांचे दोन प्रकार झाले.(२०) अश्विन हाच कुमार दोहोंमध्ये फक्त नावाचाच फरक आहे.या सर्वांना व्यापून आत्मा आकाशाप्रमाणे स्वतंत्रच होय.(२१) कापराने कापराचा सुगंध घ्यावा, किंवा नाकाचा गंध नाकानेच घ्यावा. या दोन्ही क्रियांत भिन्नपणाचा काहीच संबंध नसल्याने गंध हा विषय कसा होईल?(२२) अशा प्रकारे कर्मेन्द्रिये स्वविषयांच्या ठिकाणी प्रवृत्त होत

**विषयत्व काय । नामरूपाविण ।।२३।। आपुलीच ध्वनी । उमटली जेथें पडसादनी । उभयस्वरें शब्दश्रेणी । भेदावतीना ।।२४।। आपुलाचि प्रतिभास दर्पणीं । दृश्य द्रष्टा उभयपणीं । एकला की जाले दोनी । बरे पहा ।।२५।। तैसें भोग्य भोक्ता साधन । एक परी भासती तीन । फेन बुद्बुद लहरी जाण । एक जळ ।।२६।। न मोडतां एकपण । दिसती जरी भिन्न भिन्न । तेंच जाणिजे साजिरेंपण । दुणावलें कीं ।।२७।। चंदन सुगंधें वेष्टिला । कीं चंदन सुगंधत्वा आला । एकचि द्विधा भासला । एकपणीं ।।२८।। समुद्रीं असतां पाणी । लोकोपकारार्थ मेघ आणी । मेघीं असतां तयालागुनी । दुजें नांव कोणतें।।२९।। पाणियाच्याचि धारा । वर्षताती अपारा । पृथ्वी व्यापुनी सरिता पुरा । एकचि पाणी।।३०।। पुन्हा सागरीं मिळालें । पाणीपणा नवचे मुकलें । तरी आलें अथवा गेलें । बोलणें तें वाव।।३१।। मन वायुपासून जालें । आणि आकाशीं राहिलें। उभय कारण सांडून गेलें। मन तें कोठें ।।३२।। हिंडतां होय हिंपुटी । परि ते आकाशाचिया पोटीं । जातां येतांहि शेवटी । ठाईंचा ठाई ।।३३।। कुलालचक्रीं बैसली मासी । भोवतां दिसे चक्रासरिसी । परी ते अढळ जैसी तैसी । मनही तैसें ।।३४।। प्राण वायूतें जरी सांडी । मनीं मनपणा**

---

असली तरी नामरूपावाचून विषयाला विषयत्व वेगळे असे काही आहे का?(२३) आपलाच आवाज पडसादामध्ये उठतो.पण मूळ नाद आणि त्याचा पडसाद यांच्या शब्दावलीमध्ये काही भेद निर्माण होतो का?(२४) आरशामध्ये आपलेच प्रतिबिंब पाहावे,तेव्हा दृश्य,द्रष्टा असे दोन भिन्न दिसतील.पण त्या एकच व्यक्ती आहेत की त्या दोन भिन्न व्यक्ती आहेत?याचा विचार करा.(२५) त्याप्रमाणे भोग्य,भोक्ता आणि साधन या तीन गोष्टी भासत असल्या तरी एकच आहेत.फेस,बुडबुडे आणि लाटा या तीन गोष्टी म्हणजे एकच पाणी असते.(२६)एकपणा न मोडता त्या गोष्टी भिन्न भिन्न दिसल्या तरी त्यांचे साजिरेपण एकच असून दुणावले असे फार तर म्हणता येईल.(२७) चंदनाला सुगंधाने वेढले की, चंदनालाच सुगंधाचे रूप आले,दोन्ही एकच.एकच चंदन असूनही दोन प्रकारचा भासला,असे म्हणता येईल.(२८)समुद्रात पाणी असूनही मेघ लोकोपकारासाठी ते आणतो.मेघात आल्यामुळे त्या पाण्याला दुसरे कोणते नाव द्यावे?(२९)पाण्याच्याच धारा सर्वत्र कोसळत असतात.पृथ्वी व्यापून नद्या वाहत असतात. सर्वत्र पाणी एकच असते.(३०) ते परत समुद्राला मिळते.त्याचा पाणीपणा नष्ट होत नाही. तेव्हा पाणी आले,पाणी गेले असे बोलणेही व्यर्थ ठरते.(३१)मन वायूपासून निर्माण झाले आणि आकाशात राहिले,पण दोन्ही कारणांना सोडून मन अन्यत्र कोठे गेले काय?(३२)हिंडण्याने त्याला कष्ट होत असतील,पण ते आकाशाच्याच पोटात असते.ते गेले आले तरी शेवटी जागच्या जागीच राहते.(३३) कुंभाराच्या चाकावर माशी बसली.चक्राचे भ्रमण चालू झाल्यावर ती चक्रासारखी दिसली तरी ती जशीच्या तशी अढळच असते.मनाचेही तसेच आहे.(३४) प्राण वायूला सोडून जात असता,मनातच

**होय प्रौढी । तरी गमनागमन तातडी । बोलों येती सुखें ।।३५।। जैसे पक्षियाचे चरणीं । हातीं राहे सूत्रबंधनीं । तेथुनी उडे परी पाणी । न सोडी जैसा ।।३६।। हें असो मनें कल्पिलें । सूक्ष्मचि जडत्वा आलें । मनविषयासी जाले । दोनी नाम ।।३७।। एकचि दो ठाईं होतां । तरी कैचा भोग्य भोक्ता । हे उगीच द्वैत वरता । दिसे परी मिथ्या ।।३८।। जाणेंयेणेंही न संभवे। विषया विषयत्वही नव्हे। तरी कोणें कोणा भोगावें। द्वैतचि नाहीं।।३९।। हेंचि पुढेंहि निरोपिलें । ज्ञात्याचे देह वर्तले । परी निश्चलत्व संचलें । जैसें तैसें ।।४०।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । अकर्तृत्वनिरूपणप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - सहजस्थितिप्रकार

**करोनी कांहीच न करी । भोगोनि अभोक्ता निर्धारी । ऐसी हतवटी दुसरी । सहजस्थितिविण नसे ।।१।। चांदणीं चंद्र शोभला । चंद्रचि चांदणत्वें पघळला । विषय सेवितां करणाला। भिन्नत्व तैसें ।।२।। ज्वालें अग्नि प्रकाशिला । द्विगुण शोभा पावला । तयासि भेद नवचे कल्पिला । रतिमात्र जेवी ।।३।। तेवि ज्ञातयाचीं करणें । स्वस्वरूपाचें पुष्टपणें । द्वैतरूपें विषयसेवनें । तों तों अद्वैत दुणावें ।।४।। जयाचा व्यापार तो एकांत । जयाचा विषय तें**

---

राहून मनाला प्रौढी (मोठेपणा)वाटत असती तर गमनागमन इत्यादी भाषा सुखाने वापरता आली असती. (पण तसे होत नाही.)(३५) पक्ष्याच्या पायाला दोरी बांधून तो हातावर ठेवता येतो. तेथून तो उडेल पण हाताला सोडून जात नाही.(३६) हे असो,मन कल्पना करते.सूक्ष्माला जड स्वरूप येते.मनाचेच दोन्ही विषय.पण दोन्हीही एकच.त्यांना फक्त दोन भिन्न नावे असतात.(३७) एकच वस्तू दोन ठिकाणी होताच भोग्य कोण आणि भोक्ता कोण?वरून द्वैत दिसत असले तरी ते मिथ्या असते.(३८)वस्तुतः जाणे येणे या दोन्ही क्रिया येथे संभवत नाहीत.विषयांनासुद्धा विषयत्व येत नाही.तेव्हा द्वैतच नसल्यामुळे कोणी कोणाला भोगावे?(३९)याच अनुभूतीचे पुढे वर्णन केले आहे.ज्ञात्याचा देह व्यापार करत असला तरी त्याचे निश्चलत्व जसेच्या तसे राहते.(४०)

## पंचिका १२वी, समास ४था - सहजस्थितिप्रकार

करूनही काहीच न करण्याची,भोगूनही काहीच न भोगण्याची हातवटी सहजस्थितीखेरीज दुसरीकडे कोठे नाही.(१) चांदण्यामुळे चंद्र शोभिवंत होतो किंवा चंद्र चांदण्याच्या रूपाने पाघळतो.विषयांचे सेवन करताना इंद्रियांचे भिन्नत्व तशा प्रकारातले होय.(२)ज्वालेमुळे अग्नी प्रकाशित झाला,तिच्यामुळे त्याला दुप्पट शोभा प्राप्त झाली.पण दोहोंमध्ये कणभरदेखील भेद कल्पिता येत नाही.(३) ज्ञात्याची इंद्रिये त्याप्रमाणे होत.द्वैतरूपाने विषयसेवन करत असतानाही स्वस्वरूपाच्या पुष्टपणाने अद्वैताचीच पुष्टी होते,

**अद्वैत । जयाचा पूर्वपक्ष तो सिद्धांत । इतरां न कळे ।।५।। जयाचे मन ब्रह्मांड व्यापी । परी निश्चलत्व नवचे किमपि । बुद्धि निश्चया साक्षेपी । परी ते अरूप ।।६।। जयाचें चित्त चिंतनीं । विषयीं असतां स्वरूपस्मरणीं । जयाचा अहंकार त्रिभुवनीं । व्यापूनि अस।।७।। एकदेशी मी मी करिती । तेणेंगुणें होय फजिती । तैसा हा नव्हे निश्चिती । सर्वाभूतीं मीच मी ।।८।। दृश्य द्रष्टा दर्शन । गाळून जें का अधिष्ठान । सांडूनियां मीतूपण। अवघा मीचि दाटला ।।९।। लौकिकीं जितके शब्द । ऐकतां ते तुल्य वेद । तरी द्वैतपणाचा भेद । कैंचा उरे ।।१०।। ब्रह्म ब्रह्माचिये घसणीं । स्पर्श उठे त्वचेलागुनी । एकांतीं अथवा जनीं । सारखाचि तो ।।११।। जनीं जनार्दन सांडिती । मग एकांतीं कोणा धुंडिती । बळेंचि डोळां घालती माती । म्हणती ज्ञानांजन ।।१२।। द्वैता भेणें पळूं जातां। द्वैत दुणावें तत्वतां । असो तया मूर्खाची वार्ता । कोण काज ।।१३।। जयाचे दृष्टीचें पाहणें । जगचि होइजे जनार्दनें । नामरूपा सांडून जाणें । पाहण्यासरिसें ।।१४।। प्रकाशापुढें जैसा तम। कीं शंकरापुढें काम । तैसें द्वैत जे रूपनाम । होय भस्म पक्षवातें।।१५।।**

---

अद्वैत दुणावते.(४) त्याचा व्यापार हाच एकांत होय. त्याचा विषय म्हणजे अद्वैत होय. त्याचा पूर्वपक्ष हाच सिद्धान्त होय. तो इतरांना कळणार नाही.(५) त्याचे मन ब्रह्मांड व्यापते तरीसुद्धा ते आपले निश्चलत्व थोडेसुद्धा सोडत नाही, बुद्धी निश्चय करण्याच्या बाबतीत अत्यंत साक्षेपी आहे. परंतु तो निश्चय अरूप असतो.(६) त्याचे चित्त सतत चिंतन करत असते. विषयात रममाण असूनही त्याचे स्वरूपाचे स्मरण चालू असते. त्याचा अहंकार त्रिभुवन व्यापून राहिलेला असतो.(७) जे एकदेशी (अव्याप्त, मर्यादित) असूनही मी मी करतात, त्यांची फजिती होते. तशी या ज्ञात्याची स्थिती नसते. तो त्यांच्यासारखा मुळीच नसतो. तो सर्व भूतांमध्ये स्वत:लाच पाहत असतो. सर्वांभूती मीच व्यापून आहे असे तो मानतो.(८) द्रष्टा, दृश्य आणि दर्शन अशी त्रिपुटी टाळून, मी-तूपणाचा त्याग करून या सर्व भेदांचे जे मूळ अधिष्ठान ते मीच आहे,या भावनेने तो दाटलेला असतो.(९) लौकिकातले सर्व शब्द ऐकताना ते त्याला वेदतुल्य वाटतात. मग द्वैतपणाचे भिन्न अस्तित्व कसे उरेल?(१०) त्याचा स्पर्शाचा अनुभव म्हणजे एक ब्रह्माचे दुसऱ्या ब्रह्माशी घर्षण होणे होय. हा अनुभव एकांतात असो वा लोकांतात असो, सारखाच असतो.(११) लोकातील परमेश्वराला जे सोडून देतात ते एकांतात कोणाचा शोध घेतात? डोळ्यात बळेच माती घालतात आणि म्हणतात की, हे ज्ञानांजन घालतो आहे.(१२) द्वैताला भिऊन पळू लागला की द्वैत दुप्पट वाढते. असो, त्या मूर्खाची गोष्ट करून काय फायदा?(१३) ज्याच्या दृष्टीने पाहणे म्हणजे नारायणानेच सर्व जग होऊन जाणे होय आणि आपण पाहत असतानाच नामरूपाचा त्याग करणे होय.(१४) प्रकाशापुढे अंधार किंवा शंकरापुढे मदन तसे त्याच्या वाऱ्यानेच (पक्षवात) नामरूपात्मक सर्व द्वैत भस्म होऊन जाते. (१५)

**तया कासया आसन । कासयाचे देहसमान । दृष्टि तेथें नारायण । कोंदाटला असे।।१६।। नेत्र जरी झांकिले । असंभाव्य स्वरूप संचले । अथवा तोंड जरी चुकविले। तरी ब्रह्म सन्मुख ।।१७।। ब्रह्म पाहतां सकळ । न पाहतां उरे केवळ । स्मरणीं ब्रह्मीचे कल्लोळ । विस्मरणीं तो परिपूर्ण ।।१८।। आतां डोळा दृश्य देखो । कीं दृश्यामाजीं सर्व माखो । कीं उभयत्व जाउनी राखो । आपुला आपण ।।१९।। स्मरण विषयाते स्मरो । किं आपणिया उपसंहारो । कीं उभयातें विस्मरो । कीं स्मरो उभयातें ।।२०।। हानिलाभाचा खरखरा । जयाचा निमाला एकसरा । या हेतु आठवविसरा । विसरला तो ।।२१।। आपला आपणचि स्वादु । आपला आपण मकरंदु । रससेवनीं अभेदु । गंधग्रहणीं तैसा ।।२२।। वाच्य वाचक खाउनी । वाचा प्रवर्तली वचनीं । पन्नास मात्रकाच्या श्रेणी । अनंत शब्द।।२३।। तयाचें बीज तो प्रणव । त्रिविधा दिसे एक नांव । उच्चार नाद ध्वनी आठव। चर्तुधाही तोची।।२४।। त्रिधा चतुर्धा वळून सूत । पन्नास गुंफिल्या असती त्यांत । पुढें मागें करितां उमटत । शब्दश्रेणी।।२५।।एक तीन पन्नास दिसती । परि ते रेखा आदिअंती। हे**

---

त्याला (समाधीसाठी) आसनाची गरज काय? देह ताठ ठेवून समान ठेवण्याची तरी आवश्यकता काय? जेथे त्याची दृष्टी जाईल तेथे नारायण भरून राहिला आहे.(१६) त्याने डोळे जरी झाकून घेतले तरी त्याच्या डोळ्यात असंभाव्य स्वरूप सामावून राहिले आहे. अथवा त्याने तोंड जरी फिरविले तरी जिकडे त्याचे तोंड असेल तिकडे त्याच्यासमोरच ब्रह्म समोर उभे ठाकते.(१७) ब्रह्माकडे पाहू लागताच पाहण्याची क्रिया न घडताच तो एकटाच उरतो. त्याच्या स्मरणात ब्रह्माचे तरंग उठत असतात आणि त्याच्या विस्मरणात तो स्वत:च परिपूर्ण ब्रह्म बनतो.(१८) आता डोळा दृश्याचे अवलोकन करो की दृश्यामध्ये सर्व भरून जावो किंवा दृश्य, द्रष्टा दोन्ही जाऊन तो आपला आपणच राहो,(१९) स्मरणात विषयांचे स्मरण करो, की स्वत:चा लोप करो, किंवा दोघांनाही विसरून जावो, अथवा दोघांचेही स्मरण करो,(२०) त्याची हानिलाभाची काळजी मिटलेली असते. या दृष्टीने स्मरण विस्मरणाला तो विसरला असे म्हणावयाचे.(२१) आपणच आपला आस्वाद घ्यावा, आपणच आपला मध सेवन करावा, तसा त्याच्या रससेवनात अथवा गंधग्रहणात अभेद निर्माण होतो. (तोच भोक्ता आणि तोच भोग्य असे संपूर्ण अद्वैत त्याच्या प्रत्येक कृतीमध्ये असते.)(२२) वाच्य आणि वाचक यांचा लोप करून वाचा बोलायला प्रवृत्त होते. पन्नास मातृका आणि असंख्य शब्द तयार होतात.(२३) तरी त्या सर्वांचे मूळ बीज जो प्रणव (ओंकार) तो तीन घटकांचा दिसला तरी ते एकच नाव आहे. उच्चार, नाद, ध्वनी, स्मरण या रूपात चार प्रकारचा झाला आहे, तरी तो तोच आहे, (२४) तीन घटकांचे रूप, अथवा चार घटकांचे रूप यांचे सूत एकत्र वळून सात पन्नास मातृका गुंफल्या आहेत. त्या मागेपुढे करून असंख्य शब्दांची मालिका उत्पन्न होते.(२५) एक, तीन अथवा पन्नास इत्यादी स्थूलदृष्टीने वेगळे दिसले तरी त्या सर्वात

**स्थूलदृष्टी भासती । ध्वनि ते सूक्ष्म।।२६।।एक असून फुटी पडली। भिन्नपणें वर्ते एकली। ऐसी समता जेथें जाली। द्वैताची माउली वांजट।।२७।।जो जो शब्द मुखीं आतुडे। ते तेहि वाणी बडबडे। परी किंचितही न मोडे। मौनपण।।२८।।ऐसेचि सर्वहि व्यापार। सप्तदश तत्वाचे प्रकार। होती जाती निर्विकार। जैसें तैसें।।२९।।सागरी वर्षती मेघ। कीं धावती सरिताओघ। अग्नि तरणी शोषी अमोघ।परी न्यूनाधिक नव्हे।।३०।।सर्व प्राणिमात्र ज्यावरी वर्तती। तरि न्यूनाधिक नव्हे स्थिति। तोंचि आपण तया विकारिती। एकपिंड उपाधि कैची।।३१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । सहजस्थितिप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - अभेदभक्तिप्रकार

**कैवल्याचे शिरावरी । नाचतसे विषयव्यापारीं । स्वप्नसुषुप्तिजागररिं । अभेदें वर्ते ।।१।। सहज देव सहज भक्त । सहज पूजा होत जात । परि त्रिपुटीचा झाला घात । एकपणेंविण।।२।। देव राहिला एकीकडे । भक्त धांवे भलतीकडे । विभक्तियोगें भक्ति घडे । कैसी ते नेणों ।।३।।विज्ञानभक्ति ते पवित्र । भेद लेश नसे अणुमात्र । भज्य**

---

एकच रेषा असते. ते स्थूलदृष्टीने वेगवेगळे दिसत असले तरी ते सर्व सूक्ष्मरूपाने ध्वनीच असतात.(२६) ते सर्व एकच असून त्यांमध्ये फूट पडली. ते भिन्न असले तरी अभिन्नपणे वागू लागले. अशी समतादृष्टी जेथे निर्माण होते तेथे द्वैताची निर्मिती होत नाही. (द्वैताची आई वांझ असते.)(२७) मुखातून जो जो शब्द बाहेर पडतो ते ते वाणीच बडबडत असते. पण ज्ञात्याचे मौन किंचितही भंग पावत नाही.(२८) अशा तऱ्हेने मानवी देहाचे सर्वच व्यापार म्हणजे सतरा तत्त्वांचे प्रकारच होत. ते होतात आणि जातात. पण ज्ञाता जसाच्या तसा निर्विकार असतो.(२९) सागरामध्ये मेघ वर्षाव करतात किंवा अनेक नद्यांचे प्रवाह त्यात येऊन मिळतात. अग्नी (वडवानल), सूर्य इत्यादी पाण्याचे शोषण करतात. पण सागर मात्र कमीजास्त होत नाही.(३०) त्याप्रमाणे सर्व प्राणिमात्र ज्याच्यावर वावरतात, तरी सुद्धा ब्रह्माच्या स्थितीमध्ये कमीजास्त काही होत नाही. त्या तत्त्वाला एक पिंडाची उपाधी कशी विकृत करू शकेल?(३१)

## पंचिका १२वी, समास ५वा - अभेदभक्तिप्रकार

स्वप्न,सुषुप्ती आणि जागृती या तीनही अवस्थांमध्ये विषयव्यापारात मग्न असूनही मुक्त पुरुष कैवल्याच्या शिरावर नाचत असतो.(१)त्याला देव सहज असतो.भक्तही सहज असतो.पूजाही सहजपणे होत जाते.पण त्याच्या ठिकाणी त्रिपुटीचा नाश झालेला असतो.त्याच्या ठिकाणी एकपणाही राहिलेला नसतो.(२) एरवी देव एकीकडे धावतो आणि भक्त दुसरीकडे धावतो, अशा विभक्तीतून (भिन्नपणातून) भक्ती कशी घडते कोण जाणे !(३) विज्ञानभक्ती हीच पवित्र भक्ती होय. तिच्यात भज्य आणि भजक

**भजक एकत्र । जया भक्तीनें कालविले ।।४।। देवभक्ताची चुकामुकी । माया खेळे एकीबेकी । ते सद्‌गुरूनें केली फुकी । जाले एकी दोनीपण ।।५।। देवपण भक्तीं मिळालें । किं भक्त देवांत आटले। दोनी नसतां जें एकलें । एकपणाही न साहे ।।६।। आकाश जैसें गगनीं। कीं पाणियामाजीं पाणी । देवभक्ताची मिळणी । तैसी जाली।।७।। एक असतां सहजी। अज्ञानें केली दुजी । अज्ञान निरसतां मुरे शेजीं । स्वानुभवसुख।।८।। अनेक म्हणजे अनएक । जें सर्वाहून व्यतिरेक । एक म्हणजे सर्वत्रीं व्यापक । अन्वयरूप।।९।।म्हणून एक ते अनेक। अनेक तेचि एक । अन्वय आणि व्यतिरेक । हा पूर्वपक्ष ।।१०।। एकीं अनेक आटलें । एकपणीं शब्द फोलें । अभेदभक्तीनें केलें । कांहींचा बाही ।।११।। एकपणाचा उमस । काढितां त्रिपुटी सावकाश । होत असे म्हणोनी ध्यास । एकपणाचा नसे ।।१२।। त्रिपुटी जेथें विराली । हेच अभेदभक्तीची किल्ली । तरी ना करितांच घडली । अनायासें ।।१४।। एक प्रीति दो ठाई जाली । पतीं परपुरुषीं विभागली । तरि ते पतिव्रता बोलिली । नवचे कोणी ।।१५।। आपुल्यासाठीं देवावरी । प्रीति ठेवितां निर्धारी । तिसीच म्हणावें व्यभिचारी । भक्ति पैं गा ।।१६।।**

---

एकत्र कालवले जाऊन त्यांमध्ये अणुमात्रही भेद नसतो. (४) माया एकीबेकी खेळत असल्याने देवभक्तांची चुकामूक होत असते. पण सद्‌गुरूंनी ती माया व्यर्थ केल्याने द्वैताच्या जागी अद्वैत निर्माण होते.(५) त्या प्रक्रियेमध्ये देवपण भक्तात मिळाले की, भक्तपण देवात आटले कोणास ठावूक? दोन्हीच्या अभावी जे एकटे तत्त्व उरते त्याला एक असे म्हणणेही खपत नाही.(६) आकाश जसे गगनात, पाणी जसे पाण्यात त्याप्रमाणे देव आणि भक्त परस्परात मिसळून जातात.(७) स्वाभाविकपणे एकच तत्त्व असताना अज्ञानाने त्या जागी द्वैत निर्माण केले जाते. शेवटी अज्ञान नष्ट होताच स्वानुभवसुख प्राप्त होते.(८) अनेक म्हणजे एक नाही ते; पण 'सर्व'च्या अर्थापेक्षा अव्याप्त (व्यतिरेक) आणि विरोधी होय. हा व्यतिरेक होय आणि एक म्हणजे सर्वत्र व्यापून असलेला (अन्वय) हा अन्वय होय.(९) म्हणून एक तेच अनेक आणि अनेक तेच एक होय. असा अन्वय व्यतिरेकरूप पूर्वपक्ष होय.(१०) एकात अनेक आटतात. एकपणाचा शब्ददेखील अभेद भक्तीने फोल केला जातो. अभेदभक्तीने काहीच्या बाही (वर्णनातीत) करून टाकले.(११) एकपणाची उत्पत्ती होताच हळूहळू त्रिपुटीचा उदय होतोच. म्हणून एकपणाचा ध्यास घेता येत नाही.(१२) त्रिपुटी विरून जाणे हीच अभेदभक्तीची किल्ली होय, रहस्य होय. ती कोणी न करताच आपोआप घडते.(१३) आपणच देव आणि आपणच भक्त हा केवळ नावाचाच व्यवहार होय. अभेदभक्ती ही नेहमी अव्यभिचारी असते.(१४) एकच प्रेम, ते पती आणि परपुरुष यात विभागले गेले तर त्या स्त्रीला कोणी पतिव्रता म्हणणार नाही.(१५) आपल्यासाठी देवावर प्रेम केले तर त्या भक्तीला व्यभिचारी भक्ती म्हणतात.(१६)

**एक जालिया भक्त देव । तरी द्वैताचा नुरे ठाव । अभेदभक्तीचा स्वभाव । ऐसा असे।।१७।। अभेद सहजचि आहे। आजि नवें केलें नव्हे । ऐसें समजून जो पाहे । तोचि लाहे येरां ठक ।।१८।। सर्व हेंचि नामरूप । विचारें होतां तें अरूप । अभेदभक्ति अपोआप । न करितां होय ।।१९।। देव भक्त ते अक्षई । अक्षयरूप आपुला ठाई । आतां भजनाची नवाई । भिन्नत्वें कैची ।।२०।। एवं भिन्नत्व गेलें वृत्तीचें । मासले जितके नामरूपाचे । तें तें रूपडें देवाचें । भक्तासहित ।।२१।। करणें पाहणें आटलें । द्वैतभाव विरालें । ऐसे भजन जरी घडलें। तरी उत्तमोत्तम ।।२२।। याविरहित कोणी म्हणती । ते जाणावी कर्मभक्ति । जेथें भेदाची समाप्ति । जाली नाहीं ।।२३।। सहज सांडोनी सायासीं पडे । अभेद असतांची बिघडे । वर्म जाणती ना बापुडे । सहजस्थितीचें ।।२४।। जीवन्मुक्ति विदेहमुक्ति । सहजस्थिति अभेदभक्ति** नामभेद **मात्र दिसती । परी तें एकरूप ।।२५।। सविकल्प निर्विकल्प जरी जालें । परी तें एकरूप भासले । सविकल्प मनें कल्पिलें । निर्विकल्पता कवणा ।।२६।। स्वस्वरूप बद्ध ना मुक्त । सविकल्प ना कल्पनातीत । नामरूपाचा संकेत । पूर्वपक्षीं होय ।।२७।। ज्ञानें अज्ञान निरसलें । जीवद्वैत**

---

भक्त व देव एकरूप झाल्यावर द्वैताचे अस्तित्व उरत नाही. हा अभेदभक्तीचा स्वभाव आहे.(१७) अभेद तर मूळचाच आहे आज तो नव्याने झालेला नाही. असे समजून जो पाहील त्यालाच अभेदभक्तीचा लाभ होईल. इतरांना तिच्यापासून वंचित व्हावे लागेल.(१८) सर्व हेच नामरूपमय विश्व होय. विचाराच्या साहाय्याने ते अरूप होताच अभेदभक्ती आपोआप, मुद्दाम न करता होते.(१९) देव व भक्त अक्षयरूप असून आपापल्या ठिकाणी आहेत. मग भिन्नत्वाने भजन करण्याची नवलाई ती कोणती?(२०) अशाप्रकारे वृत्तीचे भिन्नत्व निघून गेल्यावर जेवढे जेवढे नामरूपाचे नमुने असतील ते ते सर्व भक्तांसहित देवाचीच रूपे होत.(२१) करणे, पाहणे आटून जाऊन द्वैतभाव विरलेल्या अवस्थेत जर भजन घडले तर उत्तमच होय.(२२) यावाचून जर कोणी भजन करत असतील तर ती कर्मभक्ती समजावी.कारण त्या भजण्यामध्ये भेदाची समाप्ती होतच नाही.(२३) सहज गोष्टीचा त्याग करून विनाकारण कष्टात पडल्यासारखे ते होईल. आणि मुळात असलेला अभेद नष्ट होईल.त्या बापड्यांना सहजस्थितीचे वर्मच अद्याप कळले नाही, असे म्हणावे लागेल.(२४) जीवन्मुक्ती, विदेहमुक्ती, सहजस्थिती, अभेदभक्ती यांच्यात फक्त नावांचाच फरक दिसतो. खरे तर त्या सर्व एकरूपच होत.(२५) सविकल्प निर्विकल्प असा भेद जरी असला तरी ते एकरूप होतात.सविकल्पाची कल्पना मन करते. पण निर्विकल्पाची कल्पना कोण करील?(२६) स्वस्वरूप बद्धही नाही अथवा मुक्तही नाही. सविकल्प नाही अथवा कल्पनातीतही नाही. नामरूपाचा संकेत हा फक्त पूर्वपक्षादाखलच आवश्यक असतो.(२७) ज्ञानाने अज्ञानाचे निरसन केले.त्यायोगे जीवद्वैत संपूर्णपणे गेले आणि जेवढे

**निःशेष गेलें । मिथ्या प्रतीतीस आलें । ईशद्वैत जितुकें।।२८।।समाधान एक असतां । कल्पिलें नामसंकेता । हा देहसंबंध तत्वतां । उपाधिमुळें।।२९।।ज्ञानें समाधान जालें एक। अभंग जें का निश्चयात्मक। तयासीच हीं नामें अनेक। विदेहादि ठेविली।।३०।। देहउपाधि निमाली। संकेतचिन्हें तीं सवें गेलीं। पुढे अनिर्वाच्यता संचली। स्थितिगतीविण।।३१।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । अभेदभक्तिप्रकारे । पंचमसमासः ।।५।।**

**इति सहजस्थितिप्रकारपंचिका संपूर्णा ।।१२।। ओवीसंख्या १४२**

---

म्हणून ईशद्वैत असेल त्याची मिथ्यात्वाने प्रतीती झाली,(२८) समाधानाचे स्वरूप एकच असताना नामसंकेताची कल्पना केली जाते. वास्तविक पाहता उपाधींच्या योगाने हा देहसंबंध जोडला जातो.(२९) ज्ञानाने अभंग असे समाधान निश्चयरूपाने झाले असता त्या एकालाच विदेह इत्यादी अनेक नामे ठेविली जातात.(३०) देहउपाधी नाहीशी झाल्यावर ही सर्व संकेतचिन्हे तिच्याबरोबर गेली. त्यानंतर स्थितिगतिनिरपेक्ष अनिर्वचनीयताच साचून राहते.(३१)



# पंचिका १३वी - फलरूप

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - ज्ञानवैराग्योपरमप्रकार

**श्रोता म्हणे ज्ञान तें एक । समाधान ज्ञानाचा परिपाक । सविकल्पादि नामें अनेक । कासया ठेविलीं।।१।। वक्ता म्हणे हें वृत्तिभेदें । नामें पावलीं विशदें । परि जाणिजेती अभेदें । मुक्तस्थिति एक ।।२।। समाधानाची एकरूपें । पावले असती गुरुकृपें । कोणी राहिले सविकल्पें । एक निर्विकल्पापरी ।।३।। एक प्रपंचीच वर्तती । एक उदास फिरती । एक पडोनीच राहती । एक दिसती उन्मत्त ।।४।। एक करिती देवतार्चन । एक करिती भजन। एक करिताती तीर्थाटन । एक कर्म आचरती ।।५।। एक संप्रदाय वाढविती । एक तेथून चुकविती । एक ज्ञान आच्छादिती । प्रगटती एक ।।६।। परी ते एकरूप झाले । प्रारब्धें देह वर्तू लागले । कोठें वैराग्य दिसलें । कोठें गुप्त।।७।। कोठें दिसें उपरम।कोठें दिसे सकाम।परी अंतरीचें वर्म।एकरूप असे।।८।।श्रोता म्हणे वैराग्य उपरम।हेंचि ज्ञानाचें भाग्य परम।कोठें गुप्त कोठें प्रगट हा नेम।संभवेना कीं।।९।।तरी अवधारा मानसीं।त्रिविध लक्षणें हें कैसीं।ज्ञान तेथें उभयांसी।राहणें असे।।१०।।नामरूप न करितां त्याग। ज्ञानचि**

---

### पंचिका १३वी, समास १ला - ज्ञानवैराग्योपरमप्रकार

श्रोता म्हणतो,"ज्ञान एकच आहे. ज्ञानाचा परिपाक म्हणजे समाधान होय. मग सविकल्प इत्यादी अनेक नावे का बरे ठेवली?"(१)वक्ता म्हणतो,"वृत्तिभेदाने ही अनेक नामे प्राप्त होतात.पण ती सर्व अभिन्नत्वाने समजून घ्यावीत.पण मुक्तस्थिती एकच असते.(२)गुरुकृपेने एकच समाधान सर्वांना प्राप्त होते.पण कोणी सविकल्पाने राहतात.कोणी निर्विकल्पाने,(३)कोणी प्रपंचात राहतात,कोणी उदासपणे फिरतात,कोणी पडूनच राहतात,कोणी उन्मत्तासारखे दिसतात.(४)कोणी देवतांची पूजा करतात,कोणी भजन करत असतात,कोणी तीर्थाटन करतात,कोणी कर्माचरण करतात.(५)कोणी संप्रदाय वाढवितात,कोणी ते टाळतात,कोणी स्वत:चे ज्ञान झाकून ठेवतात,कोणी ते प्रगट करतात.(६)पण सर्वांचे ज्ञान एकरूपच असते.प्रारब्धानुसार सर्वांचे देह वर्तन करत असतात.कुठे वैराग्य दिसते,कुठे ते गुप्त असते,(७)कुठे शांती दिसते,कुठे सकाम कर्मे दिसतात;पण त्या सर्वांचे अंतरीचे वर्म एकच असते.(८)तेव्हा श्रोता म्हणतो की,"वैराग्य आणि शांती हीच ज्ञानाचे परम भाग्य होय.त्यामुळे कुठे गुप्त,कुठे प्रगट असा भेद असायला नाही पाहिजे."(९)यावर वक्ता उत्तर देतो की,आता नीट लक्ष देऊन ऐका.ही त्रिविध लक्षणे समजून घ्या.जेथे ज्ञान असते,तेथे बाकीच्या दोहोंना राहावेच लागते.(१०)नामरूपांचा त्याग न करता

**नव्हे अभंग। जरी चंचल विरती सांग। ज्ञान लाहे उपरमें।।११।।हे तिन्ही एकत्र असती । दोन आच्छादिल्यापरी वाटती । प्रारब्धें प्रतिबंधक दिसती । कोठें प्रगट।।१२।।या तिहींचें कैसें चिन्ह । हेतु स्वरूप कार्य पूर्ण । आणि अवधीचेंही लक्षण। भिन्नभिन्न सांगों।।१३।। दोषदृष्टीं पदार्थीं देखिजे । या हेतू विरक्ति उपजे । त्याग हे स्वरूप ओळखिजे। पुन्हा भोगेच्छा नव्हे।।१४।।श्रवणमननादि घडतां। हा हेतू ज्ञान उद्भवतां। ग्रंथिभेद स्वरूप तत्वतां। कार्य तें नव्हे एकरूप।।१५।।शमदमादि हेतु। बुद्धिनिरोध हा एकांतू। पुन्हा दंडळिना चित्तू। हें कार्य उपरमाचें।।१६।।मुख्यत्वें ज्ञान प्रधान। हे साध्य असती दोन। मोक्ष नव्हे ज्ञानेंविण। श्रुतिप्रमाणसिद्ध।।१७।।ज्ञान सांडून वैराग्य घेती। आणि उपरम जरी करिती। परी वाउगें कष्टी होती। ते हतवटी न ये।।१८।। वैराग्य उपरम म्हणावें। परी यथार्थ तें रूप नव्हे। विवेकेंवीण शिणावें। मोक्षहि नाहीं।।१९।।वैराग्य-उपरम-आभासें। लोकांतरा गमन होतसे। अथवा योगिकुलीं जन्मतसे। पुढें ज्ञान होईल।।२०।। ऐसें नव्हे कीं ज्ञान। उद्भवतां नासे अज्ञान। येथेंचि स्वयें ब्रह्म आपण। मोक्षरूप होतो।।२१।।तेथें वैराग्य आणि उपरम। हे असतीची निःसीम। प्रारब्धें दिसती विराम । पावले ऐसे।।२२।।जनकादि राज्य**

---

ज्ञान अभंग राहूच शकत नाही. जरी संपूर्ण विरक्ती चंचल असली तरी शांतीने ज्ञानाची प्राप्ती होऊ शकते.(११) ही तिन्ही लक्षणे एकत्रच असतात. त्यात दोन आच्छादिल्याप्रमाणे वाटतात. प्रारब्धयोगाने कोठे प्रतिबंधक दिसतात, कोठे प्रगट असतात.(१२) या तिहींची लक्षणे, त्यांचे हेतू, स्वरूप आणि कार्य आणि त्यांचा शेवट इत्यादी वेगवेगळे करून सांगतो.(१३) पदार्थांकडे दोषदृष्टीने पाहण्यामुळे विरक्ती उत्पन्न होते. स्वरूप ओळखल्यानंतर पुन्हा भोगेच्छा न होणे हे त्यागाचे स्वरूप होय.(१४) श्रवण मननादी घडल्याबरोबर ज्ञान उद्भवते. हा ज्ञानाचा हेतू म्हणजे कारण होय. ज्ञानाचे स्वरूप म्हणजे ग्रंथिभेद होणे, हे होय. त्याचे कार्य एकरूप नसते.(१५) शमदमादी हा हेतू. त्यामुळे उपरम प्राप्त होतो. बुद्धिनिरोध हे त्याचे स्वरूप होय. त्यामुळे चित्त विचलित होत नाही. हे उपरमाचे कार्य होय.(१६) यात ज्ञान हे मुख्य आहे. बाकीचे दोन ही साध्येच आहेत. मोक्ष ज्ञानावाचून मिळत नाही, हे श्रुतिप्रमाणसिद्ध आहे.(१७) ज्ञानाचा त्याग करून वैराग्याचा स्वीकार केला आणि उपरम म्हणजे शांतीचा अवलंब केला तर त्यामुळे विनाकारण कष्ट मात्र होतील. ज्ञानाची जागा ते घेऊ शकणार नाहीत.(१८) वैराग्य, शांती हे असले तरी विवेकावाचून मोक्ष मिळणार नाही. कष्ट मात्र होतील,(१९)वैराग्य आणि शांती यांचा आभास करून स्वर्गादी लोकात जाता येईल किंवा योगिकुळात जन्म घेईल आणि त्यानंतर त्याला ज्ञान होईल.(२०) पण ज्ञानाचे असे नाही. ते उत्पन्न झाल्याबरोबर अज्ञान नष्ट होते. याच जन्मात ताबडतोब जीव ब्रह्मरूप होऊन त्यास मोक्ष मिळतो.(२१) ज्ञान असेल तेथे वैराग्य आणि उपरम ही दोन्ही असतातच. पण प्रारब्धामुळे ती नष्ट झाल्यासारखी दिसतात.(२२)जनकादिक राज्य करीत असताना

**जरी करितां। पूर्ण बोध तया पुरता। वैराग्य उपरमही पाहतां। तेथें असे।।२३।।नव्हे जरी वैराग्य उपरम। तरी विदेहत्व कैसें नाम। हें अंतरीचें कळावें वर्म। बाह्य मुद्रा खोटी।।२४।। बाह्यत्यागें नागवे जाले। अंतरीं स्वर्गादि भोग इच्छिले। तें वैराग्य न वचे बोलिलें। विवेकजनीं।।२५।।ब्रह्मलोकादितृणांत। वमकापरी न इच्छी चित्त। हे वैराग्यअवधि निश्चित। ज्ञानेंविण नव्हे।।२६।।सुषुप्तिसारिखी विस्मृति। उपरमअवधि निश्चिति। हेही घडे ज्ञात्याप्रती। मिथ्यात्व दृढ होतां।।२७।।मी देह बुद्धि हे बळकट। स्मरतां न स्मरतां अविट। ऐसी ब्रह्मबुद्धि जरी निघोट। हेचि ज्ञानाची अवधि।।२८।।द्वैतबुद्धीचें हनन। हेंचि वैराग्याचें लक्षण। ब्रह्माकार अनुसंधान। ज्ञान तें हेंचि।।२९।।चंचल उर्मी जेथें सरली। केवळ अखंडता संचली। हेचि उपरमाची किल्ली। ज्ञानिया लाभे।।३०।।संशयरहित समाधान। हेंचि ज्ञान हेंचि विज्ञान। आतां देह प्रारब्धाधीन। वर्तो सुखें।।३१।। आतां पाहिजे तें करो। पडो अथवा फिरो। भोगीं विरागीं राहो मरो। यासी काज नाहीं।।३२।। इच्छा नसे सविकल्पाची। अथवा निर्विकल्प दशेची। आणि मायानिर्मित मोक्षाची। सापेक्षा नसे।।३३।। हे अवघेचि घर रिघाले। न जाती जरी दवडिले। यथार्थ ज्ञान दृढ जालें। जया पुरुषासी।।३४।।**

**इति श्रीमदागमसारे। उपनिषत्तात्पर्यानुसारे। ज्ञानवैराग्योपरमप्रकारे। प्रथमसमासः।।१।।**

---

त्यांना पूर्ण ज्ञान झालेले होते. वैराग्य आणि उपरमही त्यांचे ठिकाणी होते.(२३)त्यांना जर वैराग्य, उपरम नसते तर विदेह हे नाव कसे पडले असते? हे अंतरीचे वर्म समजून घ्यावे. बाह्य रूप खोटे समजावे.(२४) वरवरचा त्याग करून एखादा मनुष्य नागडा हिंडेल, पण अंत:करणात मात्र स्वर्गादी भोगांची इच्छा करील, तर विवेकी लोक त्याला वैराग्य म्हणत नाहीत.(२५)ब्रह्मलोकापासून तृणापर्यंत सर्व वमकाप्रमाणे (ओकून टाकलेल्या पदार्थाप्रमाणे)मानून चित्ताने त्याची इच्छा न करणे ही वैराग्याची सीमा होय. ती ज्ञानावाचून सिद्ध होत नाही.(२६)अगदी झोपेतल्यासारखे विस्मरण ही उपरमाची सीमा होय. मिथ्यात्व दृढ झाल्यावर ज्ञात्याला तेही साध्य होते.(२७)मी देह आहे ही बुद्धी इतकी दृढ असते की स्मरण असताही ती न स्मरल्यासारखी पक्की होते, त्याप्रमाणे ब्रह्मबुद्धी जर पक्की असेल तर ती ज्ञानाची परिसीमा होय.(२८)द्वैतबुद्धीचा नाश हेच वैराग्याचे लक्षण होय. अनुसंधान ब्रह्माकार ठेवणे हेच ज्ञान होय.(२९)चंचल वृत्ती नष्ट होऊन केवळ अखंडता साचून राहणे हीच उपरमाची गुरुकिल्ली होय. ती ज्ञानी लोकांना प्राप्त होते.(३०)संशयरहित समाधान हेच ज्ञान आणि हेच विज्ञान होय. आता देह खुशाल प्रारब्धाच्या अधीन राहून वर्तणूक करो.(३१)तो पाहिजे ते करो, पडो, फिरो, भोगात राहो अथवा वैराग्यात राहो, अथवा मरो याला त्याच्याशी काही कर्तव्य नाही.(३२)त्याला सविकल्पाची इच्छा नसते अथवा निर्विकल्प दशेची इच्छा नसते. तसेच मायानिर्मित मोक्षाचीही अपेक्षा नाही.(३३) ज्या पुरुषाचे यथार्थज्ञान दृढ झाले असेल त्याच्या घरी हे सर्व चालत येतात. हाकलून दिले तरी ते जात नाहीत.(३४)

**।।श्रीराम समर्थ।। समास २रा - विद्वत्संन्यासप्रकार**

**ब्रह्मविद् तोचि ब्राह्मण । येर जाति आश्रम ना वर्ण । हे व्यापारार्थ बाह्य चिन्ह । लोकरीती दंडका।।१।जीव ब्राह्मण म्हणावा । तरी ब्राह्मणत्व आलें जगा सर्वा । देह तरी पुत्रादिभावा। देहदहनें ब्रह्महत्या ।।२।। वर्णासी तो नेम नाहीं । श्वेतरक्तादि कांही । जातीसी कल्पितां तेही । तरी अन्य जाती बहुऋषी ।।३।। ब्राह्मण म्हणावा कर्मवंत । तरी क्षत्रियादि यज्ञ करीत । जरी कल्पावा धर्मयुक्त । तरी आचरती सर्व ।।४।। धर्मचि जरी ब्राह्मण । तरी असती कर्त्याधीन । पांडित्या तरी जाणती संपूर्ण । पदपदार्थान्वय ।।५।। अष्ट विकल्प विकल्पितां । दूषणें दिसतीं तत्वतां । ब्राह्मणपणाची वार्ता । तेथें नसे ।।६।। जन्म होतांची शूद्रत्व । उपनयनीं आलें द्विजत्व । वेदपठणीं होय विप्रत्व । परी ब्राह्मण वेगळा।।७।। ब्रह्मविदत्व जयासी । तोचि ब्राह्मण पुण्यराशी । श्रोता म्हणे देहादिकासी । काय म्हणावे।।८।। वक्ता म्हणे ऐका उत्तर। स्वानुभव युक्ति प्रकार। देहादि जड समग्र। परिचर्याधर्म याचा।।९।। सप्तदशात्मक लिंग सूक्ष्म। यासी वैश्य हें नाम। कृषिगोरक्षादि धर्म । तेथें असती ।।१०।। कारण उभया विसावा। हा क्षात्र धर्म जाणावा। आनंदभोगें पाळी सर्वा। स्वबाहुबळें।।११।।**

---

**पंचिका १३वी, समास २रा - विद्वत्संन्यासप्रकार**

जो ब्रह्म जाणतो तोच ब्राह्मण होय.बाकीची जात,आश्रम वर्ण ही नुसती व्यवहारासाठी वापरायची चिन्हे आहेत. ती केवळ लोकव्यवहारातील दंडक होत.(१) जीवाला ब्राह्मण मानले तर जगालाच ब्राह्मणपण येईल.देहाला ब्राह्मण मानले तर आपला देह (आपल्या मृत्यूनंतर) जाळणाऱ्या पुत्र,भाऊ यांना ब्रह्महत्या घडेल.(२)वर्णावरून ब्राह्मणत्व ठरवले तर तेथे तांबडा,पांढरा इत्यादीचा विशिष्ट नेम नाही.बरे,जातीवरून ब्राह्मणत्व ठरवावे तर अनेक ऋषी इतर जातीतले आढळतात.(३) कर्म करणारा तो ब्राह्मण असे मानले तर क्षत्रियादी लोक यज्ञ करतातच. धर्माचे आचरण करणारा तो ब्राह्मण म्हणावा तर सगळेच धर्माचरण करतात.(४)धर्म हाच ब्राह्मण असे म्हटले तर तो कर्त्याच्या अधीन असतो. पांडित्यालाच ब्राह्मण मानले तर सर्वांनाच पद,पदार्थ,पदांचा परस्परसंबंध येत असतो.(५)अशा प्रकारे आठही विकल्पांची कल्पना केली तरी प्रत्येक विकल्पात दूषणे दिसतात.त्यामुळे तेथे ब्राह्मणपणाचे लक्षण आढळत नाही.(६)जन्म होताच मनुष्य शूद्र असतो.उपनयनानंतर त्याला द्विजत्व प्राप्त होते. वेदपठनाने त्याला विप्रत्व येते पण याहून ब्राह्मण मात्र वेगळाच होय.(७)ज्याला ब्रह्म कळते तोच पुण्यशील ब्राह्मण होय.यावर श्रोता प्रश्न करतो की, असे असेल तर मग देहादिकाला काय म्हणावे?(८)तेव्हा वक्ता म्हणतो की,याचे उत्तर ऐका.स्वानुभव,युक्तिवाद यांच्या आधाराने मी सांगतो.देहादी हे सर्व जड आहे.त्यांचा सेवा हाच धर्म आहे.त्याचे पालन त्यांनी करावे.(९)सतरा तत्त्वांचा सूक्ष्म लिंग देह हा वैश्य वर्णाचा असून त्याचे कृषि, गोरक्षा इत्यादी धर्म(कर्तव्ये)असतात.(१०)कारणदेह हा या दोहोंचे विश्रांतिस्थान असून त्याचा क्षात्रवर्ण

**वृत्तिसहित जें ज्ञान। जयासी तुर्या अभिधान। करी उभय अवलोकन। मध्यस्थ दीप जैसा।।१२।। तोची ब्राह्मण गा निश्चिती । येर बोलण्याची रीती । म्हणोनि ब्राह्मणत्व अन्याप्रती । बोलोचि नये।।१३।।श्रोता म्हणे ब्राह्मणासी । आश्रमेंविण रूपें कैसी । म्हणोनि प्रकृत प्रसंगासी । आश्रमादि दाखवा।।१४।।बहु बरें म्हणोनि वक्ता । जाला आश्रम विस्तारिता। देहबुद्धीनें बाटला होता । अज्ञान शूद्रत्व।।१५।।मग सद्गुरू उपाध्ये आले। शास्त्रादि संभार मेळविले। साधन सूत्र गळां घातलें। विवेक मुंज वैराग्य लंगोटी।।१६।।मग त्रिपदा महावाक्य। वाच्यांश सांडोनी अनेक। कर्णी सांगितले एक। तूं ब्रह्म असती।।१७।।देहबुद्धीचा करी कंटाळा। अनुष्ठानीं होय सोहळा। निज कृपेची उंच माळा। घातली गळां तयाच्या।।१८।। मग लोकव्यापार सांडिले। एकांतीं आसन घातिलें। निजानुभवें अनुष्ठिलें। अनुसंधान जपादि।।१९।।अथवा श्रवणमननादि वेद पढे। संधीसी अनुष्ठानीं पवाडे। त्रिकाळ उपासी रोकडे। गुरु अर्क अग्नि।।२०।।हृदय कुंड शुद्ध क्षाळीं । कोमल ज्ञानाग्नीच्या ज्वाळीं । देहत्रय समिधा जाळी। कामना आज्यासहित ।।२१।। प्रेम पलाशाचा दंड। वैराग्य कौपीनेचें**

---

आहे. आनंदाच्या उपभोगाने तो सर्वांचे स्वत:च्या बाहुबलाने पालन करतो.(११) वृत्तीसहित जे ज्ञान असते.त्याला तुर्या असे नाव आहे.ते मध्यस्थ दीपाप्रमाणे दोहोंचे अवलोकन करते.(१२) तोच निश्चयपूर्वक खरा ब्राह्मण होय.बाकीचे ब्राह्मण केवळ उपचारापुरतेच ब्राह्मण होत. म्हणून दुसऱ्या कोणाला ब्राह्मण म्हणून संबोधूच नये.(१३) यावर श्रोता म्हणतो की ब्राह्मणत्वाला आश्रमांवाचून पूर्णता नाही.म्हणून प्रसंगपरत्वे ब्रह्मवेत्त्याच्या आश्रमांचे स्वरूप सांगा.(१४)'ठीक आहे' असे म्हणून वक्ता आश्रमांचे विस्तारपूर्वक वर्णन करू लागला.प्राणी अगोदर देहबुद्धीच्या योगाने बाटलेला असतो. तेच त्याचे अज्ञान आणि तेच त्याचे शूद्रत्व होय.(१५)मग सद्गुरू हेच उपाध्ये आले.त्यांनी शास्त्रादी सामग्री जमा केली आणि साधनरूपी यज्ञोपवीत त्याच्या गळ्यात घातले.विवेकरूपी मुंज वनस्पती कमरेला बांधली आणि वैराग्याची लंगोटी त्याला दिली.(१६)मग इतर अनेक वाच्यांश टाळून'तत्त्वमसि'(म्हणजे) 'तू ब्रह्म आहेस' या महावाक्यरूपी त्रिपदा गायत्रीचा कानांमध्ये उपदेश केला.(१७)देहबुद्धीचा कंटाळा करायला सांगून त्याला अनुष्ठानाला बसवले.त्या अनुष्ठानाचाच मोठा सोहळा झाला.मग स्वत:च्या कृपेची (गुरुकृपेची) उंच माळ त्याच्या गळ्यात घातली.(१८) मग त्याने लोकव्यवहार सोडून एकांतात आसन घातले आणि स्वानुभवाने अनुसंधान,जप इत्यादींचे अनुष्ठान सुरू केले.(१९)किंवा श्रवण, मनन इत्यादीपूर्वक वेदांचे पठन करू लागला,संधिकाळात अनुष्ठानास प्रवृत्त झाला आणि गुरू,सूर्य,अग्नी यांची त्रिकाळ उपासना करू लागला.(२०) त्याने हृदयरूपी कुंड स्वच्छ धुतले, ज्ञानाग्नीच्या कोवळ्या ज्वाळांमध्ये तीन देहांच्या समिधा त्याने जाळल्या.त्यांच्याबरोबर कामनारूपी तूपही त्याने जाळले.(२१) प्रेमरूपी पळसाचा दंड त्याने हातात घेतला.वैराग्यरूपी लंगोटीचे दोन खंड त्याने बांधले आणि त्यानंतर

**बांधिलें खंड । दुजें वस्त्र कसिलें सदृढ । आच्छादिलें कामसदन।।२२।।महानुभाव संतजनीं। अर्थ सिद्धान्न मागोनी। वृत्ति झोळी आणोनि।गुरुचरणीं निवेदी।।२३।।गुरु आज्ञा होतां क्षणीं। वेगीं प्रवर्ते अर्थ भोजनीं । तृप्ति याचें समाधानीं । गुरुवचनीं विश्वास।।२४।। श्रोतीं आश्रमादि पुसिलें होतें । निवेदिलें ब्रह्मचर्यातें । व्यतिरेकें ब्रह्मानुभवानें । ब्रह्मचर्य ब्राह्मणा।।२५।।अनेच्छा सुखादिभोगाची। नैष्ठिकता अनुष्ठानाची। न्यास करावा येथेची।हंस दीक्षा घ्यावी।।२६।।सुखइच्छा असे मनीं । उपकुर्वाण समापुनी । आदरी अन्वया लागुनी। शिरोमणी गृहमेधी।।२७।।श्रोतीं अवधारा परमु । ब्रह्मविद्या गृहस्थाश्रमु। सर्वाश्रमासी विश्रामु । आणि अग्निहोत्रा।।२८।।प्रवृत्तीच्या जाया तीन । जागृति सुषुप्ति स्वप्न। निवृत्तिरूप कांता दोन। तुर्या उन्मनी वरिल्या।।२९।।भोगी स्वानंदाचें सुख। अतीथ अभ्यागत नव्हे विन्मुख । जे जे जयाची इच्छा देख। औदार्यपणें देतसे।।३०।।आपणाहून जे अधिक । तयाचा होय सेवक । पुसे स्वानुभवाचें कौतुक । ग्रहण करी आवडी।।३१।। स्वानुभवी जे समान। त्यांसी सख्य करी अनुदिन। परस्पर बाणती खूण। ब्रह्मानंदाची।।३२।। मुमुक्षु आणि साधक।यांसी होय ब्रह्मशोधक।आपण करोनि शिकविले अनेक।सक्रिय ज्ञाना।।३३।।**

---

तिचे वस्त्र करकचून बांधले आणि कामेंद्रियाला आच्छादून टाकले.(२२)महानुभवी संत जनांकडे अर्थयुक्त सिद्धान्तांची माधुकरी मागून वृत्तिरूप झोळी गुरुचरणांवर ठेवली.(२३)गुरूंची आज्ञा झाल्याबरोबर ताबडतोब अर्थभोजनास तो बसला.समाधानाची प्राप्ती झाली. त्यामुळे तृप्ती झाली.गुरुवचनांवर त्याचा पूर्ण विश्वास असतो.(२४श्रोत्यांनी आश्रमाविषयी विचारले होते.आतापर्यंत ब्रह्मचर्याचे हे निरूपण झाले.इतर सर्व गोष्टींचा निषेध करून ब्रह्मानुभव घेणे हेच ब्राह्मणाचे ब्रह्मचर्य होय.(२५सुखादी भोगांची अनिच्छा दाखवून नैष्ठिक अनुष्ठानाची येथे समाप्ती करावी.मग हंसदीक्षा घ्यावी.(२६)मनात सुखादी भोगांची इच्छा असेल तर नंतर उपाकर्म(सोडमुंज)करून यथाक्रम वंश सातत्यासाठी श्रेष्ठ गृहस्थाश्रमाचा तो स्वीकार करतो.(२७)श्रोत्यांनी आता लक्ष द्यावे.ब्रह्मविद्येतील गृहस्थाश्रम कसा असतो ते ऐकावे.गृहस्थाश्रम इतर सर्व आश्रमांचे विश्रांतिस्थान असून त्यात अग्निहोत्र धारण करावे लागते.(२८प्रवृत्तीमध्ये जागृती,स्वप्न आणि सुषुप्ती अशा तीन पत्नी असून निवृत्तीमध्ये तुर्या आणि उन्मनी या दोन पत्नी असतात.(२९)या गृहस्थाश्रमात स्वानंदाचे सुख भोगत असताना तो अतिथी,अभ्यागत यांना कधी विन्मुख जाऊ देत नाही.ज्यांची जशी इच्छा असेल ते ते उदारपणाने सर्वांना देतो.(३०)आपल्याहून जे श्रेष्ठ असतील त्यांचा तो सेवळ बनतो.त्यांना स्वानुभवाचे कौतुक विचारतो.मोठ्या आवडीने ते ग्रहण करतो.(३१) स्वानुभवाच्या बाबतीत जे समानधर्मे असतील त्यांच्याशी तो दररोज सख्य करतो.त्यांच्या सहवासात राहतो. अशा रीतीने ब्रह्मानंदाची खूण एकमेकांना पटते.(३२)मुमुक्षू आणि साधकांना तो ब्रह्मज्ञानाचा उपदेश करतो.अशा तऱ्हेने स्वत: आचरण करून नंतर तो सर्वांना सक्रिय ज्ञानाची शिकवण देतो.(३३)

**उभय संधीसी आहुती । प्रज्वळ ज्ञानाग्निज्योतीं । अज्ञान सकार्य टाकी हातीं । पंचस्त्रिया सेवेसी ।।३४।। निज सामर्थ्य वीर्यापासून । प्रसवल्या पांचही पंचसून । वेगळाल्या सरूप सगुण। नामे ऐका तयाचीं ।।३५।। प्रिय पुत्र जाला जागृती । स्वप्नोद्भवा मोद म्हणती । प्रमोदा जनिली सुषुप्ति। तुर्या आनंदसुता ।।३६।। उन्मनी जे जया प्रसवली । निरानंद नामें परम शोभली । चहू सुतांची लग्नें केलीं । पांचवा न करी ।।३७।। प्रिया मिनली प्रीति । मोदासी ते उपरती । प्रमोदें स्वीकारिली शांती । आनंदे अनुभूति वरिली ।।३८।। ऐसा ज्ञात्याचा प्रपंच । विस्तारला बहु उंच । ऐसा कोणी ग्रहस्थाश्रमींच । सुखदुःखा नातळे।।३९।। ऐसा महाराज गृहस्थ । नित्य निरतिशयी व्रतस्थ । पुढें अन्वय व्यतिरेक समाप्त । करुनि वनी जाला।।४०।।चौघी जाया अति सुंदरी। आरोपिल्या पुत्राकरीं। पांचवी उन्मनी सपुत्र। संगें घेउनी निघाले।।४१।।निरंजन जे रम्य स्थानी। राहिला तापसी होउनी। भोगेंविण सेवी उन्मनी। आणि पुत्रही सन्निध।।४२।।परी त्रिपुटीचें सूत्र असे । मंद मंद ज्ञानाग्नि कुंडीं वसे। ज्ञानमयी शिखा विलसे । आणि कौपीन विरक्ति ।।४३।। ज्ञानाग्निकुंडावरी। उपरमाची केली छपरी । आपण राहिलासे द्वारीं । पश्चिमेच्या ।।४४।। जे कां मुळीं मूळाज्ञान ।**

---

दोन्ही संध्यांच्या वेळी प्रज्वलित अशा ज्ञानाग्नीच्या ज्वालेमध्ये अज्ञानाची त्याच्या कार्यासह आहुती देतो. त्यावेळी उपरनिर्दिष्ट पाच स्त्रिया त्याच्या सेवेला तत्पर असतात.(३४)स्वत:चे सामर्थ्य हेच वीर्य त्यापासून पाची जणींना पाच रूपसंपन्न गुणी पुत्र होतात.त्यांची नावे ऐका.(३५)जागृतीच्या पुत्राचे नाव प्रिय,स्वप्नाच्या पुत्राचे नाव मोद,सुषुप्तीच्या पुत्राचे नाव प्रमोद आणि तुर्येच्या पुत्राचे नाव आनंद आणि(३६)उन्मनीने ज्याला जन्म दिला त्याचे नाव निरानंद.या पांच पुत्रांपैकी पहिल्या चार पुत्रांची त्याने लग्ने करून दिली.पाचव्याने लग्नच केले नाही.(३७)प्रियाला प्रीती ही पत्नी मिळाली,मोदाला उपरती ही पत्नी मिळाली. प्रमोदाने शांतीला पसंत केले.आनंदाने अनुभूतीशी लग्न केले.(३८) असा हा ज्ञात्याचा प्रपंच अतिशय विस्तृत होतो.अशा या गृहस्थाश्रमात राहूनही एखादा सुखदु:खांच्या आधीन होत नाही. तो त्यांच्या पलीकडे गेलेला असतो.(३९)असा तो गृहस्थाश्रमी नेहमी अतिरेक न करता संयमाने व्रतस्थ राहतो.नंतर अन्वय(आपले संबंध)आणि व्यतिरेक(आणि आपल्या मर्यादा-अव्याप्ती)यांचा त्याग करून तो वानप्रस्थ होतो.(४०)चार पत्नींना पुत्रांच्या हाती सोपवतो आणि पाचवी जी उन्मनी आणि तिचा पुत्र निरानंद यांच्यासह तो वनात जायला निघतो.(४१)निरंजन (निर्जन) अशा रम्य स्थानी तो तापसी होऊन राहतो.उपभोग न घेता तो उन्मनीचे सेवन करतो. त्याच्याबरोबर त्याचा पुत्रही असतोच.(४२)पण अद्याप त्रिपुटीचे जानवे त्याच्या गळयात असते.कुंडात ज्ञानाग्नी अजून मंद स्वरूपात असतो.ज्ञान ही त्याची शेंडी असते आणि विरक्ती कौपीन त्याच्यापाशी असते.(४३)ज्ञानाग्नीच्या कुंडावर त्याने शांतिरूप छत्री धरलेली असते आणि आपण पश्चिमेच्या दारात वास्तव्य करून असतो.(४४)जे मूलाज्ञान राहिले होते

**पूर्णाहुति करीं घेऊन। ज्ञानाग्नींत करी दहन। शेवटचि आला।।४५।।पति प्रयाणोन्मुख पाहुनी। देह ठेविती होय उन्मनी। निरानंद पावला अवसानीं। मातेसवें।।४६।।मग प्रेषोच्चार करितां। विरजाहोमीं जाळिलें द्वैतां। शिखा सूत्र कौपीन त्यागितां । वेळु नाही।।४७।। ज्ञानमयी शिखा उपडिली। अनुभूतिसूत्रेंसि करीं घेतली। विरक्तिकौपीनही त्यागिली। महाअग्निमाजीं।।४८।। मग खोपटासहित कुंड। जळालें अवघें बंड। परमहंस उरला अखंड। द्वैताद्वैत सांडुनी।।४९।।पुढें न वचे बोलिले। परेसीहि ठक पडिलें। निरूपण समाप्त जालें। वर्णाश्रमाचें ।।५०।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । विद्वत्संन्यासप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - विविदिषासंन्यासप्रकार

**श्रोता म्हणे आश्रम चारी । स्वानुभवें बोलिले निर्धारी । परि ऐसी कोठें न दिसे परी । बाह्य सर्व दिसती ।।१।। वक्ता म्हणे सद्गुरुविण । ज्ञान कैचें केवि समाधान । अंतर्निष्ठेचे लक्षण । वेषधारिया न कळे ।।२।। तुम्ही होते पुसिले । विद्वत्संन्यासा निवेदिलें । आता विविदिषासंन्यासा ऐकिलें । पाहिजे अंतरीं ।।३।। हंस जयाते म्हणती । ब्रह्मानंद साधनसंपत्ति।**

---

त्याची पूर्णाहुती हातात घेऊन तो ज्ञानाग्नीत दहन करतो.आता त्याचा शेवटच जवळ आलेला असतो.(४५) पती प्रयाण करण्यास सज्ज झालेला पाहून त्याची पत्नी उन्मनी देहत्याग करते आणि पुत्र निरानंद आपल्या आईबरोबरच मृत्यू पावतो.(४६) मग प्रेषोच्चार करून विरजाहोमामध्ये द्वैताचे दहन करतो. शिखा (शेंडी),सूत्र (यज्ञोपवीत) आणि कौपीन यांचा त्याग करायला त्याला वेळ लागत नाही.(४७) मग तो आपली ज्ञानमय शेंडी उपटून टाकतो. अनुभवरूप यज्ञोपवीतासह ती तो हातात घेतो आणि विरक्तीरूपी कौपीनासह त्यांचा महाअग्नीमध्ये त्याग करतो.(४८) मग खोपटासहित ते कुंड सगळे जळून जाते. तो सगळा व्याप जळून जातो आणि शेवटी द्वैताद्वैतांच्या पलीकडे गेलेला तो परमहंस तेवढा अखंडपणे उरतो.(४९) यापुढे वर्णन करणे अशक्य आहे. कारण येथे परावाणीलाही संभ्रम निर्माण होतो. अशा रीतीने हे वर्णाश्रमांचे निरूपण येथे समाप्त होते.(५०)

## पंचिका १३वी, समास ३रा - विविदिषासंन्यासप्रकार

श्रोता यावर म्हणतो की,स्वानुभवाने आपण चार आश्रमांचे वर्णन केलेत.परंतु असा प्रकार कोठे पहायला मिळत नाही.सर्वजण बाह्यात्कारीच दिसतात.(१)त्यावर वक्ता म्हणतो की,सद्गुरूवाचून ज्ञान कसे मिळेल? किंवा समाधान तरी कसे मिळेल? वेषधारी माणसाला अंतर्निष्ठेचे लक्षण कसे कळेल?(२) तुम्ही विचारले होते म्हणून विद्वत्संन्यासाचे स्वरूप स्पष्ट करून सांगितले. आता विविदिषा संन्यासाचे स्वरूप ऐका.(३) हंस म्हणविणारे लोक ब्रह्मानंदाची साधनसंपत्ती गुरुमुखाने श्रवण करतात. मग मनन

**गुरुमुखें श्रवणादि करिती । मनन निदिध्यास ।।४।। त्याचा त्यागप्रकार । श्रोते ऐकोत सादर । पूर्वी बोलिला जो अधिकार । तीव्रतर वैराग्य।।५।। तेणें सर्व कर्म त्यागावें । एक सद्गुरुपाद सेवावे । कामदि ईषणा स्वभावें । विरजाहोमीं जाळी ।।६।।भूलोक अकार विश्वाचा । तैजस उकारीं विलाप त्याचा । स्थूल भोग जागृतीचा । व्यष्टिसमष्टिसह।।७।। चंचल भास उकार । भूवर्लोक हा समग्र । प्रविविक्त भोग अहंकार । तैजस विष्णू।।८।। याचा विलाप मकारीं । करितां मृगजलाचेपरी । सप्तदशाची सामुग्री । अहाच वाटे।।९।। स्वर्ग सुषुप्ति अज्ञान। शून्य मकार प्राज्ञ। आनंदभोग निस्तत्वपण। या विलोपन अस्तित्वीं।।१०।। तों प्राज्ञ ना अप्राज्ञ । उरे केवळ प्रज्ञानघन । अंतर्यामी शिव संपूर्ण । तयासीच बोलिजे।।११।। अर्थ इंद्रियाहूनि पर । तेही मनाच्या अवर । मनाहुनी बुद्धीचा विचार । सूक्ष्मत्वें पैलीकडे।।१२।।**

---

करतात, निदिध्यास करतात.(४) त्यानंतर ते जे त्याग करतात त्याचा प्रकार आता श्रोत्यांनी सादर होऊन ऐकावा. पूर्वी (मागे) जो अधिकार सांगितला तो तीव्रतर वैराग्य असणाऱ्या साधकाचा अधिकार होय.(५) त्याने सर्व कर्माचा त्याग करावा. सद्गुरुचरणांची सेवा तेवढी करावी. कामादी सर्व इच्छा तो विरजाहोमामध्ये जाळून टाकतो.(६) देहाचे जागृती, स्वप्न, सुषुप्ती या तीन अवस्थांनुसार स्थूल, सूक्ष्म आणि कारण असे प्रकार होतात. त्यानुसार त्या अवस्थांच्या अभिमानी जीवांचेही अनुक्रमे विश्व, तैजस आणि प्राज्ञ असे प्रकार होतात. या जीवांचे तीन अवस्थांनुसार स्थूल, प्रविविक्त आणि आनंद असे तीन प्रकारचे भोग असतात. ओंकाराच्या तीन मात्रांमध्ये विभागणी केल्यास या तिन्ही देहांच्या अनुक्रमे अ, उ, म अशा मात्रा ठरतात. सप्त लोकांपैकी या तिन्ही अवस्थांचे भू, भुवः आणि स्वः असे तीन लोक असतात. (वरील चार ओव्यांमध्ये स्वामींनी ही माहिती दिली आहे. ती मागेपुढे झाली आहे. ती एकत्रितपणे जुळवून येथे दिली आहे. केवळ अनुवादामुळे गोंधळ उडेल म्हणून ती या स्वरूपात दिली आहे. पुढे अनुवाद दिला आहे.) भूलोक अकार, विश्व या अभिमानी जीवाचा असून तैजसाच्या उकारामध्ये त्यांचे मिश्रण होते. व्यष्टी समष्टीसह (पिंड ब्रह्मांडासह) जागृतीचा स्थूल भोग तेथे घडतो.(७-१०) तैजस या अभिमानी जीवाला विष्णू म्हणतात. त्याचे चंचल भास असून उकार, समग्र भुवर्लोक, प्रविविक्त भोग आणि अहंकार हे त्याचे प्रकार होत.(८) त्यांची कारणदेहाच्या मकारामध्ये सरमिसळ करताच सूक्ष्म देहाचे जे सतरा घटक असतात त्यांची सामग्री मृगजळाप्रमाणे निरर्थक ठरते.(९) कारण देहाची स्वर्ग लोक, सुषुप्ती अवस्था, अज्ञान हे स्वरूप, मकार (टिंब) ही मात्रा, प्राज्ञ हा अभिमानी जीव, आनंद हा भोग (निस्तत्त्वपणा), या सामग्रीचा सद्रूपात (अस्तित्वात) लोप करावा.(१०) सद्रूप प्राज्ञ नाही की अप्राज्ञ नाही, अंतर्यामी व्यापून राहिलेला प्रज्ञानघन आत्मा तेवढा उरतो. त्यालाच शिव असेही म्हणतात.(११) अर्थ इंद्रियांहून पलीकडे असतो. मन त्याच्या पलीकडे असते. (शब्दशः-मनाअलीकडे इंद्रिये असतात.) बुद्धी सूक्ष्मत्वाच्या दृष्टीने मनाच्या पलीकडे असते.(१२)

**त्याहुनी महान अंतरात्मा । चंचलत्वें महत्तत्त्व नामा । पुढें अव्यक्त त्याहुनी सीमा । पराकाष्ठा पुरुषरूप।।१३।।उपाधियोगें पुरुष नाम। सकळ विश्रांतीसी विश्राम । उरे केवळ आत्माराम । तुर्यु नाम जया।।१४।।मग अकार तोचि उकार । उकार तोचि मकार । अर्धमात्रा सर्वेश्वर । प्रणवरूप जो।।१५।।भूत भविष्य वर्तमान। यासी अतीत जो निरंजन। हा प्रणवरूप संपूर्ण । एकाक्षर ब्रह्म।।१६।।क्षरत्व वृत्ति निमाली । अक्षरत्वें निश्चया आली । नामरूपें अनायासें गेली । उरली चिन्मात्र सत्ता।।१७।।व्यतिरेक वृत्तीसी धुतलें। चिद्रूप अन्वयें रंगविले। पिंडब्रह्मांड आच्छादिलें।काषाय वस्त्र।।१८।।स्थूल वसन त्यागिलें। लिंगसूत्र तें तोडिलें । मूळ खांडून काढिलें। अज्ञानशिखेचें।।१९।।दृश्यवस्त्र रंगविलें कावीं । प्रणवसूत्रामध्यें गोवी । कटिबंद कौपीन मिरवी । मोक्षकामा आच्छादन ।।२०।।अष्टदेह पिंड ब्रह्मांड । अष्टपर्व नारायण दंड । मध्ये श्वेतचिद्वस्त्रखंड। मूलाग्र ज्ञानाज्ञान ।।२१।। अग्रीं दिसे किंचिदज्ञान। मुळीं पेटला ज्ञानाग्नि। सुटला वैराग्यप्रभंजन। क्षणमात्रें उरों नेदी।।२२।। कमंडलू पंचभूतिक।त्यांत चैतन्यजळ हें एक।कमंडलू फुटतांहि न्यूनाधिक ।जळ तो नव्हे।।२३।।**

---

अंतरात्मा तिच्याहूनही पलीकडचा असतो. चंचलत्वाच्या दृष्टीने महत्तत्त्व,त्याहून अव्यक्त आणि त्याहीपलीकडे पुरुष असतो.(१३)त्याला उपाधींमुळेच पुरुष असे नाव दिले जाते.जो सगळ्या विश्रांतीची विश्रांती आहे.ज्यालाच तुर्य असेही नाव आहे,तो केवळ आत्माराम शेवटी उरतो.(१४)प्रणवाच्या साडेतीन मात्रांपैकी अकार तोच उकार-उकार तोच मकार असतो.अर्धमात्रा यांनी मिळून सर्वेश्वर प्रणव शेवटी उरतो.(१५)हे प्रणवाचे संपूर्ण रूप एकाक्षर ब्रह्मच असून ते भूत,भविष्य,वर्तमान यांच्या पलीकडचे असून ते निरंजन म्हणजे निर्विकल्प, निष्कलंक असते.(१६)तेथे क्षय पावणारी वृत्ती नष्ट होते.अक्षयत्वाने ती स्थिर होते.नामरूपे आपोआप लयाला जातात.शेवटी जाणीवरूप सत्ता मात्र उरते.आता या विविदिषा संन्यासाची तयारी कशी होते ते पहा.(१७) सर्वापेक्षा भिन्नत्वाने राहणाऱ्या वृत्तीला धुवून काढले आणि मग सर्व एकरूप पहाणाऱ्या वृत्तीने चिद्रूपाला म्हणजे जाणिवेच्या(चैतन्याच्या रूपाला रंगविले आणि सर्व पिंड ब्रह्मांडच भगव्या रंगाच्या वस्त्राने झाकून टाकले.(१८)स्थूल देहरूपी वस्त्राचा त्याग केला,लिंगदेहरूपी यज्ञोपवीत तोडून टाकले,अज्ञान म्हणजे कारणरूप शेंडीचे मूळच उपटून काढले.(१९)सर्व दृश्यरूपी वस्त्र कावेने रंगवले प्रणवरूपी सूत्रात गोवले.तोच कटिबंद आणि कौपीन(लंगोटी)असून त्यांनी मोक्षकामनेला झाकून टाकले.(२०) पिंड ब्रह्मांडासहित अष्ट देह म्हणजे आठ कांड्यांचा नारायणदंड होय.त्याच्या मधोमध पांढऱ्या रंगाचा जाणीवरूप वस्त्राचा तुकडा बांधला.ज्ञान आणि अज्ञान ही दोन्ही त्याच्या मुळाला आणि शेंड्याला बांधले.(२१)शेंड्याला किंचित अज्ञान दिसते. मुळाशी ज्ञानरूपी अग्नी पेटवलेला आहे.पण वैराग्यरूपी जोराचा वारा त्या अग्नीला क्षणभरही टिकू देत नाही,(२२)पंचमहाभूतांचे कमंडलू सिद्ध करून त्यात चैतन्यजल घातले आहे.कमंडलू फुटला तरी चैतन्यजल कमीजास्त होत नाही.(२३)

**निमिष्यापासून कल्पवरी । कालचक्राची जे फेरी । जप प्रणवाचा निर्धारीं । हंसाक्षरीं चाले।।२४।। सहज आसन सहज जप । सहज चाले आपेआप । सहज संमाधि सुखरूप। जेथें उत्थान असेना ।।२५।। क्रियारूप जें कर्म । हा राहिला सर्व नेम । चत्वार उरलीं असतीं नामें । अवधारा त्यांची ।।२६।। स्नान शौच भिक्षा एकांत । याचीं रूपें ऐका समस्त । मन सज्जिलें स्वरूपांत । हेंचि स्नान यतिवरा ।।२७।। शौच तो इंद्रियदमन । ब्रह्मामृताचें भोजन । द्वैतेंविण अद्वैत सेवन । हाचि एकांत उत्तम ।।२८।। संशयरहित अपरोक्ष ज्ञान । होय तोंवरी हें साधन । होतां निजांगें आपण । सर्व गळे आपेआप।।२९।। मग विविदिषा राहिली । विद्वत्ता ते प्राप्त जाली । कर्तृतंत्रताचि पावली । वस्तुरूप दशा।।३०।। एवं ऐसा हा यतिवर । बहु दुर्लभ भूमीवर । जयाचे दर्शनें प्राणिमात्र । उद्धार गति पावती ।।३१।। वेषधारी बहु असती । दंड काषाय वागविती । परी वार्ताहि नेणती । श्रवणमननाची ।।३२।। निदिध्यास मग कैचा । साक्षात्कार दूर साचा । अति दूरतर वाचा । केवि बोलावा ।।३३।। उपटून सांडिली शेंडी । वासनेची वळली जुंबाडी। सदासर्वदा तातडी । भिक्षा कलहाची ।।३४।।संत म्हणती निंदा कासया।वाणीसी श्रमचि**

---

एका निमिषापासून कल्पपर्यंत जी कालचक्राची फेरी पूर्ण होते,तोपर्यंत हंसाक्षरांनी(सोऽहम् अथवा अहंस:या मंत्रांनी)प्रणवाचा जप चाललेला असतो.(२४)त्याचे आसन सहज असून जपही सहज चाललेला असतो.त्याचे चालणे सहज आपोआप चालल्यासारखे असून समाधीही सहजच असते.तिच्यातून त्याचे उत्थान होत नाही.(२५)क्रियारूप कर्मे असलेला त्याचा नित्यक्रम बाजूला राहतो.आता त्याच्यासाठी फक्त चारच कर्मे राहिलेली असतात.त्यांची नावे ऐका.(२६)ती कर्मे म्हणजे स्नान,शौच,भिक्षा,एकांत.त्यांची रूपे सर्वजण ऐका.मन स्वरूपात गढलेले असणे हेच यतिवराचे स्नान असते.(२७)शौच म्हणजे त्याच्या दृष्टीने इंद्रियदमन हेच होय.ब्रह्मामृताचे भोजन हीच त्याची भिक्षा म्हणजे जेवण असते.द्वैतावाचून अद्वैताचे सेवन हाच त्याचा एकांत असतो.(२८)संशयरहित अपरोक्षज्ञान होईतो हे साधन चालते.स्वत: आत्मरूप झाल्यानंतर सर्व आपोआप गळून पडते.(२९)मग जाणण्याची इच्छा लोप पावते.कारण जाणावयाचे ते त्याने जाणलेले असते.त्याच्या अंगी ज्ञानरूपता बाणलेली असते.इतका काळ त्याच्याकडे कर्तृतंत्रताच होती.तिचे रूपान्तर वस्तुतंत्र होण्यात झाले.(३०) अशा प्रकारचा यतिश्रेष्ठ पृथ्वीवर दुर्लभच होय.त्याच्या दर्शनाने सर्व प्राणिमात्रांचा उद्धार होतो.(३१) बाकीचे वेषधारी पुष्कळ असतात.ते दंड,भगवे वस्त्र धारण करतात,परंतु श्रवण-मननाची वार्ताही त्यांच्या कानी कधी पडत नाही.(३२) मग निदिध्यास त्यांना कोठून जमणार?साक्षात्कार तर दूरच राहिला.वाणीने त्याचे वर्णन कसे करता येईल?वाणीला तर ते ब्रह्म आणखीनच दूर असते.(३३)त्याने शेंडी उपटून टाकली तरी वासनेची पेंडी तशीच वळलेली असते.आणि सदा सर्वकाळ भिक्षा मागण्याची,भांडणे करण्याची त्यांना घाई असते.(३४)

**वायां। तरी हे निंदा नव्हे स्वामिराया। अंतरीं खेद वाटे।।३५।।कैसें जि हें अज्ञान। भुलविलें चेटकिया मायेन। काय करिती बापुडे दीन। सद्गुरुवाचोनी।।३६।।असे जे सद्गुरुपदीं अनन्य। तेचि त्रिलोकीं धन्य। येर सर्वही अमान्य। वेदबाह्य।।३७।।जरी जाले जगविख्यात। अथवा वेद-शास्त्र-अधीत। तरी गुरूविण व्यर्थ त्यांचें जीवित। अजागलस्तनापरी।।३८।।जेणें सत्संग धरिला। श्रवण मनन अभ्यासूं लागला। तया अवलोकून उचंबळला। ज्ञात्याचा आल्हाद।।३९।।ज्ञानी जे पूर्ण समाधानी। त्याचा महिमा कोण वाखाणी। परी लागले जे गुरुभजनीं। त्या अनुमोदन संतांचे।।४०।।केवळ अज्ञानी जे भ्रांत। तयांची खंती करी चित्त। वादी जे का पाषांडयुक्त। तया मौनचि बरें।।४१।।विविदिषासंन्यासपरी। येथें बोलिली निर्धारी। पुढें स्वानुभवाचे अनुकारीं। बोलिजे तें ऐका।।४२।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । विविदिषासंन्यासप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - स्वानुभूतिवर्णन

**मज मागील दुःख आठवलें । स्वप्नवृत्तांत चेऊनी बोले । त्या रीती पाहिजे ऐकिलें । वैराग्य उपयोगी श्रोतीं ।।१।। अहो या सामर्थ्य मायेचें । विस्मयें बोलिलें न वचे । आपण खपुष्प**

---

यावर संत म्हणतील की,अशांची निंदा करून काय फायदा? विनाकारण वाणीला श्रमच होतील.तर यावर आमचे स्पष्टीकरण असे की,ही निंदा नव्हे. अंत:करणात जो खेद वाटतो त्याचे हे वर्णन आहे.(३५)काय हे अज्ञान?चेटकी मायेने या लोकांना कसे भुलविले?हे बिचारे सद्गुरूवाचून काय करतील?(३६)सद्गुरूंच्या चरणी जे अनन्य आहेत असे लोक त्रैलोक्यात धन्य होत.बाकीचे वेदबाह्य गोष्टींप्रमाणे अमान्य होत.(३७)जरी ते जगविख्यात झाले,वेदशास्त्रसंपन्न झाले,तरी त्यांचे जिणे सद्गुरूवाचून अजागल स्तनाप्रमाणे(शेळीच्या गळ्याशी लोंबणाऱ्या स्तनाप्रमाणे)व्यर्थ होय.(३८)ज्याने सत्संग धरला आणि जो श्रवणमननाचा अभ्यास करू लागला, त्याला पाहून ज्ञात्याचा आनंद उचंबळून येतो.(३९)जे पूर्ण समाधानी ज्ञानी असतील,त्यांचा महिमा कोण वर्णन करील?पण,जे गुरुभजनात निमग्न होतात,त्यांना संतांचे अनुमोदन लाभते.(४०)पण जे केवळ अज्ञानी आणि भ्रांत आहेत त्यांच्याबद्दल मनाला खंत वाटते आणि जे पाखंडी वादविवादाला प्रवृत्त होतात,त्यांच्या बाबतीत मौनच धारण केलेले बरे.(४१)अशा प्रकारे विविदिषासंन्यासाचा प्रकार येथे सांगितला,पुढे स्वानुभवानुसार वर्णन केले जाईल,ते ऐका.(४२)

### पंचिका १३वी, समास ४था - स्वानुभूतिवर्णन

मला मागील दु:खाची आठवण झाली. स्वप्नातला वृत्तान्त मी जागृतीत येऊन सांगत आहे. त्या रीतीने श्रोत्यांनी वैराग्यासाठी उपयुक्त होईल म्हणून ते ऐकावे.(१) अहो, या मायेचे सामर्थ्य अगाध आहे.

**परी जगाचे । दाविले खेळ ।।२।। मी हा निर्धर्म अविनाशी । त्या मज बांधोनी ममतापाशीं व्याघ्रापरी आपण दरवेशी । होऊनि हिंडविलें ।।३।। क्षणे नरक क्षणे स्वर्ग । क्षणा देव क्षणा तिर्यग[७७] । क्षणा दाखवी मध्यभाग । मनुष्यादि योनी ।।४।। नाथिलेंपण महापुरीं । चुबकुळ्या देत खालीवरी । उसंत नेदी अणुमात्री । सुखदुःख भोगवी ।।५।। समुद्रींचे रेणु किती । नव्हे जैसी गणती । ऐशा अनंत योनीप्रती । मजसी हिंडविलें ।।६।। म्यां तेथें जें जें केलें । तें तें अघासीच साह्य जालें । तये आधीन माझें काय चाले । कैवारियाविण।।७।। ऐसे कासाविस होतां । नरदेहा आणी अवचिता । तेथें कांही करूं धांवतां । पुन्हा आसुडी[७८] तेथुनी ।।८।। भेणें देवा शरण गेलों । परि मी न वचे रक्षिलों । सत्यलोकादि हिंडलों । तरी हे बाई सोडीना ।।९।। सर्व देव इच्या आधीन । इच्या भयें कापती जाण। तरी आतां कैवारी कोण । मजलागीं सोडवी ।।१०।। देव म्हणती कर्मे करीं । पापाची होय जंव बोहरी[७९] । पुण्यसामुग्री असे पदरीं । तरिच सुख होईल ।।११।। मग कर्मे आदरिलीं । बहु कष्टें सिद्धी गेलीं । तेणें पुढें ओडवलीं । स्वर्गसुखें ।।१२।। क्षणें तेथुनी**

---

विस्मयामुळे ते सांगता येत नाही. स्वत: खपुष्प असूनही ती जगाचे विविध खेळ दाखविते.(२) खरे तर मी धर्महीन, अविनाशी स्वरूपाचा. पण असे असूनही ममतापाशांनी बांधून दरवेशी जसा वाघाला दारोदारी हिंडवितो तसे तिने मला हिंडविले आहे. (३) एका क्षणात नरक, तर दुसऱ्या क्षणाला स्वर्ग, या क्षणाला देव तर दुसऱ्या क्षणाला वृक्षकीटकादी योनी, आणखी तिसऱ्या क्षणी मधल्या अवस्थांतील मनुष्यादी योनी असे हिंडविले आहे.(४) नसलेल्या खोट्या महापुरात तिने मला खाली वर अशा बुचकुळ्या दिल्या. एक क्षणाचीही उसंत न देता तिने मला सुखदु:खे भोगायला लावले.(५) समुद्रातील वाळूचे किती कण असतील? त्यांची जशी गणना करता येणार नाही, त्याप्रमाणे असंख्य असलेल्या जीवयोनींमधून तिने मला फिरविले.(६) मी तेथे जे जे केले ते सर्व पापालाच साहाय्यभूत झाले. तिच्या अधीन असल्यामुळे आणि कोणी कैवारी न भेटल्यामुळे माझे काय बरे चालू शकले असते?(७) अशा प्रकारे फिरताना मी खूप कासावीस झालो. मग अचानकपणे मी नरदेहात जन्माला आलो. तेथे काही करायचा प्रयत्न केला तर तेथूनही तिने मला हुसकावून लावले.(८) शेवटी भीतीने मी देवाला शरण गेलो. पण त्यांच्याकडून माझे रक्षण कोणी केले नाही. सत्यलोक इत्यादी लोकांतही फिरलो पण या बाईने पिच्छा सोडला नाही.(९) सर्व देवच हिच्या अधीन होते. हिच्या भयाने ते चळचळा कापत असतात, तर अशा परिस्थितीतून माझी सुटका करील असा रक्षणकर्ता कोण बरे असेल?(१०) देव मला म्हणत असत की, कर्मे करीत रहा पापांचे जेव्हा जळून भस्म होईल आणि जेव्हा गाठी थोडेफार पुण्य साचेल, तेव्हा तुला सुख प्राप्त होईल.(११) मग कर्मे करण्यास आरंभ केला. पुष्कळ कष्ट करून ती सिद्धीस गेली. त्यामुळे पुढे स्वर्गसुखांचे संकट उभे राहिले.(१२) त्यातून काळ येताच मला ढकलून

**टाकिलें । देवें कर्णीं हात ठेविले । पुन्हा भोगणें प्राप्त जालें । नाना योनी।।१३।।मागुती नरदेह पावला। शास्त्राचा भार वाहिला । व्रततपादि नेम ऐकिला । प्रवर्तलों तेथें ।।१४।। व्रतें केलीं उदंड। मंत्रयंत्रादि बडबड । नाना जप ध्यान कबाड[८०] । कण सांडोनी बडविले।।१५।। देह क्षुधेनें पीडिला । खाऊनी नाना वृक्षांचा पाला । पंचाग्नीनें भाजून काढिला । तीर्थीं भिजविला चिरकाल।।१६।।उलटें टांगून घेतलें । धुरें[८१] देहासी वांचविले। बहुकाळ वायु भक्षुन फुगविलें । भात्यापरी उदर।।१७।।देव मेळविले उदंडे। नाना धातूंचे किंवा गुंडे । तुळसी बेल फुलें कोडें । वाहिले तया मस्तकीं ।।१८।।अंतरीं वाढे कामना। बाह्य प्रवर्तलों भजन पूजना । तेथे देव कैचा वरी पाषाणा । वरपडा[८२] जालों।।१९।। तप्त मुद्रा ताविल्या थोर। तेणें भाजिलें सर्व शरीर। टिळे माळा विचित्र वस्त्र । नाना सोंगें आणिलीं।।२०।। भस्म अंगी लेपन केलें । नखशिख रुद्राक्ष बांधिले । नेत्र लावुनी ध्यान केलें । तेथें उमटलें स्त्री वित्त ।।२१।। देवें तेथें काय करावें । आपुलें अदृष्ट जाणावें । मायानिरासार्थ करूं जावें । तों तों वाढे द्विगुणा ।।२२।। वायु कोंडिला अति बळें । याया मायेचेनि सळें । तो तो अधिक उफाळे । नाना सिद्धि बंधनें ।।२३।। असो ऐसें जें जें केलें। तें तें तितुकें व्यर्थ**

---

दिले. देवांनी कानांवर हात ठेवले. त्यामुळे निरनिराळ्या योनी फिरण्याचा भोग भोगणे सुरू झाले.(१३)शेवटी पुन्हा नरदेह प्राप्त झाला.त्यावेळी खूप शास्त्रे वाचून त्यांचा भार वाहिला.त्यातून व्रत,तपादी साधने व त्यांचे नियम ऐकले. मग ती साधने करायला प्रवृत्त झालो.(१४)अनेक व्रते केली. मंत्रयंत्रादी बडबड केली. निरनिराळे जप, ध्यान इत्यादी धान्याचे कण नसलेला कडबा बडवत राहिलो.(१५) निरनिराळ्या वृक्षांचा पाला खाऊन खाऊन देह भुकेने कष्टी झाला,त्या देहाला पंचाग्निसाधनाने भाजून काढले,तीर्थामध्ये पुष्कळ काळ भिजवला,(१६)उलटे टांगून घेतले,तेव्हा प्रतिष्ठित लोकांनी (धुरें) त्यातून देहाला वाचविले. त्यानंतर अनेक दिवस वायुभक्षण करून पोट भात्याप्रमाणे फुगविले.(१७)अनेक प्रकारचे देव गोळा केले,त्यात निरनिराळे धातूंचे देव होते, गुळगुळीत गोट्यांचे देव होते. त्या देवांच्या मस्तकांवर तुळशीची पाने,बेल,फुले इत्यादी मोठ्या कौतुकाने वाहिली.(१८)ते करत असताना मनात इच्छा वाढू लागल्या तसतसा बाह्य भजन,पूजा इत्यादी साधने करण्यास प्रवृत्त झालो,तेथे देव कुठला?उलट दगडाधोंड्यांच्या अधीन झालो.(१९)मोठमोठ्या मुद्रा तप्त करून त्यांनी सर्व शरीर भाजून काढले.टिळे,माळा, विचित्र वस्त्रे इत्यादी नाना सोंगे धारण केली.(२०)सर्व अंगाला भस्माचे लेप दिले, नखशिखान्त रुद्राक्ष बांधले, नेत्र बंद करून ध्यान केले, तो तेथे स्त्री आणि संपत्ती यांची चित्रे दिसू लागली.(२१)अशा वेळेला देवाने काय करावे? आपले नशीब म्हणावे झाले. या मायेचे निरसन करावे म्हटले तर ती दुप्पट वाढू लागली.(२२)या मायेच्या वैरामुळे मोठ्या प्रयासाने वायू कोंडला. तो तो निरनिराळ्या सिद्धींच्या बंधनांसकट ती अधिक उफाळू लागली.(२३) असो, याप्रमाणे जे जे कर्म केले ते ते सर्व व्यर्थ गेले.

**गेलें। परी या मायेचें हलवलें । नाहीं रोम।।२४।।मग उदय पातला दैवाचा। महिमा ऐकिला सद्गुरूचा। मग न्यास करून सर्व कर्माचा। गेलों शरण कैवारिया।।२५।।मरतयासी अमृतपान। कीं अवर्षणीं वर्षे घन। दुकाळीं मिळालें मिष्टान्न ।तेवी स्मरण प्रभूचें।।२६।।अत्यंत मोकलितां धाय। त्वरें धावली गुरुमाय । अति कोमल हृदय । वज्रपंजरू दासासी ।।२७।। कैवारी पाहुनिया दृष्टी। बळकट चरणीं घातली मिठी। सोडवीं सोडवीं कृपादृष्टी। या मायेपासुनी।।२८।। सद्गुरू विचारिती मनीं । मुळींच नाहीं मायराणी । अघटित करऊं एक करणी । याचिया हातीं भक्षऊं ।।२९।।नाभी नाभी अभयकरें । मज संबोधिलें बारे । अपूर्व जडी एक आदरें । करीं समर्पिली माझा।।३०।। येथें दृष्टांत सुचला एक । उत्तरदेशिं करींचें कटक। त्यांत पातलें जंबूक। सारिखें पशु ।।३१।। वृक्ष एक वनस्पतीचा । महिमा जाणुनि तयाचा । गोंडा भिजऊनि पुच्छाचा। लघुशंकेनें ।।३२।। शतावधी हस्तीचे भार । शिंपडितां होय तुषार । अणुप्राय पडतां अंगावर । सर्वही प्राणा मुकती।।३३।।मग त्या पशूनें हत्ती । भक्षून हुंगी वृक्षाप्रती। सान उदर परी ते भस्मती । पोटही न भरे।।३४।। सर्वही प्रेतें खाउनी । भुकेलेंचि हिंडे वनीं। ऐसी वनस्पतीची करणी। अघटित घडे।।३५।।**

---

पण या मायेचा एक केससुद्धा हलला नाही.(२४) मग दैवाचा उदय झाला.सद्गुरूंचा महिमा कानांवर पडला.मग सर्व कर्मांचा त्याग करून रक्षणकर्त्या त्या सद्गुरूंना मी शरण गेलो.(२५) मरणाऱ्या माणसाला अमृत प्यायला मिळावे,किंवा अवर्षणकाळी मेघाने वृष्टी करावी,दुष्काळात मिष्टान्न मिळावे त्याप्रमाणे मला ऐनवेळेला प्रभूचे स्मरण झाले.(२६)मी हंबरडा फोडून रडू लागलो,तेव्हा गुरुमाउली वेगाने धावून आली.तिचे हृदय अतिशय कोमल असून ती आपल्या भक्तांसाठी वज्राचा पिंजराच होते.(२७)आपल्या रक्षणकर्त्याला पाहताच मी त्याच्या पायांना मिठीच मारली आणि म्हणू लागलो"आपल्या कृपादृष्टीने आपण मला या मायेच्या तावडीतून सोडवा."(२८) सद्गुरू मनात विचार करू लागले."माया तर मुळीच नाही.तरीपण याच्या हातून एक अपूर्व कृत्य घडवून आणू. त्याच्याच हातांनी मायेचे भक्षण करायला लावू."(२९)"भिऊ नकोस, भिऊ नकोस"असे म्हणून मला त्यांनी जवळ बोलाविले आणि माझ्या हातात एक अपूर्व वनस्पती त्यांनी दिली.(३०)येथे एक दृष्टान्त सुचला.उत्तर देशात हत्तींच्या कळपात एक कोल्ह्यासारखा प्राणी आला.(३१)त्याने एका वनस्पतीचा महिमा जाणून आपल्या शेपटाचा गोंडा आपल्याच लघुशंकेत बुडवून(३२)ते जे कळपात शेकडो हत्ती होते त्यांच्या अंगांवर त्याने त्या लघुशंकेचे तुषार शिंपडले.त्यातील कणभर तुषार अंगावर पडताच ते सर्व हत्ती प्राणास मुकले.(३३)मग त्या पशूने त्या हत्तींना खाऊन टाकले. नंतर तो त्या वनस्पतीला हुंगू लागला. त्याचे पोट लहान असले तरी एवढे हत्ती खाऊनही त्याच्या पोटात हत्तींचे भस्म झाले.त्याचे पोटही त्यामुळे भरले नाही.(३४)सर्व प्रेते खाऊनही तो पशू भुकेलाच वनात हिंडत राहिला.अशी त्या वनस्पतीची अघटित करणी होती.(३५)

**तेवी मज जंबुकाकरवीं।समूळ माया हे ग्रासवी।परी जडी आधीं जाणावी।कोठोनी आणिली।।३६।।मायेची काढोनी अंतरसाली। माझिये करीं वोपिली।तेणें अति क्षुधा वाढली।आज्ञा जाली भक्षीं गा।।३७।।देहद्वय आधीं चघळिले।बाकस उगळूनि टाकिलें।अज्ञान निःशेष खांदलें।परी पोट न भरे।।३८।।मग ब्रह्मांड उंसापरी।रस घेउनी चिपाडें करी। हिरण्यगर्भाची सामुग्री।चंचलत्व शोखिलें।।३९।। माया अविद्या शक्ति दोन्ही।आभाससहित खाउनी।दुजे उरले नाहीं कोणी।मायेवांचोनि निःशेष।।४०।।यज्ञीं जैसी पुर्णाहुती। माया ग्रासिली तेणें रीती।परी क्षुधेची नव्हे समाप्ति। कासाविस केलें।।४१।।मग सद्गुरुनाथें धाउनी।कांडी घेतली हिरोनी ।मग उरला स्वानुभव खाउनी।ढेंकरू दिधला।।४२।।ऐक्यतेची करून शेज।सुखीं निजविलें मज।फिरून उठे ऐसें काज।उरलें नाहीं।।४३।।मग गुरुराजें आपण।पिंडब्रह्माडीं घातलें ठाण।देहद्वयाचें वर्तन।स्वसत्तेनें चालवी।।४४।।मी मी वागवी हा गुरु।मीपणाचा करूनि मारू।एकला एक निर्विकारु। श्रुतिप्रतिपाद्य जो।।४५।।यारीती प्रसंगासी आलें।तें यथामति बोलिलें।आतां हर्ष खेद जाउनि उरलें।चिन्मात्र ब्रह्म ।।४६।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । स्वानुभूतिवर्णनप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

---

त्याप्रमाणे सद्गुरूंनी माझ्या रूपाने आलेल्या कोल्ह्याकडून ती माया मुळासकट खायला लावली. पण ही औषधी वनस्पती त्यांनी कोठून आणली? ते आधी समजून घ्या.(३६) त्यांनी मायेची अंतरसाल काढून माझ्या हातात दिली. त्यामुळे माझी भूक खूप वाढली. तेव्हा त्यांची आज्ञा झाली की ती आंतरसाल खाऊन टाक.(३७) मग आधी स्थूल सूक्ष्म हे दोन देह चघळले, चोथा टाकून दिला. अज्ञान संपूर्णपणे खाऊन टाकले, पण पोट काही भरेना. (३८) मग मी सर्व ब्रह्मांडाची, उसाचा रस घेऊन चिपाडे करतात त्याप्रमाणे चिपाडे करून टाकली. हिरण्यगर्भाची सामग्री आणि चंचलत्व शोषून घेतले.(३९) माया आणि अविद्या या दोन्ही शक्ती आणि त्यात प्रतिबिंबित झालेल्या ईश्वर आणि जीव ह्या दोन्ही आभासांसह खाऊन टाकल्या. तेव्हा मायेखेरीज दुसरे काही उरले नाही.(४०) मग यज्ञातील पूर्णाहुतीप्रमाणे मायाही गिळून टाकली. पण भूक काही शमली नाही. त्या भुकेने कासावीस केले. (४१) मग सद्गुरू धावून आले आणि त्यांनी हातातील कांडी काढून घेतली. मग उरला सुरला स्वानुभव खाऊन मी ढेकर दिला.(४२) मग श्रीगुरूंनी ऐक्याची शेज करून मला सुखाने निजविले. त्यातून पुन्हा जागे होण्याचे कारणच राहिले नाही.(४३) मग श्रीगुरूंनी आपण होऊन पिंडब्रह्मांडात स्थान मांडले आणि तेथून ते स्वसत्तेने स्थूल-सूक्ष्म या दोन्ही देहांचे नियंत्रण करू लागले.(४४) मीपणाचेही सद्गुरूच नियंत्रण करत होते. त्यांनीच मीपणाचा नाश करून, श्रुतिप्रतिपाद्य असा एकटा एक निर्विकार करून मला ठेवले. (४५) अशा रीतीने प्रसंगाने आले ते मी स्वबुद्धीनुसार सांगितले. आता हर्षखेद नष्ट झाल्यानंतर केवळ चैतन्य ब्रह्म तेवढे उरले.(४६)

**।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - कर्माकरणानुकार**

**निमाली जयाची वासना । त्या कर्मीं काज नसे जाणा । अहंतेविण निष्कर्मपणा । अर्थचि नसे ।।१।। समाधि ना जप ध्यान । ऐसें श्रुतीचें वचन । आणि स्मृतींचीहि प्रमाणें । उदंड असती ।।२।। अकाम निष्काम आप्तकाम । तिहीं वेगळा पूर्णकाम । सर्व समाधाना विश्राम । आत्माराम सर्वदा ।।३।। बाह्यविषयकामना गेली । तिसीं अकामता बोलिली। आत्मदर्शनें सहज आली । निष्कामता तया ।।४।। आत्मलाभें संतुष्टमनीं । आप्तकाम यालागुनी । लाभेच्छा पावे समाधानी । पूर्णकाम या हेतू ।।५।। आपुला आपण सहज असतां । लाभही बोलावा केउता । आप्तकाम न ये बोलतां । मा कर्म निष्कर्म कैचें।।६।। श्रुति अनुभूति उभयानें । विधि निषेधा न येणें न जाणें । तयासी अनुवादावें कवणें । अमुक म्हणोनी ।।७।। तेथें कर्मज्ञानसमुच्चय[८३] हें । अप्रमाण बोलणें काय । जयासी श्रुति आज्ञापितां भिये । म्हणे इच्छा त्याची ।।८।। श्रोता म्हणे कृष्णवचनीं। कर्मसंसिद्धि समाधानीं। जनकादिका[८४] लागुनी। विहित कर्म असे ।।९।। वक्ता म्हणे इतुके वचनीं ।**

---

**पंचिका १३वी, समास ५वा - कर्माकरणानुकार**

ज्याची वासना नष्ट झाली त्याला कर्माचे काही प्रयोजन नाही. अहंतेवाचून निष्कर्मपणालाही काही अर्थ नाही.(१) अशा ज्ञात्याला ना समाधीची गरज,ना जप ध्यानाची.असे श्रुतीचेच वचन आहे. याच अर्थाची स्मृतींचीही अनेक प्रमाणे आहेत.(२) अकाम, निष्काम आणि वाप्तकाम या तिघांपेक्षा पूर्ण काम वेगळा आहे.आत्माराम तर नेहमी सर्व समाधानांचे विश्रांतिस्थान आहे.(३)बाह्य विषयांवरची कामना गेली आहे अशा स्थितीला अकामता म्हणतात.आत्मदर्शनाने त्या ज्ञान्याला सहजच निष्कामता प्राप्त होते.(४) जो आत्मलाभाने मनात संतुष्ट झालेला असतो त्याला आप्तकाम म्हणतात. आणि ज्याची प्राप्तीची इच्छाच शांत झाली आहे त्याला पूर्णकाम असे म्हणतात.(५)आपला आपण सहजपणाने राहत असताना त्याला लाभ तरी कसे म्हणायचे? जिथे आत्मकाम असेही म्हणता येत नाही तिथे कर्म,निष्कर्म हे शब्द तरी कसे वापरता येतील?(६)श्रुती आणि अनुभव या दोन्ही निकषांनी त्याच्या ठिकाणी विधी आणि निषेध उत्पन्नही होत नाहीत आणि नाशही पावत नाहीत. अशा ज्ञात्याला अमुक प्रकारचा असे कसे म्हणता येईल?(ज्ञाता विधि-निषेधांच्या पलीकडे पोहोचलेला असतो. त्याचे विशिष्ट प्रकारचा असे वर्णन करता येत नाही.)(७) त्याच्या बाबतीत 'कर्मज्ञान समुच्चय' हे बोलणे अप्रमाण ठरते. (त्याला अमुक मार्गच स्वीकार,अमुक स्वीकारू नकोस असे सांगता येत नाही.)कारण वेदसुद्धा त्याला आज्ञा करायला घाबरतो.तो म्हणतो,"त्याला त्याच्या इच्छेप्रमाणे वागू देत."(८)यावर श्रोता म्हणतो की, भगवद्गीतेत कृष्णाचे वचन असे आहे की,'कर्मानेच सिद्धी प्राप्त होते. (भ.गी.३.२०) आणि आसक्तिरहित समाधानी अशा जनकालाही विहित कर्माचे बंधन होते' असे सांगितले आहे.(९) यावर वक्ता म्हणतो

**दुजें नायकसी कर्णीं । त्यासी अर्थ नाहीं करणीं । आणि अकरणींहि असेना[८५] ।।१०।। हेंही वाक्य श्रीकृष्णाचें। यदर्थीं काज नसे दोहींचें। राजयासी द्वारपाळाचें। शासन केवी।।११।। श्रोता म्हणे त्या काज नसो । परी लोकोपकारार्थ करणें असो । श्रीकृष्ण करितसे अतिसो। विहित कर्माचा।।१२।।श्रेष्ठ जैसें आचरती। तें पाहुनी लोक वर्तती[८६]। म्हणोनिया ज्ञात्याप्रती। करणें हा विधी।।१३।।वक्ता म्हणे सावधान । नेमू न करीच श्रीकृष्ण । करणे न करणें त्या स्वाधीन । इच्छिती तरी करिती।।१४।।त्या जनचि ठाउके नव्हे । खरे बुडती तरी तारावे । बंधचि किमपि न संभवे । तरी मोक्ष कैचा।।१५।।जरी श्रीकृष्ण बोलिला । मीही आचरतों कर्माला । परी नेमु न करी ज्ञातयाला । करा कीं न करा ।।१६।।निश्चयोचि जरी करिता। तरी ऐसें श्रीकृष्ण न बोलता । कीं सर्व भौतिकीं आणि भूता । किंचिदर्थ त्या नसे।।१७।।श्रोता म्हणे भगवंतासी । कर्मी अर्थ सिद्धि कायसी । परी लोकरीती सायासीं। सर्वही करी।।१८।।वक्ता म्हणे देव संपूर्ण। वाहती प्रवृत्तीचा अभिमान । तयासी तो अगत्य करणें । विहितचि आहे।।१९।।हे ज्ञातयासी नलगे । अवघीं माइकाचीं सोंगें ।**

---

की,श्रीकृष्णाच्या अनेक उद्‌गारांपेकी तू फक्त एवढाच उद्धार ऐकलास. इतर अनेक उद्‌गार तू ऐकतच नाहीस. त्याच गीतेत म्हटले आहे की,(भ.गी.३.१८)'त्या महापुरुषाला कर्मे करण्याचे काही प्रयोजन असत नाही. तसेच कर्मे न करण्याचेही काही प्रयोजन नाही.'(१०)"हेही श्रीकृष्णाचेच वचन आहे. त्याच्या अर्थानुसार ज्ञात्याला कर्म आणि अकर्म या दोन्हीचेही प्रयोजन नाही. राजाला द्वारपालाची आज्ञा पाळायचे बंधन असते काय?"(११) श्रोता म्हणतो की,त्याला प्रयोजन असो नसो,पण लोकोपकारासाठी तरी त्याला कर्म करणे असावे.(भ.गी.३.२०)श्रीकृष्ण विहित कर्माचा अतिशयच आग्रह धरतो.(१२)"श्रेष्ठ लोक ज्याप्रमाणे आचरण करतात ते पाहून इतर लोकही त्याप्रमाणे वर्तन करत असतात.त्यामुळे ज्ञात्याने कर्म केले पाहिजे,हा विधी होय."(भ.गी.३.२१)(१३)यावर वक्ता म्हणतो की,"थांब. श्रीकृष्णाने ज्ञात्याला कर्म केलेच पाहिजे असा नियम केलेला नाही.करणे न करणे हे सर्वस्वी ज्ञात्याच्याच स्वाधीन आहे. त्याची इच्छा असेल तर तो करीलही."(१४) वस्तुस्थिती अशी आहे की, ज्ञात्याला लोकच भिन्नपणे ज्ञात नसतात. ते खरेच बुडत असतील तरच त्यांना तारणार ना? मुळात बंधच नसेल तर मोक्ष कसा संभवेल?(१५) जरी श्रीकृष्ण म्हणाला की, मीही कर्मे करतो, तरी त्याने ज्ञात्याला हा नियम केलेला नाही. तुम्ही करा की न करा.(१६) श्रीकृष्णाला निश्चयचा(नियम) करायचाच असता तर,"सर्व भौतिकांत आणि भूतांत ज्ञात्याला काही अर्थ वाटत नाही (३.१८)"असे श्रीकृष्ण म्हणालाच नसता.(१७) यावर श्रोता म्हणतो की,"भगवंताला कर्मात काय फायदा होता? पण लोकरीतीप्रमाणे तो कष्टपूर्वक सर्व कर्मे करतच होता."(१८)यावर वक्ता म्हणतो,"सर्व देव प्रवृत्तीचा अभिमान बाळगणारे आहेत. त्यांना कर्मे करणे हे आवश्यकच आहे, असे वाटते."(१९) पण ज्ञात्याला कर्माची जरुरी नाही. कारण हे सर्व

**करणें न करणें लागवेगें। सांडिले तेणें ।।२०।। तथापि जरी आचरे । लोकरीती अनुकारें । करितां काय उणें पुरें । समाधानाचें ।।२१।। कर्मी उदंड जेथें मिळाले । तेथें[८७] तेणेंही नाक धरिलें। बापें मेळविली जैसीं मुलें । त्यासह खेळे चक्रादि ।।२२।। मन-वाणी-अगोचर । हाचि ज्ञानाचा निर्धार । होतां इंद्रियाचा व्यापार । कर्मे निपजती।।२३।। ऐसा परस्परें विषयभेद। ज्ञाता करीना कर्मोच्छेद । आणि कर्मीही उपमर्द । ज्ञानासी न करिती ।।२४।। कर्मियांचे समाजीं । ज्ञाता कर्माते नावाजी । मुमुक्षुसाधका म्हणे काय जी। निर्फळ करिता ।।२५।। तेथें आपणही त्यागी । करूं नेदी तया लागीं । श्रवण मनना प्रवर्तवि वेगीं । ब्रह्माभ्यास करवीत ।।२६।। येर कांहीं नसे उरलें । निःसंदेह ज्ञाते जाले। परी शरणागतां उपेक्षिलें। न वचे कदा ।।२७।। मुमुक्षूचा कृपेसाठीं । करूनि करविती अटाअटी । तयासी कर्तेपणाची गोष्टी । लाऊंचि नये ।।२८।। कर्म अकर्म निष्कर्म । हा ज्ञातयासी नसे भ्रम । जो स्वयें आत्माराम । कर्मानिष्कर्मातीत ।।२९।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । कर्माकरणानुकारे । पंचमसमासः ।।५।।**

**इति फलरूपपंचिका संपूर्णा ।।१३।। ओवीसंख्या २०१**

---

दृश्य विश्व हे मायिकाची सोंगे आहेत. म्हणून त्यासंबंधीचे कर्तव्य काय, अकर्तव्य काय असा विचार करणे त्याने लगेच टाकून दिले आहे. (२०) तथापि लोकरीतीप्रमणे त्याने काही आचरण केले तर त्याच्या समाधानात काय उणे अधिक होणार आहे?(२१) ज्या ठिकाणी कर्म करणाऱ्यांचा मेळावा जमला असेल त्या ठिकाणी तो नाकही धरील! बापाने आपल्या मुलाबरोबर खेळायला मुलं जमवली तर त्यांच्याबरोबर तोही चक्र इत्यादी खेळ खेळत नाही काय?(२२)ज्ञान हे मन,वाणी यांच्या टप्प्यापलीकडचे आहे, आणि इंद्रियांच्या व्यापारातून कर्मे निपजतात.(२३) असा परस्पर विषयभेद असल्याने ज्ञाता कर्माचा उच्छेद करत नाही की कर्मी ज्ञानाचा करत नाहीत.(२४) कर्मी लोकांच्या समाजात ज्ञाता कर्माची स्तुती करील आणि मुमुक्षूला, साधकाला 'हे काय निष्फळ करता?' असे विचारीत बसेल. (२५) त्या ठिकाणी स्वत: कर्माचा त्याग करील आणि त्यांनाही कर्मे करू देणार नाही. उलट त्यांना श्रवण मनन यांकडे वळवून त्यांच्याकडून ब्रह्माभ्यास करवून घेईल.(२६) त्यांना कर्म करायला काहीच उरलेले नसते. ज्ञाते निःसंदेह झालेले असतात. पण ते शरणागताची कधीही उपेक्षा करत नाहीत.(२७) मुमुक्षूच्या कृपेसाठी स्वत: सायास करून त्यांना ते करायला लावतात. त्यांच्या बाबतीत कर्ते असा शब्द वापरूच नये.(२८) म्हणून ज्ञात्याला कर्म, अकर्म, निष्कर्म असा भ्रम नसतोच. कारण तो कर्म, निष्कर्म इत्यादींच्या पलीकडे गेलेला असतो. तो स्वत:च आत्माराम झालेला असतो.(२९)



# पंचिका १४वी - उपसंहार

## ।।श्रीराम समर्थ।। समास १ला - संतस्तवन

**आतां कळस हा ग्रंथींचा । गोड घास शेवटिचा । स्तव आरंभिला संतांचा । मंगलरूप।।१।। सद्गुरू तेचि संत। जे भवसागरीं हेला तारित। येथें भेदाची नसे मात। आदि अंत सद्गुरू।।२।। लक्षणेंचि नसतां साधूसी । स्तवनीं वाचा प्रवर्ते कैसी । मायायोगें स्तवितां त्यासी । तरी दोष कोणता।।३।।माया हें सामर्थ्य जयाचें । परादिकाही अंश तिचे । जीवन सागरीं सागरींचे। काय वेचे टाकितां।।४।।संत हेचि बुद्धिदाते। प्रकाशविती निजदृष्टीतें। आप्त सुहृद संतापरतें। नसे त्रिभुवनीं।।५।।संत वाचा आणि वाचक । संत वाणीचे प्रेरक। संत प्राणाचे चालक । अकर्तेपणें।।६।।संत साधका विसावा । संत हा निजधनाचा ठेवा। संत मायिकाचा गोवा। तोडोनि टाकिती।।७।।संत वैराग्याचें घर। संत ज्ञानाचें भांडार।संत उपरमासी थार। विश्रांतीची विश्रांति।।८।।संत हेचि सहस्रकर। ज्ञानप्रकाश करिती थोर। उदयअस्तुविण निरंतर। अखंड प्रभा।।९।।संत मायबाप सखे बंधू। मित्र स्वजन ते साधू। व्रतें तपें धारणा विविधु।**

---

### पंचिका १४वी, समास १ला - संतस्तवन

आता हा ग्रंथाचा कळस(शेवट)आहे.शेवटचा घास गोड असावा म्हणून संतांचे स्तवन सुरू करत आहे. ते स्तवन मंगलाच्या स्वरूपाचे आहे.(१)सद्गुरू म्हणजेच संत होत.ते भवसागरातून लीलेने तारतात. तेथे भेदाची वार्ताच नाही. आदी अंती सद्गुरूच आहेत.(२)साधूला लक्षणेच नसताना त्यांच्या स्तुतीला वाणी कशी प्रवृत्त होतेअसे कोणी विचाराल तर त्यावर उत्तर असे की, मायेच्या साहाय्याने त्यांची स्तुती केली तर कोणता दोष लागणार आहे?(३) माया ही सद्गुरूंचे सामर्थ्य आहे.परादी वाचा या मायेचेच अंश होत.सागराचे पाणी सागरात टाकल्याने काय हानी होणारआहे?(४)संत हे बुद्धिदाते आहेत.ते निजदृष्टीला प्रकाशित करतात.संतांखेरीज कोणी दुसरे आप्त,सुहृद या त्रिभुवनात नाहीत.(५)संत हेच वाचा आणि संत हेच वाचक होत.संत वाणीचे प्रेरक आहेत.अकर्ते असूनही संत हे प्राणांचे चालक आहेत.(६)संत हे साधकांसाठी विसावा होत.आत्मसुखाचा ठेवा होत.ते मायिकांचा गुंता तोडून टाकतात.(७) संत हे वैराग्याचे घर असून ज्ञानाचे भांडार आहेत.ते उपरमा(शांती)चे आश्रयस्थान असून विश्रांतीची विश्रांती होत.(८)संत हे सहस्रकर असे सूर्य असून श्रेष्ठ ज्ञानाचा प्रकाश देतात.ते उदय व अस्त यांच्या पलीकडचे असून अखंड प्रकाश देत असतात.(९)संत हे आई,वडील,सखे आणि बंधू आहेत.साधुसज्जन हेच स्वकीय,मित्र आहेत.या संतांवाचून व्रते,तपे,विविध धारणा यांना काही अर्थच राहत नाही.(१०)

**संतावीण काई।।१०।।संत जीवाचा जिव्हाळा। संत आनंदाचा सोहळा।संत प्रेमाचा गळाळा।अमृताहुनी।।११।।शांति क्षमा देशधडी फिरती। तया न मिळे विश्रांति।मग आलिया संतांप्रती।माहेरा कन्या जेवी।।१२।।तीर्थे पावन न होय।व्रततपें शुद्धता न ये।प्रायश्चित्ता न चले उपाय।बुद्धिपूर्वक दोषा।।१३।।ते संतीं न लागतां घडी।अनंत जन्मीचे दोष बिघडी।प्रलयाग्नि जैसा धडाडी।एक दसोडी उरों नेदी।।१४।।ज्ञानवैराग्यप्रबोधजळें।जीव कैसे शुद्ध केले।की शिवत्व जाले ओवळें।मायामळें मळलें जें।।१५।।बहु काय बोलूं बोलें। वेदें न वचे जें प्रकाशिलें। तेचि संतीं उघडे केलें। शरणागतासी।।१६।।ज्ञानेंचि एक पावन होती। बोले जरी वेदश्रुति।परी संतांवीण ज्ञानशक्ति। अंमल करीना।।१७।।जैसी मात्रा अति अमोलिक।सर्व रोगासी जे दाहक।परी वैद्य नसतां परीक्षक।व्यर्थचि जाय।।१८।।क्षेत्रांचे उपाध्ये सांडिले।तरी तीर्था जाउनी काय केलें। जेणें संतांसी अव्हेरिलें। ते मुकले निजसुखा।।१९।।संतांसी जो शरण आला।न पाहतीच थोर धाकुला। वेगीं साम्राजीं बैसविला|कृपाकटाक्षें।।२०।। संतांचिये कृपे ऐसी। मातेची कृपा कायसी। माता वधी बाळकासी। विपत्यकाळीं।।२१।।**

---

संत जीवाचा जिव्हाळा आहेत,ते आनंदाचा सोहळा आहेत;संत हे प्रेमाच्या मधुरसधारा(गळाळा)आहेत.त्या अमृताहून ही मधुर आहेत.(११)शांती,क्षमा देशोधडी होऊन फिरताहेत.त्यांना कोठेच विश्रांती मिळत नाहीत.मग त्या सासुरवाशिणी मुली जशा माहेराला येतात तशा संतांकडे विश्रांतीसाठी येतात.(१२)बुद्धिपूर्वक केलेले दोष तीर्थांनी पवित्र होत नाहीत.व्रते,तपे यांनी त्यांना शुद्धता येत नाही,प्रायश्चित्तांचा उपाय त्यांना लागू होत नाही.(१३)पण संतांच्याकडून मात्र अनंत जन्मांच्या पापराशी एका घडीचाही वेळ जाऊ न देता तत्क्षणी नष्ट होतात.प्रलयाग्नी ज्याप्रमाणे पेटलेल्या वस्त्राची एक दशीदेखील राहू देत नाही.त्याप्रमाणे संत पापाचा एक कणही राहू देत नाहीत.(१४)संतांनी ज्ञान आणि वैराग्य यांच्या सामर्थ्याने जीव इतके शुद्ध केले की शिवाचे शिवपण सुद्धा त्यापुढे ओवळे ठरेल.शिवाला ओवळेपणा येण्याचे कारण त्याचे शिवत्व मायेच्या मळाने मलिन झाले आहे.(१५) शब्दांनी जास्त काय बोलू? वेदांना जे प्रकट करता येत नाही तेच संतांनी आपल्या शरणागत भक्तांना उघडे करून दाखविले आहे.(१६) 'ज्ञानानेच काहीजण पावन होतात'असे जरी वेद म्हणत असले तरी संतांवाचून ज्ञानशक्ती प्रभाव दाखवू शकत नाही.(१७) अतिशय मोलाची अशी एक मात्रा सर्व रोग जाळून टाकते. पण परीक्षावंत वैद्य नसला तर ती व्यर्थ जाऊ शकते.(१८) तीर्थाच्या ठिकाणी गेल्यानंतर तेथील उपाध्यायांना टाळले तर त्या तीर्थाला जाण्याचा फायदा काय? त्याप्रमाणे संतांचा ज्यांनी अव्हेर केला ते ब्रह्मप्राप्तीच्या निजसुखाला मुकले असे समजावे.(१९) जो संतांना शरण येतो त्याच्या संदर्भात मोठा, लहान असा संत विचारदेखील करत नाहीत आणि त्याला केवळ आपल्या कृपाकटाक्षाने ताबडतोब साम्राज्यपदावर बसवितात.(२०) संतकृपेपुढे आईची कृपा काय? माता संकटकाळी आपल्या बालकाचा वध करते.(२१)

**देव कृपावंत मोठे।शरणागतासी गोमटे।वैरी मारिले नेटें।समान भाव नसे।।२२।।शत्रु मित्र सारिखे संता।म्हणोनि देवा न ये तुळितां।क्षमेविशीं पाहतां।पृथ्वीचि वाटे।।२३।।नांगर घालोनी फाडिली।पदघातें सर्वी ताडिली।परी कृपेनें फळें दिधलीं।समान सर्वां।।२४।।परि तेही जड कठिण।कोणासी न करी पावन।उपमे देता संतालागुन।अति दुषणचि की।।२५।। लोहाचें होय सुवर्ण।परिसाचेनि सन्निधानें।परी परिसशक्ती जे आपण।वंचिली परिसें।।२६।।संतें उपदेशून दासातें।संतचि केले निभ्रांते।तेहि कैवल्या होती दाते।परंपरा ऐसी।।२७।।कामधेनु चिंतामणी।कल्पतरु कल्पिलिया दानीं।समर्थ असती परी कोणी।निर्विकल्प देतीना।।२८।।सूर्यें बाह्य प्रकाशिजे।परी अंतर तम तें न वजे।म्हणोनि केवि उपमिजे।ज्ञानसूर्य ते संत।।२९।।असो संतां नसे उपमा।मौनेंचि वंदावें पादपद्मा।ग्रामो नास्ति कुतः सीमा। लक्षणेविण स्तवन।।३०।।सर्व तीर्थांचे तीर्थ ते संत।सर्व व्रतांचे फळ ते संत।सर्व कर्मासि असे क्षाळित।श्रीचरण संताचे।।३१।। सर्व देवाचे देव साधु।संतसामर्थ्य ते अगाधु।कृपेसरिसा भवसिंधु।कोरडा करिता।।३२।। स्वस्वरूपाचे मायबाप।ते हें संताचें स्वरूप । अविनाशी अखंड अमुप । ते हे संत।।३३।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । संतस्तवनानुकारे । प्रथमसमासः ।।१।।**

---

देव मोठे कृपावंत असतात.पण ते फक्त त्यांना शरण आलेल्या भक्तांसाठीच केवळ चांगले असतात,शत्रूंना मोठ्या निकराने मारतात.त्यांच्याजवळ समदृष्टी नसते.(२२)संतांना शत्रुमित्र सारखेच होत.म्हणून त्यांची देवांशी तुलना करता येत नाही.क्षमेबाबत संत म्हणजे पृथ्वीच वाटतात.(२३)पृथ्वीला नांगर घालून फाडले किंवा पदाघाताने सर्वांनी तिला ताडन केले तरी कृपाळूपणाने सर्वांना समान फळे देते.(२४)पण तीदेखील जड,कठीण असून कोणाला पावन करू शकत नाही.तेव्हा संतांना तिची उपमा देण्याने दोषच पदरी येतील.(२५)परिसाच्या सांनिध्याने लोखंडाचे सोने होते.परंतु परिस स्वतःची परिसशक्ती स्वतःकडेच ठेवतो.ती तो लोखंडाला देत नाही.(२६)पण संत शिष्याला उपदेश देऊन त्याला निश्चितपणे संतच करून टाकतात.पुढे तेही मोक्षाचे दाते बनतात.त्यांची परंपरा पुढे अशीच चालू राहते.(२७) कामधेनू, चिन्तामणी,कल्पतरू त्यांच्यासमोर कल्पिलेल्या(इच्छिलेल्या)वस्तू देण्यास समर्थ असतात.पण यांपैकी कोणीही कल्पना न करता काही देऊ शकत नाहीत.(२८)सूर्य बाह्य विश्व प्रकाशित करतो पण अंतर्गत काळोख(तम)त्याला दूर करता येत नाही.म्हणून सूर्याची उपमा संतांना देता येत नाही.ते ज्ञानसूर्य आहेत.(२९)असो,संतांना कुणाचीच उपमा देता येत नाही.मौनानेच त्यांच्या चरणकमलांना वेद करावे झाले!गावच नाही तर त्याची शीव कुठून असणार?तसे लक्षणांवाचून संतांचे स्तवन कसे करणार?(३०)संत सर्व तीर्थांचे तीर्थ आहेत,सर्व व्रतांचे फळ आहेत,संतचरण सर्व कर्मांचे क्षालन करतात.(३१)साधुसंत देवांचे देव आहेत.त्यांचे सामर्थ्य अगाध आहे,त्यांची कृपा होताच ते सर्व भवसागर कोरडा करतात.(३२) स्वस्वरूपाचे मायबाप असे हे संतांचे स्वरूप आहे.संत अविनाशी,अखंड आणि अमूप आहेत.(३३)

**।।श्रीराम समर्थ।। समास २रा - साधकगुरुपुत्रस्तवन**

**गुरु तेचि हे गुरुपुत्र । जे ज्ञानाचे सत्पात्र । जे पवित्रा करिती पवित्र । गुरुदास्यत्वें ।।१।। माझिये देवार्चनींच्या मूर्ति। गुरुपुत्रचि गा निश्चिती । पंचप्राणाची आरती । अखंड होतसे।।२।। वेदार्थशुद्धजळाचा । अभिषेक होतसे साचा । अर्थोद्भूत स्वानुभूतीचा । परिमळु धूप।।३।। कल्पनेंविण सुमनातें । हार गुंफिला प्रेमतंते । निजानंद वृत्तीच्या हातें । कंठीं सुदला न सुकेची।।४।।पूर्ण पूर्णत्वीं उरलें। हेंचि गुरुपुत्रा भोजन जालें। नामरूप हे विसर्जिलें । मुख क्षाळिलें करांसह।।५।।ऐसी हे अखंड पूजा। सहज होतसे वोजा। परी पूजकचि न दिसे दुजा। अहंपणेंविण।।६।।गुरुपुत्र गुरुस्वरूप। येथें कोणता पा आक्षेप। दीपें लाविला जैसा दीप ।प्रकाशासारिखा।।७।।जयाचीं लक्षणें पाहतां। अमृता आली कडवटता। जयाच्या तेजें मलिनता। अग्नीसी आली।।८।।श्रोता म्हणे तयाचीं लक्षणें। आम्हां सांगावीं कोणकोणें। वक्ता म्हणे सावध होणें । यथामति बोलिजे।।९।। नामरूप मिथ्या स्वभावें। जें जें मायोद्भव आघवें । ऐसें दृढ जालें बरवें । इच्छा नसे या हेत ।।१०।। विषयअसती बहुत। परी दोनच जीवा अनर्थ करीत । ते हे जाणावे स्त्री वित्त । बांधोनि घालिती बंधनीं।।११।।**

---

**पंचिका १४वी, समास २रा - साधकगुरुपुत्रस्तवन**

गुरुपुत्र हे गुरूच होत. ते गुरुदास्याच्या बळावर ते पवित्रालाही पवित्र करतात. त्यामुळे ते ज्ञानाचे सत्पात्रच होत.(१) माझ्या देवपूजेतील मूर्ती म्हणजे हे गुरुपुत्रच (गुरुभक्त) होत. त्यांना माझ्या पंचप्राणांची आरती अखंडपणे चालू असते.(२)वेदार्थरूपी शुद्ध जलाचा अभिषेक सारखा चालू असतो. त्या अर्थातून उत्पन्न झालेल्या अनुभूतीचा सुवासिक धूप नित्य लावलेला असतो.(३) निर्विकल्पतारूप फुलांचा प्रेमाच्या सूत्राने हार गुंफला आणि निजानंदवृत्तीच्या हातांनी गुरुभक्ताच्या गळ्यात घातला. तो अद्याप सुकलेला नाही.(४)पूर्णत्वातून पूर्ण उरले, हेच गुरुपुत्राला भोजन होय. नामरूपाचा त्याग केला म्हणजे त्याच्या हात व मुखाचे क्षालन झाले.(५)अशी ही अखंड पूजा सहजपणे चांगल्या प्रकाराने (वोजा) होत असते. पण अहंपणा नसल्याने दुसरा म्हणवणारा पूजकच दिसत नाही.(६)गुरुपुत्र हा गुरुस्वरूप आहे. त्यात आक्षेपार्ह काही नाही. दिव्याने दिवा लावावा, तेव्हा मूळचा दिवा आणि नंतरचा हा दिवा यांचा प्रकाश सारखाच असतो.(७)त्याची लक्षणे पाहिल्यास अमृतालासुद्धा कडवटपणा येईल. आणि त्याच्या तेजापुढे अग्नीलासुद्धा मलिनता येईल.(८)यावर श्रोता म्हणतो की त्याची कोणकोणती लक्षणे आहेत ती आम्हाला सांगावीत.तेव्हा वक्ता म्हणतो की, सावध होऊन ऐका, मी माझ्या बुद्धीच्या क्षमतेनुसार सांगतो.(९)नामरूप हे स्वभावत:च खोटे आहे. जे जे मायेपासून निर्माण झाले आहे ते ते सर्व मिथ्या आहे.असे चांगले पक्के समजल्यामुळे त्याच्या ठिकाणी इच्छाच राहिलेली नसते.(१०) विषय पुष्कळ आहेत. पण त्यातील दोनच जीवाला अधिक अनर्थ निर्माण करतात. ते म्हणजे स्त्री आणि

**मृत्तिका आणि सुवर्ण। हे दोनी जयासी समान। होय दोषदृष्टी जैसें वमन। त्यागचि केला।।१२।। एकांती जरी उर्वसी । कामशांत्यर्थ उपासी । परी जयाचिया मानसीं । विकारचि नव्हे।।१३।। पंचवर्षी कुमारी । कीं शतवर्षी म्हातारी । तैशाचि तरुणी सुंदरी । समान पाहे ।।१४।। सर्वभूतीं मी एकला । स्त्रीपुरुषामाजीं व्यापला । मीच भोगून अलिप्त ठेला । चर्मभोग तो काय ।।१५।।जैसा मुमुर्षू लग्नाची। इच्छा न करी साची । अहंकृति सांडिता देहाची । इच्छा निमाली।।१६।।ऐसा काम जेथें नसे । वैराग्य तेथें वसतसे । तमाभावीं प्रकाशें। वस्ती केली।।१७।।कामाचा धाकुटा बंधु। जो महा खडतर क्रोधु । तयासी पडला विरोधु । विवेकासी।।१८।।समष्टितादात्म्य पिंडापरी । आपुला आपण निर्धारी । माझी तुझी केली बोहरी । तरी क्रोध कैचा।।१९।।जिव्हा दातानें चाविली। कोणें बत्तीसी पाडिली। भूतें भौतिका पीडा केली। माझें काय तेथें।।२०।। आपुली कांता परपुरुषीं। आपण पाहतां दृष्टीसी। तो परु हा मी न ये मानसीं। मा क्रोध तो केवी।।२१।। ऐसी अक्रोधता पाहसी जेथें। विवेक ज्ञान राहिलें तेथें। तया साधका वेदगुह्यार्थें। माळ घातली बळें।।२२।।**

---

द्रव्य हे होत.ते जीवाला बांधून बंधनात टाकतात.(११) मृत्तिका आणि सोने ही दोन्ही त्याला सारखीच वाटतात.त्याने त्यांचा दोषदृष्टीने वमनासारखा त्याग केलेला असतो.(१२)जरी उर्वशीने कामशांती करण्यासाठी त्याची एकांतात आराधना केली तरी त्याच्या मनात विकार उत्पन्नच होत नाहीत.(१३)पाच वर्षांची कुमारी असो,की शंभर वर्षांची जख्खड म्हातारी असो,त्याचप्रमाणे सुंदर तरुणी असोत,तो सर्वांना समानच पाहतो.(१४) सर्व भूतांमध्ये आणि स्त्रीपुरुषांमध्ये मीच एकला व्यापून राहिलो आहे. मीच मला भोगून अलिप्त राहिलेला असतो.मग नुसत्या चर्मभोगाचे मला काय आकर्षण?(१५)जसा मृत्युशय्येवर असणारा रोगी लग्नाची इच्छा करत नाही,त्याप्रमाणे देहाबद्दलच्या अहंकाराचा त्याग केल्याबरोबर त्याची इच्छाच नष्ट होते.(१६)अशा तऱ्हेने जेथे काम राहत नाही तेथे वैराग्य वास्तव्य करते. तम म्हणजे अंधकार नाहीसा होताच त्या ठिकाणी जसा प्रकाश वस्ती करतो तसेच हे आहे.(१७)कामाचा धाकटा भाऊ अतिशय खडतर असा जो क्रोध त्याचे विवेकाशी वैर पडलेले असते.(१८)पिंडाप्रमाणे त्याचे समष्टीशी आपले आपणच तादात्म्य झालेले असते आणि त्याने माझेपणाची आणि तुझेपणाची राखरांगोळी केलेली असते.त्यामुळे त्याच्या ठिकाणी क्रोध कसा असेल?(१९)दातांनी जीभ चावली म्हणून कोणी रागारागाने स्वत:ची बत्तिशीच पाडते काय?भूतापैकी एकाने भूतनिर्मित अवयवाला पीडा केली,त्यात माझे काय जाणार आहे, असे तो मानतो.(२०)आपली पत्नी परपुरुषाबरोबर आहे,हे स्वत: पाहूनसुद्धा तो परका आहे.मी हा त्याहून वेगळा आहे असे त्याच्या मनातसुद्धा येत नाही,मग क्रोध कसा येईल?(२१)अशी अक्रोधता जेथे असेल तेथेच विवेक आणि ज्ञान हे वसती करतात. अशाच साधकाच्या गळ्यात वेदांचा गुह्यार्थ माळ घालतो.(२२)

**आपपरु न दिसे साचा। तरी लोभ असावा कासयाचा । लोभाभावीं तृष्णेचा । घातचि जाला।।२३।।लोभ तृष्णा हे निमाली जरी। निजतृप्ति अपैसी वरी। सर्व भूतीं पाहे निर्वैरी। मद तो कैचा।।२४।।मदाभावीं समता जाली। तेणें शांति बळावली। तेणें दंभवृत्ति विघुरली। नव्हती जैसी।।२५।।मत्सर करावा कोणासी। आपण ब्रह्म सर्व देशीं । लोकेविण लौकिकासी। स्वानुभवें ग्रासिलें।।२६।।अहंता ममता प्रयत्न । सुख दुःख पाप पुण्य । लज्जाभयादि संपूर्ण । देशधडी जाले।।२७।।शांति दांति उपरम । तितिक्षा श्रद्धा नियम। हें बळकाविलें परम । संपत्ति साधनें।।२८।।विवेक वैराग्य महा शूर । हे दोन्हीं असतां खबर्दार । अन्य साधनाचा परिवार । पुसत घर येताती।।२९।।इतुकीं साधनें जयापाशीं। नांदत असती दिवानिशीं । गुरुपुत्र साधक तयासी । नांव ठेवी श्रुति।।३०।।परी सर्व साधनसंपत्तीसी । जीवन जैसें उपवनासी । आश्रयो असे निश्चयेसी। सद्‌गुरुराज।।३१।।चातकासी जैसा घन। चकोरासी रोहिणीरमण। तैसा अनन्यासी पावन। श्रीसद्‌गुरुनाथ।।३२।।मुख्य सद्‌गुरूचें भजन । हेंचि कैवल्य गुरुपुत्रालागुन । सद्‌गुरुवीण उपासन । सच्छिष्या नाहीं।।३३।।गुरुदेव गुरु मायबाप । गुरु स्वरूपाचें स्वरूप । गुरुवीण बापुडे अल्प । सकळ कांहीं ।।३४।।**

---

आपण आणि परका असा भेदच जर दिसत नसेल तर त्याच्या मनात कशाचा लोभ असेल? आणि लोभ नसल्यामुळे तृष्णा नष्टच होते.(२३) आणि लोभ आणि तृष्णा जर निमाली तर निजतृप्ती त्याला आपोआप माळ घालते. सर्व भूतांमध्ये तो निर्वैर पाहतो, मग त्याला मद कसा ग्रासील?(२४) मद नसल्यामुळे समता प्राप्त होते. तिच्यायोगे शांती बळावते आणि त्यायोगे दंभवृत्ती विघरून होती की नव्हती अशी होते.(२५) आपणच जर सर्व व्यापक ब्रह्म झालो तर कोणाचा मत्सर करावा? लोक नसल्यामुळे लौकिकाला सुद्धा तो स्वानुभवाने ग्रासून टाकतो.(२६) त्याच्या ठिकाणी अहंता, ममता, प्रयत्न, सुखदुःख, पाप-पुण्य, लज्जा, भय इत्यादी संपूर्णपणे देशोधडीला लागलेले असतात.(२७) आणि साधनांच्या द्वारा शांती, दम (इंद्रियनिग्रह), उपरम (विश्रांती, समाधान), तितिक्षा, श्रद्धा, नियम ही श्रेष्ठ संपत्ती तो बळकावून बसतो.(२८) विवेक आणि वैराग्य हे दोन शूर पुरुष तत्पर असताना अन्य साधनांचा परिवार घर पुसत त्याच्याकडे येतो.(२९) अशाप्रकारची एवढी सर्व साधने ज्याच्याजवळ रात्रंदिवस नांदत असतील त्याला श्रुतींनी साधक गुरुपुत्र असे नाव दिले आहे.(३०) परंतु उपवनाला जसे जल त्याप्रमाणे या सर्व साधनांना सद्‌गुरू हे आश्रयस्थान होत.(३१) मेघ जसा चातकाला, चंद्र जसा चकोराला, तसा अनन्य झालेल्या साधकाला सद्‌गुरू पावतात.(३२) सद्‌गुरूचे भजन पूजन हा गुरुपुत्राचा म्हणजे गुरुभक्ताचा मोक्ष होय. सच्छिष्याला सद्‌गुरूवाचून दुसरी उपासना नाही.(३३) गुरू हेच त्याचे देव; गुरू तेच त्याचे मायबाप; गुरू हेच त्याच्या स्वरूपाचे स्वरूप होय. गुरूवाचून सर्व काही त्याला अल्पच होय.(३४)

**काया वाचा आणि मन । गुरुचरणीं होय अभिन्न । हें मुख्य गुरुपुत्राचें लक्षण । तेथें ज्ञानही असे ।।३५।। असो ऐसिया गुरुपुत्रासी । माझी पूजा अहर्निशी । बहुत बोलणें कासयासी। त्या राहावयासी हृदय स्थान ।।३६।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । साधकगुरुपुत्रस्तवनप्रकारे । द्वितीयसमासः ।।२।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ३रा - साधनोत्तीर्णप्रकार

**आतां परमार्थाची संपदा । जेणें पावविलें निजपदा । सकळ दुःखाची आपदा । भवबाधा निरसली।।१।।हे उपकारी सामुग्री थोर । शब्द शास्त्र विचार । आणि श्रवणमननादि प्रकार । यासी उत्तीर्ण व्हावें।।२।।उत्तीर्णपणाची मात । कैसेनि तो पुढें संकेत । प्रस्तुत अवधारा सावचित्त । हे उपकारी कैसे।।३।।अवकाशीं जो जन्मला । प्रवृत्ति निवृत्ति दिवटा जाला । बंध मोक्ष या दोहीला । शब्देंचि रूपा आणिलें ।।४।। अविद्येसी होतां वरपडा। जीवाते बंध करी उघडा । विद्यात्मकत्वें रोकडा । मोक्ष दे हाची।।५।।जैसा दुभाषी नर कोणी। समजावित उभयांलागुनी। तैसा शब्द अविरोधपणीं । सारिखा उभया।।६।।तो एकलाचि महावीर। स्त्रीवेषें जाला चतुःप्रकार। परादिकीं नांदे सधर । तत्तदाकार परिणमे।।७।।**

---

काया, वाचा आणि मनेकरून गुरुचरणाशी तो अभिन्न असतो. तेच गुरुपुत्राचे लक्षण होय. त्याचे ठिकाणी ज्ञानही असते.(३५) असो, अशा गुरुपुत्राला माझी रात्रंदिवस पूजा असो. जास्त काय बोलू? त्याला राहण्यासाठी माझे हृदय ही जागा दिली आहे.(३६)

### पंचिका १४वी, समास ३रा - साधनोत्तीर्णप्रकार

आता सगळी दु:खरूपी संकटे, भवबाधा (जन्ममरणरूप संसाराची बाधा) यांचे निरसन करून निजपदाला जिने पोहोचविले, त्या परमार्थसंपदेचे आता (वर्णन करू).(१) शब्द, शास्त्र, विचार आणि श्रवणमननादी प्रकार ही सामग्री अतिशय उपकार करणारी असून तिचे उतराई व्हायचे आहे. तिचे ऋण फेडायचे आहे.(२) आता हे ऋण कसे फेडायचे या गोष्टीचा विचार नंतर करू. पण अगोदर त्यांच्या उपकारांचे स्वरूप पाहू.(३) शब्द अवकाशात म्हणजे आकाशात जन्मतो आणि प्रवृत्ती आणि निवृत्ती या दोहोंना मार्गदर्शक होतो. बंध आणि मोक्ष या दोहोंना शब्दानेच रूप (आकार) दिले.(४) तो अविद्येच्या आहारी गेला की जीवाला बंध निर्माण करतो आणि तो विद्यासंयुक्त होताच तोच प्रत्यक्ष मोक्ष मिळवून देतो.(५) एखादा दुभाषी माणूस त्या दोन्ही भाषा बोलणाऱ्यांची समजूत काढतो, त्याप्रमाणे शब्द विरोध न करता बंध आणि मोक्ष या दोहोंनाही समान असतो.(६)तो एकटाच पराक्रमी शब्दपुरुष स्त्रीवेष धारण करून चार प्रकारे विभागला जातो. तो परा, पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी या वाणीच्या चारी

**जेणें तस्कर धाडिले वनीं । आपणचि निघाला धावणी । तेवी या शब्दाची करणी । अघटित असे।।८।।हा अविद्येसी साह्य होता । नाथिलें बळाविलें द्वैता । तूं मी या ऐसिया अनंता । बहुधा केले।।९।।पुढे त्रिविध प्रकारीं हा भ्रम । नाथिलेपणें करी उपशम । वैराग्य विचार होता परम । साहकारि जेव्हां।।१०।।मृत्तिकेसी अग्नि इंधन । जेथवां मिळती मूसीं पूर्ण । तेव्हां मृत्तिकेचेचि होय सुवर्ण । पुढें मळ झाडतां।।११।।अविद्यात्मकें मळला। कठिणपणीं नानात्वा आला। तों वैराग्य-ज्ञान-विचारें ताविला । गुहामूसेमाजीं।।१२।। अज्ञान कठिणत्व परादिकांचे । जातां विद्यात्मक राहणें त्याचें । ऐसे उपकार शब्दाचे । असती मायां।।१३।।श्रोता म्हणे शब्दें येणें । आत्मा भेटविला आत्मपणें । किंवा अज्ञान निरसतां होणें । उपकारी कैसा।।१४।।आत्मया आत्मा दाविला । हा शब्दचि व्यर्थ गेला। अविद्यानाशें उपकारी जाला । तरी अविद्या मिथ्या।।१५।।मिथ्या म्हणिजे नाहीं । नाहीं ते नाशिलें कहीं। तरी उपकार हा कदां ही। बोलोचि नये।।१६।।ऐसें श्रोतयाचें उत्तर।ऐकोनि वक्ता दे प्रत्युत्तर । तुम्ही बोलतां हेंचि खरें । तरी तारतम्य असे।।१७।।अविद्या अज्ञान मुळीं नसतां। परी नाथिली आली बद्धता। तेचि विचारें मिथ्या होतां। अज्ञान नाशिलें।।१८।।**

---

प्रकारांबरोबर समर्थपणे नांदताना त्या वाचेच्या स्वरूपानुसार बदलतो.(७) रानात चोरांना आपणच पाठवायचे आणि आपणच पुन्हा त्यांचा पाठलाग करायचा त्याप्रमाणे या शब्दाची करणी अघटित आहे.(८) शब्द जर अविद्येला साहाय्यक झाला तर मिथ्या द्वैताला बळकटी येते आणि तू आणि मी असा भेद उत्पन्न करून एका अनंत तत्त्वाला बहुविध रूप दिले जाते.(९) पण वैराग्य आणि विचार हे थोर साहाय्यकारी भेटताच तो त्रिविध प्रकारांनी या भ्रमाचे उपशमन करतो.(१०) मृत्तिका, अग्नी आणि इंधन यांची एका मुशीत गाठ पडताच त्याच मृत्तिकेतील मळ नाहीसा होऊन तिचे सुवर्ण बनते.(११) त्याप्रमाणे अविद्येने मलिन झाल्यामुळे स्थूल रूपाने जो नानात्व धारण करतो तोच वैराग्य, ज्ञान आणि विचार या अग्नीवर हृदयाच्या मुशीमध्ये तापवल्याबरोबर(१२) परादी वाणींचे अज्ञान आणि काठिन्य जाते आणि तोच शब्द केवळ विद्यास्वरूपात राहतो. शब्दाचे असे अनंत उपकार आहेत.(१३) यावर श्रोता आक्षेप घेतो की, या शब्दाने आत्म्याला आत्मस्वरूपाने भेटविले किंवा अज्ञानाचे निरसन केले यात उपकार कसला?(१४) आत्म्याला आत्मा दाखविला हा शब्दप्रयोग व्यर्थ नाही काय? बरे अविद्येचा नाश केला या कार्यातही अविद्या मिथ्याच आहे.(१५) मिथ्या म्हणजे नाहीच. नसलेल्याचा कधी नाश होईल काय? तेव्हा याला उपकार असे केव्हाही म्हणू नये.(१६) श्रोत्याची ही शंका ऐकून वक्ता तिला प्रत्युत्तर देतो. वक्ता म्हणतो, तुम्ही म्हणता ते खरेच आहे. पण येथे थोडे तारतम्याने घ्यावे.(१७)अविद्या आणि अज्ञान मुळीच नसताना विनाकारण खोटी बद्धता मानावी लागते. विचाराने त्यांचे मिथ्या स्वरूप कळताच अज्ञान नष्ट होते.(१८)

**आणि अविद्येसी नासुनी । आपण निमाला तत्क्षणीं । परादि आटल्या चारी वाणी । सहगमनीं पतिव्रता ।।१९।। आपण सहकुटुंब निमाला । मग आत्माचि परिपूर्ण उरला । ऐसा उपकारी थोर जाला । दोहीपरी ।।२०।। तैसेचि सत्शास्त्र वेदांत । शब्द ब्रह्म जया म्हणत । तेंहि उपकारीच होत । बोलिला न्यायें ।।२१।। श्रवणमननादि साधन । निदिध्यासें पावे समाधान । मोडला परमार्थ उभवून । उपकारी जालें ।।२२।। आतां वैराग्यासहित विचार । हे दोन्ही महाशूर । पाहतां तयांचा उपकार । थोरचि असे ।।२३।। प्रवृत्ति निवृत्ति दोहींकडे । दोन दोन वीर असती गाढे । तेणें सर्व सेनेसी बळ चढे । स्वस्वदळीं।।२४।। प्रवृत्तिकडे क्रोध काम । हे दोन्ही दांडुगे परम । येणें जितुका अविद्यासंभ्रम । पैसावला बळें।।२५।। निवृत्तिकडे दोघे वीर । बळावले वैराग्य विचार । तरी कामक्रोधादि असुर। प्राणचि टाकिती।।२६।।मग प्रवृत्तिचि सेना । उगीच पावे अवसाना । विजयी देखोनि दोघां जणा । सर्व परमार्थी मिळती।।२७।। शमदमादि शांति । उपरमादि जितुकी संपत्ति। साधकाप्रति उपासिती । निर्वैरपणे ।।२८।। म्हणोनि वैराग्य विचार । शत्रु पराभवून सत्वर । आपणहि निमती साचार । स्वामिकार्यार्थ ।।२९।। मग आत्माचि आत्मपणीं । अखंडैकरस पूर्णपणीं । विचारादिकांची ऐसी करणी। तरी उपकार थोर कीं ।।३०।।**

---

अविद्येचा नाश करून शब्द आपण स्वत:ही नष्ट होतो.त्याबरोबर परादी चारी वाणी सती जाणाऱ्या पतिव्रता स्त्रियांप्रमाणे आटून जातात.(नष्ट होतात).(१९)शब्द आपण स्वत: सकुटुंब नष्ट झाल्यावर एकटा आत्माच उरतो.म्हणून शब्द हा खरोखर दोन्ही प्रकारांनी उपकारक ठरतो.(२०)म्हणून सच्छास्त्र जो वेदान्त ज्याला शब्दब्रह्म असे म्हणतात तोदेखील वर सांगितलेल्या न्यायाने उपकारक ठरतो.(२१)श्रवण मनन इत्यादी साधनांच्या निदिध्यासाने समाधान प्राप्त होते आणि मोडलेल्या परमार्थाची पुन्हा उभारणी करून उपकारक होतात.(२२)आता वैराग्यासहित विचार हे दोन्ही अतिशूर असून त्यांच्या उपकाराचा विचार करता तो खूपच मोठा असल्याचे लक्षात येते.(२३)प्रवृत्ती आणि निवृत्ती या दोहींकडेही दोन दोन पराक्रमी वीर आहेत.त्यांच्यामुळे त्या त्या सेनादळाला बळ चढत असते.(२४)प्रवृत्तीकडे क्रोध आणि काम हे दोन्ही अतिशय बलवान असून त्यांच्यामुळेच अविद्येचा सर्व पसारा वाढला आहे.(२५)निवृत्तीकडेही दोन बलवान वीर आहेत.ते म्हणजे वैराग्य आणि विचार हे होत.त्यांच्यापुढे कामक्रोधादी असुर प्राणच टाकतात.(२६)मग प्रवृत्तीची सेना आपोआपच नष्ट होते.(किंवा बळेच अवसान धरते म्हणजे जोर धरते)तेव्हा या विवेक आणि वैराग्य या दोन वीरांना विजयी झालेले पाहताच सर्वजण परमार्थाला येऊन मिळतात.(२७)मग शमदमादी,शांती उपरमादी जेवढी साधनसंपत्ती आहे ती सर्व परस्परांशी वैर न करता साधकाची उपासना करू लागतात.(२८)म्हणून वैराग्य आणि विचार हे दोघेजण शत्रूचा वेगाने पराभव करून लगेच स्वामींच्या कार्यार्थ स्वत:ही नष्ट होतात.(२९)मग आत्माच तेवढा आत्मरूपाने पूर्ण

**यासि उत्तीर्णता कैसी । न देखों अन्य पदार्थासी। अनन्य होता सद्‌गुरूसी । सहज उत्तीर्ण।।३१।। कारण सद्‌गुरुंवाचून । काय करिती बापुडें दीन । हे सर्वही गुरोराधीन । सर्वदा असती ।।३२।। सद्‌गुरूचे पाई डोई । ठेवितां जालों उतरायी । सत्य सत्य निःसंशयी । उरलों चिन्मात्ररूप ।।३३।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । साधनोत्तीर्णप्रकारे । तृतीयसमासः ।।३।।**

## ।।श्रीराम समर्थ।। समास ४था - ग्रंथोपसंहार

**आता ग्रंथ-उपसंहारु । नामे जया आगमसारु । चतुर्दशपंचिकेचा निर्धारु । विषय तो एकचि ।।१।। उपनिषदादि आचार्यसंमति । वेदान्तसागर जया म्हणती । त्यांतील सारार्थ प्राकृतीं । यथामति काढिला ।।२।। प्राकृत भाषेंत जरी आला । अर्थ नवचें कीं बाटला। अंत्यजा घरिंचे अग्नीला । विटाळ कोण म्हणे ।।३।। शास्त्रसंपन्न जे नर । जया वैराग्यादि विचार । गुरुमुखें अपरोक्ष साक्षात्कार । तया होय गीर्वाणें ।।४।। अनधीत जे इतर । विविदिषा होय अधिकार । तयासि प्राकृत ग्रंथ परपार । करिती अनायासें ।।५।। रिंगणीचिया वृक्षातें । अमृतफळें येतीं आयतें । तरी शिणावें कासयातें । आम्रवृक्षलावणीं।।६।।**

---

अखंडैकरस होऊन राहतो. विचारादिकांची अशी करणी पाहिल्यावर त्यांचा उपकार मोठा नाही काय?(३०) त्यांचे उतराई कसे व्हायचे? दुसऱ्या पदार्थांच्या साहाय्याने ते करता येईल म्हणावे तर तसा दुसरा पदार्थ नाही. पण सद्‌गुरूंशी अनन्य होताच मात्र सहजच उतराई होता येते. (३१) कारण सद्‌गुरूवाचून दीन बापडे काय करतील? ते सर्वच जण नेहमी गुरूंच्या अधीन असतात.(३२) सद्‌गुरूंच्या पायांवर डोके ठेवताच मी त्यांचा उतराई होऊन फक्त चिन्मात्ररूप उरलो, हे त्रिवार सत्य होय. (३३)

## पंचिका १४वी, समास ४था - ग्रंथोपसंहार

आता आगमसार नावाच्या या ग्रंथाचा उपसंहार करू.या चौदा पंचिकांचा विषय निश्चयपूर्वक एकच आहे.(१)ज्यांना वेदान्त सागर असे म्हणतात.त्या उपनिषदादी ग्रंथातून आचार्यांच्या(शंकराचार्यांच्या)संमतीने प्राकृतमध्ये स्वबुद्धीनुसार सारार्थ काढला.(२)प्राकृत भाषेत माझ्या बुद्धीच्या कुवतीप्रमाणे सारार्थ काढला,तरी त्यामुळे मूळचा अर्थ बाटला नाही.अंत्यजाच्या घरच्या अग्नीला कोणी विटाळला म्हणेल काय?(३)जे लोक शास्त्रसंपन्न आहेत,ज्यांच्याकडे वैराग्यादी विचार आहेत,त्यांना संस्कृतच्या साहाय्याने अपरोक्ष साक्षात्कार होतो.(४)पण इतर जे अशिक्षित आहेत,पण ज्यांना जाणण्याची इच्छा आहे आणि ज्यांनाअधिकार आहे.अशांना प्राकृतमधील ग्रंथ परतीराला अनायासे पोहोचवितात.(५)साध्या रिंगणीच्या वृक्षाला जर गोड फळे आयती मिळत असतील,तर आंब्याच्या लागवडीसाठी विनाकारण कष्ट का बरे उपसावेत?(६)

**गीर्वाण शब्द टाकुनी । अर्थेचि पावे समाधानी । तोचि अर्थ प्राकृतीं जाणोनी । शब्द फलकट सांडिजे।।७।।दोहींचा अर्थ तो एक । अर्थेचि पाविजे परलोक । हे अनुभवी जाणती विवेक । येर ते मत्सरी।।८।।रामकृष्णादि अवतार । मनुष्यरूपें भूमीवर । सर्व जनासी जाले गोचर । महोदय भाग्याचा।।९।।तेचि ते वैकुंठीं असतां । कोण देखे त्या भगवंता । तैसें तया गुह्य संस्कृता । कोण जाणे।।१०।।अवतार होतां देवत्व गेलें । ऐसें नाहीं ऐकिलें । पतितपावन हें नाम जालें । तिहीं लोकीं।।११।।तैसेचि प्राकृतींच्या अर्थे। बहुत पावली परमार्थपंथें । न्यूनाधिक कोणी येथें । मानुंचि नये।।१२।।येथें सर्वा असे अधिकार। अनधीत आणि स्त्रीशूद्र। वैराग्ययुक्त आणि विचार। इतुके साचार पाहिजें।।१३।। वरी गुरुसेवेची आवडी। श्रवणमननादि अति गोडी। तया न लगतां अर्ध घडी। शिवापडिपाडी होतसे।।१४।।स्त्रीशूद्रही शिवासमान । मा काइ न होती ब्राह्मण । श्रोता म्हणे हो अनुमान। थोरसा वाटे।।१५।।असती जे वेदाधीत । तयासीच ज्ञानें मोक्ष होत। अन्यथा मानितां वेदासि येत। व्यर्थता सहज।।१६।।वक्ता म्हणे हो सावधान। जडभरत जन्मतांचि पावन ।**

---

संस्कृतचे शब्द टाकून देऊन केवळ अर्थाने समाधान प्राप्त होऊ शकते. तोच अर्थ प्राकृतात जाणून घेऊन शब्दरूपी फोलकटाचा त्याग करावा.(७) दोन्ही भाषांचा अर्थ एकच आहे आणि अर्थानेच परलोकाची प्राप्ती होऊ शकते. अनुभवी लोकांना हा विवेक समजतो. बाकीचे विनाकारणच मत्सर करतात.(८) रामकृष्णादी अवतार मनुष्यरूपाने पृथ्वीवरील लोकांसमोर प्रकट झाले. ते सर्व लोकांच्या भाग्याचा महोदयच म्हणायचा!(९) तेच जर वैकुंठातच राहिले असते तर त्या भगवंताला कोण पाहू शकले असते? त्याप्रमाणे गूढ (पर्यायाने कठीण) असे संस्कृत कोणाला समजू शकेल?(१०) अवतार घेतल्याने त्यांचे देवत्व नष्ट झाले, असे काही ऐकिवात नाही उलट तिन्ही लोकात त्यांचे पतितपावन असे नाव झाले.(११) त्याप्रमाणेच प्राकृतमधील अर्थामुळे पुष्कळ लोक परमार्थाच्या वाटेला लागले. म्हणून याबाबतीत कोणी कमीजास्तपणा मानू नये.(१२) येथे सर्वांनाच अधिकार आहे. मग ते अशिक्षित असोत अथवा स्त्रिया असोत अथवा शूद्र असोत. मात्र ते वैराग्ययुक्त आणि विचार करणारे असले पाहिजेत. एवढ्या गोष्टी आवश्यक आहेत. (१३) त्यात भर म्हणून गुरुसेवेची आवड असेल, श्रवणमननाचीही आवड असेल तर अर्ध्या घटकेचाही अवधी न लागता तो शिवसमान होतो.(१४) स्त्रीशूद्रही शिवासमान होऊ शकतात. मग ब्राह्मण का बरे होणार नाहीत? हे ऐकताच श्रोता म्हणाला, ''हा तर्क जरा भारी वाटतो.(१५) ज्यांनी वेदांचे अध्ययन केले अशांनाच ज्ञानाने मोक्ष मिळतो, हे जर खरे मानले नाही तर वेदाला सहजपणे व्यर्थपणा येतो.''(१६) यावर वक्ता म्हणतो, ''यावर जरा सावधान होऊन विचार करा. जडभरताला तुम्ही जन्मतःच पावन मानता. मग

**तेणें केलें अध्ययन । कोणतें सांगा ।।१७।। श्रोता म्हणे पूर्वजन्मीचें । अध्ययन असे साचें। वक्ता म्हणे हो सर्वांचें । ऐसेंचि असे।।१८।।अन्य याती ब्रह्मज्ञानीं । तेही पूर्वपुण्याची करणी । वेदार्थ आकळिला पूर्वजन्मीं । तोचि हा येथें प्रगटला ।।१९।। तरी वेदासी न ये व्यर्थता । वेदचि सर्वांसि तारिता । पूर्वी वेदाधीत न होतां । ज्ञानीं प्रवृत्तीच नव्हे।।२०।। तस्मात् हें पूर्वीच जालें। परोक्ष ज्ञान सर्व आकळलें। अपरोक्षीं उणें राहिलें । पुन्हा जन्मले या हेतू ।।२१।। गत दिवसाचें अध्ययन । दुसरे दिवशी होय पठण । तैसें पूर्व संपादित जें ज्ञान । प्रगटलें येथें ।।२२।। देशिकपूर्व परोक्षज्ञान । होय जरी सप्रमाण । बुद्धिपूर्वक पाप संपूर्ण । अग्नि इंधना जाळी जेवी ।।२३।। देशिकपूर्वक अपरोक्षज्ञान । विचारें होय सप्रमाण । मूलाज्ञाना तमा सहस्त्रकिरण । मध्यान्हींचा जैसा ।।२४।। अज्ञानचि निःशेष जातां । ब्रह्म परिपूर्ण होय ज्ञाता । तरी शिवादिकांची साम्यता । काय नसे त्या ।।२५।। असो वेदार्थ आलोडुनि आला । वेदांत प्राकृतीं उमटला । तरी हा पाहिजे सेविला । मुमुक्षुजनीं ।।२६।। श्रोता म्हणे ग्रंथ प्राकृत । पूर्वीच असती वेदांतसंमत । पूर्वाचार्य जाले बहुत । तेणें जगदोद्धार केला।।२७।।आतां याचे प्रयोजन कोणतें । अवधारा हों एकचित्तें।**

---

त्याने कोणते अध्ययन केले होते सांगा.''(१७) श्रोता यावर म्हणतो,''त्याचे पूर्वजन्मीचे अध्ययन होते''वक्ता यावर म्हणतो''मग सर्वांचेच असे असते.''(१८) अन्य जातीसुद्धा ब्रह्मज्ञानी होऊ शकतात. कारण त्यांच्या पूर्वपुण्याची ती करणी असते. पूर्वजन्मात त्यांनी वेदार्थ समजून घेतला होता. त्याचेच फल या जन्मी प्रकट झाले असे मानावे.(१९) त्यामुळे वेदाला व्यर्थता येत नाही. वेदच सर्वांना तारतो. पूर्वी जर वेदाचे अध्ययन केले नसेल तर या जन्मी त्याची ज्ञानाकडे प्रवृत्तीच होणार नाही.(२०) म्हणून त्यांना परोक्षज्ञान पूर्वीच प्राप्त झाले होते. आता अपरोक्ष ज्ञानाच्या संदर्भात काही उणीव राहिलेली असते,म्हणून त्यांना पुन्हा जन्म प्राप्त होतो.(२१)कालच अध्ययन केलेले असल्याने आजच्या अध्ययनाच्या वेळी ते तोंडपाठ होते. त्याप्रमाणे अगोदर जे ज्ञान मिळवले होते ते आता याजन्मी प्रगट होते.(२२)सद्गुरूंनी केलेल्या उपदेशानंतर जर परोक्षज्ञान सप्रमाण झाले तर बुद्धिपूर्वक केलेले पाप, अग्नी इंधनाला जाळतो त्याप्रमाणे संपूर्ण नष्ट होते.(२३) सद्गुरूंनी केलेल्या उपदेशानंतर जर अपरोक्षज्ञान विचारानंतर सप्रमाण झाले, तर मध्यान्हीचा सूर्य ज्याप्रमाणे अंधकार नाहीसा करतो त्याप्रमाणे मूळ अज्ञानाला ते नाहीसे करते.(२४)आणि अज्ञान नि:शेष नाहीसे झाल्यानंतर ज्ञाता परिपूर्णपणे ब्रह्मच होऊन जातो. मग त्याला शिवाशी साम्य कसे येणार नाही?(२५)असो, वेदार्थाचे आकलन केल्यानंतर जर वेदान्त प्राकृतामध्ये प्रकट केला तर मुमुक्षू लोकांनी त्याचे सेवन केलेच पाहिजे.(२६)यावर श्रोता म्हणतो, 'वेदान्ताला संमत असे ग्रंथ प्राकृतात पूर्वीच होऊन गेले आहेत. पूर्वाचार्यही पुष्कळ होऊन गेले. त्यांनी जगदुद्धाराचे कार्यही पुष्कळ केले आहे.(२७) मग आता या ग्रंथाचे प्रयोजन काय? याचे 'उत्तर' चित्त देऊन ऐका.

**घरोघरीं अन्नसंतर्पणातें । श्रीमंत करिती ।।२८।। मुमुक्षु साधक याचक । तृप्ति पावती अनेक । सकल ग्रंथांची अमोलिक। ठाई ठाई छत्रें ।।२९।। कोणी एक दरिद्रियाला । धनाचा कूप सांपडला । तेणें करितां संतर्पणाला । काय न भक्षिती कोणी ।।३०।। संतर्पण तेणें न करितां । काय उपवास पडती समस्तां । आपुल्या श्रेयार्थ तत्वतां । करितसे तो ।।३१।। हा ग्रंथ न होतां प्रस्तुत। साधक राहती ना अतृप्त । परी अंतरींचा असे जो हेत । तो प्रगट करूं ।।३२।। गुरुभक्ताचें घडावें सेवन । ऐसें वांछित होतें मन । परी दुर्बळ मी दैवहीन। तें प्राप्त कैचें ।।३३।। ऐसें जें हीनत्व आलें । तें पाहिजे निवारिलें । म्हणून पूर्वीचे बोल बोलिले । उच्छिष्ट समर्थांचे ।।३४।। हेचि गुरुपुत्र पाहती । आपुलें ठाई संतोषती । तेणें माझी हीनत्वगती । निरसून गेली ।।३५।। संतोष करावा सकळांचा। हाचि प्रकार ईशपूजनाचा। संतोष होतां सत्साधकाचा । पूर्ण सेवेचा अधिकारु ।।३६।। हें इतुकेचि प्रयोजन । गुरुपुत्र ते गुरुसमान । अन्यथा नव्हे नव्हे आण । श्रीसद्गुरुची।।३७।। आतां येव्हडाहि परिहारु। कासयासी मी मी करूं । कर्ता केलें याचा विचारु । पुढिले समासीं ।।३८।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ग्रंथोपसंहारप्रकारे । चतुर्थसमासः ।।४।।**

---

घरोघरी श्रीमंत लोक अन्नसंतर्पण करतात.(२८) त्याप्रमाणे मुमुक्षू, साधक, याचक या लोकांनी पूर्वीच्या आचार्यांनी केलेल्या ग्रंथांच्या साहाय्याने तृप्ती प्राप्त करून घेतली आहे. या सगळ्या अमोलिक ग्रंथांची ठीकठिकाणी ग्रंथछत्रे उघडली आहेत.(२९) अशात एखाद्या दरिद्री माणसाला धनाचा आड सापडला आणि त्याने अन्नसंतर्पण केले तर कोणी खाणार नाही काय?(३०) त्याने संतर्पण केले नाही तर कोणी उपाशी राहील असेही नाही. तो आपल्या पुण्यासाठी करत असतो.(३१) हा ग्रंथ लिहिला नसता तर साधक अतृप्त राहणार नाहीत, पण आमच्या मनातील हेतू स्पष्ट करून सांगतो.(३२) गुरुभक्ताची सेवा घडावी असे मनात खूप वाटत होते. पण मी दुबळा आणि दैवहीन असल्यामुळे मला ते कसे प्राप्त झाले असते?(३३) अशा तऱ्हेचे जे हीनत्व आले होते ते काढून टाकले पाहिजे म्हणून पूर्वीच समर्थांनी बोललेले उच्छिष्ट बोल मी पुन्हा बोलतो आहे.(३४) गुरुभक्तांनी ते पाहिले तर ते आपल्या मनात संतुष्ट होतील. त्यामुळे माझी हीनत्वबुद्धी निरसून गेली.(३५) सगळ्यांना संतुष्ट करावे हाही ईश्वरपूजेचाच एक प्रकार होय. सत्साधकांना संतोष वाटला तरच गुरुभक्तांच्या सेवेचा पूर्ण अधिकार मला प्राप्त झाला असे मला वाटेल.(३६) हा एवढा माझ्या मनात उद्देश होता. गुरुभक्त हे गुरूसमान असतात, ते त्याहून भिन्न नाहीत. हे मी सद्गुरूंची शपथ घेऊन सांगतो.(३७) आता एवढा तरी परिहार मी का बरे करू? कर्ता कोण, कोणी केले, याचा विचार पुढच्या समासात करू.(३८)

**।।श्रीराम समर्थ।। समास ५वा - ग्रंथाकर्तृत्वगुरुभजनप्रकार**

**कर्तृत्व कोणासी आलें । आणि उत्पन्न काय केलें । हें आतां पाहिजे धुंडिलें । सप्रतीत।।१।। केलें तें आधी पाहतां। मग कळेल कीं कोण कर्ता। म्हणोनि पाहावें आतां। केलें तें काय।।२।। स्पर्शादिवर्ण अनादि असती । ॐकार त्रिमात्राची गती । शब्दगुण आकाशाची प्रतीति । अनादीच असे।।३।।वेदशास्त्र ते अनादि । आणि अर्थ तो सर्वा आदि । तरी केलें हें प्रतिपादी । नूतन कोण।।४।।केलें तें न दिसे कोठें । तरी तें व्यर्थ अवघें खोटें । मग कर्तेपणाचें तुटे । मूळ सहजचि।।५।।तथापि देहासी करणें घडे । तरी हे सुषुप्तींत न करी मढें । देहावीण इंद्रिया राहणें न घडे । मा करणें कैंचें।।६।।प्राण तो जडत्वें न करिती । बुद्ध्यादि परप्रकाशें वर्तती । देहावीण तया आदिअंती । रूपचि नाही।।७।।आत्मा तरी निराभास। मिथ्यात्वें न करी चिदाभास। उभयतादात्मीं तयास। कर्तृत्व जरी।।८।। तादात्म्य अज्ञाने केलें । ज्ञान होतां तें नासलें । आतां हें कर्तृत्व आलें । कोठें पहा ।।९।। केळीचा गाभा पाहूं जातां । सर्व टरफलें येती हातां । तरी जयाचें नांव कर्ता । तो खपुष्पापरी।।१०।। कर्ता ठाईचा जन्मेना। केलें तें मिथ्या नाना । तरी आतां बोलावे ना।केलें न केलें ।।११।।**

---

**पंचिका १४वी, समास ५वा - ग्रंथाकर्तृत्वगुरुभजनप्रकार**

कर्तृत्व कोणाचे आणि त्याने केलेल्या निर्मितीचे स्वरूप काय आहे, हे आता अनुभवाच्या प्रकाशात धुंडाळले पाहिजे.(१) प्रथम काय केले ते पाहू. म्हणजे आपोआपच कर्ता कोण आहे, ते कळेल म्हणून आता काय केले आहे ते पाहू.(२) स्पर्शादी वर्ण अनादी आहेत. ओंकार, त्रिमात्रांची गती, आकाशाचा शब्दगुण हे सर्व अनादीच आहेत.(३) वेदशास्त्रही अनादी आहे आणि अर्थही सर्वांच्या अगोदरचा आहे. तर मग 'हे केले ते सर्व नवीनच आहे' असे कोण सांगतो?(४) जे केले ते कुठेच दिसत नाही. ते सर्व व्यर्थच होय. सर्व खोटेच आहे असे ठरते. मग कर्तेपणाचे मूळही आपोआपच तुटते.(५) तरीसुद्धा देहाकडून कर्म घडतेच. मग सुषुप्तीत हा देह मढ्यासारखा असतो. तेथे काहीच करत नाही. इंद्रिये देहावाचून राहत नाहीत. मग त्यांना काही करणे कसे शक्य होईल?(६) प्राण तर जड असल्यामुळे काही करू शकत नाहीत. बुद्धी इत्यादी परप्रकाशाने वागतात आणि देहावाचून त्यांना केव्हाही रूपच नाही.(७) आत्मा तर निराभासच असतो. जीव मिथ्या असल्यामुळे काही करत नाही. उभय तादात्म्यामुळे (जीव हा आत्मा आणि देह या दोहोंशीही तादात्म्य पावू शकतो.) त्याला कर्तृत्व येते, असे म्हटले तर,(८) तादात्म्य अज्ञानाने केलेले असते. त्यामुळे ज्ञान होताच ते केलेले नष्ट होते, मग कर्तृत्व कोठे येते?(९) केळीचा गाभा पाहू गेल्यास सर्व सोपटीच हाताशी येतात. अशा परिस्थितीत ज्याला कर्ता असे नाव देऊ शकू तो आकाशाच्या फुलाप्रमाणे मिथ्याच होय.(१०) कर्ता मुळातच जन्म पावत नाही. जे केले ते सर्व मिथ्या असल्यामुळे हे केले, ते केले नाही,असे बोलूच नये.(११)

१७६ग – काढितांही ऊसीं उसु।



**सर्व ब्रह्मांड जेणें केलें।तेथें कर्तृत्व नाहीं आलें। मृगजळासी वडवणिलें। हे मिथ्या शब्द।।१२।। मागील वर्ण पुढें जोडी। पुढिल नेले मागिलकडि। इतुक्या हेतु उगाचि बडबडी। कर्तेपणें।।१३।। असो सद्गुरूनाथ हें मीपण।उरोंचि नेदी आपण।सर्व जालें जें निरूपण।कोणे रीती कळेना।।१४।।आदिअंती हा सद्गुरू।मध्येंहि तयाचा विस्तारु।मी मी हा कैचा चोरु।उरला तेथें।।१५।।पेरिला तेव्हां असे उसु।वाढतांही म्हणावें उसु।रसरूप अवघा।।१६।।मुळीं कंदही दिसेना।सेंडा फळ हि असेना।मध्ये कणिसहि लागेना।तरी निर्फळ नव्हे।।१७।। ऊस सर्वांगी सफळ।तेथें कल्पू नये फळ ।म्हणून हा सद्गुरू दयाळ ।ग्रंथा आदिअंती।।१८।। डोरलियाचिया व्रता।पुसे विमानाची वार्ता।तैसे नसे गा वेदांता।सप्रतीत ज्ञान।।१९।।शब्दासरिसे भरंगळले। तरी तें जाणावे व्यर्थ गेलें। अर्थरूपचि श्रवणें जालें । या नांव प्रतीति।।२०।।पापाची खंडणा देहबुद्धीसहीत। होता होइजे निभ्रांत। ब्रह्मरूप होय निवांत। या नांव प्रतीति।।२१।।भोजन करितां होय तृप्ति।सर्वेचि ढेंकरु असे देती।हेचि मुख्य फलश्रुति।दुजा पुसणें नलगे ।।२२।। दृश्य पाप वोसरले । पुण्य परब्रह्म उरलें । तरीच प्रतीत बाणलें । समाधान अंगीं ।।२३।।**

---

सर्व ब्रह्मांड ज्याने केले त्याकडे तर कर्तृत्व येऊ शकत नाही. तेव्हा 'मृगजळावर वडवण बांधले'हे शब्द मिथ्या ठरतात.(१२)मागील अक्षरे पुढे जोडले किंवा पुढील वर्ण मागे नेलै, एवढ्या कारणासाठी अमुक कर्ता म्हणून बडबड करणे व्यर्थ होय.(१३) असो, सद्गुरूनाथ आपण होऊन हे मीपण राहूच देत नाहीत. त्यामुळे हे निरूपण कशा प्रकारे झाले हे कळतच नाही.(१४) श्रीगुरू आद्यन्ती (आरंभापासून ते शेवटपर्यंत) आहेत.मध्येही तेच व्यापून आहेत. तेव्हा 'मी मी' हा चोर तेथे कसा उरेल?(१५)पेरताना ऊसच होता,वाढल्यावरही तो ऊसच होता, काढल्यावरही तो ऊसच होता; या सर्व अवस्थांमध्ये तो रसानेच भरलेला होता.(१६)त्याच्या मुळाशी कंदही दिसत नाही,की शेंड्याला फळ नाही अथवा मध्ये कणीसही लागत नाही,तरीही तो निर्फळ आहे असे म्हणता येत नाही.(१७)तेव्हा ऊस सर्वांगांनी सफलच असतो तेथे फळाची अपेक्षा करू नये. त्याप्रमाणे दयाळू सद्गुरू ग्रंथाच्या आद्यन्ती आहेत.(१८) 'डोरल्याच्या व्रताला विमानाची चौकशी'असा प्रकार वेदान्तात नाही.वेदान्तातील सर्वज्ञान प्रत्यक्ष अनुभवाने सिद्ध झालेले असते.(१९)शब्दालाच चिकटून असल्यामुळे शब्दाबरोबरच घरंगळत जाणारे ज्ञान असेल तर ते ज्ञान व्यर्थ गेले असे समजावे.तेव्हा शब्दाच्या आतील अर्थरूपानेच त्याचे श्रवण झाले आणि त्या श्रवणाने जे अर्थरूपच अनुभवाला येते,याला प्रतीती असे म्हणतात.(२०)देहबुद्धीसहित सर्व पापाचे खंडन(निरसन)होऊन आपण भ्रांतिमुक्त होतो आणि निवांत ब्रह्मरूप होऊन उरतो यालाच प्रतीती म्हणतात.(२१)भोजन केल्यानंतर तृप्ती होते आणि त्यामुळे ढेकर देतात हीच भोजनाची मुख्य फलश्रुती होय. तिच्यासाठी दुसऱ्या कुणाला विचारायची गरज नाही.(२२) दृश्यरूपी पाप ओसरले, परब्रह्मरूपी पुण्य उरले तरच अनुभवाधिष्ठित समाधान प्राप्त होते. ते समाधान अंगात बाणते,प्रतीतीस येते.(२३)

**ऐसें सप्रतीत जरी कळलें । तरीच पाहिजे अंगिकारिलें । येर अवघेचि फोल जालें । शब्दजात।।२४।।असो,ज्ञान जालिया संपूर्ण । यावत्प्रारब्ध देहाचें वर्तन । मुक्ति वरील सद्‌गुरूभजन । हेंचि फल ज्ञानाचें।।२५।।तयाचीं लक्षणें कैसीं । अभिन्नपणें एकरसीं । चित्सागरीं लहरी जैसी । विलसत असे।।२६।।देहबुद्धि तरी दास । जीव तरी तुझा अंश। आत्मत्वीं तूं मी दोहींस। ठाव नाहीं।।२७।।संत सत् आणि सद्‌गुरु।हा नामभेदाचा प्रकारु। परी तो एकचि निर्विकारु । मीपणेंविण।।२८।।मीपणेंविण भजन। तेंचि नवविध लक्षण। सच्चरणा नुरावें भिन्न । वेगळेपणें।।२९।।श्रवण कीर्तन स्मरण । पादसेवन अर्चन । वंदन दास्य परिपूर्ण। सख्य निवेदन नववें।।३०।।हे नवविध परी एक । ऐक्यभक्तीचें कौतुक। जाला ग्रंथाचा विवेक । संपूर्ण येथुनी।।३१।।आतां संतासी विनवणी । सावध असावें श्रोतेजनीं । परोपकारालागुनी । वरप्रसाद" मागों।।३२।।श्रोते वक्ते बद्धांजलि । ऐकावया सरसावली । गुरुमाउली प्रसन्न जाली । म्हणती त्वरा करा।।३३।।संत सद्गुरु अति उदार। चिद्‌गगनीं उदेला दिनकर । साधक मुमुक्षु त्यासमोर । प्रार्थिते जाले ।।३४।। सद्‌गुरुसी जे अनन्यशरण । तत्काल व्हावें द्वैतखंडण।संत म्हणती सुप्रसन्नवदन । तथास्तु तथास्तु।।३५।।**

---

असे प्रतीतीस आले तरच त्याचा स्वीकार करावा. तद्‌व्यतिरिक्त इतर सर्व शब्दांचा फापटपसारा व्यर्थ होय.(२४) असो, संपूर्ण ज्ञान झाल्यानंतर प्रारब्ध असेतो देहाची वागणूक चालू असते. तोपर्यंत हे मुक्तीवरील सद्‌गुरुभक्ती चालू असणे हेच ज्ञानाचे फळ होय.(२५)त्या भक्तीचे स्वरूप कसे असते? चैतन्यसागरात तद्रूप झालेली, एकजीव झालेली लाट अभिन्नपणे वावरते तेच तिचे स्वरूप होय.(२६)मी देहबुद्धियुक्त असलो तरी तुझाच सेवक आहे, जीव असलो तरी तुझाच अंश आहे, आत्मस्वरूपात तू, मी अशा प्रकारच्या भेदाला जागाच नाही.(२७)संत, सत् आणि सद्‌गुरू हा केवळ नामभेदाचा प्रकार असला तरी त्यांच्या रूपाने मीपणाविरहित एकच असलेले निर्विकारी तत्त्व तेथे असते.(२८) मीपणावाचून भजन ही नवविध उपासना होय. सद्रूप सद्‌गुरुचरणांपासून वेगळेपणाने उरू नये हेच तिचे लक्षण आहे.(२९) ही नवविध भक्ती श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, परिपूर्ण दास्य, सख्य आणि आत्मनिवेद या स्वरूपात असते.(३०) हे नवविध असूनही एकरूप असतात. हेच या ऐक्यभक्तीचे कौतुक आहे. ग्रंथाचा विचार येथे पूर्ण झाला.(३१) आता श्रोत्यांनी सावध असावे. संतांनाही विनंती करतो. आता सद्‌गुरूंकडे परोपकाराच्या उद्देशाने वरप्रसाद मागू.(३२) श्रोते आणि वक्ते उभयता दोन्ही हात जोडून ऐकण्यासाठी सरसावले. गुरुमाउली प्रसन्न होऊन म्हणाले, "लवकर मागा."(३३)संत-सद्‌गुरू अतिशय उदार असून चिदाकाशात उगवलेल्या सूर्यासारखेच होत. साधक, मुमुक्षू त्यांच्यासमोर प्रार्थना करू लागले.(३४) "सद्‌गुरूंना जे अनन्यभावाने शरण जातात त्यांच्या मनातील द्वैताचे तत्काल खंडन व्हावे"संत सुप्रसन्न वदनाने म्हणाले, 'तथास्तु, तथास्तु' (३५)

**अहंकाराचा वारा । न लागो तया सकुमारा । निघती संत मुखोद्गारा । तथास्तु तथास्तु।।३६।। कल्पनेची ऊष्ण झळी । न स्पर्शोचि साधककुळीं । म्हणती संत मुखकमळीं । तथास्तु तथास्तु।।३७।।माइकाची भीड न पडो । गुरुचरणीं वृत्ति दडो । संत म्हणती तैसेंचि घडो। तथास्तु तथास्तु ।।३८।। स्वस्वरूपाचा विसरु । क्षणभरी न होअवसरू । ऐकतां बोलती सद्गुरू । तथास्तु तथास्तु ।।३९।। गुरुनामेंवीण शिणे वाणी। तरी जिव्हा जावो झडोनी। संत उदार बोलती तत्क्षणीं । तथास्तु तथास्तु ।।४०।। गुरुविण देखे जरी अनेक । तरी तत्क्षणीं फुटो हा मस्तक । संत बोलती अलोलिक । तथास्तु तथास्तु।।४१।।मी ब्रह्म हें ही मुरो। परी सद्गुरुचरणीं उरो। संत म्हणती वासना पुरो। तथास्तु तथास्तु।।४२।।झाला एकचि जयजयकार। वरदाष्टकाचा प्रकार। मौनेचि घातले नमस्कार। अनन्यभावें।।४३।।या वरदाष्टकाचे विश्वासें।लागती सद्गुरूचे कासे।तयासि फल तें कायसें।फलरूप होय।।४४।।**

**इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे । ग्रंथाकर्तृत्वगुरुभजनप्रकारे । पंचमसमासः ।।५।।**

**इति उपसंहारपंचिका संपूर्णा ।।१४।। ओवीसंख्या १८४. उत्तरार्ध ओवीसंख्या १४४३**

**।। इति श्रीमदागमसारः समाप्तः ।। एकंदर संख्या ३५२६**

---

"त्या सुकुमार गुरुभक्ताला अहंकाराचा वारा लागू नये" तेव्हा संतांच्या मुखातून उद्गार निघतात, 'तथास्तु, तथास्तु'(३६) साधकांच्या सर्व समुदायाला कल्पनेच्या उष्ण झळयांनी स्पर्श करू नये" यावर संत मुखकमलांनी उद्गारले, 'तथास्तु, तथास्तु'.(३७) "त्यांना मायिकाची (मायेने निर्माण केलेल्या गोष्टींची) भीड पडू नये त्यांची वृत्ती गुरुचरणामध्ये दडून राहो' यावर संत म्हणाले, "तसेच घडेल. तथास्तु तथास्तु".(३८) त्यांना स्वस्वरूपाचा कधीच विसर पडू नये. त्यासाठी (विसर पडण्यासाठी) त्यांना क्षणभराचाही अवसर मिळू नये." हे ऐकताच सद्गुरू म्हणतील, 'तथास्तु, तथास्तु'.(३९) "गुरूंच्या नामावाचून जर वाणी शिणत असेल तर ती जीभ झडून जावो" त्याक्षणी उदार हृदयाचे संत म्हणतात, 'तथास्तु, तथास्तु'.(४०) "गुरूंना विसरून जर अनेकांचे दर्शन घडले तर त्याक्षणी हे मस्तक फुटून जावो" त्यावेळी संत प्रेमळपणाने म्हणतात, 'तथास्तु, तथास्तु'.(४१) "मी ब्रह्म ही जाणीवही मुरून जावो. पण सद्गुरुचरणी मात्र एकनिष्ठपणाने उरो." संत लगेच म्हणतात, 'तुझी ही इच्छा पूर्ण होवो, तथास्तु, तथास्तु'.(४२) अशा प्रकारे वरदाष्टकाचा हा प्रकार संपूर्ण झाला. मग एकच जयजयकार झाला. मग सर्वांनी मौनानेच अनन्यभावाने नमस्कार घातले.(४३) या वरदाष्टकावर भरवसा ठेवून सद्गुरूंचा जे आश्रय करतील, त्यांना कोणते फळ द्यायचे? ते स्वत:च फलस्वरूप होतात.(४४)



## पद

शिष्यहि वंचक गुरुहि वंचक तेथें परलोक कैचा दोघा ॥१॥
शिष्य आज्ञा लंघी गुरु द्रव्य हरी वंचक निर्धारी दोघे ऐसे ॥२॥
शिष्य भावहीन गुरु ज्ञानहीन दोघेही समान नुद्धरती ॥३॥
शिष्य भाव दावी मंत्राचे पुरता ज्ञान बोले वरुता द्रव्यलोभें ॥४॥
वेद म्हणे ऐसे गुरुशिष्य उभय तरणाचा उपाय तेथें नाहीं ॥५॥

-श्रीहंसराजस्वामी

## श्रीहंसराजस्वामींची आरती

जय जय जय जय आरति सद्गुरु नारायण हंसा ।
आरति ओवाळितांची देहबुद्धी नुरे सहसा ॥धृ.॥
मायाविपिनी बहु जिव भ्रमले उमजेना कोणा ।
व्यवहारीं सुखदुःख कष्ट भोगीती नाना ॥
या तळमळिची सद्गुरुलागी आली बहु करुणा ।
म्हणुनी समर्थ व्यक्ति धरोनी उपदेशिति ज्ञाना ॥१॥
दर्शनमात्रे अधिकाराते पावती सकळ ।
व्यतिरेकाने निजरुप दाउनि तोडिति भवजाळ ॥
तेचि अन्वये पाहता विरती सर्वहि तळमळ ।
यास्तव निजपदकमळी लोळे चिमणेसे बाळ ॥२॥

-श्रीहंसभक्त चिमणकवी अकलनूरकर

**॥ श्रीसद्गुरुचरणारविंदार्पणमस्तु ॥**